# अनुक्रमणिका

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

# जीवनसंहिता

## परिचय

जीवनाचा भरपूर लाभ घेणे, यथायोग्य आनंद प्राप्त करणे आणि खऱ्या अर्थाने यशस्वी जीवन पार पाडणे खात्रीने आपला हक्क आहे, मात्र त्याच वेळी जेव्हा जीवनयापनाची कुशलता आपण जाणत असाल, यशस्वी जीवनाच्या नियमांशी व शिष्टाचारांशी परिचित असाल, एवढेच नव्हे तर त्या नीतीनियमांना व शिष्टाचारांना आचरणात आणून आपल्या जीवनाला सुशोभित बनविण्याच्या प्रयत्नात सातत्याने कार्यरत आपण राहता.

सुसंस्कार आणि चांगली आचरणशैली, प्रतिष्ठा आणि सुसभ्यता, शुध्दता आणि शुचिर्भूतता अभिरुचि आणि चांगली निवड, क्रमबध्दता आणि व्यवस्थापन, अनुभूतिची सूक्ष्मता आणि चांगली आवड, उच्च नीतीमत्ता आणि सभ्यता, सहानुभूती आणि शुभ चिंतन, मृदु संभाषण आणि वाक्–मधुरता, आदर आणि विनम्रता, त्याग आणि बलिदान, नि:स्पृहता आणि सचोटी, धैर्यशील स्वभाव आणि पुरुषार्थ, कर्तव्याची जाण आणि तत्परता, ईशभीरुता आणि दुराचारापासून अलिप्तता, ईश्वरावर निष्ठापूर्वक भरवसा आणि साहस, पूर्ण कृतिशीलता इत्यादी. ही इस्लामी जीवनाची ती नीतीमूल्ये होत, ज्यांच्यामुळे ईमान राखणाऱ्या माणसाच्या सुशोभित जीवनात ती असाधारण आकर्षण आणि अथांग ओढ निर्माण होते. केवळ इस्लामचे अनुयायीच नव्हे तर इस्लामशी अनभिज्ञ असलेले इतर लोकदेखील अनावर होऊन त्याच्याकडे खेंचले जातात. मग सर्वसामान्य बुध्दी हा विचार करण्यास विवश होते की मानवतेला वृध्दिंगत करणारी जी संस्कृती, मनुष्यजीवनाला सुशोभित करण्यासाठी आणि असाधारण आकर्षणाने सजविण्यासाठी मानवजातीला अनमोल नीतीनियमांचा आणि शिष्टाचारांचा नजराणा प्रदान करते, ती निश्चितच हवा आणि प्रकाशाप्रमाणे समस्त मानवांची सर्वसामान्य वारसासंपत्ती आहे. नि:संशय या योग्यतेची आहे की संपूर्ण मानवजाती याचा स्वीकार करुन तिच्या आधारावर आपल्या व्यक्तिगत व सामूहिक जीवनाची यशस्वी उभारणी करील. अशासाठी की ऐहिक जीवन सुखा-समाधानाने, शांती-सुबत्तेने आणि सुखरूपपणे पार पडावे आणि मरणोत्तर जीवनात ते सर्वकाही प्राप्त व्हावे जे एका सफल आणि यशस्वी जीवनाकरिता आवश्यक आहे.

प्रस्तुत 'जीवन-दर्शन' मूळ उर्दू भाषेतील 'आदाब-ए-जिन्दगी'चे मराठी रूपांतर आहे. त्यात इस्लामी संस्कृतीच्या नियम व शिष्टाचारांना सुयोग्य क्रमासह सादर करण्याचा प्रयत्न केला गेला आहे. अल्लाहचा ग्रंथ (दिव्य कुरआन), पैगंबर मुहम्मद (स.) यांची आदर्श आचरण आणि पूर्वीच्या सदाचारी लोकांच्या चिरसजीव स्मृती-अवशेषांचे मार्गदर्शन आणि इस्लामी आवड व प्रवृत्तीच्या प्रकाशात जीवनयापनाची यथोचित शैली शिकविणारा हा संग्रह संकलित केला गेला आहे. जो पाच महत्त्वपूर्ण अध्यायांवर आधारित आहे.

पहिला अध्याय - वर्तनकौशल्य आणि संस्कृती

दुसरा अध्याय - उत्तम उपासना

तिसरा अध्याय - समाजसौंदर्य

चौथा अध्याय - धर्माचे आवाहन

पाचवा अध्याय - दास्यत्वाची जाणीव

या पाच अध्यायांना अनुसरून जीवनाच्या सुमारे सर्वच पैलूंशी संबंधित इस्लामी संस्कार आणि शिष्टाचारांना 'प्रभावशाली क्रम', 'साधी व सरळ भाषा', 'सर्वांच्या आकलनात येणारे व मनमोहक स्पष्टीकरण' आणि 'अंतर्दृष्टीवर्धक पुरावे' इत्यादींसह संबोधनपूर्ण शैलीत अनुक्रमाने सादर केले गेले आहे.

आशा आहे की 'जीवन-दर्शन'च्या स्वरूपात नीतीमूल्यांचा हा संग्रह प्रत्येक वर्ग आणि प्रत्येक वयाच्या वाचकाकरिता अल्लाहच्या असीम कृपेने अपेक्षाप्रत लाभदायक ठरेल. इस्लामशी प्रेम राखणारे बांधव आणि भगिनी या अमूल्य संस्कार व शिष्टाचारांना आणि मांगल्यपूर्ण दुआ-प्रार्थनांना आचरणात आणून आपले जीवन सुशोभित करतील आणि आपल्या किशोरवयाच्या मुला-मुलींचे चारित्र्य व सवयी आणि वर्तनपध्दतींनाही सुधारतील आणि त्यांना चांगली माणसे बनविण्याचा प्रयत्न करतील. शक्यतो लहान मुला-मुलींना हे संस्कार, शिष्टाचार आणि दुआ-प्रार्थना तोंडपाठ कराव्यात. नि:संशय या सुसंस्कारांनी सुशोभित झालेले जीवन या जगातही मानसन्मानपूर्वक आणि प्रेम व श्रध्दापूर्ण नजरेने पाहिले जाईल आणि पारलौकिक जीवनातही चांगला मोबदला व इनामास पात्र ठरेल.

ग्रंथसंकलनास्तव ज्या अन्य महत्त्वपूर्ण ग्रंथांपासून लाभ घेतला गेला आहे, त्यांचे संदर्भ त्याचप्रसंगी दिले गेले आहेत.

सर्वश्रेष्ठ, सर्वव्यापी, सर्वज्ञ अशा अल्लाहशी दुआ-प्रार्थना आहे की त्याने या सेवेला स्वीकृतीचा मान प्रदान करावा आणि मुस्लिमांना सुबुध्दी द्यावी की त्यांनी या संस्कार व नितीमूल्यांद्वारे आपल्या जीवनास सुशोभित करून इस्लामकरिता हृदयात स्थान, आवड व श्रध्दा निर्माण करावी आणि हा संग्रह अल्लाहच्या दासांना अल्लाहच्या सत्यधर्माकडे आकृष्ट करण्यात एक प्रभावी साधन आणि संकलकाकरिता एक अल्लाहतर्फे क्षमा केले जाण्याचे निमित्त ठरावे आणि त्या धर्मसेवकांनाही अल्लाह भलाईपूर्ण मोबदला प्रदान करो, ज्यांच्या बहुमूल्य ग्रंथापासून लाभ घेतला गेला आहे. आमीन.

मुहम्मद यूसुफ इस्लाही
रामपूर
३० ऑगस्ट १९६८

## प्रकरण - १

# सभ्यता व संस्कृती

## १. स्वच्छता व शुचिर्भूततेचे नीतीनियम

ईश्वराने त्या लोकांना आपले प्रिय दास ठरविले आहे, जे स्वच्छता व पवित्रतेची पुरेपूर ईमान राखतात. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे. ‘‘स्वच्छता व पवित्रता अर्धे ईमान आहे.’’ अर्थात अर्धे ईमान म्हणजे माणसाने आपला आत्मा शुध्द राखावा आणि अर्धे ईमान हे की माणसाने आपले शरीरही शुध्द राखावे.

आत्म्याची शुध्दता ही की त्याला कुफ्र (द्रोह) आणि शिर्क (अनेकेश्वरत्व) तसेच दुराचार व अपराधाच्या घाणीपासून शुध्द करून सदाचारपूर्ण श्रध्दा आणि पावित्र्यपूर्ण आचरणाने सुशोभित करते. शरीराची शुध्दता म्हणजे त्यास बाह्य स्वरुपाच्या घाणींपासून शुध्द करून पावित्र्य आणि नीटनेटकेपणाच्या नीतीनियमांनी सुशोभित करणे आहे.

१) झोपून उठल्यावर हात धुतल्याविना पाण्याच्या भांड्यात हात टाकू नये. कोण जाणे झोपलेल्या स्थितीत स्वत:चा हात कोणकोणत्या ठिकाणी पडला असेल.

२) स्नानगृहाच्या जमिनीवर लघवी करण्यापासून अलिप्त राहा. विशेषत: अशा वेळी जेव्हा स्नानगृहाची जमीन कच्ची असेल.

३) शौचादि विधी पार पाडताना न काबागृहाच्या दिशेकडे तोंड करून बसावे आणि न त्या दिशेकडे पाठ करून बसावे. लघवी केल्यानंतर वीटेचा तुकडा किंवा पाण्याने स्वच्छता प्राप्त करावी. लीद, हाडे आणि कोळसा इ. वस्तूंनी स्वच्छता प्राप्त करू नये. हा विधी पार पाडल्यावर साबण किंवा मातीने हात चांगले स्वच्छ धुवून घ्यावेत.

४) शौच किंवा लघवी लागलेली असताना जेवणासाठी बसू नये. आधी हा विधी आटोपून घ्यावा नंतर जेवणास बसावे.

५) भोजन करताना उजव्या हाताचा वापर करावा. वुजू करतानाही उजवा हात प्रयोगात आणावा. लघवीनंतर अवयव स्वच्छ करताना आणि नाक वगैरे साफ करताना डावा हात प्रयोगात आणावा.

६) नरम (शोषून घेणाऱ्या) जागेवर लघवी करावी, यासाठी की शिंतोडे उडू नयेत. नेहमी बसून लघवी करावी. परंतु जमीन बसण्यायोग्य नसेल किंवा अन्य एखादी विवशता असेल तर उभे राहून लघवी करू शकता, परंतु सर्वसामान्य स्थितीत ही मोठी घाणेरडी सवय आहे. जिच्यापासून सक्तीने दूर राहिले पाहिजे.

७) नदी किंवा पाटाच्या किनारी, लोकांच्या येण्या-जाण्याच्या रस्त्यावर आणि छायादार ठिकाणावर मल-मूत्र विसर्जनासाठी बसू नये. अशाने इतर लोकांनाही त्रास होतो आणि असे करणे शिष्टाचार व संस्कृतीच्या विरुध्द आहे.

८) शौचास जाताना पायात चप्पल घालून व डोक्यावर टोपी वगैरे घालून जावे आणि जाताना ही दुआ करावी.

"अल्लाहुम्मा इन्नी आऊजुबि-क मिनल खुबुसि वल खबाइस"

اَللّٰهُمَّ اِنِّیْٓ اَعُوْذُبِكَ مِنَ الْخُبُثِ وَالْخَبَآئِثِ (بخاری، مسلم)

हे अल्लाह ! तुझा आश्रय इच्छितो सैतानांपासून त्या सैतानांपासूनही जे पुरूष आहेत आणि त्यांच्यापासूनही ज्या स्त्रिया आहेत. (हदीस : बुखारी, मुस्लिम)

आणि शौचलयातून बाहेर पडल्यावर ही दुआ करावी.

"अल-हम्दु लिल्लाहिल्लज़ी अज़-ह-ब अन्निल अज़ा व आफ़ानी"

اَلْحَمْدُ لِلّٰهِ الَّذِیْٓ اَذْهَبَ عَنِّی الْاَذٰی وَعَافَانِیْ (نسائی، ابن ماجہ)

अल्लाहचा आभारी आहे, ज्याने माझा त्रास दूर केला व मला आराम पोहचविला.'

(हदीस : नसई , इब्ने माजा)

९) नाक साफ करण्यासाठी किंवा बलगम वगैरे थुंकण्यासाठी सावधगिरीने थुंकदान वापरावे अथवा लोकांच्या नजरेस न पडेल अशा रीतीने आपली गरज भागवावी.

१०) वारंवार नाकात बोट घालणे व नाकातली घाण काढणे इ. गोष्टी टाळाव्यात. जर नाक साफ करण्याची गरज असेल तर लोकांच्या नजरा चुकवून चांगल्या प्रकारे साफ करून घ्यावे.

११) रूमालात बलगम थुंकून मळण्याचे सक्तीने टाळावे. ही मोठी किळसवाणी सवय आहे. अगदी निरूपाय किंवा विवशता असेल तर गोष्ट वेगळी.

१२) तोंडात पान भरून अशा प्रकारे दुसऱ्याशी संभाषण करू नये की ज्यामुळे समोरच्या माणसावर शिंतोडे उडतील व त्याला त्रास होईल. त्याचप्रमाणे जर तंबाखू आणि पान जास्त प्रमाणात खात असाल तर तोंड स्वच्छ राखण्याचीही खूप काळजी घ्यावी आणि या गोष्टीची काळजी घ्यावी की वार्तालाप करताना आपले तोंड समोरच्या इसमाच्या जवळ नेऊ नये.

१३) वुजू (नमाज पढण्यापूर्वी चेहरा, तोंड, हात, पाय वगैरे धुण्याचा विधी) खूप इतमामासह करावा. सतत वुजूच्या अवस्थेत राहणे शक्य नसेल तर बहुतेक वेळा वुजूच्या अवस्थेत राहण्याचा प्रयत्न करावा. जिथे पाणी उपलब्ध नसेल, तिथे तयम्मुम (स्वच्छ मातीने वुजूचा विधी) करून घ्यावा. *"बिस्मिल्लाहिर्रहमा निर्रहीम"* असे म्हणून वुजूचा आरंभ करावा आणि वुजू करताना ही दुआ वाचावी.

"अशहदु अल्लाइला-ह-इलल्लाहु वह-दहु ला शरी-क
लहू व अश्हदु अन-न मुहम्मदन अबदुहू व रसूलुहू
अल्लाहुम्मज-अलनी मिनत्तव्वाबी-न वज-अलनी मिनल मु-त-तहहिरीन."

मी साक्ष देतो की अल्लाहखेरीज कोणीही उपास्य नाही, तो एकमेव आहे आणि त्याचा कोणीही सहभागी नाही आणि मी साक्ष देतो की मुहम्मद (स.) अल्लाहचे दास आणि त्याचे पैगंबर आहेत. हे अल्लाह! मला त्या लोकांमध्ये सामील कर जे अत्याधिक क्षमायाचना करणारे आणि अतिशय शुध्द राहणारे आहेत. (हदीस : तिर्मिजी)

वुजू करून झाल्यावर ही प्रार्थना करावी.

"सुब्हा-न-क अल्लाहुम-म व बिहम्दि-क अश्हदु अल्ला
इला-ह इल्ला अन-त अस्तग़िफ़रू-क व अतूबु इलै-क"

हे अल्लाह! तू पवित्र आणि श्रेष्ठतम आहेस आपल्या प्रशंसेसह मी साक्ष देतो की कोणीही उपास्य नाही मात्र तुझ्याखेरीज. मी तुझ्याकडे क्षमायाचना करतो आणि तुझ्याकडे रुजू करतो. (हदीस : नसई)

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे.

"कयामतच्या दिवशी माझ्या अनुयायींची ओळख ही असेल की त्यांचा माथा आणि वुजूचे अवयव तेजाने चकाकत असतील. तेव्हा जो मनुष्य आपले तेज वाढवू इच्छित असेल तर त्याने वाढवावे." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

१४) नित्यनेमाने मिस्वाक (दात घासणे) करावे. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे, "जर मला माझ्या संप्रदायातील लोकांच्या कष्ट-यातनांची जाणीव नसती तर मी प्रत्येक वुजूच्या वेळी त्यांना मिस्वाक करण्याचा आदेश दिला असता."

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ काही लोक आले. त्यांचे दात पिवळे पडले होते. पैगंबरांनी ते पाहिले तेव्हा ताकीद दिली, "मिस्वाक करत जा."

१५) आठवड्यातून एकदा तरी स्नान करून घ्यावे. जुमा अर्थात शुक्रवारी स्नानाची काळजी घ्यावी आणि स्वच्छ कपडे घालून जुमाच्या नमाजमध्ये सहभागी व्हावे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "अनामतीची अदायगी माणसाला जन्नतमध्ये नेते."

सहाबा (सहवासातील अनुयायी) नी विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स)! अनामतीशी अभिप्रेत काय आहे?"

सांगितले, “मलीनता व अपवित्रतेपासून शुध्द होण्यासाठी स्नान करणे. याहून श्रेष्ठ अशी अल्लाहने कोणतीही अनामत निर्धारित केली नाही. जेव्हादेखील माणसाला स्नानाची गरज भासेल तेव्हा त्याने स्नान करावे.”

१६) अपवित्रतेच्या अवस्थेत मशिदीत प्रवेश करू नये आणि न मशिदीमधून जावे. परंतु काहीही संभव नसेल तर मग तयम्मुम करून मशिदीत जावे किंवा तेथून बाहेर पडावे.

१७) डोक्यास तेल लावण्याची व केसांना विंचरण्याचीही काळजी घ्यावी. दाढीच्या वाढलेल्या अस्ताव्यस्त केसांना कैचीने नीटनेटके करावे. डोळ्यांत सुरमादेखील लावावा, नखे काढण्याची व स्वच्छ राखण्याचीही काळजी घ्यावी. साधेपणा व समतोल राखण्याची यथायोग्य काळजी घ्यावी.

१८) शिंकताना तोंडावर रूमाल धरावा, यासाठी की कोणावर शिंतोडे उडू नयेत.

शिंकल्यानंतर “अलहम्दुलिल्लाह” - ‘अल्लाहचा आभारी आहे’ असे म्हणावे.

ऐकणाऱ्याने “यरहमुकल्लाह” - ‘अल्लाह तुझ्यावर दया करो’ असे म्हणावे.

त्याला उत्तर म्हणून “यहदीकल्लाह” - ‘अल्लाह तुला मार्गदर्शन प्रदान करो’ असे म्हणावे.

१९) सुगंधाचा मोठ्या प्रमाणात वापर करावा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांना सुगंध अतिशय आवडत असे. पैगंबर मुहम्मद (स.) झोपून उठल्यानंतर जेव्हा शौचादि क्रिया आटोपून घेत, तेव्हा सुगंधी द्रव्य जरूर लावीत.

# २. स्वास्थ्यसंबंधी शिष्टाचार

१) स्वास्थ्य, ईश्वराने प्रदान केलेली महान देणगी आहे आणि फार मोठी अनामत आहे. स्वास्थ्याची कदर जाणा आणि त्याचे रक्षण करण्यात कधीही बेपर्वाई दाखवू नका. एकदा तब्येत बिघडली तर मोठ्या मुश्किलीने ठिकाणावर येते. ज्याप्रमाणे अगदी तुच्छ व किरकोळ वाटणारे कृमीकीटक मोठमोठ्या ग्रंथालयाला चाटून सफाचट करतात. तद्वतच प्रकृतीसंदर्भात क्षुल्लक गफलत आणि किरकोळ आजार जीवनाचा नाश करतो.

मनुष्यजीवनाची खरी रत्ने बुद्धी, चारित्र्य, ईमान व सुज्ञता आहेत. या रत्नांच्या निकोपतेचा आधार मोठ्या मर्यादेप्रत शारीरिक स्वास्थ्य आहे. बुध्दी आणि प्रज्ञेचा विकास, नैतिक लाभाच्या निकडी आणि धार्मिक कर्तव्यें पार पाडण्याकरिता शरीरस्वास्थ्य आधारशिलेचे स्थान राखते. दुर्बळ आणि रोगी शरीरात बुध्दी व प्रज्ञाही कमजोर असतात आणि त्यांचे कार्यही मोठे हतोत्साहित असते. जेव्हा जीवन इच्छा-आकांक्षा आणि चेतनाहीन होते, तेव्हा निश्चय व संकल्प कमजोर पडतात व भावनांचा आवेग नाहीसा होऊन त्या थंडगार होतात. असे निस्तेज जीवन, दुर्बल शरीराकरिता संकट ठरते.

जीवनात ईमानधारकाला जी उच्च कार्ये पार पाडायची आहेत आणि ईशप्रतिनिधित्वाच्या ज्या महान जबाबदारीला पार पाडायचे आहे त्यासाठी आवश्यक आहे की शरीरात प्राण असावा, बुध्दी व प्रज्ञा समर्थ असावी, निश्चय आणि संकल्पात दृढता व मजबुती असावी, धैर्यात खंबीरता व उच्चता असावी. समस्त जीवन इच्छा-आकांक्षांनी, उच्चतम भावनांनी, नेत्रददीपक चैतन्याने ओतप्रोत असावे. निरोगी व सुदृढ आणि चेतनापूर्ण हृदयाच्या माणसांद्वारेच जिवंत राष्ट्रे व जनसमूह बनतात. मग असेच जनसमूह जीवनांच्या कार्यक्षेत्रात उच्चतम त्याग आणि बलिदान सादर करून आपले स्थान निर्माण करतात आणि आपल्या कर्तृत्वाने जीवनाचे मूल्य आणि मात्रा निश्चित करतात.

२) नेहमी आनंदी, प्रसन्न, उल्हसित राहा. प्रसन्नचित्त, सदवर्तन, स्मितहास्य आणि सहृदयता इ. गुणांनी जीवनाला सुशोभित, आकर्षक आणि स्वास्थ्यपूर्ण राखा. दु:ख, क्रोध, क्लेश, काळजी, ईर्ष्या, द्वेष, अनिष्ट चिंतन, संकुचित दृष्टी, मृतप्राय मन आणि बौध्दिक गुंतागुंतीपासून दूर राहा. हे नैतिक आजार आणि बौद्धिक ताणतणाव जठराला वाईटरित्या प्रभावित करतात आणि पचनक्रियेतील बिघाड स्वास्थ्याचा फार मोठा शत्रू आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे,

" साधे सरळ राहा. मध्यममार्गाचा अंगीकार करा आणि प्रसन्नचित्त व उल्हासित राहा."

(हदीस : मिश्कात)

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एका म्हाताऱ्या माणसाला पाहिले की तो आपल्या दोन पुत्रांचा आधार घेत, त्यांच्या दरम्यान घसरत जात आहे. पैगंबरांनी विचारले, "या

म्हाताऱ्याला काय झाले आहे?"

लोकांनी सांगितले, "याने काबागृहापर्यंत पायी चालत जाण्याचा नवस मानला होता."

पैगंबरांनी सांगितले, "अल्लाह यापासून नि:स्पृह आहे की या म्हाताऱ्याने स्वत:ला यातनाग्रस्त करावे."

पैगंबरांनी त्या म्हाताऱ्याला आदेश दिला, "स्वार होऊन आपला प्रवास पूर्ण करा."

माननीय उमर (रजि.) यांनी एकदा तरूणाला पाहिले की तो कड्यासारखा चालत आहे. त्यांनी त्याला थांबविले आणि विचारले, "तुला कसला आजार आहे?"

तो म्हणाला, "कसलाही आजार नाही."

माननीय उमर (रजि.) यांनी आपला चाबूक उचलला आणि त्याला दरडावित म्हणाले, "रस्त्यावर सर्वशक्तीसह चाल."

पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा रस्त्यावरून चालत, तेव्हा अतिशय स्थिर पावले टाकत आणि अशा प्रकारे शक्तीसह चालत की जणू एखाद्या उतारावरून उतरत आहेत.

माननीय अब्दुल्लाह बिन हारिस (रजि.) उल्लेखितात, "मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याहून अधिक स्मितहास्य करणारा अन्य एखादा माणूस पाहिला नाही." (हदीस : तिर्मिजी)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या विशाल संप्रदायाच्या लोकांना जी दुआ शिकवली आहे तिचीही काळजी घ्यावी.

"अल्लाहुम-म अऊजु बि-क मिनल हम्भि वल-हुज़्नि वल- अज्ज़ वल-क-सलि व ज़ल-इद दैनि व ग-ल-बतिर्रिजाल."

हे अल्लाह! मी स्वत:ला तुझ्या आश्रयाखाली सोपविते, यातनापासून, दु:खापासून, विवशतेपासून, सुस्ती आणि आळसापासून, कर्जाच्या ओझ्यापासून आणि या गोष्टीपासून की लोकांनी माझ्यावर दबाव आणावा. (हदीस : बुखारी, मुस्लिम)

३) आपल्या शरीरावर सहन करण्यापलीकडे ओझे लादू नका. शारीरिक शक्तींना वाया घालवू नका. शारीरिक शक्तींचा हक्क आहे की त्यांचे रक्षण केले जावे आणि त्यांच्याकडून त्यांच्या सहनशक्तीनुसार समतोल राखून काम घेतले जावे.

माननीय आएशा (रजि.) सांगतात, पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे, "तेवढेच आचरण करा, जेवढे करण्याचे तुमच्या अंगी सामर्थ्य आहे." (हदीस : बुखारी)

माननीय अबू कैस (रजि.) सांगतात, ते पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत अशा वेळी हजर झाले, जेव्हा पैगंबर प्रवचन देत होते. माननीय अबू कैस उन्हात उभे राहिले. पैगंबरांनी आदेश दिला तेव्हा ते सावलीकडे सरकले. (अल अदबुल मुफरद)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मनाई केली की माणसाच्या शरीराचा काही भाग उन्हात राहावा आणि काही भाग सावलीत.

बाहला कबिल्याची एक स्त्री मुजीबा (रजि.) उल्लेख करतात, एकदा माझे पिता, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे धर्माचे ज्ञान प्राप्त करण्यासाठी गेले आणि (धर्माच्या काही महत्त्वपूर्ण गोष्टींची माहीती घेऊन घरी परतले. मग एक वर्षानंतर पुन्हा दुसऱ्यांदा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झाले (तेव्हा पैगंबर त्यांना मुळीच ओळखु शकले नाहीत) आणि विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर! आपण मला ओळखले नाही काय?"

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्माविले, "नाही! मी तर तुम्हाला ओळखले नाही. तुम्हीच तुमची ओळख करून द्या."

ते म्हणाले, "मी बाहला कबिल्याचा एक सदस्य आहे. गेल्या वर्षी आपल्या सेवेत हजर झालो होतो."

तेव्हा पैगंबर म्हणाले, "ही तुमची काय अवस्था होत आहे! गेल्या वर्षी जेव्हा आले होते तेव्हा तर तुमचा चेहरा-मोहरा आणि अवस्था फार चांगली होती!"

ते म्हणाले, "जेव्हापासून मी आपल्या जवळून गेलो, त्या वेळेपासून आतापर्यंत सातत्याने रोजे पाळत आहे. फक्त रात्रीच जेवतो."

पैगंबरांनी सांगितले, "तुम्ही निष्कारण स्वत:ला यातनाग्रस्त केले." (आणि आपल्या प्रकृतिचा नाश करून घेतला.)

मग पैगंबरांनी ताकीद केली, "रमजानमध्ये संपूर्ण महिनाभर रोजे राखा आणि याखेरीज प्रत्येक महिन्यात एक रोजा राखत जा."

ते म्हणाले, "पैगंबर! एका दिवसाहून अधिकची अनुमती द्या."

पैगंबर म्हणाले, "ठीक. प्रत्येक महिन्यात दोन रोजे राखत जा."

ते पुन्हा म्हणाले, "हुजूर! थोडी आणखी जास्तची अनुमती द्या."

पैगंबरांनी सांगितले, "महिन्यातून तीन दिवस."

ते म्हणाले, "पैगंबर, थोडी आणखी वाढ करून द्या."

पैगंबरांनी सांगितले, "ठीक. दरवर्षी आदरणीय महिन्यांमध्ये रोजे राखा आणि सोडून द्या. असेच दरवर्षी करा." हे सांगताना पैगंबरांनी आपल्या तीन बोटांनी संकेत केला. त्या बोटांना एकत्र जोडले, मग सोडून दिले. (याद्वारे ते हे सांगू इच्छित होते की रज्जब, शव्वाल, जीकादा, जिलहिज्जा या महिन्यांमध्ये रोजे राखा आणि एखाद्या वर्षी सोडून द्या.)

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे. "ईमान राखणाऱ्याकरिता उचित नाही की त्याने स्वत:ला अपमानित करावे."

लोकांनी विचारले, "ईमानधारक स्वत:ला कसा बरे अपमानित करतो."

सांगितले, "स्वत:ला असह्य कसोटीत टाकता." (हदीस : तिर्मिजी)

४) नेहमी कठीण परिश्रम, मेहनत आणि शौर्यतापूर्ण जीवन व्यतित करा. सर्व प्रकारची कठोर परिस्थिती झेलण्याची आणि अत्याधिक प्रतिकूल परिस्थितीशी सामना करण्याची सवय लावून घ्या आणि चिवट बनून साधे-सरळ आणि अन्याय-अत्याचाराविरुध्द लढा देणाऱ्या वीराचे जीवन जगण्याची काळजी घ्या. ऐशआरामाची इच्छा राखणारे, सहज-सोपे पसंत करणारे, नाजुकप्रिय, सुस्त, आळशी, भेकड आणि ऐहिकवादी बनू नका.

पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा माननीय मुआज बिन जबल (रजि.) यांना यमनचा गवर्नर बनवून पाठवू लागले. तेव्हा त्यांना ताकीद केली, "मुआज! स्वत:ला ऐषआरामाची अभिलाषा करण्यापासून अलिप्त राखा, अशासाठी की अल्लाहचे दास सुखविलासाची इच्छा राखत नाहीत." (हदीस : मिश्कात)

माननीय अबू उमामा (रजि.) म्हणतात, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"साधेपणाने जीवन व्यतीत करणे ईमानची निशाणी आहे." (हदीस : अबू दाऊद)

पैगंबर मुहम्मद (स.) साधे आणि (अल्लाहच्या मार्गात) प्रयत्नशील जीवन व्यतीत करीत आणि नेहमी आपले प्रयत्नशील सामर्थ्य वाचविण्याची व ते वाढविण्याची काळजी घेत असत.

पैगंबर मुहम्मद (स.) पोहण्यातही स्वारस्य राखत, यासाठी की पोहण्यात उत्तम व्यायाम होत असे. एकदा एका तलावात पैगंबर आणि त्यांचे काही सहकारी पोहत होते. पैगंबरांनी पोहणाऱ्यांपैकी प्रत्येकाची जोडी ठरवून दिली की प्रत्येकाने आपल्या जोडीदाराकडे पोहत जावे. यास्तव पैगंबरांचे साथीदार माननीय अबू बकर (रजि.) ठरले. पैगंबर पोहत जाऊन त्यांच्यापर्यंत पोहोचले आणि त्यांची मान धरली.

पैगंबर मुहम्मद (स.) यांना वाहनासाठी घोडा फार प्रिय होता. ते आपल्या घोड्याची खूप सेवा करीत. आपल्या हाताने त्याचे तोंड पुसत आणि स्वच्छ करीत. त्याच्या डोक्यावरील केसांना आपल्या बोटांनी विंचरीत आणि म्हणत, "भलाई याच्या माथ्याशी कयामतपावेतो जडलेली आहे."

माननीय उक्बा (रजि.) सांगतात, पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"धनुष्यबाण चालविणे शिका, घोड्यावर स्वार व्हा, तिरंदाजी करणारे, मला घोड्यांवर स्वार होणाऱ्यांपेक्षा अधिक पसंत आहेत. ज्याने तिरंदाजी शिकून सोडून दिली, त्याने

अल्लाहच्या देणगीची कदर केली नाही." (हदीस : अबू दाऊद)

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) सांगतात, पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"ज्याने धोक्याच्या प्रसंगी अल्लाहच्या मार्गात लढणाऱ्यांची देखभाल केली, त्याची ती रात्र शबेकद्रपेक्षा श्रेष्ठा आहे." (मुसतदरक हाकीम)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या सहकाऱ्यांना संबोधून सांगितले, "माझ्या जनसमूहावर ती वेळ येणार आहे जेव्हा इतर जनसमूह त्याच्यावर अशा प्रकारे तुटून पडतील, ज्या प्रकारे भोजन करणारे जेवणाच्या ताटावर तुटून पडतात."

तेव्हा एकाने विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर! त्या काळात आमची संख्या इतकी कमी होईल काय की आम्हाला गिळंकृत करण्यासाठी इतर जनसमूह एकत्र होऊन आमच्यावर तुटून पडतील?"

सांगितले, "नव्हे त्या काळात तुमची संख्या कमी नसेल, किंबहुना तुम्ही फार मोठ्या संख्येत असाल. परंतु तुम्ही महापुरात वाहून जाणाऱ्या कस्पटासमान भारहीन असाल. तुमच्या शत्रूंच्या मनातून तुमचा दबदबा निघून जाईल आणि तुमच्या मनात नेभळटपणा घर करील."

यावर एका माणसाने विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर! तो नेभळटपणा कशामुळे येईल?"

पैगंबरांनी सांगितले, "अशामुळे की तुम्ही या जगाशी प्रेम आणि मृत्युशी तिरस्कार करू लागाल."

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे. पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"सर्वोत्तम जीवन त्या माणसाचे जीवन आहे, जो त्याच्या घोड्याचा लगाम धरून अल्लाहच्या मार्गात त्याला धावत फिरतो. जिथे एखाद्या धोक्याची खबर ऐकली, घोड्याच्या पाठीवर बसून धाव घेतली. हत्या आणि मृत्युशी असा निर्भय आहे, जणू त्याच्या शोधात आहे." (हदीस : मुस्लिम)

५) स्त्रियांनीही कष्टाचे व परिश्रमाचे जीवन जगावे. घरातले कामकाज स्वत:च्या हातांनी करावे. चालण्या-फिरण्याची आणि यातना सहन करण्याची सवय लावून घ्यावी. ऐषआराम, आळस आणि कामचुकार वृत्तीपासून स्वत:ला अलिप्त राखावे आणि मुलांनाही सुरुवातीपासूनच मेहनती आणि कष्टाळू बनविण्याचा प्रयत्न करावा. घरात नोकर-चाकर असले तरी मुलांना लहान-सहान कामांकरिता नोकरांचा आधार घेण्यापासून मनाई करावी. त्यांना या गोष्टीची सवय लावावी की त्यांनी स्वत:चे काम स्वत:च्या हातांनी करावे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सहकाऱ्यांच्या पत्नी स्वत:च्या घरातली कामे आपल्या हातांनी करीत, स्वयंपाक करीत, जात्यावर बसून दळण दळीत, पाणी भरून आणीत, कपडे धूत, शिवणकाम करीत आणि मोठ्या कष्टाचे जीवन जगत. प्रसंग पडल्यास लढाईच्या मैदानावर जखमी योद्ध्यांना मलमपट्टी करण्याची व पाणी पाजण्याची व्यवस्था सांभाळीत. अशाने स्त्रियांचे स्वास्थ्य चांगले राहते आणि आचार-विचार चांगले राहतात. मुलांवर त्याचे चांगले परिणाम होतात. इस्लामच्या नजरेत चांगली पत्नी तीच आहे जी घरच्या कामात व्यस्त राहते आणि जी रात्रंदिवस अशा प्रकारे पैगंबरांनी घरगुती जबाबदाऱ्या पार पाडण्यात व्यस्त असते की तिच्या चेहऱ्यावरून परिश्रमाचा थकवा दिसून येतो आणि स्वयंपाकघरातील धुराचा परिणामही दिसून येतो.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"मी आणि धुळीने माखलेल्या गालांची स्त्री कयामतच्या दिवशी अशा प्रकारे असतील." (हे सांगताना पैगंबरांनी तर्जनी व मधले बोट जोडून दाखविले.)

६) सकाळी लवकर उठण्याची सवय लावा. झोप घेण्यात समतोल राखा. एवढे कमीही झोपू नका की शरीराला पूर्णत: आराम मिळणार नाही तसेच शरीरात थकवा आणि अंगदुखी राहावी. इतके जास्तही झोपू नका की अंगात सुस्ती व आळस निर्माण होईल. रात्री लवकर झोपण्याची आणि सकाळी लवकर उठण्याची सवय लावा.

प्रात:काळी उठून अल्लाहची उपासना करा आणि बाग किंवा मैदानात फेरफटका मारण्याकरिता निघा. सकाळची ताजी हवा प्रकृतीवर फार चांगला परिणाम करते. दररोज आपल्या शारीरिक सामर्थ्यानुसार योग्य आणि हलका-फुलका व्यायाम करण्याचीही काळजी घ्या.

पैगंबर मुहम्मद (स.) यांना बागेत फिरायला जाणे आवडत असे. कधीकधी स्वत: बागेत फिरायला जात असत. पैगंबरांनी इशाच्या नमाजनंतर जागण्यास आणि बोलण्यास मनाई केली आणि सांगितले,

"इशानंतर तोच माणूस जागू शकतो ज्याला काही धार्मिक विषयावर बोलायचे असेल किंवा कुटुंबियांशी आवश्यक ते बोलायचे असले."

७) आत्मसंयम राखण्याची सवय लावा. आपल्या भावना, विचार आणि कामवासनांवर काबू राखा. मनाला बहकण्यापासून, विचारांना भरकटण्यापासून आणि दृष्टीला स्वैरभैर होण्यापासून वाचवा. इच्छा-अभिलाषांचे बहकणे आणि दृष्टीच्या स्वैर होण्याने मन-मस्तिष्क सुख-शांतीला पारखे होते, असले चेहरे तारुण्याच्या सौंदर्यास, लावण्यास, आकर्षण आणि पौरूषीय वैशिष्ट्यांच्या मनमोहकतेस वंचित होतात. मग ते जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात नेभळट, निरुत्साह आणि भेकड ठरतात.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"डोळ्यांचा व्यभिचार वाईट नजर आणि जीभेचा व्यभिचार निर्लज्जतेच्या गोष्टी बोलणे होय. आत्मा निकड दर्शविते आणि लज्जास्थान एकतर त्याचे सत्य समर्थन करते किंवा त्यास खोटे ठरविते."

एका बुध्दिमान व्यक्तीने सांगितले आहे, "मुस्लिमांनो! व्यभिचाराच्या जवळही जाऊ नका. यात सहा प्रकारची हानी आहे. तीन प्रकारची हानी या जगातील आहे आणि तीन प्रकारची हानी पारलौकिक जीवनातील. या जगातील हानी ही की अशाने १) माणसाच्या चेहऱ्यावरील तेज आणि आकर्षण नष्ट होत जाते. २) माणसावर दारिद्र्य आणि गरजूवृत्तीचे संकट कोसळते आणि ३) त्याचे आयुष्य घटते."

८) मादक पदार्थांपासून दूर राहा. मादक पदार्थ मेंदूवर परिणाम करतात आणि जठरावरही. मद्य तर हराम (अवैध) आहेच, याखेरीजही ज्या वस्तू मादक आहेत, त्याही घेऊ नका.

९) कोणत्याही कामात मधला मार्ग पत्करा आणि साधेपणावर लक्ष द्या. शारीरिक श्रमात, बौध्दिक कामात, पती-पत्नी संबंधात, खाण्या-पिण्यात, झोप आणि आराम करण्यात, काळजी करण्यात व हसत राहण्यात, खेळ-करमणुकीत व उपासना करण्यात, बोलण्या-चालण्यात; तात्पर्य प्रत्येक कामात मधला मार्ग पत्करा आणि तो शुभ-मांगल्याचा आणि गुणवैशिष्ट्यांचा खजिना समजा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ वचन आहे,

"समृध्दी आणि संपन्नतेच्या अवस्थेत मधला मार्ग किती चांगला आहे, गरीबीच्या अवस्थेत मधलेवर्तन किती भले आहे आणि उपासनेत मध्यममार्ग किती उत्तम आहे."

(कंजुल आमाल)

१०) भोजन नेहमी वेळेवर घ्या. अधिक खाणे टाळा. सतत तोंड चालू ठेवण्यापासून अलिप्त राहा. भूक लागल्यावरच जेवण करा. जेव्हा थोडी भूक बाकी असेल तेव्हा हात आवरा. भुकेपेक्षा जास्त मुळीच खाऊ नका.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्माविले, "ईमानधारक एका आतडीत खातो आणि ईमान न राखणारा सात आतड्यांत खातो." (हदीस : तिर्मिजी)

पोट व्यवस्थित असल्यावरच आरोग्य यथायोग्य राहते. जास्त खाल्ल्याने मेदा खराब होतो.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ही गोष्ट एका उदाहरणाद्वारे समजावून सांगितली,

"मेदा (जठर) शरीराकरिता हौदाप्रमाणे आहे आणि धमन्या या हौदाद्वारे सिंचन केल्या जाणाऱ्या आहेत. म्हणून जर मेदा ठीक आणि स्वस्थ आहे तर धमन्याही आरोग्याने सिंचित होऊन परततील आणि जर जठर खराब व रोगी आहे तर धमन्या आजार शोषून परततील."

(हदीस : बैहकी)

कमी खाण्यावर प्रवृत्त करताना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हेदेखील सांगितले,

"एक माणसाचे भोजन दोन माणसांकरिता पुरेसे आहे."

११) नेहमी साधारण प्रकारचे भोजन घ्या. चाळून न घेतलेल्या पिठाची भाकरी किंवा पोळी खा. जास्त गरम पदार्थ खाणे टाळा. मसाले, चमचमीत, तिखट आणि गरजेपेक्षा अधिक स्वादिष्ट पदार्थ खाण्याचे टाळा. लवकर पचणारे, साधारण आरोग्यदायक आणि पौष्टिक भोजन पसंत करा. केवळ स्वाद प्राप्त करण्याची इच्छा धरू नका.

पैगंबर मुहम्मद (स.) न चाळलेल्या पिठाची भाकरी पसंत करीत. जास्त पातळ आणि मैद्याची पोळी पसंत करीत नसत. जास्त गरम भोजन, ज्यातून वाफ बाहेर पडत असे, खात नसत. किंबहुना थंड होण्याची वाट बघत.

पैगंबर मुहम्मद (स.) जास्त गरम भोजनाबाबत सांगतात, "अल्लाहने आम्हाला आग खाऊ घातली नाही आणि गरम जेवल्याने बरकत (समृद्धी) होत नाही."

पैगंबर मुहम्मद (स.) मांसाहार पसंत करीत, विशेषकरून मांडी, मान आणि पाठीचे मांस आवडीने खात असत. वास्तविक शरीराला शक्ती प्राप्त व्हावी म्हणून आणि अल्लाहच्या मार्गात शौर्यतापूर्ण स्वभाव बनविण्यासाठी मांस एक महत्त्वपूर्ण आणि आवश्यक भोजन आहे. ईमान धारकाची छाती (हृदय) नेहमी शौर्यतापूर्ण भावनांनी ओतप्रोत असली पाहिजे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जो मनुष्य अल्लाहच्या मार्गात जिहाद (प्रयत्नांची पराकाष्ठा) न करता मरण पावला आणि त्याच्या मनात तशी इच्छाही नव्हती तो निफाक (कपटाचारी) च्या एका अवस्थेत मरण पावला."

(हदीस : मुस्लिम)

१२) जेवण अतिशय शांती-समाधानाने खूप चांगले चावून खा. दु:ख, क्रोध आणि घाबरलेल्या अवस्थेत भोजन करणे टाळा. आनंद आणि बौध्दिक शांतीच्या अवस्थेत समाधानपूर्वक जे भोजन घेतले जाते ते शरीराला शक्तिदायक आहे आणि दु:ख, संताप व भयभीत अवस्थेत गिळलेले अन्न मेद्यावर वाईट परिणाम करते आणि अशाने शरीराला पूर्णपणे शक्ती लाभत नाही. भोजन करताना अगदी गप्प, दु:खी आणि उदास होऊन बसू नका आणि न मर्यादेबाहेर थट्टा-मस्करी व हास्य विनोदाचे फवारे उडवू नका. जेवताना मोठमोठ्याने हसणे प्रसंगी प्राणघातक ठरू शकते.

भोजन करताना समतोल राखून हसत बोलत राहा. आनंदाने जेवा आणि अल्लाहने प्रदान केलेल्या देणग्यांबद्दल त्याचे मनापासून आभार माना आणि आजारी असाल तर पथ्यही पुरेपूर पाळा.

उम्मे मुंजिर (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) माझ्या घरी आले. आमच्याकडे खजुरीचे घस लटकत होते. पैगंबर मुहम्मद (स.) त्यातून खाऊ लागले. माननीय अली (रजि.) देखील त्यांच्यासोबत होते. तेही खाऊ लागले, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यांना रोखले व म्हणाले, "तुम्ही नुकतेच आजारातून उठलात, तुम्ही खाऊ नका."

यास्तव माननीय अली (रजि.) यांनी खायचे थांबविले आणि पैगंबर मुहम्मद (स.) खात राहिले.

उम्मे मुंजिर (रजि.) म्हणतात, नंतर मी जव घेऊन शिजविले. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माननीय अली (रजि.) यांना सांगितले, "अली! हे खा. हे तुमच्याकरिता योग्य भोजन आहे." (हदीस : शमाइले तिर्मिजी)

पैगंबर मुहम्मद (स.) अतिथीबरोबर भोजन करताना त्याला वारंवार सांगत,

"खा आणि खा."

जेव्हा अतिथी पोट भरून जेवून घेत असे आणि अगदी इन्कार करीत असे, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) अधिक आग्रह करणे थांबवित. अर्थात पैगंबर मुहम्मद (स.) अतिशय प्रसन्न आणि आनंदी वातावरणात सुयोग्य वार्तालाप करीत भोजन घेत.

१३) दुपारचे जेवण घेतल्यानंतर थोडा वेळ कैलूला (आराम) अवश्य करा, रात्रीचे जेवण घेतल्यानंतर थोडा वेळ चालणे फिरणे करा आणि जेवणानंतर लगेच एखादे सक्त प्रकारचे बौध्दिक किंवा शारीरिक काम मुळीच करू नका. अरबी भाषेतील प्रसिध्द वाक्प्रचार आहे,

"दुपारचे जेवण घ्या तेव्हा ताणून द्या. रात्रीचे जेवण घ्या तेव्हा चालणे फिरणे करा."

१४) डोळ्यांच्या रक्षणाची खूप खूप काळजी घ्या. प्रखर प्रकाशाकडे पाहत राहणे टाळा. सूर्याकडे टक लावून पाहू नका. जास्त सौम्य किंवा जास्त प्रखर प्रकाशात वाचन करू नका. नेहमी साफ आणि मध्यम प्रकाशात वाचन करा. अधिक जागरण करणे टाळा. धूळ-फफोट्यापासून डोळ्यांना वाचवा. डोळ्यांत सुरमा लावा आणि नेहमी डोळे स्वच्छ राखण्याचा प्रयत्न करा. शेतात बागेत आणि हिरवळीत फिरायला जा. हिरवळ पाहिल्याने दृष्टी चांगली राहते. डोळ्यांना वाईट नजर टाकण्यापासून वाचवा. अशाने नेत्र नि:स्तेज होतात आणि स्वास्थ्यावरही वाईट परिणाम होतो.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"तुमच्या डोळ्यांचाही तुमच्यावर हक्क आहे. ईमानधारकाचे कर्तव्य आहे की अल्लाहच्या या देणगीची त्याने कदर जाणावी. तिचा अल्लाहच्या मर्जीनुसार वापर करावा. तिच्या संरक्षणाची व स्वच्छतेची काळजी घ्यावी, त्या सर्व उपाययोजनांचा अंगीकार करावा

ज्यांच्यामुळे डोळ्यांना फायदा पोहचतो आणि त्या गोष्टीपासून दूर राहावे ज्यांच्यामुळे डोळ्यांना हानी पोहचते.

अशाच प्रकारे शरीराच्या अन्य अवयवांचा व शक्तीच्या संरक्षणाचाही विचार राखावा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "लोकांनो! डोळ्यांत सुरमा लावत जा. सुरमा डोळ्यांतली मळ-धाण दूर करतो आणि केसांना उगवतो." (हदीस : तिर्मिजी)

१५) दातांच्या सफाईचा व संरक्षणाची काळजी घ्या. दातांना स्वच्छ ठेवल्याने आनंद प्राप्त होतो. पचनक्रियेवर चांगला परिणाम होतो आणि दात मजबूत राहतात. मिसवाकची सवय लावा. चांगल्या दंतमंजनाचाही वापर करा. पान किंवा तंबाखू वगैरेचा जास्त वापर करून दात खराब करू नका. खाण्यापूर्वी आणि खाल्ल्यानंतर दात चांगल्या प्रकारे स्वच्छ करून घेत जा.

दात घाणेरडे राहिल्याने वेगवेगळ्या प्रकारचे आजार निर्माण होतात. म्हणून पैगंबर मुहम्मद (स.) यांची सवय होती की ते जेव्हा झोपेतून जागे होत, तेव्हा मिसवाकने आपले तोंड साफ करून घेत. (हदीस : बुखारी, मुस्लिम)

माननीय आएशा (रजि.) यांनी निवेदन आहे,

"आम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकरिता वुजूचे पाणी आणि मिसवाक तयार ठेवीत. ज्या क्षणी अल्लाहचा आदेश होत असे, पैगंबर मुहम्मद (स.) उठून बसत आणि मिसवाक करीत. मग वुजू करून नमाज अदा करीत." (हदीस : मुस्लिम)

माननीय अनस (रजि.) यांचे कथन आहे, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "मी तुम्हाला मिसवाक करण्याबाबत खूप ताकीद केली आहे." (हदीस : बुखारी)

माननीय आएशा (रजि.) यांचे निवेदन आहे,

पैगंबर (स.) यांनी सांगितले, "मिसवाक तोंड स्वच्छ राखणारे आणि अल्लाहला राजी करणारे अस्त्र आहे." (हदीस : नसई)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "जर मी आपल्या उम्मत (जनसमूहा)करिता ओझे समजले नसते तर प्रत्येक नमाजच्या वेळी मिसवाक करण्याचा आदेश दिला असता." (हदीस : अबू दाऊद)

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या भेटीसाठी काही मुस्लिम हजर झाले. त्यांचे दात स्वच्छ न राखल्याने पिवळे पडले होते. पैगंबरांची नजर पडली, तेव्हा त्यांनी सांगितले,

"तुमचे दात पिवळे का दिसत आहेत? मिसवाक करत जा." (हदीस : मसनद अहमद)

१६) शौचास, लघवीची गरज असेल तर त्वरीत ती गरज पूर्ण करा. या गरजा रोखल्याने मेदा

(जठर) आणि मेंदूवर फार वाईट परिणाम होतो.

१७) शुचिर्भूतता आणि स्वच्छतेचा पुरेपूर इतमाम राखा. कुरआनात उल्लेख आहे,

"अल्लाह त्या लोकांना आपला प्रिय राखतो, जे अतिशय पाक व साफ राहतात."

*(दिव्य कुरआन)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"साफ-सफाई आणि शुचिर्भूतता अर्धे ईमान आहे."

स्वच्छता आणि पवित्रतेचे महत्त्व लक्षात घेता पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यासंबंधीचे आदेश स्पष्ट सांगितले आहेत आणि प्रत्येक मामल्यात स्वच्छता व पावित्र्याची ताकीद केली आहे.

खाद्यपदार्थांना व पिण्याच्या पाण्यास झाकून ठेवा, त्यांना अस्वच्छ होण्यापासून वाचवा. माशांपासून रक्षण करा. भांडी स्वच्छ राखा. कपडे आणि झोपण्या-बसण्याचे अंथरूण स्वच्छ ठेवा. उठण्या-बसण्याच्या जागा स्वच्छ राखा. शरीराच्या सफाईकरिता वुजू आणि स्नानाची काळजी घ्या. शरीर, कपडे आणि गरजेच्या सर्व वस्तूंची सफाई व शुचिर्भूततेने मनाला प्रसन्नता लाभते आणि शरीरालाही टवटवीतपणा मिळतो. अशा प्रकारे सर्वथा माणसाच्या आरोग्यावर यांचा अतिशय मनोहारी प्रभाव पडतो.

माननीय अदी बिन हातिम (रजि.) यांचे निवेदन आहे,

"जेव्हापासून मी इस्लाम धर्माचा स्वीकार केला आहे, प्रत्येक नमाजकरिता वुजू केलेल्या अवस्थेत राहतो." (हदीस : मुस्लिम)

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माननीय बिलाल (रजि.) यांना विचारले,

"तुम्ही माझ्या आधी जन्नतमध्ये कसे दाखल झालात?"

ते म्हणाले, "हे अल्लाहचे पैगंबर! मी जेव्हादेखील अजान देतो तेव्हा दोन रकअत नमाज अवश्य अदाकरतो आणि वुजू तुटताक्षणीच, त्वरीत नवीन वुजू करून नेहमी वुजूच्या अवस्थेत राहण्याचा प्रयत्न करतो."

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"प्रत्येक मुस्लिमाचा अल्लाहवर हक्क आहे की प्रत्येक आठवड्यातून एक दिवस अवश्य स्नान करून घ्या आणि आपले डोके व शरीराला धुत जा." (हदीस : बुखारी)

# ३. पोषाखाचे शिष्टाचार

१) पोषाख असा घाला जो लज्जा व अब्रू, शील व सौजन्य आणि शरीराला झाकतो आणि त्याच्या रक्षणाचे काम पूर्ण करतो तसेच त्याद्वारे संस्कृती, नीटनेटकेपणा, शोभा व सौंदर्य जाहीर होते.

पवित्र कुरआनात सर्वश्रेष्ठ अल्लाहने आपल्या या देणगीचा उल्लेख करताना सांगितले आहे,

"हे आदमच्या मुलांनो, आम्ही तुमच्यासाठी पोशाख उतरविला आहे की तुमच्या शरीरातील लज्जा-अंगांना झाकावे. आणि तुमच्यासाठी शरीर रक्षण व भूषणाचे साधन देखील व्हावे," *(दिव्य कुरआन, ७:२६)*

मूळ अरबी आयतीत 'रीश' हा शब्द झाला आहे. 'रीश' वास्तविक चिमण्यांच्या पंखाना म्हणतात. चिमण्यांचे पंख त्यांच्याकरिता सौंदर्याचे साधन आहे आणि शरीराच्या रक्षणाचेही. सर्वसामान्य वापरात "रीश" हा शब्द शोभा-सौंदर्य आणि फार चांगल्या पोषाखाकरिता बोलला जातो.

पोषाखाचा उद्देश शोभा-सजावट आणि शरीराला ऋतुच्या प्रभावापासून सुरक्षित राखणे हा आहे, परंतु प्रथम उद्देश लज्जास्थानांना झाकणे आहे. अल्लाहने लज्जा-संकोच माणसाच्या स्वभावात रुजविला आहे. याच कारणास्तव जेव्हा आदरणीय आदम (अ.) आणि आदरणीय हव्वा यांच्या अंगावरून जन्नतचा उत्तम पोषाख काढून घेतला गेला, तेव्हा ते जन्नतच्या वृक्षांच्या पानांद्वारे आपल्या उघड्या शरीराला झाकू लागले. यास्तव पोषाखाबाबत या उद्देशाला अग्रक्रम द्या. अशा पोषाखाची निवड करा की ज्याद्वारे लज्जास्थाने झाकण्याचा हेतु चांगल्या प्रकारे साध्य व्हावा. त्याचबरोबर याही गोष्टीची काळजी घ्या की पोषाख ऋतुच्या प्रभावापासून शरीराचे संरक्षण करणारा असावा आणि असा नीटनेटका पोषाख असावा जो शोभा-सौंदर्य आणि संस्कृतीचेही साधन असावा. असे न व्हावे की तो घालून आपण एखादे विचित्र किंवा विदूषक बनावे, ज्यामुळे लोकांना विनोदाचा विषय मिळावा.

२) पोषाख घालताना हे ध्यानी घ्या की ही ती ईशदेणगी आहे ज्याद्वारे अल्लाहने केवळ माणसाला उपकृत केले आहे. इतर प्राणी या देणगीपासून वंचित आहेत. या विशेष देणगीबद्दल अल्लाहचे आभार माना आणि अल्लाहशी कृतघ्नता आणि त्याची अवज्ञा कधीही करू नका. पोषाख अल्लाहची फार मोठी निशाणी आहे. पोषाख घालताना ही जाणीव ताजी करा आणि कृतज्ञतेच्या भावनांना त्या दुआ (प्रार्थने) च्या शब्दांत व्यक्त करा जी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ईमानधारकांना शिकवली आहे

३) सर्वोत्तम पोषाख 'तकवा' (अल्लाहचे भय राखून सदाचार करण्याचा) आहे. ईशपरायणतेच्या पोषाखाशी अभिप्रेत आंतरिक शुध्दता आहे आणि बाह्य पापभीरूतेचा

पोषाखसुद्धा अर्थात असा पोषाख घाला जो शरीअतच्या दृष्टीने अल्लाहचे भय राखून आचरण करणाऱ्यांचा असेल, ज्याद्वारे घमेंड व गर्व जाहीर होत नसेल, जो न स्त्रियांकरिता पुरूषासमान बनण्याचे साधन असेल आणि न पुरूषांकरिता स्त्रियांसमान बनण्याचे. असा पोषाख ज्याला पाहून असे वाटावे की पोषाख घालणारा एखादा भला सज्जन माणूस आहे. स्त्रियांनी पोषाखाच्या त्या मर्यादा ध्यानात ठेवाव्यात, ज्या शरीअतने त्यांच्यासाठी निर्धारित केल्या आहेत आणि पुरुषांनी त्या मर्यादा पाळाव्यात ज्या शरीअतने त्यांच्यासाठी निर्धारित केल्या आहेत.

४) नवा पोषाख घालताना वस्त्रांचे नाव घेऊन आनंद जाहीर करा की अल्लाहने आपल्या दया-कृपेने हे वस्त्र प्रदान केले आणि कृतज्ञ भावनेत बुडून नवा पोषाख घालण्याची ती दुआ (प्रार्थना) म्हणा जी पैगंबर मुहम्मद (स.) करत असत.

माननीय अबू सईद खुदरी (रजि.) यांचे निवेदन आहे, पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा एखादे नवे वस्त्र, अमामा किंवा अंगरखा अथवा चादर वगैरे घालत, तेव्हा त्याचे नाव घेऊन म्हणत,

"अल्लाहुम-म लकल-हम्दु अन-त कसौ-तनीहि, अस्अलु-क ख़ै-रहू व ख़ै-र मा सुनि-अ लहू व अऊज़ुबि-क मिन शर्रिहि व शर्रि मा सुनि-अ लहू" (हदीस : अबू दाऊद)

"हे अल्लाह! तुझा फार आभारी आहे की तू मला हा पोषाख नेसविला, मी तुझ्यापासून याची भलाई इच्छितो आणि मी स्वत:ला तुझ्या आश्रयाखाली सोपवितो या पोषाखाच्या वाईटपणापासून आणि याच्या हेतुच्या त्या वाईट पैलूपासून, ज्याकरिता तो बनविला गेला आहे."

'दुआ'चा अर्थ असा,

"हे अल्लाह! तू मला सुबुध्दी दे की तू प्रदान केलेल्या पोषाखाचा मी त्याच उद्देशाकरिता वापर करावा जे तुझ्या ठायी शुध्द आहेत. मला सुबुद्धी दे की मी याद्वारे आपल्या लज्जास्थानांना झाकावे आणि निर्लज्जतेच्या गोष्टीपासून अंतर्बाह्यत: आपला बचाव करावा. तसेच शरीअतच्या मर्यादेत राहून मी याद्वारे शरीराचे रक्षण करावे आणि त्याला सौंदर्याचे साधन बनवावे. वस्त्रे परिधान करून न तर इतरांवर आपले वर्चस्व दाखवावे न घमेंड करावी, न या देणगीचा वापर करण्यात शरीअतच्या त्या सीमांचे उल्लंघन करावे, ज्या तू आपल्या दास-दासींकरिता निर्धारित केल्या आहेस."

माननीय उमर (रजि.) कथन करतात, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जो मनुष्य नवे कपडे घालील, जर त्याची ऐपत असेल तर आपले जुने कपडे एखाद्या गरीबाला दान करावेत आणि नवे कपडे घालत असताना ही दुआ करावी,

"अल हम्दु लिल्लाहिल्लज़ी कसानी मा उवारी बिहि औ-रती व अ-त-जम्मलु बिहि फ़ी

हयाती" (हदीस : तिर्मिजी)

"सर्व प्रशंसा त्या अल्लाहकरिता आहे, ज्याने मला हे कपडे नेसवले, ज्याद्वारे मी आपली लज्जास्थाने झाकतो आणि जे या जीवनात माझ्यासाठी सजावटीचेही साधन आहे."
(हदीस : तिर्मिजी)

जो मनुष्य नवे कपडे घालताना ही दुआ करेल, सर्वश्रेष्ठ अल्लाह, त्याला जीवनात आणि मृत्यसनंतरही आपल्या संरक्षणात व देखरेखीत ठेवील.

५) कपडे घालताना उजव्या बाजूने नेसावेत. शर्ट, कुर्ता, शेरवानी आणि कोट वगैरे अंगात घालताना प्रथम उजवी बाही घालावी, तसेच पायजामा वगैरे घालताना प्रथम उजवा पाय टाकावा.

पैगंबर मुहम्मद (स.) सदरा घालताना प्रथम उजवा हात बाहीत टाकत, मग डावा हात बाहीत टाकत. तसेच जोडे वगैरे घालताना प्रथम उजवा पाय, उजव्या जोड्यात घालत, नंतर डावा पाय डाव्या जोड्यात घालत आणि जोडे पायातून काढताना प्रथम डावा पाय जोड्यातून काढत मग उजवा पाय काढत असत.

६) कपडे घालण्यापूर्वी अवश्य झटकून घ्यावेत. संभवत: त्यात एखादा अपायकारक कीडा वगैरे असेल आणि त्यामुळे अपाय होईल.

पैगंबर मुहम्मद (स.) एकदा एका जंगलात आपले मोजे घालत होते. पहिला मोजा घातल्यानंतर जेव्हा त्यांनी दुसरा मोजा घालण्याचा प्रयत्न केला, तेव्हा एका कावळ्याने झडप घातली आणि मोजा घेऊन उडाला आणि खूप उंच नेऊन सोडून दिला. जास्त उंचीवरून खाली पडल्यामुळे त्या धक्क्याने त्यातून एक साप निघून दूर जाऊन पडला. हे पाहून पैगंबरांनी अल्लाहचे आभार मानले आणि सांगितले,

"प्रत्येक मुस्लिमांसाठी आवश्यक आहे की जेव्हा मोजा घालण्याचा इरादा करेल, तेव्हा तो झटकून घ्यावा." (तबरानी)

७) पांढरा पोषाख घाला. पांढरा पोषाख पुरुषांकरिता पसंत केला गेला आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"पांढरे वस्त्र परिधान करा, हा उत्तम पोषाख आहे. पांढरे वस्त्र जीवनात घातले पाहिजे आणि पांढऱ्या वस्त्रात मृतांना दफन केले पाहिजे." (हदीस : तिर्मिजी)

आणखी एका प्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"पांढरी वस्त्रे घालत जा. यासाठी की पांढरे वस्त्र अधिक स्वच्छ असते आणि यातच आपल्या मृतांना कफनविधी करा." (हदीस : मुस्लिम)

अधिक स्वच्छ असण्याचा अर्थ त्याच्यावर किंचितही डाग लागला तर त्वरित दिसून येईल आणि मनुष्य त्याला लगेच धुवून स्वच्छ करील, याउलट रंगीत कपड्यांवरील डाग लवकर दिसून येणार नाही आणि लगेच धुवून स्वच्छ करण्याकडे ध्यान जाऊ शकणार नाही.

सही बुखारीत उल्लेख आहे, पैगंबर मुहम्मद (स.) पांढरे वस्त्र परिधान करीत. अर्थात त्यांनी स्वत: पांढरे कपडे पसंत केले आणि आपल्या जनसमूहाच्या लोकांनीही पांढरे कपडे घालावेत ही इच्छा बाळगली.

८) पायजमा आणि लुंगी वगैरे पायाजवळच्या हाडांपासून उंच राखा. जे लोक घमेंडीपणाने आपला पायजमा किंवा लुंगी पायापर्यंत लोंबकळत ठेवतात, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या नजरेत ते असफल व निराश लोक आहेत आणि सक्त ईशशिक्षेचे हक्कदार आहेत.

याबाबत पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले आहे,

"तीन प्रकारची माणसे अशी आहेत की अल्लाह, कयामतीच्या दिवशी न तर त्यांच्याशी बोलेल, न त्यांच्याकडे नजर टाकील आणि न त्यांना शुध्द करून जन्नतमध्ये दाखल करील, उलट त्यांना अतिशय दु:खदायक यातना देईल."

माननीय अबू जर गिफारी (रजि.) यांनी विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर (स)! हे असफल आणि निराश लोक कोण आहेत?"

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

पहिला - घमेंडीत आपला पायजमा पायापर्यंत लोंबकळवितो.
दुसरा - उपकाराची जाणीव करून देतो आणि
तिसरा - खोट्या शपथांच्या आधारे आपला व्यापार वाढवू इच्छितो.

(हदीस : मुस्लिम)

माननीय उबैद बिन खालीद (रजि.) यांनी आपली एक घटना वर्णन करताना सांगितले,

मी एकदा मदीना येथे जात होतो. तेवढ्यात मला आपल्या पाठीमागून हे ऐकायला मिळाले,

"आपला तहबंद वर करून घ्या की याने मनुष्य बाह्य घाणीपासून सुरक्षित राहतो आणि आंतरिक घाणीपासूनही."

मी मान वळवून पाहतो तर पैगंबर मुहम्मद (स.) होते.

मी म्हणालो, "हे अल्लाहचे पैगंबर (स)! ही तर एक मामुली चादर आहे. यात घमेंड कसली."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"तुमच्याकरिता माझे अनुसरण आवश्यक नाही काय?"

मी पैगंबरांचे हे शब्द ऐकले तेव्हा त्वरित माझे लक्ष त्यांच्या तहमदीकडे गेले. पाहतो तर त्यांनी घातलेला तहमद अर्ध्या पोटरीपर्यंत वर आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे हे कथन मोठे अर्थपूर्ण आहे. पायजामा, लुंगी वगैरे पायाच्या घोट्यापासून वर घातल्याने मनुष्य सर्व प्रकारच्या अंतर्बाह्य घाणीपासून सुरक्षित राहतो. अर्थात वस्त्र पायापर्यंत लोंबकळत राहिल्याने रस्त्यातील घाणीमुळे अस्वच्छ व खराब होईल. शुध्द राहू शकणार नाही. हे शुध्दतेच्या आवडीविरुध्द आहे आणि असे करणे घमेंडीमुळे आहे. घमेंड मनातली अस्वच्छता आहे. ही कारणे नसली तरी ईमानधारकाकरिता हे फर्मान पुरेसे आहे.

"पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवन तुमच्याकरिता सर्वोत्तम नमुना आहे."(दिव्य कुरआन)

अबू दाऊद यांनी उल्लेखिलेल्या हदीसवचनात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मोठी भयकंपित करणारी शिक्षा ऐकविली आहे. सांगितले,

"ईमानधारकांचा पायजमा किंवा लुंगी अर्ध्या पोटरीपर्यंत असली पाहिजे आणि त्याच्या खाली घोट्यापर्यंत असण्यात काही हरकत नाही. परंतु त्याच्या खाली पायजमा किंवा लुंगीचा जेवढा हिस्सा खाली लोंबकळेल तो आगीत जळेल आणि जो मनुष्य घमेंडीत आपली वस्त्रे पायापर्यंत लोंबकळत ठेवील, कयामतच्या दिवशी अल्लाह त्याच्याकडे दृष्टिक्षेप टाकणार नाही."

९) रेशमी वस्त्रे परिधान करू नका. हा स्त्रियांचा पोषाख आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पुरुषांना स्त्रियांसारखा पोषाख घालण्यास आणि स्त्रियांसारखा चेहरा-मोहरा बनविण्यास सक्तीने मनाई केली आहे.

माननीय उमर (रजि.) सांगतात, पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"रेशमी कपडे नेसू नका कारण जो या जगात हे कपडे घालील तो पारलौकिक जीवनात या कपड्यांना घालू शकणार नाही." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माननीय अली (रजि.) यांना म्हटले,

"त्या रेशमी कपड्यास[1] फाडून आणि त्याचे दुपट्टे बनवून या फातिमा[2] मध्ये वाटून द्या." (हदीस : मुस्लिम)

---

१. हे वस्त्र पैगंबर मुहम्मद (स.) यांना उकैदर, दूमाच्या शासकाने भेटवस्तू म्हणून पाठविला होता.

२. अनेक फातमांशी अभिप्रेत या तीन प्रतिष्ठित स्त्रिया होत – (१) माननीय फातिमा, पैगंबर मुहम्मद (स.) यांची लाडकी लेक आणि माननीय अली (रजि.) यांची पत्नी. (२) फातिमा बिन असद, माननीय अली(रजि.) यांची आई. (३) फातिमा बिन हम्जा माननीय हमजा (रजि.) यांची कन्या.

याद्वारे हे कळाले की स्त्रियांकरिता रेशमी कपडे घालणे पसंत केले गेले आहे. यासाठी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आदेश दिला,

"स्त्रियांचे दुपट्टे बनवून द्या, अन्यथा ते वस्त्र तर दुसऱ्या कामी उपयोगी पडू शकते."

१०) स्त्रियांनी असे पातळ वस्त्र परिधान करू नये की ज्यातून शरीर दिसून यावे आणि न असा चुस्त पोषाख घालावा ज्यातून शरीराचा आकार आणखी जास्त आकर्षक बनून जाहीर होतो आणि कपडे घालूनही स्त्री नग्न दिसावी.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अशा निर्लज्ज स्त्रियांना दुष्परिणामाची खबर दिली आहे,

"त्या स्त्रियादेखील जहन्नमी आहेत, ज्या कपडे घालूनही नग्न राहतात, इतरांना आसक्त करतात आणि स्वत: इतरांवर आसक्त होतात. त्यांची डोकी नखऱ्यामुळे बुख्ती (एक प्रकारच्या मोठ्या) उंटाच्या मोट्याप्रमाणे वाकडी आहेत. या स्त्रिया न जन्नतमध्ये जातील आणि न जन्नतचा सुगंध प्राप्त करू शकतील, वास्तविक जन्नतचा सुगंध फार लांबून येतो."

(हदीस : रियाजुस्सालिहीन)

एकदा माननीय अस्मा (रजि.) पातळ वस्त्रे नेसून पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झाल्या. त्या समोर येताच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्वरीत तोंड फिरविले आणि सांगितले,

"अस्मा! जेव्हा स्त्री तरूण होते, तेव्हा तिच्याकरिता हे योग्य नव्हे की तोंड आणि हाताखेरीज तिच्या शरीराचा कोणताही भाग दिसून यावा."

११) लुंगी आणि पायजमा वगैरे घातल्यानंतर अशा पध्दतीने पहुडण्या व बसण्यापासून बचाव करा की ज्यामुळे शरीर उघडे पडण्याचे किंवा जाहीर होण्याचे भय असावे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे,

"एक पादत्राण घालून चालत जाऊ नका आणि लुंगी घातलेल्या अवस्थेत एक गुडघा उचलून बसू नका, डाव्या हाताने खाऊ नका, चादर संपूर्ण शरीरावर अशा प्रकारे लपेटू नका (की काम करण्यात किंवा नमाज वगैरे पढण्यात हात काढणे अशक्य व्हावे.) आणि न उताणे झोपून एक पाय दुसऱ्या पायावर ठेवावा (कारण अशाने लज्जास्थाने झाकण्यात असावधगिरीचे भय आहे.)

१२) पोषाखाबाबत स्त्रिया आणि पुरुषांनी एकमेकांसारखे दिसण्याचा व वागण्याचा हव्यास करू नये.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाहने त्या पुरुषांची निर्भर्त्सना केली आहे, जे स्त्रियांसमान दिसण्या-वागण्याच्या

पध्दती अवलंबितात आणि त्या स्त्रियांचा धिक्कार केला आहे, ज्या पुरुषांसमान दिसण्या-वागण्याच्या पध्दती अवलंबितात.'' (हदीस : बुखारी)

माननीय अबू हुरैरा (रजि.) कथन करतात,

''अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्या पुरुषाचा धिक्कार केला आहे जो स्त्रियांसारखा पोषाख घालतो आणि त्या स्त्रीचा धिक्कार केला आहे, जी पुरुषासारखा पोषाख घालते.'' (हदीस : अबू दाऊद)

एकदा माननीय आएशा (रजि.) यांना कोणीतरी सांगितले की अमुक एक स्त्री पुरुषांसारखी पादत्राण घालते. तेव्हा त्यांनी फर्माविले, ''अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अशा स्त्रियांची निर्भर्त्सना केली आहे, ज्या पुरुष बनण्याचा प्रयत्न करतात.''

१३) स्त्रियांनी डोक्यावर ओढणी घेण्याची काळजी घ्यावी आणि त्याद्वारे आपले डोके व छातीचा भाग झाकून ठेवावा. ओढणी इतकी पातळ असू नये की ज्यामुळे डोक्याचे केस दिसून यावेत. ओढणीचा उद्देश हाच की त्याद्वारे सौंदर्य लपविले जावे.

पवित्र कुरआनमध्ये अल्लाहने सांगितले आहे,

''आणि आपल्या छातीवर आपल्या ओढणीचा पदर घालून ठेवावा.''

*(दिव्य कुरआन, २४:३१)*

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ इजिप्त देशात तयार झालेली अगदी पातळ मलमल आली. पैगंबरांनी त्यातून काही भाग फाडून दाहया कलबीला दिला आणि सांगितले,

''यातून एक हिस्सा फाडून तुम्ही स्वत:साठी अंगरखा बनवून घ्या आणि एक हिस्सा तुमच्या पत्नीला दुपट्टा बनविण्यासाठी द्या. परंतु त्यांना सांगा की याच्या खाली आणखी एक कापड लावून घ्याव, यासाठी की शरीराची बनावट आतून जाहीर होऊ नये.''

(हदीस : अबू दाऊद)

पवित्र कुरआन आणि पैगंबराचरणाची ही स्पष्ट ताकीद ध्यानी घेऊन अल्लाहच्या आदेशांचा उद्देश पूर्ण करा आणि पातळ ओढणीच्या पट्टीला गळ्याचा हार बनवून अल्लाह आणि त्याचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आदेशांची थट्टा मस्करी करू नका.

माननीय आएशा (रजि.) सांगतात,

''जेव्हा हा आदेश उतरला तेव्हा स्त्रियांनी पातळ (पारदर्शक) वस्त्रे सोडून जाड वस्त्रे निवडली आणि त्यांच्या ओढण्या बनविल्या.'' (हदीस : अबू दाऊद)

१४) पोषाख नेहमी आपल्या ऐपती व सामर्थ्यानुसार घाला. असा पोषाख घालू नये ज्याने घमेंड आणि दिखावा जाहीर होईल, तुम्ही इतरांना तुच्छ समजू लागले, संपत्ती व सामर्थ्यापेक्षा जास्त किंमतीचा पोषाख असू नये ज्यामुळे अनाठायी खर्चाचा गुन्हा डोक्यावर लादला जाईल. असे दरिद्रीं बनून राहू नये की सदैव तुमचा चेहरा भिक्षुकांसारखा दिसावा आणि सर्वकाही असतानाही तुम्ही वंचित दिसावे. किंबहुना नेहमी तुमच्या ऐपती व सामर्थ्यानुसार, योग्य, नीटनेटका व स्वच्छ पोषाख घालावा.

काही लोक फाटकी, जीर्ण आणि ठिगळ लागलेले कपडे घालून, दरिद्री बनून राहतात आणि याला धार्मिकता समजतात. एवढेच नव्हे तर ते अशा लोकांना भौतिकवादी समजतात जे स्वच्छ, नीटनेटके कपडे घालतात. वस्तुत: धार्मिकतोसंबंधीची ही कल्पना अगदी चुकीची आहे.

माननीय अबू हसन अली शाजली यांनी एकदा खूप चांगले कपडे घातले होते. एका सूफी महाशयांनी त्यांच्या या थाटामाटाबद्दल आक्षेप घेतला आणि म्हटले, "अल्लाहवाल्यांना असा मौल्यवान पोषाख घालण्याची काय गरज?"

त्यावर माननीय शाजली यांनी उत्तर दिले, "महाशय! हा थाटमाट, हे वैभव, सर्वाधिक वैभवशाली अल्लाहची प्रशंसा आणि त्याचे आभार व्यक्त करण्याकरिता आहे आणि तुमचे हे दरिद्री रूप हात पसरविण्यासारखे आहे."

खरे तर धार्मिकता न जीर्ण, फाटक्या व ठिगळ लागलेल्या कपड्यांनी सिध्द होते आणि न थाटामाटाच्या मौल्यवान कपड्यांनी सिध्द होते. किंबहुना धार्मिकता तर माणसाच्या नीती व त्याच्या योग्य आचार-विचाराने सिध्द होते. तात्पर्य, माणसाने प्रत्येक मामल्यात आपली शक्ती व सामर्थ्याचा विचार करीत मध्यमार्ग पत्करावा.

माननीय अबुल अहवस यांचे पिता एका घटनेचा उल्लेख करतात, एकदा मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झालो. त्या वेळी माझ्या शरीरावर अतिशय मामुली कपडे होते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विचारले, "तुमच्याजवळ धन-दौलत आहे?"

मी म्हणालो, "होय!"

विचारले, "कशा प्रकारची संपत्ती?"

मी म्हणालो, "अल्लाहने मला सर्व प्रकारची संपत्ती दिली आहे, उंट आहेत, गायी आहेत, शेळ्या आहेत, घोडे आहेत आणि नोकर-चाकरही आहेत."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जेव्हा अल्लाहने तुम्हाला धन-संपत्ती दिली आहे, तर त्याच्या मेहरबानीचा प्रभाव तुमच्या

अंगावर दिसायला हवा." (हदीस : मिश्कात)

अर्थात - जेव्हा अल्लाहने तुम्हाला सर्वकाही प्रदान केले आहे, तेव्हा तुम्ही गरीब-दरिद्रीसारखा वेष का बनविला आहे? ही तर अल्लाहशी कृतघ्नता होय.

माननीय जाबीर (रजि.) यांचे कथन आहे.

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) भेट घेण्याच्या हेतुने आमच्याकडे आले तेव्हा त्यांनी एका माणसाला पाहिले जो धुळीने माखलेला होता आणि त्याचे केस विखुरलेले होते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विचारले, "या माणसाजवळ एखादा कंगवा नाही काय, ज्याद्वारे त्याने आपले केस व्यवस्थित करून घेतले असते?"

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अन्य एका माणसाला पाहिले, ज्याने मळलेले कपडे घातले होते. पैगंबरांनी सांगितले,

"या माणसाजवळ ती वस्तू (अर्थात साबण वगैरे) नाही की ज्याद्वारे याने आपले कपडे धुतले असते?" (हदीस : मिश्कात)

एका माणसाने पैगंबर मुहम्मद (स.) यांना सांगितले, "हे अल्लाहचे पैगंबर (स)! मी इच्छितो की माझा पोषाख खूप उत्तम असावा, डोक्याला तेल लावलेले असावे, पादत्राणेही चांगले असावेत."

अशा प्रकारे त्याने अनेक वस्तूंचा उल्लेख केला. येथपावेतो की तो म्हणाला, "माझ्या मनाला वाटते की माझा कोडा (चाबूक) सुद्धा खूप चांगला असावा."

पैगंबर मुहम्मद (स.) त्याचे म्हणणे ऐकत राहिले, मग सांगितले,

"या सर्व गोष्टी प्रिय आहेत आणि अल्लाह या चांगल्या आवडीस चांगल्या नजरेने पाहतो." (मुसतदरक हाकीम)

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) कथन करतात.

मी अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले, "हे अल्लाहचे रसूल! ही घमेंड आहे काय की मी चांगले आणि उत्तम कपडे घालावे?"

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"नव्हे. ही तर सजावट आहे आणि अल्लाह या सजावटीस पसंत करतो." (हदीस : इब्ने माजा)

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) कथन करतात.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"नमाजच्या स्थितीत दोन्ही वस्त्रे परिधान करा (अर्थात पूर्ण पोषाख घालत जा). अल्लाह जास्त हक्कदार आहे की त्याच्यासमोर माणसाने चांगल्या प्रकारे नीटनेटके होऊन जावे."
(हदीस : मिश्कात)

माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) कथन करतात.
पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,
"ज्याच्या मनात किंचितही घमेंड असेल तर तो जन्नतमध्ये जाणार नाही."

एक मनुष्य म्हणाला, "प्रत्येक माणूस इच्छितो की त्याचे कपडे चांगले असावेत, त्याचे जोडे चांगले असावेत."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाह स्वत: सौंदर्यवान आहे आणि सौंदर्य पसंत करतो (अर्थात चांगला पोषाख घालणे घमेंड नाही). घमेंड वास्तविक ही की माणसाने सत्याबाबत नि:स्पृहता दाखवावी आणि लोकांना तुच्छ व अपमानित समजावे." (हदीस : मुस्लिम)

१५) वस्त्र परिधानात आणि सजावट करण्यात आवड आणि नीटनेटकेपणा विचाराधीन राखावा. सदऱ्याची बटने उघडून उघड्या छातीने फिरणे, उलटसुलट बटने लावणे, पायजम्याचा एक भाग उंच तर दुसरा खाली ठेवणे आणि एक पादत्राण घालून चालणे किंवा विस्कळीत केस ठेवणे इ. सर्व गोष्टी चांगली आवड आणि नीटनेटकेपणा याच्या विरुध्द आहे.

एक दिवस पैगंबर मुहम्मद (स.) मसजिदीत स्थानापन्न होते. तेवढ्यात एक मनुष्य तिथे आला, ज्याच्या डोक्याचे व दाढीचे केस विखुरलेले होते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या हाताने त्याच्याकडे संकेत केला, ज्याचा अर्थ असा होता की जाऊन आपल्या डोक्याचे केस व दाढी व्यवस्थित करा. यास्तव तो मनुष्य गेला आणि केसांना नीट व्यवस्थित करून परतला, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ही सजावट याहून अधिक चांगली नाही काय की माणसाचे केस अस्ताव्यस्त असावेत? असे माहीत होते की जणू तो सैतान आहे." (हदीस : मिश्कात)

माननीय अबू हुरैरा (रजि.) सांगतात.
पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"एक पादत्राण घालून कोणी चालू नये, एकतर दोन्ही घालून चाला किंवा दोन्ही काढून चाला." (हदीस : तिर्मिजी)

याच हदीसच्या आधारे इस्लामच्या विद्वानांनी एक बाही आणि एक मोजा घालण्यासही मनाई केली आहे.

१६) गडद आणि भडक रंग, भडकदार पोषाख, तसेच दिखाव्याचे काळे व गेरू रंगाचे कपडे घालण्याचे टाळावे. लालभडक आणि गडद रंग, तसेच भडकदार पोषाख स्त्रियांकरिताच योग्य आहे. अर्थात त्यांनीदेखील मर्यादा ध्यानी घेतल्या पाहिजेत. राहिलेत दिखाव्याचे लांबलचक कुरते किंवा काळे वा गेरू रंगाचे वस्त्रे घालून इतरांच्या तुलनेत आपले श्रेष्ठत्व दाखविणे आणि आपल्या मोठेपणाची शेखी मिरवणे तर यात निव्वळ घमेंडीची निशाणी आहे. त्याचप्रमाणे असे चित्र-विचित्र कपडे आणि जे थट्टा-मस्तकरीचा विषय बनतील असे कपडे घालू नका की जे घातल्यामुळे तुम्ही उगाच नवलपूर्ण ठरावे आणि लोकांनी तुम्हाला थट्टा-विनोदाचा विषय समजून घ्यावे.

१७) नेहमी साधा, संस्कृती आणि प्रतिष्ठेला साजेल असा पोषाख घाला. वस्त्रांवर नेहमी मधल्या मार्गाचा खर्च करा. पोषाखासंदर्भात आरामप्रियता आणि गरजेपेक्षा जास्त नाजुकपणा बाळगू नका.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"आरामप्रियतेपासून दूर राहा. कारण अल्लाहचे प्रिय दास आरामप्रिय नसतात."

(हदीस : मिश्कात)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले,

"ज्या माणसाने योग्यता व सामर्थ्य असतानाही लीनता व नम्रतेच्या हेतुने पोषाखात साधेपणा पत्करला तर अल्लाह त्याला सज्जनता व बुजुर्गीच्या पोषाखाने सजवील."

(हदीस : अबू दाऊद)

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे निकटवर्ती अनुयायी एक दिवस बैठकीत जगासंबंधी बोलत होते, तेव्हा पैगंबरांनी सांगितले, "पोषाखात साधेपणा ईमानच्या निशाण्यांपैकी एक आहे." (हदीस : अबू दाऊद)

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाहचे अनेक दास ज्यांची बाह्य अवस्था अगदी क्षुल्लक असते. केस अस्ताव्यस्त आणि धुळीने माखलेले, कपडे साधारण आणि क्षुल्लक प्रकारचे असतात. परंतु अल्लाहच्या नजरेत त्यांचा दर्जा इतका उच्च असतो की जर एखाद्या गोष्टीवर ते शपथ घेतील, तर अल्लाह त्यांची शपथ पूर्ण केल्याखेरीज राहात नाही. अशा प्रकारच्या लोकांपैकी एक बरा बिन मालिक (रजि.) आहेत." (हदीस : तिर्मिजी)

१८) अल्लाहच्या या देणगीचे आभार मानण्याकरिता त्या गरीब व असहाय लोकांना कपडे नेसवा, ज्यांच्याजवळ अंग झाकण्यासाठी काहीच नसावे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जो मनुष्य एखाद्या ईमान धारकास कपडे नेसवून त्याचे अंग झाकील, तर सर्वश्रेष्ठ अल्लाह कयामतीच्या दिवशी जन्नतचे हिरवे वस्त्र नेसवून त्याचे अंग झाकील."

(हदीस : अबू दाऊद)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"एखाद्या ईमानधारकाने आपल्या ईमान धारक बांधवाला कपडे नेसवले तर जोपर्यंत ते कपडे घालणाऱ्याच्या अंगावर राहतील, नेसविणाऱ्याला अल्लाह आपल्या देखरेखीत व संरक्षणात ठेवील." (हदीस : तिर्मिजी)

१९) तुमच्या त्या नोकरांना व सेवा-चाकरी करणाऱ्यांना तुमच्या ऐपतीनुसार योग्य व चांगले कपडे द्या, जे रात्रंदिवस तुमच्या सेवेत राहतात.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"दास-दासी तुमचे बांधव आहेत. अल्लाहने त्यांना तुमच्या ताब्यात देऊन ठेवले आहे. तेव्हा तुमच्यापैकी ज्या कोणाच्या ताब्यात व वापरात अल्लाहने कोणाला दिले आहे तेव्हा त्याने त्याला तेच खाऊ घालावे, जे तो स्वत: खातो, त्याला तोच पोषाख नेसवावा जो तो स्वत: नेसतो आणि त्याच्यावर कामाचा तेवढाच भार टाकावा जो त्याच्या सहनशक्तीच्या बाहेर नसेल. जर तो ते काम करू शकत नसेल तर स्वत: त्याच्या कामात त्याला मदत करावी."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

# ४. खाण्या-पिण्याचे शिष्टाचार

१) जेवणापूर्वी प्रथम हात स्वच्छ धुवून घ्या. शुध्दतेची निकड आहे की जेवणाच्या ताटात पडणाऱ्या हाताविषयी स्वत:ला समाधान व्हावे.

२) "बिस्मिल्ला हिर्रहमा निर्रहीम" असे म्हणून भोजनास आरंभ करा आणि विसर पडल्यास, आठवण येताच "बिस्मिल्लाहि अव्वुलू व आखिरुहू" म्हणा. लक्षात ठेवा, ज्या भोजनावर अल्लाहचे नाव घेतले जात नाही त्याला सैतान आपल्यासाठी उचित करून घेतो.

३) जेवताना टेका लावून बसू नका. नम्रतापूर्वक मांडी न वळता किंवा दोन्ही गुडघे टेकून अथवा एक गुडघा टेकून तर दुसरा उभा ठेवून बसा. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) अशाच प्रकारे बसत.

४) नेहमी उजव्या हाताने खा. गरज पडल्यास डाव्या हाताचीही मदत घेतली जाऊ शकते.

५) तीन बोटांनी खा आणि गरज असेल तर सर्वात लहान बोट सोडून चार बोटांचा वापर करा आणि बोटांना पुरेपूर भरवून घेऊ नका.

६) घास फार मोठा घेऊ नका आणि न जास्त लहान आणि एक घास गिळून झाल्यावरच दुसरा घास तोंडात टाका.

७) भाकरी किंवा पोळीने बोटे मुळीच पुसू नका ही फार किळसवाणी सवय आहे.

८) पोळी झटकण्याचे वा आपटण्याचे टाळा.

९) ताटात आपल्या बाजूच्या किनाऱ्याने खा मध्यभागी हात टाकू नका आणि दुसऱ्याच्या बाजूकडूनही घास उचलू नका.

१०) घास हातातून खाली पडल्यास, उचलून साफ करून घ्या किंवा धुवून घ्या नंतर खा.

११) भोजन आपसात मिळून घ्या. आपसात मिळून खाल्ल्याने प्रेम निर्माण होते आणि बरकत (समृध्दि) सुद्धा.

१२) जेवणात दोष काढू नका. पसंत नसेल तर सोडून द्या.

१३) चटके बसतील असे गरम जेवण खाऊ नका.

१४) खाताना मोठ्याने हसणे व बडबड करणे टाळा.

१५) अनावश्यकरित्या जेवणाचा वास घेऊ नका. ही वाईट सवय आहे. खात असताना वारंवार तोंड अशा प्रकारे उघडू नका की चावला जाणारा घास दिसेल आणि वारंवार तोंडात बोट घालून दातांत अडकलेले काढण्याचा प्रयत्न करू नका. अशाने समोर जेवणाऱ्याला किळस येते.

१६) खाणे-पिणे बसलेल्या अवस्थेत करा. तथापि शक्य नसल्यास फळे वगैरे उभे राहून खाऊ शकता आणि पाणीही उभ्याने पिऊ शकता.

१७) ताटात जे काही उरल्यास, पातळ पदार्थ असेल तर पिऊन घ्या, अन्यथा बोटाने चाटून ताट स्वच्छ करा.

१८) खाण्या-पिण्याच्या पदार्थावर फुंकर मारू नका. आतून येणारा श्वास घाणेरडा आणि विषारी असतो.

१९) पाणी तीन श्वासात थोडे थोडे थांबून प्या. अशाने पाणी गरजेनुसार प्यायले जाते आणि मनही तृप्त होते. एकाच दमात भांड्यातले संपूर्ण पाणी पोटात टाकल्याने कधीकधी नुकसानदायक ठरते.

२०) सर्व मिळून जेवताना, उशिरापर्यंत खाणाऱ्यांचा आणि हळूहळू जेवणाऱ्यांचाही विचार करा आणि सर्वांसोबत उठा.

२१) जेवण आटोपल्यावर बोटे चाटून घ्या, नंतर हात धुवून स्वच्छ करा.

२२) फळे खाताना एकाच वेळी दोन-दोन, तीन-तीन चिऱ्या उचलू नका.

२३) लोटा किंवा सुराईच्या तोटीने किंवा यासारख्या दुसऱ्या वस्तूने पाणी पिऊ नका. अशा भांड्यात पाणी घेऊन प्या ज्यात पिताना तोंडात जाणारे पाणी दिसून यावे, यासाठी की अस्वच्छ किंवा नुकसानदायक वस्तू पोटात जाऊ नये.

२४) जेवण खाऊन झाल्यावर ही दुआ करा

اَلْحَمْدُ لِلّٰهِ الَّذِیْ اَطْعَمَنَا وَسَقَانَا وَجَعَلَنَا مِنَ الْمُسْلِمِیْنَ

"अलहम्दु लिल्लाहिल्लज़ी अत-अ-म-ना व सक़ाना व ज-अ-ल-ना मिनल मुस्लिमीन."

स्तुती त्या अल्लाहकरिता आहे, ज्याने आम्हाला खाऊ घातले आणि ज्याने आम्हाला प्यायला दिले आणि ज्याने आम्हाला आज्ञाधारकांपैकी बनविले.

# ५. झोपण्या व जागण्याचे शिष्टाचार

१) संध्याकाळचा अंधार पसरू लागेल तेव्हा लहान मुलांना घरात बोलवा आणि बाहेर खेळू देऊ नका. रात्रीचा काही हिस्सा निघून जाईल, तेव्हा त्यांना बाहेर पडण्याची अनुमती देऊ शकता. सावधगिरी यातच आहे की एखाद्या मोठ्या गरजेविना लहान मुलांना रात्री - अपरात्री घराबाहेर पडू देऊ नका.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"संध्याकाळ होईल तेव्हा लहान मुलांना घरात रोखून ठेवा, यासाठी की त्या वेळी सैतान (जमिनीवर) पसरतात. तथापि घटिकाभर रात्र निघून जाईल, तेव्हा मुलांना बाहेर सोडू शकता."
(हदीस : सिहाहे सित्ता, हिस्ने हसीन)

२) संध्याकाळ होईल, तेव्हा ही दुआ करा. पैगंबर मुहम्मद (स.) आपल्या सहवासातील सहकाऱ्यांना ही दुआ करण्यास सांगत असत.

"अल्लाहुम-म बि-क अम्सैना व बि-क अस्बह्ना व बि-क नह्या व बि-क नमूतु व इलैकन्नुशूर."
(हदीस : तिर्मिजी)

हे अल्लाह! आम्ही तुझ्याच प्रदान केलेल्या सुबुध्दीने संध्याकाळ केली आणि तुझ्याच मदतीने सकाळ केली. तुझ्याच दया-कृपेने जगत आहोत आणि तुझ्याच इशाऱ्यावर मरणार आणि शेवटी तुझ्याच जवळ उठून हजर होणार आहोत.

मगरिबच्या अजानप्रसंगीही दुआ पढा–

"अल्लाहुम-म हाज़ा इक़बालु लैलि-क व इदबारू नहारि-क व अस्वातु दुआति-क फ़ग़फ़िरली."
(हदीस : तिर्मिजी, अबू दाऊद)

हे अल्लाह! ही वेळ आहे तुझ्या रात्रीच्या आगमनाची तुझ्या दिवसाच्या निर्गमनाची आणि तुझ्या अजान देणाऱ्यांच्या पुकाराची, तेव्हा तू माझी क्षमा याचना कबूल कर.

३) इशाच्या नमाजपूर्वी झोपी जाण्याचे टाळा. अशा प्रकारे नेहमी इशाची नमाज धोक्यात सापडेल. न जाणो झोपेच्या या मृत्युनंतर अल्लाह दासाचे प्राण वापस करतो की मग नेहमीकरिता ताब्यात घेतो. पैगंबर मुहम्मद (स.) इशाच्या नमाजपूर्वी कधीही झोपत नसत.

४) रात्र होताच घरात उजेड अवश्य करून घ्या. पैगंबर मुहम्मद (स.) अशा घरात जाणे टाळत, ज्यात उजेड केला गेला नसे.

५) रात्री उशिरापर्यंत जागण्याचे टाळा. रात्री लवकर झोपी जाण्याची आणि सकाळी लवकर उठण्याची सवय लावून घ्या.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे.

"इशाच्या नमाजनंतर एक तर अल्लाहचे नाम:स्मरण करण्याकरिता जागले जाऊ शकते किंवा कुटुंबियांशी आवश्यक बोलण्याकरिता." (हदीस : मुस्लिम)

६) रात्री जागण्यापासून आणि दिवसा झोप पूर्ण करण्यापासून अलिप्त राहा. अल्लाहने रात्र आराम आणि विश्रांती घेण्याकरिता निर्माण केली आहे आणि दिवसाला झोप घेऊन उठून आपल्या गरजांच्या पूर्ततेकरिता धावपळ करण्याचा काळ ठरविला आहे.

पवित्र कुरआनातील 'सूरह फुर्कान'मधील उल्लेखानुसार,

"आणि तो अल्लाहच आहे ज्याने रात्रीला तुमच्यासाठी पोशाख, आणि झोपेला मृत्यू-शांती, आणि दिवसाला जिवंत होण्याची घटका बनविले."

*(दिव्य कुरआन, २५:४७)*

'सूरह नबा'मध्ये आहे,

"आणि तुमच्या निद्रेला विश्रांतीसाठी बनविले आणि रात्रीला पांघरूण आणि दिवसाला उपजीविकेची वेळ बनविली आणि तुमच्यावर सात मजबूत आकाश कायम केले ." *(दिव्य कुरआन, ७८: ९-१२)*

सूरह 'नम्ल' मध्ये आहे.

"त्यांना उमगत नव्हते का की आम्ही रात्र त्यांना विश्रांती घेण्यासाठी बनविली होती आणि दिवसाला प्रकाशमान केले होते? यात बरेच संकेत होते त्या लोकांसाठी जे श्रद्धा ठेवीत आहेत." *(दिव्य कुरआन, २७:८६)*

रात्रीला अंधकारमय आणि आराम-विश्रांतीचा समय बनविण्यात आणि दिवसाला धावपळ आणि मेहनतीकरिता उज्वल बनविण्यात संकेत हा आहे की रात्री नियमितपणे झोपी जावे आणि दिवसा आपल्या गरजांच्या पूर्ततेकरिता मेहनत आणि प्रयत्न केले जावे.

दिवसाच्या उजेडात आपली उपजीविका आणि गरजांकरिता मेहनत व कष्ट करीत राहावे. येथपावेतो की आपले अंग आणि शारीरिक शक्तींना थकवा जाणवू लागावा. त्या वेळी रात्रीच्या शांत व निद्रामय वातावरणात आरामाने झोपी जावे आणि दिवस उजाडताच अल्लाहचे नाव घेऊन ताज्या दमाने कर्मक्षेत्रात उतरावे. जे लोक आरामप्रियता व सुस्तीमुळे दिवसा घोरत पडून राहतात किंवा ऐषआरामात आणि खेळ-तमाशात मग्न राहतात व त्यासाठी रात्रभर जागतात ते अल्लाहच्या बुध्दिकुशलतायुक्त व्यवस्थेला पायदळी तुडवतात त्यांच्या आरोग्याचे व जीवनाचे वाटोळे करून घेतात. दिवसा उशिरापर्यंत झोपत राहणारे त्यांच्या दिवसाच्या कामात उणीव राखतात आणि शरीर व प्राण दोघांनाही आरामापासून वंचित राखतात. यासाठी की दिवसाची झोप रात्रीची भरपाई करू शकत नाही. पैगंबर

मुहम्मद (स.) यांनी या गोष्टीलाही पसंत केले नाही की माणसाने रात्रभर जागून अल्लाहची उपासना करावी आणि स्वत:ला असह्य अशा कष्ट व यातनेत टाकावे.

माननीय अब्दुल्लाह बिन अम्र (रजि.) यांना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विचारले, "ही गोष्ट जी मला सांगितली गेली आहे ती खरी आहे काय की तुम्ही नियमितपणे दिवसा रोजे (उपवास) पाळता आणि रात्रभर नमाज पढत राहता?"

माननीय अब्दुल्लाह (रजि.) म्हणाले, "होय हुजूर! हे खरे आहे."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "नाही. असे करू नका. कधी रोजा राखा, कधी खा व प्या, तसेच झोप घ्या आणि उठून नमाजही पढा. कारण तुमच्या शरीराचा तुमच्यावर हक्क आहे आणि तुमच्या डोळ्यांचाही तुमच्यावर हक्क आहे." (हदीस : बुखारी)

७) जास्त आरामदायक अंथरूण वापरू नका. या जगात ईमान राखणाऱ्याने आरामप्रियता आणि सुख-विलासाच्या आसक्तीपासून दूर राहिले पाहिजे. आयुष्य, ईमान धारकाकरिता जिहाद आहे आणि ईमान धारकाने अतिशय मेहनती असले पाहिजे.

माननीय आएशा (रजि.) यांचे शुभ कथन आहे.

"पैगंबर मुहम्मद (स.) यांचे अंथरुण चामड्याचे होते ज्यात खजुरीची साल भरलेली होती." (हदीस : शमाइले तिर्मिजी)

माननीय हफ्सा (रजि.) यांना कोणीतरी विचारले,

"आपल्या घरी पैगंबर मुहम्मद (स.) यांचे अंथरुण कसे होते?"

फर्माविले, "एक गोणपाट होते, ज्याला दुहेरी करून आम्ही पैगंबरांच्या खाली अंथरून देत असू. एक दिवस माझ्या मनात आले की जर याला चौपदरी करून अंथरले गेले तर जरा जास्त नरम अंथरुण होईल. म्हणून मी ते चौपदरी करून अंथरले."

सकाळी पैगंबरांनी विचारले, "रात्री माझ्या खाली काय अंथरले होते?"

मी म्हणाले, "तेच गोणपाटाचे अंथरूण होते. तथापि रात्री मी ते चौपदरी करून अंथरले होते की थोडे नरम व्हावे."

पैगंबरांनी सांगितले, "नको, ते दुहेरीच ठेवा. रात्री अंथरुणाचा नरमपणा तहज्जुदकरिता उठण्यात अडसर बनला." (हदीस : शमाईले तिर्मिजी)

माननीय आएशा (रजि.) फर्मावितात,

"एकदा एक अन्सारी स्त्री आली आणि तिने पैगंबर मुहम्मद (स.) यांचे अंथरूण पाहिले. घरी जाऊन तिने एक अंथरुण तयार केले. त्यात लोकर भरून खूप मऊदार बनविले अणि पैगंबरांकरिता पाठविले.

पैगंबर जेव्हा घरी आले आणि मऊदार अंथरुण ठेवलेले पाहून फर्माविले, "हे काय आहे?"

मी उत्तर दिले, "हे अल्लाहचे पैगंबर (स)! अमुक अन्सारी स्त्री आली होती आणि अंथरूण पाहून गेली होती. तिनेच हे मऊ अंथरूण आपल्यासाठी तयार करून पाठविले आहे."

पैगंबरांनी सांगितले, "नको, ते परत करा."

मला तो बिछाना खूपच पसंत होता. म्हणून परत करण्याची इच्छा होत नव्हती. परंतु पैगंबरांनी इतक्या वेळा सांगितले की मला ते परत करावेच लागले."

(हदीस : शमाइले तिर्मिजी)

पैगंबर मुहम्मद (स.) एकदा चटईवर झोपले होते. पहुडल्याने त्यांच्या शरीरावर चटईचे निशाण पडले. माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) सांगतात, मी ते पाहून रडू लागलो.

पैगंबरांनी मला रडताना पाहून विचारले, "का म्हणून रडत आहात?"

मी म्हणालो, "हे अल्लाहचे पैगंबर (स)! हे रोमन सम्राट तर रेशमी आणि मखमली गाद्यांवर झोपतात आणि आपण गोणपाटावर!"

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "यात रडण्यासारखे काही नाही. त्यांच्याकरिता हे जग आहे आणि आमच्याकरिता आखिरत (मरणोत्तर जीवन)."

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"मी ऐषआरामाचे आणि चिंता नसलेले जीवन कसे जगू शकतो, जेव्हा अवस्था अशी आहे की इसराफील (नामक फरिश्ता) तोंडात सूर (शंख) घेऊन, कान लावून (आदेशाच्या पालनाकरिता) नतमस्तक होऊन प्रतिक्षा करीत आहे की केव्हा सूर फुंकण्याचा आदेश होतो."

(हदीस : तिर्मिजी)

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनाचा हा पैलू हे इच्छितो की ईमानधारकाने या जगात संघर्षपूर्ण जीवन व्यतीत करावे आणि ऐषआराम करण्यापासून अलिप्त राहावे.

८) झोपण्यापूर्वी वुजू करण्याची सवय लावावी आणि शुध्द होऊन झोपावे. जर हातांना तेलकट काही लागले असेल तर हात चांगले स्वच्छ धुवून घ्यावेत नंतर झोपावे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्यांच्या हाताला तेलकट वगैरे लागले असेल आणि तो ते धुतल्याविना झोपी गेला तर त्याला नुकसान पोहचले. (अर्थात एखाद्या जनावराने चावले) तर त्याने स्वत:च आपली निर्भत्सना करावी. (की हात धुतल्या विना झोपला होता.)"

पैगंबर मुहम्मद (स.) यांची ही पध्दत होती की ते झोपी जाण्यापूर्वी वुजू करीत आणि जर कधी अशा स्थितीत झोपण्याचा इरादा करीत की स्नानाची गरज असे तेव्हा अस्वच्छ व

नापाक अंग धुवून घेत, मग वुजू करून झोपत."

९) झोप घेताना घराचा दरवाजा बंद करून घ्या. खाण्यापिण्याची भांडी झाकून घ्या. दिवा किंवा कंदील वगैरे विझवा आणि आग प्रज्वलित असेल तर तीदेखील विझवा.

एकदा मदीना येथे रात्रीच्या वेळी कोणाच्या तरी घरात आग लागली तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "आग तुमची वैरी आहे. जेव्हा झोपायला जाल, आग विझवून टाका."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आदेश दिला,

"जेव्हा संध्याकाळ होईल, तेव्हा लहान मुलांना घराबाहेर पडू देऊ नका. कारण त्या वेळी सैतान (जमिनीवर) पसरतात. मग जेव्हा थोडी रात्र निघून जाईल, तेव्हा त्यांना सोडून द्या. आणि "बिस्मिल्लाह" म्हणून दरवाजा बंद करा आणि "बिसमिल्लाह" म्हणून दिवा विझवा आणि "बिसमिल्लाह" म्हणूनच पाण्याच्या पखालीचे तोंड बांधा आणि "बिसमिल्लाह" म्हणून खाण्या-पिण्याची भांडी झाका आणि झाकण्यासाठी झाकण वगैरे नसेल तर दुसरी एखादी वस्तु भांड्यावर ठेवा."

(सिहाह सित्र : हिस्नहसीन)

१०) झोपते वेळी अंथरूणावर आणि अंथरूणा शेजारी या वस्तू अवश्य ठेवा. पिण्याचे पाणी व ग्लास, लोटा, लाठी, उजेडाकरिता आगपेटी किंवा टॉर्च, मिसवाक, टॉवेल वगैरे आणि जर तुम्ही कोणाकडे पाहुणे म्हणून असाल तर त्या घरच्या लोकांकडून शौचालयाची जागा माहीत करून घ्या. संभवत: रात्री गरज पडावी आणि तुम्ही त्रस्त व्हावे.

पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा आराम करत तेव्हा त्यांच्या डोक्याजवळ सात वस्तू ठेवलेल्या असत. तेलाची बाटली, कंगवा, सुरमादानी, कैची, मिस्वाक, आरसा आणि लाकडाची एक छोटीशी काडी, जी डोके वगैरे खाजविण्यासाठी उपयोगी पडत असे.

११) झोपतेवेळी आपली पादत्राणे आणि कपडे वगैरे जवळ ठेवा कारण, झोपेतून उठल्यावर शोधण्याची पाळी न येवो. उठताक्षणीच पादत्राणात पाय टाकू नका. तसेच कपडेदेखील न झटकता अंगात घालू नका. संभवत: पादत्राणे किंवा कपड्यात एखादा त्रासदायक कृमी-कीटक असावा आणि अल्लाह न करो, आपणास त्रास पोहचवावा.

१२) झोपण्यापूर्वी आपले अंथरुण चांगल्या प्रकारे झाडून स्वच्छ करा. झोपेतून एखाद्या गरजेसाठी उठाल तर पुन्हा झोपताना अंथरूण चांगल्या प्रकारे झाडून घ्या.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,

"जेव्हा कोणी रात्री अंथरूणावरून उठेल आणि पुन्हा अंथरूणावर जाईल, तेव्हा आपल्या लुंगीच्या किनाऱ्याने तीन वेळा ते झाडावे, यासाठी की तो नाही जाणत की त्याच्या पश्चत अंथरूणावर काय येऊन पडले आहे."

(हदीस : तिर्मिजी)

१३) अंथरूणावर पोहचल्यावर ही दुआ (प्रार्थना) करा. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे विशेष सेवक माननीय अनस (रजि.) सांगतात, जेव्हा पैगंबर अंथरूणावर झोपण्यासाठी जात, तेव्हा ही दुआ करत असत.

"अल-हम्दु लिल्लाहिल्लज़ी अत-अ-म-ना व सक़ाना व कफ़ाना व आवाना फ़ कम-मिम -मल्-ला काफ़ि-य लहू व ला मुअ-वि-य." (हदीस : शमाईले तिर्मिजी)

स्तुती व प्रशंसा अल्लाहकरिताच आहे, ज्याने आम्हाला खाऊ-पिऊ घातले आणि ज्याने आमच्या कामात भरपूर मदत केली आणि ज्याने आम्हाला निवासाचे स्थान प्रदान केले. कितीतरी लोक असे आहेत, ज्यांचा कोणी मदत करणारा नाही आणि न कोणी स्थान प्रदान करणारा."

१४) अंथरूणावर पोहोचल्यावर पवित्र कुरआनचा काही भाग अवश्य पठण करा. पैगंबर मुहम्मद (स.) झोपण्यापूर्वी पवित्र कुरआनचा काही भाग अवश्य पठण करीत असत.

पैगंबर मुहम्मद (स.) उच्चारित असत,

"जो मनुष्य आपल्या अंथरूणावर आराम करतेवेळी अल्लाहच्या ग्रंथाचा काही भाग म्हणतो. तेव्हा सर्वश्रेष्ठ अल्लाह त्याच्याजवळ एक फरिश्ता पाठवितो, तो प्रत्येक त्रासदायक वस्तूपासून त्याच्या जागे होण्यापर्यंत त्याचे रक्षण करतो, मग तो केव्हाही झोपेतून जागला असावा." (हदीस : अहमद)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जेव्हा मनुष्य झोपण्यासाठी अंथरूणावर जातो, तेव्हा त्याच वेळी एक फरिश्ता आणि सैतान त्याच्याजवळ पोहचतात. फरिश्ता त्याला म्हणतो, "तुझ्या कामांचा शेवट भलेपणावर कर." सैतान म्हणतो, "तुझ्या कामांचा शेवट वाईटपणावर कर." मग जर तो मनुष्य अल्लाहचे नामस्मरण करून झोपला तर फरिश्ता रात्रभर त्याचे रक्षण करतो."

(हदीस : मुस्लिम)

माननीय आएशा (रजि.) यांचे शुभकथन आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा अंथरूणावर जात, तेव्हा दोन्ही हाताना दुआ मागण्यासारखे मिळवित आणि "कुल हुवल्लाहु अहद" आणि 'कुल अऊज़ू बिरब्बिल फ़-लक़" आणि "कुल अऊज़ु बिरब्बिन्नास" या सूरती (अध्याया) चे पठण करीत. मग हातांवर फुंकून जेथपर्यंत हात पोहचत असे आपल्या शरीरावर फिरवित. डोके, चेहरा आणि शरीराच्या पुढच्या भागापासून सुरूवात करीत आणि असे ते तीन वेळा करीत.

(हदीस : शमाइले तिर्मिजी)

१५) झोपण्याचा इरादा कराल तेव्हा उजवा हात आपल्या उजव्या गालाखाली ठेवून उजव्या कुशीवर झोपा. माननीय बरा (रजि.) सांगतात, पैगंबर मुहम्मद (स.) आराम करीत, तेव्हा आपल्या उजव्या हाताला उजव्या गालाखाली ठेवत आणि या वचनांचा उच्चार करीत.

"रब्बि क़ीनी अज़ा-ब-क यौ-म तब-असु इबा-द-क"

"हे माझ्या पालनकर्त्या! मला त्या दिवशी आपल्या यातनेपासून वाचव, ज्या दिवशी तू दासांना आपल्यासमोर उठवून हजर करशील."

'हिस्ने हसीन'मध्ये उल्लेख आहे की पैगंबर मुहम्मद (स.) हीच वचने तीन वेळा उच्चारित असत.

१६) पालथे झोपण्यापासून आणि डाव्या कुशीवर झोपण्यापासून अलिप्त राहा.

माननीय मुअीमचे पिता तफखतुल गिफारी (रजि.) सांगतात, मी मसजिदीत पालथे होऊन झोपलो होतो की कोणीतरी मला आपल्या पायाने हलविले आणि म्हटले, "अशा प्रकारे झोपणे अल्लाह नापसंत करतो" आणि मी जेव्हा पाहिले तर ते पैगंबर मुहम्मद (स.) होते. (हदीस : अबू दाऊद)

१७) झोपण्यासाठी एखाद्या अशा जागेची निवड करा, जिथे ताजी हवा पोहचत असावी. अशी बंदिस्त खोली टाळा, जिथे ताजी हवा उपलब्ध नसावी.

१८) तोंडावर पांघरूण लपेटून झोपू नका. अशा प्रकारे झोपतांना प्रकृतीवर वाईट परिणाम होतो. चेहरा खुला ठेवून झोपण्याची सवय लावा, यासाठी की तुम्हाला ताजी हवा मिळत राहावी.

१९) खुल्या छतांवर झोपण्याचे टाळा, ज्यांना भिंतीने घेरलेले नसावे आणि छतावरून उतरताना सावधगिरी पाळा आणि जिन्यावर पाय ठेवण्यापूर्वी उजेडाची व्यवस्था करा. कधीकधी क्षुल्लक चूकभूल झाल्याने मोठा त्रास भोगावा लागतो.

२०) कितीही कडाक्याची थंडी पडलेली असो, झोपण्याच्या खोलीत अंगेठी जळत ठेवून झोपू नका आणि न बंदिस्त खोलीत कंदील जळत ठेवून झोपावे. आग जळत राहिल्याने बंद खोलीत जो वायु उत्पन्न होतो, तो स्वास्थ्याकरिता फार अपायकारक आहे. किंबहुना कधीकधी तर अशाने जिवाला धोका उद्‌भवतो आणि मृत्यूही ओढवतो.

२१) झोपण्यापूर्वी ही दुआ अवश्य करा. माननीय अबू हुरैरा (रजि.) कथन करतात, अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) झोपण्यापूर्वी ही दुआ करत असत.

"बिस्मि-क रब्बी व ज़अतू जम्बी व बि-क अरफ़उहू इन अम-सक-त नफ़्सी फ़र-हम्हा, व इन अर-सल-तहा फ़ह-फ़जहा बिमा तह फ़ज़ु बिहि इबाद कस्सालिहीन."

"हे माझ्या पालनकर्त्या! तुझ्याच नावाने मी आपली कुशी अंथरूणावर ठेवली आणि

तुझ्याच आधारे मी तिला अंथरूणावरून उठवीन. जर तू रात्रीच माझा प्राण ताब्यात घेशील तर त्यावर दया कर आणि जर तू त्याला सोडून आणखी जास्त सवलत देशील तर त्याचे रक्षण कर, ज्याप्रमाणे तू आपल्या नेक दासांचे रक्षण करतो."(हदीस : बुखारी, मुस्लिम)

जर ही दुआ तोंडपाठ नसेल तर लहानशी दुआ ही आहे

اَللّٰهُمَّ بِاسْمِكَ اَمُوْتُ وَاَحْيٰى (بخاری، مسلم)

"अल्लाहुम-म बिस्मि-क अमूतु व अह्या" (हदीस : बुखारी, मुस्लिम)

"हे अल्लाह! मी तुझेच नाव घेऊन मृत्युच्या कुशीत जातो, आणि तुझ्याच नावाने जिवंत उठेल."

२२) रात्रीच्या शेवटच्या भागात झोपेतून उठण्याची सवय लावा. आत्मप्रशिक्षण आणि अल्लाहशी संबंध जोडण्याकरिता अंतिम प्रहरी उठणे व अल्लाहचे नाम:स्मरण करणे आवश्यक आहे. अल्लाहने आपल्या प्रिय दासांची हीच विशेष गुणवत्ता सांगितली आहे की रात्री झोपेतून उठून अल्लाहसमोर रूकू आणि सजदे करतात आणि आपल्या अपराधांची क्षमा मागतात.

पैगंबर मुहम्मद (स.) यांची ही पध्दत होती की ते रात्रीच्या सुरूवातीला आराम करत आणि अंतिम प्रहरी उठून अल्लाहच्या उपासनेत मग्न होत.

२३) झोपेतून उठल्यावर ही दुआ करा,

"अल-हम्दु लिल्लाहिल्लज़ी अहयाना बअ-द या अमातना व इलैहिन्नुशूर."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

"प्रशंसा अल्लाहकरिताच आहे, ज्याने आम्हाला मृत केल्यानंतर जीवन प्रदान केले आणि त्याच्याच समोर उठून हजर व्हायचे आहे."

२४) जेव्हा एखादे चांगले स्वप्न पाहाल तेव्हा अल्लाहचे आभार माना आणि त्याला स्वत:साठी शुभ समाचार जाणा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"आता प्रेषित्वापैकी बशारती (खुशखबरी) खेरीज काही बाकी राहिले नाही."

लोकांनी विचारले, "बशारत म्हणजे काय?"

पैगंबरांनी सांगितले, "चांगले स्वप्न."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "तुमच्यापैकी जो अधिक सच्चा आहे, त्याचे स्वप्न अधिक खरे असेल."

पैगंबरांनी ताकीद केली, "एखादे चांगले स्वप्न पाहाल तेव्हा अल्लाहची प्रशंसा करा व ते सांगा आणि मित्रालाच सांगा."

पैगंबर मुहम्मद (स.) एखादे स्वप्न पाहत तेव्हा जवळच्या सहकाऱ्यांना सांगत आणि सहकाऱ्यांनासुद्धा आपले स्वप्न सांगण्याविषयी बोलत व म्हणत, "मी त्याचे स्वप्नफल सांगेन." (हदीस : बुखारी)

२५) दरूद शरीफ जास्तीतजास्त उच्चारत जा. आशा आहे, सर्वश्रेष्ठ अल्लाह पैगंबर मुहम्मद (स.) यांचे स्वप्नात दर्शन घडवीन.

मौलाना मुहम्मद अली मुंगेरी यांनी एकदा माननीय फज्ले रहमान गंज - मुरादाबादी यांना विचारले, "एखादे खास दरूद शरीफ सांगा की ज्यामुळे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभदर्शन व्हावे."

माननीय फज्ले रहमान गंज - मुरादाबादी यांनी सांगितले, "कोणतेही खास दरूद नाही, फक्त सचोटीपूर्ण निष्ठा निर्माण केली पाहिजे." मग थोडे थांबून म्हणाले, "तथापि माननीय सैयद हसन (रह.) यांचे या दरूदला अमलात आणणे सफल ठरले."

"अल्लाहुम-म सल्लि अला मुहम्मदिंव-व इत-र-तिही बि-अ-ददि कुल्लि मअलूमिल्ल-क."

"हे अल्लाह! दया व कृपा अवतरित कर मुहम्मद (स.) यांच्यावर आणि त्यांच्या वंशजांवर, त्या समस्त वस्तूंच्या संख्येइतकी जी तुला माहीत आहे."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्या माणसाने स्वप्नात मला पाहिले, त्याने खरोखर मलाच पाहिले, यासाठी की सैतान माझ्या रुपात येऊ शकत नाही." (हदीस : शमाइले तिर्मिजी)

माननीय यजीद फारसी पवित्र कुरआन लिहीत असत. एकदा स्वप्नात त्यांना पैगंबर मुहम्मद (स.) यांचे दर्शन झाले. माननीय अब्दुल्ला बिन अब्बास (रजि.) जिवंत होते. माननीय यजीद यांनी स्वप्नाबाबत सांगितले तेव्हा माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) यांनी त्यांना पैगंबर मुहम्मद (स.) यांचे हे हदीसवचन सांगितले,

"ज्याने स्वप्नात मला पाहिले, त्याने खरोखर मलाच पाहिले कारण सैतान माझ्या रूपाने येऊ शकत नाही."

मग विचारले, "तुम्ही स्वप्नात ज्यांना पाहिले ते दिसायला कसे होते, ते सांगू शकता?"

माननीय यजीद म्हणाले, "त्यांचे शरीर आणि त्यांचा डामडोल मध्यम प्रकारचा होता. त्यांचा रंग गव्हाळीसह सफेद होता. डोळ्यांना सुरमा लावलेला. हसरा, सुंदर, गोल चेहरा,

अतिशय दाट दाढी, जी संपूर्ण चेहऱ्यावर होती आणि छातीवर पसरलेली होती."

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) यांनी सांगितले, "जर तुम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांना त्यांच्या हयातीत पाहिले असते, तरी यापेक्षा जास्त वर्णन करू शकले नसते." (अर्थात तुम्ही जे वर्णन केले, ते खरोखर पैगंबर मुहम्मद (स.) यांचेच होय.)

(हदीस : शमाइले तिर्मिजी)

२६) अल्लाह न करो, एखादे अप्रिय आणि भयानक स्वप्न दिसले तर ते कोणालाही मुळीच सांगू नका आणि त्या स्वप्नाच्या वाईटपणापासून अल्लाहचा आश्रय मागा. अल्लाहने इच्छिल्यास त्याच्या वाईटपणापासून सुरक्षित राहाल.

माननीय अबू सलमा (रजि.) सांगतात, मी वाईट स्वप्नांमुळे नेहमी आजारी पडत असे. एक दिवस मी माननीय अबू कतादा (रजि.) यांच्याजवळ त्याबाबत तक्रार केली तेव्हा त्यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांचे हे हदीसवचन सांगितले,

"चांगले स्वप्न अल्लाहतर्फे असते. तुमच्यापैकी कोणी चांगले स्वप्न पाहील तर आपल्या निष्ठावान मित्राखेरीज इतर कोणालाही सांगू नका आणि कोणी वाईट स्वप्न पाहील तर कोणालाही मुळीच सांगू नका, उलट जाग येताच *'अऊजु बिल्लाहि मिनश शैतानिर्रजीम'* असे उच्चारून तीन वेळा डाव्या बाजुला थुंकावे आणि कुशी बदलून घ्यावी. अशाने तो स्वप्नाच्या वाईटपणापासून सुरक्षित राहील." (हदीस : रियाजुस्सालिहीन, मुस्लिम)

२७) आपल्या मनाने रचून खोटी स्वप्ने कधीही सांगू नका.

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) यांच्या कथनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जो स्वप्न न पाहता आपल्यातर्फे मनाने रचून सांगेल, त्याला ही शिक्षा दिली जाईल की जवाच्या दोन दाण्यांमध्ये गाठी मारावी आणि तो असे कधीही करू शकणार नाही."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"हा फार मोठा आळ आहे की माणसाने ते काही सांगावे जे त्याच्या डोळ्यांनी पाहिले नाही." (हदीस : बुखारी)

२८) कोणी मित्र आपले स्वप्न सांगेल, तेव्हा त्यांचे चांगले स्वप्नफल सांगा आणि त्याच्या हक्कात दुआ करा.

एकदा एका माणसाने पैगंबर मुहम्मद (स.) यांना आपले स्वप्न सांगितले, तेव्हा पैगंबरांनी सांगितले, "फार चांगले स्वप्न पाहिले, उत्तम स्वप्नफल असेल."

पैगंबर मुहम्मद (स.) सर्वसामान्यत: प्रात:कालीन (फज्र) नमाजनंतर पालथी मारून बसत

आणि लोकांना सांगत, "ज्याने जे स्वप्न पाहिले असेल ते सांगा" आणि स्वप्न ऐकण्याआधी हे शब्द उच्चारीत,

"खैरन त-लक्काहु व शर्रन त-वक्काहु व खैरल-लना व शर्रन अला अअ-दाइना वल-हम्दु लिल्लाहि रब्बिल आलमीन."

"त्या स्वप्नाचा भलेपणा तुम्हाला प्राप्त होवो आणि त्याच्या वाईटपणापासून तुम्ही सुरक्षित राहो. आमच्या हक्कात भलाई आणि आमच्या शत्रूंकरिता संकट असो आणि स्तुती व प्रशंसा अल्लाहकरिताच आहे, जो समस्त जगाचा पालनहार आहे."

२९) कधी स्वप्नात भयभीत झालात किंवा त्रस्त करणारे स्वप्न पाहून दु:खीकष्टी व्हाल, तेव्हा भीती व त्रास दूर करण्याकरिता ही दुआ करा आणि आपल्या बुध्दिमान मुलांनासुद्धा दुआ तोंडपाठ करण्यास सांगा.

माननीय अब्दुल्लाह बिन अम्र बिन आस (रजि.) कथन करतात, जेव्हा कोणी स्वप्नात भयभीत होत असे किंवा दु:खी-कष्टी होत असे, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) त्याची त्रासदी दूर करण्यासाठी ही दुआ करत असत–

"अ ऊज़ु बि कलिमातिल्लाहित्ताम्मति मिन ग़-ज़-बिहि व इक़ाबिहि व शर्रि इबादिहि व मिन ह-म-ज़ातिश शयातीनि व अंय्यह-ज़ुरून" (हदीस : अबू दाऊद, तिर्मिजी)

"मी अल्लाहच्या समस्त वचनांचे आश्रय मागतो. त्याच्या प्रकोपापासून, त्याच्या यातनेपासून, त्याच्या दासांच्या वाईटपणापासून, सैतानांच्या कुविचार मनात टाकण्यापासून आणि या गोष्टीपासून की त्यांनी माझ्याजवळ यावे."

# ६. चालताना मार्गासंबंधीचे शिष्टाचार

१) रस्त्याने चालतांना मध्यम चालीने चालत जा. एवढ्या घाईनेही चालू नका की उगाच लोकांना तमाशा दिसावा आणि न इतक्या सुस्तीने सरपटत जाण्याचा प्रयत्न करु नका की लोकांनी आजारी समजून विचारपूस करावी. पैगंबर मुहम्मद (स.) लांब पावले टाकीत आणि पाय उचलून चालत घसरून कधीही चालत नसत.

२) शिष्टतापूर्वक आणि गांभीर्यासह नजर खाली ठेवून चाला आणि रस्त्यात इकडे तिकडे प्रत्येकावर दृष्टिक्षेप टाकत चालू नका. असे करणे गांभीर्याच्या व संस्कृतीच्या विरुद्ध आहे. पैगंबर मुहम्मद (स.) चालतांना आपले शरीर पुढच्या बाजूने झुकवून चालत जणू कोणी उंच भागावरून खाली उतरत असावा. पैगंबर मुहम्मद (स.) गांभीर्याने थोडी गतीने चालत असत आणि शरीराला चुस्त आणि समेटलेले ठेवत आणि चालतांना उजव्या डाव्या बाजूला पाहत.

३) नम्रतापूर्वक हलक्या पावलांनी चाला, ताठरपणे चालू नका, तुम्ही तर ठोकरीने जमिनीला फाडू शकता नाही की पर्वतांच्या उंचीपर्यंत पोहचू शकता नाही. मग उगाच ताठ होऊन चालण्याची गरजच काय?

४) नेहमी जोडे (पादत्राणे) घालून चाला. नागड्या पायांनी चालणे-फिरणे टाळा. जोडे घातल्याने पायांना काटे, बारीक दगड, आणि इतर त्रासदायक वस्तूंपासून इजा पोहचत नाही. आणि त्रासदायक जनावरांपासूनही या संदर्भात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,

"नेहमी जोडे घालत जा जोडे घालणाराही एक प्रकारे स्वार असतो."

५) रस्त्याने चालतांना चांगली आवड आणि संस्कृती व सभ्यता विचाराधीन राखा. एकतर दोन्ही जोडे घालून चाला किंवा दोन्ही काढून चाला. एका पायात जोडा आणि दुसरा पाय नागडा अशा अवस्थेत चालणे मोठी विदुषकी हरकत आहे. जर खरोखर काही इलाज नसेल तर अशा प्रकारच्या असभ्यपणापासून अगदी दूर राहण्याचा प्रयत्न करा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"एक जोडा घालून कोणी चालू नये. एकतर दोन्ही जोडे घालून चालावे किंवा दोन्ही जोडे काढून चालावे." (हदीस : शमाइले तिर्मिजी)

६) चालतांना घातलेले कपडे समेटून चाला. यासाठी की अडखळून पडण्याचा धोका राहू नये. पैगंबर मुहम्मद (स.) चालताना आपली लुंगी वगैरे थोडी वर उचलून घेत.

७) नेहमी नि:संकोचपणे साथीदारांसह चाला. पुढे पुढे चालत राहून आपली श्रेष्ठता दाखवू नका. पैगंबर नि:संकोचपणे आपल्या साथीदारांसह चालताना कधीही आपली विशेष श्रेष्ठता

दाखवीत नसत. नेहमी ते आपल्या साथीदारांच्या मागे चालत आणि कधी नि:संकोचपणे आपल्या साथीदाराचा हात धरूनही चालत असत.

८) रस्त्याचा हक्क अदा करण्याचे ध्यानात राखा. रस्त्यात थांबून किंवा बसून येण्याजाणाऱ्याना बघत राहणे टाळा आणि प्रसंगी रस्त्यात थांबण्याची किंवा बसण्याची पाळी आलीच तर रस्त्याचा हक्क अदा करण्याकरिता सहा गोष्टी लक्षात ठेवा.

अ) नजर खाली राखा
आ) त्रासदायक वस्तूंना रस्त्यातून हटवा
इ) सलामचे उत्तर द्या
ई) सत्कर्मासाठी प्रवृत्त करा आणि दुराचारापासून रोखा
उ) भटकलेल्यांना रस्ता दाखवा
ऊ) आपदाग्रस्त लोकांची मदत करा

९) रस्त्यात नेहमी चांगल्या लोकांची सोबत धरा, वाईट लोकांसोबत चालण्याचे टाळा.

१०) रस्त्याने स्त्री - पुरुष मिळून मिसळून चालू नका. स्त्रियांनी मध्यमार्ग सोडून किनाऱ्याने चालले पाहिजे, आणि पुरूषांनी त्यांच्यापासून दूर राहून चालावे.
पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,
"चिखलाने माखलेले आणि दुर्गंधीयुक्त सडक्या चिखलात भरलेल्या डुकराशी धडक बसणे सहन केले जाऊ शकते, परंतु हे सहन करण्यासारखे नाही की एखाद्या पुरुषाच्या खांद्यांला एखाद्या अनोळखी स्त्रीची धडक बसावी."

११) सभ्य व सुसंस्कृत स्त्रिया जेव्हा एखाद्या गरजेपोटी रस्त्याने चालतील, तेव्हा त्यांनी बुरखा किंवा चादरीने आपले शरीर पोषाख आणि शृंगार-सजावटीस खूप चांगल्या प्रकारे लपवावे आणि चेहऱ्यावर पडदा (नकाब) ठेवून असावे.

१२) असा कोणताही दागिना घालून चालू नका, ज्यामुळे चालताना झंकार निर्माण व्हावा. तेव्हा हलक्या पावलांनी चालावे यासाठी की त्यांचा आवाज अनोळखी पुरुषांना आकर्षित करू नये.

१३) स्त्रियांनी, हवेत दूरपर्यंत पसरणारा सुगंध (अत्तर वगैरे) लावून रस्त्यावर चालू नये. अशा स्त्रियांबाबत पैगंबर मुहम्मद (स.) यांनी कडक शब्दात निषेध केला आहे.

१४) घराबाहेर पडतांना आकाशाकडे दृष्टी वर करून ही दुआ करावीससस.
"बिस्मिल्लाहि तवक्कल्तु अलल्लाहि अल्लाहुम-म इन्नी अऊजु बि-क मिन अन-नज़िल-ल अव नुज़ल-ल व अन नज़िल अव नुज़ल-ल अव नज़लि-म अव युज़ ल-म अलैना अव नज-ह-ल अव युज-ह-ल अलैना."

अल्लाहचे नाव घेऊन (मी घराबाहेर पाऊल टाकले) आणि त्याच्यावरच माझा भरवसा आहे. हे अल्लाह ! मी तुझा आश्रय इच्छितो. या गोष्टीपासून की आम्ही डळमळून जावे किंवा कोणी दुसऱ्याने आम्हाला डळमळीत करावे, आम्ही स्वत: भटकून जावे किंवा कोणी आम्हाला भटकवावे, आम्ही स्वत: कोणावर अत्याचार करून बसावे किंवा कोणी आमच्यावर अत्याचार करावा, आम्ही स्वत: नादानपणा करू लागावे किंवा कोणी दुसऱ्याने आमच्याशी अज्ञानपूर्ण वर्तन करावे. (हदीस : मुसनद अहमद)

१५) बाजारात जाल तेव्हा ही दुआ करा,

"बिस्मिल्लाहि अल्लाहुम-म इन्नी अस-अलु-क ख़ै-र हाज़िहिस्सूक़ि व ख़ै-र मा फ़ीहा व अऊज़ु बि-क मिन्शर्रिहा व शर्रिमा फ़ीहा, अल्लाहुम-म इन्नी अऊज़ु बि-क अन उसी-ब बिहा यमीनन फ़ाजि-र-तन अव स-फ़-क़-तन ख़ासिरह."

अल्लाहच्या नावाने (बाजारात दाखल होतो) हे अल्लाह! मी तुझ्याजवळ या बाजाराची भलाई आणि जे काही याच्यात आहे, त्याची भलाई इच्छितो आणि या बाजाराचा वाईटपणा आणि जे काही याच्यात आहे, त्याच्या वाईटपणापासून आश्रय मागतो. हे अल्लाह! तुझा आश्रय मागतो, या गोष्टीपासून की इथे मी खोट्या शपथा घेण्यात किंवा घाट्याचा एखादा सौदा करून बसावे."

माननीय उमर बिन खत्ताब (रजि.) कथन करतात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "जो मनुष्य बाजारात दाखल होताना ही दुआ करेल तर अल्लाह त्याच्या हिशोबात दहा लाख नेकी (सत्कर्मे) लिहील. दहा लाख अपराधांना माफ करील आणि दहा लाख दर्जे उंचावील. ती दुआ अशी,

"ला इला-ह इल्लल्लाहु वह्दहु ला शरी-क लहू लहुल मुल्कु व लहुल हम्दु युह्यी व युमीतु व हु-व हय्युल्ला यमूतु बि-यदिहिल-ख़ैरू व हु - व अला कुल्लि शैइन क़दीर."

अल्लाहच्या खेरीज कोणी ही उपास्य नाही. तो एकमेव आहे. त्याचा कोणीही सहभागी नाही. राज्यसत्ता त्याचीच आहे. तोच आभार व स्तुति-प्रशंसेचा हक्कदार आहे. तोच जीवन प्रदान करतो आणि तोच मृत्यु देतो. तो जिवंत आणि अविनाशी आहे. त्याला मृत्यु नाही. सर्व भलाई त्याच्याच सामर्थ्याधीन आहे आणि तो सर्वसमर्थ आहे." (हदीस : तिर्मिजी)

# ७. प्रवासाचे शिष्टाचार

१) प्रवासाकरिता अशा वेळी निघाले पाहिजे की कमीतकमी वेळ खर्च व्हावा आणि नमाजच्या वेळांचेही ध्यान रहावे. पैगंबर मुहम्मद (स.) स्वत: प्रवासावर जात किंवा दुसऱ्या कोणाला पाठवीत तेव्हा सर्वसामान्यत: गुरूवारचा दिवस योग्य मानीत.

२) प्रवास एकट्याने करू नका. शक्य असेल तर निदान तीन माणसे सोबत घ्या. अशाने रस्त्यात सामानाचे रक्षण आणि इतर गरजा भागविण्यात सुविधा असते आणि मनुष्य अनेक प्रकारच्या संकटापासून सुरक्षित राहतो.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जर लोकांना एकट्याने प्रवास करण्याच्या त्या हानीकारक गोष्टी माहीत पडतील ज्या मी जाणतो, तर कोणताही स्वार कधीही रात्री एकट्याने प्रवास करणार नाही."

(हदीस : बुखारी)एकदा एक मनुष्य खूप लांबचा प्रवास करून पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेस हजर झाला. तेव्हा प्रवाशाला विचारले,

"तुमच्या सोबत कोण आहे? तो म्हणाला, हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) माझ्या सोबतीला कोणीही नाही. मी एकटा आलो आहे. तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्माविले, "एकटा स्वार सैतान आहे आणि दोन स्वार सैतान आहेत. तथापि तीन स्वार, स्वार आहेत."

३) स्त्रीने नेहमी एखाद्या अशा नातेवाईकासोबत प्रवास करावा, ज्याच्याशी लग्नसंबंध होऊ शकत नाही. परंतु एक किंवा अर्ध्या दिवसाचा मामुली प्रवास करायचा असेल तर काही हरकत नाही. परंतु सावधगिरी हीच की कधी एकट्याने प्रवास करू नये. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभवचन असे,

"जी स्त्री अल्लाह आणि पारलौकिक जीवनाच्या दिवसावर ईमान राखते, तिच्याकरिता उचित नव्हे की तिने तीन दिवस किंवा त्याहून जास्त काळाचा प्रवास एकटीने करावा. ती इतका लांबचा प्रवास, त्याच वेळी करू शकते, जेव्हा तिच्यासोबत तिचा पिता असेल, किंवा स्वत:चा मुलगा असेल अथवा अन्य असा नातेवाईक ज्याच्याशी लग्नसंबंध वर्ज्य असेल."

(हदीस : बुखारी)

आणखी एका प्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले, "स्त्रीने एक दिवस आणि एक रात्रच्या अंतरावर एकटीने जाऊ नये." (हदीस : मुस्लिम, बुखारी)

४) प्रवासाला निघताना जेव्हा वाहनावर बसाल आणि वाहन चालायला लागले त्या वेळी ही दुआ करावी,

"सुबहानल्लज़ी सख़-ख़र लना हाज़ा व मा कुन्ना लहू मुक़रिनी-न व इन्ना इला रब्बिना ल-मुन्क़लिबून। अल्लाहुम-म इन्ना नस-अलु-क फ़ी स-फ़-रिना हाज़लबिर-र वत्तक़्वा व

मिनलअ-मलि मा तर्ज़ा अल्लाहुम-म हव्विन अलैना स-फ़-रिना हाज़ा वत्वि अन्ना बुअ-दहू अल्लाहुम-म अन्तस्साहिबु फ़िस-स-फ़रि वल ख़लीफ़तु फ़िल अह्लि, अल्लाहम-म इन्नी अऊज़ुबि-क मिन वअ-साइस-स-फ़रि व कआ-बतिल मंज़रि, व सूइल मुन-क़-ल-बि फ़िल मालि वल अह्लि वल व-लदि वल हौरि बअ-दल कौरि व दअ-वतिल मज़्लूम."

(हदीस : मुस्लिम, अबू दाऊद, तिर्मिजी)

पवित्र आणि श्रेष्ठतम आहे तो अल्लाह, ज्याने हे (वाहन) आमच्या अधीन केले, वास्तविक आम्ही त्याला काबूत राखणारे नव्हतो. निश्चितच आम्ही आपल्या पालनकर्त्याकडे परत जाणार आहोत. हे अल्लाह! आम्ही तुझ्याकडून या प्रवासात सत्कर्म आणि पापभीरूतेची सुबुध्दी मागतो आणि अशा कामांची सुबुध्दी, जी तुझ्या प्रसन्नतेची असावीत. हे अल्लाह! आमच्यासाठी हा प्रवास सहज-सुलभ कर आणि याचे लांब अंतर आमच्यासाठी कमी कर. हे अल्लाह! तूच या प्रवासात सोबती आहेस. आणि तूच कुटुंबियांचा वाली आणि देखरेख करणारा आहेस. हे अल्लाह! मी तुझा आश्रय मागतो प्रवासाच्या कष्ट यातनांपासून असत्य दृश्यांपासून आणि आपल्या धन-सम्पत्ति, आपल्याशी संबंधित लोकांमध्ये आणि मुलाबाळात वाईटरित्या परत येण्यापासून आणि भलाईनंतर वाईटपणा पासून आणि अत्याचारपीडिताच्या शापापासून."

५) मार्गात इतरांच्या सोयी सवलतीचा आणि आरामाचाही विचार राखा. रस्त्याच्या सोबतीचाही हक्क आहे. पवित्र कुरआनात आहे, सोबतीशी चांगला व्यवहार करा. शेजारच्या सोबतिशी अभिप्रेत असा प्रत्येक माणूस, जो कोठेही केव्हाही आपल्या सोबत व्हावा. प्रवास करतांना लहानशा साथीदाराचा हा हक्क आहे की आपण त्याच्याशी चांगला व्यवहार करावा आणि प्रयत्न करावा की आपल्या एखाद्या बोलण्याने किंवा कामाने त्याला त्रास पोहचू नये.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले की,

"जनसमूहाचा प्रमुख हा त्यांचा सेवक असतो. जो मनुष्य इतरांची सेवा करण्यात बाजी मारील, त्याच्याहून सत्कर्मात पुढे जाणारा जर कोणी असू शकतो तर फक्त तोच, जो अल्लाहच्या मार्गात शहीद होईल." (हदीस : मिश्कात)

६) प्रवासासाठी निघतांना आणि परत आल्यावर दोन रकअत कृतज्ञता दर्शविण्यासाठी नफ्ल नमाज अदा करा. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे हे आचरण होते.

७) जेव्हा तुमची गाडी, बस किंवा विमान उंचीवर चढत जाईल किंवा उडेल, तेव्हा ही दुआ करावी.

अल्लाहुम-म ल-कश-श-र-फु अला कुल्लि श-र-फिंव-व लकल हम्दु अला कुल्लि हाल.

हे अल्लाह! तुला प्रत्येक श्रेष्ठतेवर आणि उच्चतेवर महानता प्राप्त आहे. स्तुती आणि प्रशंसा,

प्रत्येक स्थितीत तुझाच हक्क आहे.

८) रात्री कोठे थांबवण्याची वेळ आली तर सुरक्षापूर्ण ठिकाणी थांबा, जिथे चोर डाकूपासून आपणास जिवांचा व धनाचा धोका नसावा आणि त्रास-यातना देणाऱ्या जनावरांचे ही भय नसावे.

९) प्रवासाचा उद्देश पूर्ण झाल्यानंतर घरी परत येण्यात विलंब लाऊ नका. अनावश्यकरित्या इकडे-तिकडे फिरू नका.

१०) प्रवासाहून परतल्यावर अचानक सूचना न देता घरी येऊ नये. आधी तशी सूचना द्या, अन्यथा मशिदीत दोन रकअत कृतज्ञतेची नमाज अदा करून घरच्या लोकांना एवढी संधी द्या की त्यांनी आपल्या स्वागताची तयारी करावी.

११) प्रवासात जनावर सोबत असेल तर त्याच्या सुखसुविधेचा व आरामाचा विचार राखा. आणि जर कोणी स्वार असेल तर त्याच्याही गरजांचा व रक्षणाचा काळजी घ्या.

१२) शीत ऋतुत आवश्यक कपडे, अंथरूण वगैरे सोबत राखा. आणि यजमानाला अनुचित क्लेश देऊ नका.

१३) प्रवासात पाण्याचे भांडे, नमाज पढण्याचे वस्त्र वगैरे सोबत असू द्या. यासाठी की इस्तिंजा, वुजू ,नमाज आणि पाणी पिण्याबाबत त्रास होऊ नये.

१४) अनेक जण एकत्रितपणे प्रवास करत असतील तर एकाला आपला प्रमुख ठरवा. तथापि प्रत्येक मनुष्याने आपले तिकिट, गरजेपुरती रक्कम आणि इतर आवश्यक सामान आपल्यासोबत राखावे.

१५) प्रवासात एखाद्या ठिकाणी रात्र झाल्यास ही दुआ करावी,

"या अरजु! रब्बी व रब्बुकील्लाहु अउजु बिल्लाहि मिन शर्रिकि व शर्रि मा खुलि-क़ फ़ीकि व शर्रि मा यदिब्बु अलैकी व अ ऊजु बिल्लाहि मिन-अ-स-दिंव व अस-व-द व मिनल हय्यिति वल-अक़-रबि व मिन शर्रि साकीनिल ब-लदि व मिवँ वालिदिवँ वमा व लद."

हे जमीन! माझा आणि तुझा पालनकर्ता अल्लाह आहे. मी अल्लाहचा आश्रय मागतो तुझ्या वाईटपणापासून आणि त्या जीवांच्या वाईटपणापासून जे तुझ्यात अल्लाहने निर्माण केले आहेत आणि त्या जीवांच्या वाईट पणापासून जे तुझ्यावर चालतात आणि मी अल्लाहचे शरण मागतो. सिंहापासून काळ्या नागापासून आणि साप व विंचूपासून या शहराच्या रहिवाशांपासून आणि प्रत्येक बाप व संततीच्या वाईटपणापासून." (हदीस : अबू दाऊद)

१६) जेव्हा प्रवासाहून घरी परत याल तेव्हा ही दुआ करावी.

औबन औ-बल्लि रब्बिना नौबल्ला युग़ादिरू अलैना हौबा

परतणे आहे आपल्या पालनकर्त्याकडे परतणे आहे आणि आपल्या पालनकर्त्या समोरच तौबा (क्षमायाचना) आहे. अशी तौबा जी आमच्यावर अपराधाचा कसलाच प्रभाव बाकी राहू देणार नाही.'' (हिस्ने हसीन)

१७) जेव्हा एखाद्याला प्रवासासाठी निरोप द्याल तर थोडे दूर त्याच्यासोबत जा निरोप देतांना त्यालाही दुआची विनंती करा आणि त्याला या दुआसह निरोप द्या

अस्तौदि उल्ला-ह दी-न-क व अमा-न-त-क व ख्वाती-म अ-मलिक (हिस्ने हसीन)

मी तुमच्या दीन (धर्मा)स, अमानत आणि आचरणाच्या समाप्तीस अल्लाहच्या हवाली करतो.

१८) जेव्हा कोणी प्रवासाहून परत येईल तर त्याचे स्वागत करा आणि प्रेमदर्शक शब्दांचा प्रयोग करीत, गरज आणि प्रसंगाचे भान राखून हस्तांदोलन करा किंवा आलिंगन द्या.

# ८. दु:ख शोकाचे शिष्टाचार

१) संकटांना संयम आणि शांतीपूर्वक सहन करा. कधीही धैर्य सोडू नका. दु:ख आणि शोकाला कधीही मर्यादेबाहेर जाऊ देऊ नका. या जगाच्या जीवनात कोणताही मनुष्य दु:ख विलाप, संकट व त्रास, आपत्ती आणि अपयश, तसेच हानीपासून निर्भय आणि सुरक्षित राहू शकत नाही. तथापि ईमानधारक व इन्कारी माणसांच्या चारित्र्यात हा फरक अवश्य असतो की इन्कारी मनुष्य दु:ख-शोकाच्या आघाताने त्रस्त होऊन आपले भान हरवून बसतो. नैराश्याला बळी पडून गळीतगात्र होतो आणि प्रसंगी दु:खावेग असह्य झाल्याने आत्महत्या करून बसतो. परंतु ईमाधारक, कितीही मोठे संकट आल्यावर संयमशील राहतो. संयम आणि मजबूतीचा पुतळा बनून अभेद्यशिलेसारखा अढळ राहतो. तो हा विचार करतो की हे जे काही झाले, अल्लाहने निर्धारीत केलेल्या भाग्यानुसार घडले. अल्लाहचा कोणताही आदेश बुध्दिकौशल्य आणि उद्दिष्टाविना नसतो आणि असा विचार करून अल्लाह जे काही करतो, आपल्या दासाच्या भलाईसाठी करतो. खात्रीने यात भलाईचा पैलू असेल. यामुळे ईमानधारकाला मानसिक समाधान प्राप्त होते. दु:खाच्या आघातात एक गोडी वाटू लागते. आणि भाग्यासंबंधीची ही श्रध्दा प्रत्येक कठीण परिस्थितीला सहज -सुलभ बनविते. अल्लाहने फर्माविले आहे.

"कोणतीही विपत्ती अशी नाही जी पृथ्वीवर अथवा तुमच्या स्वत:वर कोसळत असते आणि आम्ही तिला निर्माण करण्यापूर्वी एका ग्रंथात (अर्थात विधी-लेखात) लिहिलेली नसते. असे करणे अल्लाहसाठी अत्यंत सोपे काम आहे. (हे सर्वकाही अशासाठी आहे) जेणेकरून जी काही हानी तुम्हाला होईल त्यावर तुम्ही विषण्ण होऊ नये."

*(दिव्य कुरआन, ५७:२२-२३)*

भाग्यावर ईमान राखण्याचा लाभ हा आहे की ईमानधारक मोठ-मोठ्या संकटाला भाग्याचा निर्णय समजून स्वत:च्या दु:खाचा उपाय प्राप्त करून घेतो आणि त्रस्त, विमनस्क होत नाही. तो प्रत्येक मामल्याचा संबंध कृपावान अल्लाहशी जोडून भलाईच्या पैलूवर दृष्टी केंद्रित करतो आणि संयम व कृतज्ञतेसह प्रत्येक वाईटातून स्वत:साठी भलाई काढण्याचा प्रयत्न करतो. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे.

"ईमानधारकांचा मामला मोठा वैशिष्ट्यपूर्ण आहे. तो ज्या अवस्थेत असतो, भलाई प्राप्त करतो. जर तो दु:ख, आजार आणि दारिद्र्याला तोंड देत असतो तेव्हा धैर्य व शांतीने सहन करतो आणि ही कसोटी त्याच्यासाठी हक्कात भलाई ठरते. आणि जर त्याला आनंद आणि सुख संपन्नता प्राप्त होते. तर तो अल्लाहचे आभार मानतो आणि ही सुख-संपन्नता त्याच्यासाठी भलाईचे कारण ठरते." (हदीस : मुस्लिम)

२) जेव्हा दु:ख-शोकाची एखादी बातमी ऐकाल किंवा एखादे नुकसान होईल अथवा एखादी क्लेश यातना पोहोचेल किंवा अचानक एखाद्या संकटात सापडाल तेव्हा त्वरीत "इन्ना लिल्लाहि व इन्ना इलैहि राजिऊन" (अर्थात आम्ही अल्लाहचेच आहोत आणि त्याच्याचकडे परत जाणार आहोत) हे वचन म्हणावे. अर्थात हे की आमच्याजवळ जे काही आहे, सर्व अल्लाहचेच आहे. त्यानेच प्रदान केले आहे आणि तोच घेणाराही आहे. आम्ही सर्व त्याचेच आहोत आणि त्याच्याचकडे परत जाणार आहोत. आम्ही प्रत्येक स्थितीत अल्लाहच्या मर्जीवर राजी आहोत. त्याचे प्रत्येक कार्य हेतु, बुध्दिकौशल्य आणि न्यायाला अनुसरून आहे. तो जे काही करतो ते एखाद्या मोठ्या भलाईला दृष्टीपंथात राखून करतो. एकनिष्ठ दासाचे कर्तव्य हे की कोणत्याही प्रसंगी त्याच्या कपाळावर आढ्या येता कामा नये.

या संदर्भात अल्लाहने फर्माविले आहे,

"आणि आम्ही खचितच तुम्हाला भय-भूख, जीवित व वित्त हानी आणि तुमच्या प्राप्तीमध्ये घट करून तुमची परिक्षा घेऊ. ह्या परिस्थितींत जे लोक संयमपूर्वक आचरण करतील आणि जेव्हा जेव्हा आपत्ती येईल तेव्हा म्हणतील कि, "आम्ही अल्लाहचेच आहोत, आणि अल्लाहकडेच आम्हाला परत जायचे आहे." त्यांना शुभसंदेश द्या. त्यांच्यावर त्यांच्या पालनकर्त्याकडून मोठी कृपा होईल. आणि त्यांच्यावर दयेचे छत्र असेल आणि असेच लोक सन्मार्गी असतील." *(दिव्य कुरआन, २:१५५-१५७)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जेव्हा एखादा दास संकट आल्यावर, "इन्ना लिल्लाहि व इन्ना इलैहि राजिऊन" वाचतो, तेव्हा अल्लाह त्याचे संकट दूर करतो. त्याला चांगल्या परिणामाने उपकृत करतो आणि त्याला त्याची आवडती वस्तू त्याचा मोबदला म्हणून प्रदान करतो."

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांचा दिवा विझला, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी "इन्ना लिल्लाहि व इन्ना इलैहि राजिऊन" या वचनाचा उच्चार केला.

एकाने विचारले, हे अल्लाहचे पैगंबर! दिवा विझणे हीसुध्दा आपत्ती आहे काय? पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, होय ! ज्या गोष्टीनेदेखील ईमान धारकाला त्रास दु:ख पोहोचेल ती आपत्ती होय."

आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्माविले,

"ज्या ईमानधारक माणसाला जी काही मानसिक यातना, शारीरिक यातना व आजार एखादे दु:ख आणि मन:स्ताप पोहोचतो, येथपावेतो की जर त्याला एखादा काटाही बोचतो (आणि तो यावर संयम राखतो) तर अल्लाह त्याच्या अपराधांना माफ करतो."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

माननीय अनस (रजि.) यांचे निवेदन आहे, पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभवचन आहे. "जेवढी मोठी कसोटी आणि आपत्ती असते तेवढा मोठा त्याचा मोबदलाही असतो. आणि अल्लाह जेव्हा एखाद्या समूहाशी प्रेम राखतो तेव्हा त्यांना (आणखी जास्त सतेज व शुध्द सोने बनविण्याकरिता) कसोटीत टाकतो. यास्तव जे लोक अल्लाहच्या मर्जीवर राजी राहिले, अल्लाहदेखील त्यांच्याशी राजी राहतो. आणि जो या कसोटीत अल्लाहशी नाराज होईल तर अल्लाहदेखील त्याच्याशी नाराज होतो." (हदीस : तिर्मिजी)

माननीय अबू मूसा अशअरी (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जेव्हा एखाद्या माणसाचा बालक मरण पावतो, तेव्हा अल्लाह फरिश्त्यांना विचारतो, " तुम्ही माझ्या दांसाच्या बाळाचे प्राण हरण केले काय? ते म्हणतात, " होय ". मग तो त्यांना विचारतो, "तुम्ही त्याच्या काळजाच्या तुकड्याचे प्राण हरण केले?" ते म्हणतात, " होय." मग तो त्यांना विचारतो, "तेव्हा माझ्या दासाने काय म्हटले?" ते म्हणतात, "या संकटात त्याने तुझी प्रशंसा केली आणि 'इन्ना लिल्लाहि व इन्ना इलैहि, राजिऊन' असे म्हटले." त्यावर अल्लाह त्यांना फर्मावितो, "माझ्या या दासासाठी जन्नतमध्ये एक घर तयार करा आणि त्याचे नाव 'बैतुल हम्द' (कृतज्ञतेचे घर) असे ठेवा." (हदीस : तिर्मिजी)

३) एखाद्या दु:खद घटनेवर शोक व्यक्त करणे स्वाभाविक बाब आहे तथापि या संदर्भात या गोष्टीचे पुरेपूर मान राखावे की दु:खावेशाच्या अत्याधिक अवस्थेत तोंडाने कोणतीही नाहक गोष्ट बोलू नये आणि धीर-संयम व कृतज्ञशीलता सोडू नये.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे सुपुत्र माननीय इब्राहीम (रजि.) पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या मांडीवर होते. श्वास उखडण्याची वेळ होती. हे रूदनकारक दृश्य पाहून पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शुभ नेत्रातून अश्रू वाहू लागले आणि त्यांनी सांगितले," हे इब्राहीम! आम्ही तुझ्या विरहाने दु:खी आहोत. परंतु तोंडाने तेच निघेल, जे अल्लाहच्या मर्जीनुसार असेल." (हदीस : मुस्लिम)

४) अत्याधिक दु:खात असे कोणतेही कृत्य करू नका ज्याद्वारे कृतघ्नता व तक्रार व्यक्त व्हावी आणि जे शरीअतच्या विरुध्द असावे. मोठ्याने ओरडून रडणे, अंगावरचे कपडे फाडणे, तोंडावर मारून घेणे, आरडाओरड करणे आणि शोकातिरेकाने डोके व छाती बडवून घेणे, वगैरे ईमानधारकांरिता उचित नाही. याबाबत पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जो मनुष्य सदऱ्याचा गळा फाडत, गालांवर चापट्या मारत आणि अज्ञान काळाप्रमाणे आरडाओरड करीत करतो, तो माझ्या सम्प्रदायापैकी नाही." (हदीस : तिर्मिजी)

माननीय जाफर (रजि.) जेव्हा शहीद झाले, आणि त्यांच्या शहादतीची खबर त्यांच्या घरी पोहोचली तेव्हा त्यांच्या घरातल्या स्त्रिया मोठ्याने ओरडू लागल्या आणि शोक-विलाप

करू लागल्या. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगून पाठविले, असा शोकविलाप केला जाऊ नये पण त्यांनी आपला शोक जारी ठेवला तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी दुसऱ्यांदा मनाई केली तरीही त्यांनी ऐकले नाही. तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आदेश दिला, त्यांच्या तोंडात माती भरा. (हदीस : बुखारी)

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) एका जनाजा (अन्त्ययात्रे) त सहभागी होते. एक स्त्री शेगडी घेऊन आली. पैगंबरांनी तिला एवढ्या सक्तीने दरडावले की ती तत्क्षणी पळाली.

(सीरतुन्नबी, भाग - ६) पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, जनाजाच्या मागून कोणी आग आणि राग घेऊन जाऊ नये.

अरबस्तानात ही प्रथा होती की लोक अंत्ययात्रेत मागे चालत तेव्हा शोक व्यक्त करण्याकरिता आपली चादर फेकून देत, फक्त अंगरखा घालून राहात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी या लोकांना या अवस्थेत पाहून सांगितले,

"अज्ञानकाळातील प्रथा पत्करीत आहात? माझ्या मनात आले की, तुमच्यासाठी अशी वाईट प्रार्थना करावी की तुमचे चेहरेच विकृत होऊन जावेत." लोकांनी त्याच क्षणी आपापल्या चादरी अंगावर टाकल्या आणि पुन्हा असे केले नाही."(हदीस : इब्ने माजा)

५) आजाराला बरे-वाईट बोलू नका आणि न तक्रारदर्शक गोष्ट तोंडाने काढू नका किंबहुना अतिशय धीर-संयम बाळगून राहा आणि पारलौकिक जीवनातच्या मोबदल्याची अपेक्षा करा.

आजारपण झेलल्याने व यातना सहन केल्याने ईमानधारकांचे अपराध धुतले जातात. तो शुध्द होतो. आणि पारलौकिक जीवनात मोठा मोबदला मिळतो. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ईमानधारकाला शारीरिक त्रास किंवा आजार अथवा अन्य एखाद्या कारणाने जो काही त्रास किंवा दु:ख पोहोचते अल्लाह त्यामुळे त्याच्या अपराधांना अशा प्रकारे झडवतो, ज्या प्रकारे वृक्ष आपल्या पानांना झडवतो." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एका स्त्रीला थरथर कापत असलेले पाहून विचारले, हे उम्मे साइब (मुसय्यिब) ! हे काय, तुमचा थरकांप कशामुळे होतोय? त्या म्हणाल्या, मला तापाने वेढून ठेवलय, अल्लाह समाचार घेवो त्याचा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ताकीद केली की,

"नव्हे, तापाला वाईट म्हणू नका. कारण ताप आदमच्या संततीला अशा प्रकारे अपराधांपासून मुक्त करतो ज्या प्रकारे आग लोखंडाच्या घाणीला दूर करून साफ करते." (हदीस : मुस्लिम)

माननीय अता बिन रिबाइ (रजि.) आपला एक किस्सा निवेदन करतात, एकदा

काबागृहाजवळ माननीय अब्बास (रजि.) मला म्हणाले, "तुम्हाला एक जन्नती स्त्री दाखवू? मी म्हणालो, 'अवश्य दाखवा.' म्हणाले, पाहा ही जी काळी कुळकुळीत स्त्री आहे ही एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेस हजर झाली आणि म्हणाली, हे अल्लाहचे पैगंबर! मला मिरगी (फिटस) चा असा दौरा पडतो की आपल्या शरीराचेही भान राहात नाही आणि मी त्या अवस्थेत विवस्त्र होते. हे पैगंबर मुहम्मद (स.) माझ्यासाठी अल्लाहजवळ दुआ करा. " पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, जर तुम्ही हा त्रास संयमपूर्वक सहन करीत राहाल तर अल्लाह तुम्हाला जन्नत प्रदान करील आणि तुमची इच्छा असेल तर मी दुआ करतो की अल्लाह तुम्हाला चांगले करो." हे ऐकून ती स्त्री म्हणाली, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! मी हा त्रास सबुरीने सहन करीन. तथापि ही दुआ अवश्य करा की मी या अवस्थेत विवस्त्र न व्हावी. तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी तिच्यासाठी दुआ केली. माननीय अता म्हणतात की मी त्या उंच स्त्री उम्मे जुफरला काबागृहाच्या पायऱ्यांवर पाहिले.

६) कोणाच्या मृत्युवर तीन दिवसांपेक्षा जास्त काळ शोक करू नका. नातेवाईकांच्या मृत्युबद्दल दु:खी होणे, रडणे एक स्वाभाविक गोष्ट आहे. परंतु याची मुदत जास्तीतजास्त तीन दिवस आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"एखाद्या ईमानधारकाकरिता हे उचित नव्हे की तीन दिवसाहून अधिक एखाद्याबद्दल शोक करीत राहावे तथापि विधवा स्त्रीच्या शोक-विलापाचा अवधी चार महिने दहा दिवस आहे. या अवधित तिने कोणतेही रंगीत वस्त्र घालू नये. सुगंधी द्रव्य वगैरे लावू नये आणि कसलाही साजशृंगार करू नये."

(हदीस : तिर्मिजी)

माननीय जैनब बिन्त जहश यांच्या भावाचे निधन झाले. तेव्हा चौथ्या दिवशी विचारपूस करण्यासाठी काही स्त्रिया पोहोचल्या. त्यांनी सर्वांसमोर सुगंधी द्रव्य लावले आणि सांगितले,

"मला या वेळी अत्तर लावण्याची काही गरज नव्हती मी हे अत्तर फक्त एवढ्यासाठी लावले की मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडून ऐकले आहे की एखाद्या मुस्लिम स्त्रीला पतीशिवाय कोणत्याही नातेवाईकाकरिता तीन दिवसापेक्षा जास्त काळ शोक करणे उचित नाही."

७) दु:ख विलाप आणि संकटसमयी एकमेकांना संयम राखण्यास प्रवृत्त करा. पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा उहूदच्या लढाईहून परत आले तेव्हा स्त्रिया आपापल्या प्रियजनांची व नातेवाईकांची दशा जाणून घेण्यास हजर झाल्या. जेव्हा माननीय हम्ना बिन्त जहश, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या समोर आली तेव्हा पैगंबरांनी तिला संयम राखण्यास प्रवृत्त केले आणि म्हणाले, आपला भाऊ अब्दुलाहबाबत संयम राखा. त्यांनी "इन्ना लिल्लाहि व इन्ना इलैहि

राजिऊन" म्हटले आणि भावासाठी क्षमा-याचनेची प्रार्थना केली. मग पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, आपले मामा हम्जाबाबतही धीर संयम राखा. त्यांनी पुन्हा "इन्ना लिल्लाहि व इन्ना इलैहि राजिऊन" म्हटले व क्षमा-याचनेची प्रार्थना केली.

माननीय अबू तलहा (रजि.) यांचा पुत्र आजारी होता. मुलाला त्या अवस्थेत सोडून ते कामावर निघून गेले. ते गेल्यानंतर मुलाचे निधन झाले. अबू तलहा (रजि.) यांच्या पत्नीने लोकांना सांगितले, अबू तलहा यांना ही बातमी कळता कामा नये. ते जेव्हा संध्याकाळी कामावरून घरी परतले तेव्हा पत्नीला विचारले, "बाळाची काय अवस्था आहे?" ती म्हणाली, "पहिल्यापेक्षा अधिक शांत व सुखरूप आहे." असे म्हणून तिने अबू तलहाकरिता भोजन आणले. त्यांनी सावकाश व समाधानपूर्वक जेवण घेतले आणि पहुडले. सकाळ झाल्यावर त्या पुण्यशील पत्नीने मोठ्या बुध्दिकौशल्यपूर्ण शैलीत विचारले, "जर कोणी एखाद्यास उसनवारीने एखादी वस्तू देईल आणि नंतर परत मागेल तर काय त्याला हा हक्क प्राप्त आहे की त्याने ती वस्तू रोखून ठेवावी?" अबू तलहा म्हणाले, "असा हक्क त्याला कसा बरे प्राप्त होईल?" त्यावर संयम राखणाऱ्या त्या सुशील पत्नीने म्हटले, "आपल्या बाळाबद्दलही संयम राखा." (हदीस : मुस्लिम)

८) सत्य मार्गात येणाऱ्या संकटांचे मोकळ्या मनाने स्वागत करा आणि या मार्गात जे दु:ख पोहोचले, त्यावर दु:खी-कष्टी होण्याऐवजी आनंदी वृत्तीने अल्लाहचे आभार माना की त्याने आपल्या मार्गात तुमचे बलिदान स्वीकारले.

माननीय अब्दुल्लाह बिन जुबैर (रजि.) यांची माता माननीय अस्मा (रजि.) सक्त आजारी पडल्या. माननीय अब्दुल्लाह (रजि.) त्यांची विचारपूस करण्यासाठी आले. आई आपल्या पुत्रास म्हणाली, "मला! मनात ही इच्छा आहे की दोन गोष्टींपैकी एक जोपर्यंत पाहून न घ्यावी अल्लाह मला जिवंत राखो. एक तर तू लढाईच्या मैदानात शहीद व्हावे आणि मी तुझ्या बलिदानाची वार्ता ऐकून संयमाचे सद्भाग्य प्राप्त करावे. अथवा तू जिंकावे आणि तुला विजेत्यांच्या स्वरूपात पाहून मी आपले नेत्र शीतल करावे." अल्लाहचे करणे की माननीय अब्दुल्लाह बिन जुबैर (रजि.) ने आईच्या जीवनकाळातच शहादतच्या दर्जा प्राप्त केला. शहीद केल्यानंतर हज्जाजने त्यांना सूळावर चढविले. माननीय अस्मा फार म्हातारी झाली होती. परंतु अत्याधिक दुर्बलता असतानाही हे रूदनकारक दृश्य पाहण्याकरिता त्या आल्या आणि आपल्या काळजाच्या तुकड्यांचे कलेवर पाहून रडण्याऐवजी हज्जाजला म्हणाल्या, "या स्वाराकरिता अजून वेळ नाही आली की घोड्याच्या पाठीवरून खाली उतरावे."

९) दु:ख-विलापात एकमेकांना सहकार्य करा. मित्रांच्या शोकात सहभागी व्हा आणि त्याच्या दु:ख निवारणासाठी सर्व प्रकारे सहकार्य करा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले, "समस्त ईमानधारक मिळून एका माणसाच्या शरीरासारखे आहेत की जर त्याचे डोळेही

दुखत असतील तर त्याची वेदना संपूर्ण शरीराला जाणवते आणि जर डोके दुखत असेल तर सगळे शरीर त्रस्त राहाते." (हदीस : मुस्लिम)

माननीय जाफर तैयार (रजि.) जेव्हा शहीद झाले, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जाफरच्या घरी भोजन पाठवा. यासाठी की आज दु:खातिरेकाने त्यांचे कुटुंबीय भोजन तयार करू शकणार नाहीत." (हदीस : अबू दाऊद)

माननीय अबू हुरैरा (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्या माणसाने अशा एखाद्या स्त्रीला सांत्वना दिली, जिचे मूल मरण पावले असावे, तर त्याला जन्नतमध्ये दाखल केले जाईल आणि जन्नतची चादर अंगावर टाकली जाईल." (हदीस : तिर्मिजी)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्या माणसाने एखाद्या संकटात सापडलेल्या माणसाला सांत्वना दिली तर त्यालाही तेवढाच मोबदला मिळेल जेवढा स्वत: संकटग्रस्त माणसाला मिळेल."(हदीस : तिर्मिजी) या संदर्भात पैगंबर मुहम्मद (स.) या गोष्टीची ताकीद केली की जनाजा (अंत्ययात्रे) मध्ये सहभागी व्हावे. माननीय अबू हुरैरा (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,

" जो मनुष्य जनाजामध्ये सहभागी झाला आणि जनाजाची नमाज अदा केली तर त्याला एक किरात घर पुण्य लाभेल आणि जनाजाच्या नमाजनंतर दफनविधीत ही सहभागी झाला तर त्याला दोन किरात मिळतील. एकाने विचारले, " दोन कीरात कीती मोठे असतील?" सांगितले, " दोन पर्वतांइतके." (हदीस : बुखारी)

१०) संकटे आली असताना आणि दु:खाच्या भोवऱ्यात अल्लाहच्याकडे वळा आणि नमाज पढून अतिशय विनम्रतेने अल्लाहजवळ दुआ करा. कुरआनात सांगितले आहे, "ईमानधारकांनो! (संकट आणि कसोटीप्रसंगी) धैर्य आणि नमाजद्वारे मदत प्राप्त करा." (दिव्य कुरआन, २:१५३) दु:खाच्या स्थितीत डोळ्यांतून अश्रू वाहणे आणि दु:खी होणे स्वाभाविक गोष्ट आहे. परंतु मोठमोठ्याने ओरडून रडणे टाळा. पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा रडत, तेव्हा रडण्याचा आवाज निघत असे. थंड श्वास घेत. डोळ्यांतून अश्रू वाहत आणि छातीतून असा आवाज निघत असे जणू एखादी हंडी उकळत असावी, किंवा चक्की चालत असावी. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्वत: आपल्या शोक आणि रूदन अवस्थेची कैफियत या शब्दात सांगितली आहे,

"डोळ्यांतून अश्रू वाहतात, मन दु:खी होते आणि आम्ही तोंडाने तेच काही बोलतो, ज्याने आमचा पालनकर्ता खूश होतो."

माननीय अबू हुरैरा (रजि.) सांगतात की पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा चिंताग्रस्त होत, तेव्हा आकाशाकडे डोके उंचावून फर्मावित,

"सुब्हा-नल्लाहिल अज़ीम"

पवित्र आणि श्रेष्ठतम आहे महान अल्लाह आणि जेव्हा जास्त रडण्याच्या अवस्थेत असत आणि प्रार्थनेत मग्न असत, तेव्हा फर्मावित,

"या हय्यु या क़य्यूम" (हदीस : तिर्मिजी)

११) दु:ख शोकाचा अतिरेक, संकटांचे सतत येत राहणे, आणि क्लेश यातना वाढत असता या दुआ (प्रार्थना) करत राहा. माननीय साद बिन अबी वकास (रजि.) म्हणतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "युनूस (अ.) यांनी माशाच्या पोटात आपल्या पालनकर्त्या जवळ दुआ केली." ती अशी, (हदीस : तिर्मिजी)

"ला इला-ह इल्ला अन-त सुब-हा-न-क इन्नी कुन्तु मिनज़्ज़ालिमीन"

तुझ्याखेरीज कोणीही उपास्य नाही तू व्यंग दोष-विरहित आणि पवित्र आहे. मी स्वत:च आपल्यावर जुलूम करणारा आहे. यास्तव जो ईमानधारक एखाद्या क्लेश यातनेत किंवा अडचणीत अल्लाह जवळ ही दुआ मागतो, अल्लाह अवश्य कबूल करतो.

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा एखाद्या दु:ख शोकात पडत तेव्हा ही दुआ मागत,

ला इला-ह इल्लल्लाहु रब्बुल अर्शिल अज़ीम, ला इला-ह इल्लल्लाहु रब्बुस्समावाति व रब्बुल अर्ज़ि रब्बुल अर्शिल करीम

अल्लाहखेरीज कोणीही उपास्य नाही. तो महान ईशसिंहासनाचा स्वामी आहे. अल्लाहच्या खेरीज कोणीही उपास्य नाही. तो आकाश व जमिनीचा स्वामी आहे. थोर बुज़ूर्ग अशा सिंहासनाचा स्वामी आहे. (हदीस : बुखारी, मुस्लिम)

माननीय अबू मूसा (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ला हौ-ल व ला कुव्व-त इल्ला बिल्लाहि व ला मल-ज-अ मिनल्लाहि इल्ला इलैह."

अपराधापासून दूर राहण्याची शक्ती आणि सत्कर्म करण्याची सुबुध्दी प्रदान करण्याची शक्ती फक्त अल्लाहच प्रदान करणारा आहे आणि त्याच्या शिक्षेपासून तोच सुरक्षित राहू शकतो जो स्वत: त्याच्या दया कृपेच्या छत्राचा आश्रय घेईल."

हे वचन ९९ रोगांचे औषध आहे. सर्वात कमी गोष्ट ही की याचे पठण करणारा दु:ख शोकापासून सुरक्षित राहतो.

माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) यांनी सांगितले की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

ज्या माणसाला कसलेही दु:ख किंवा त्रास पोहोचेल आणि तो ही दुआ मागेल सर्व श्रेष्ठ अल्लाह त्याच्या दु:ख शोकास अवश्य आनंदात परिवर्तीत करील.

"अल्लाहुम-म इन्नी अब्दु-क वब्नु अब्दि-क वब्नु अ-मति-क नासियती बियदि-क, माज़िन फ़िय्य हुक्मु-क, अद-लुन फ़िय्य क़ज़ाउ-क अस-अलु-क बिकुल्लिस्मिन हु-व-ल-क सम्मै-त बिही नफ-स-क अव अन्जल-तहू फी किताबि-क अव अल्लम-तहू अ-ह-दम मिन ख़लक़ि-क अविस्ता-सर-त बिहि फ़ी इल्मिल ग़ैबि इन-द-क अन तज-अलल कुरआनल अज़ी-म रबी-अ क़ल्बी, व नू-र ब-सरी व जला-अ हुज़्नी व ज़-हा-ब हम्मी."
(हदीस : अहमद, इब्ने हिब्बान, हाकीम हिस्ने हसीन)

"हे अल्लाह! मी तुझा दास आहे. माझा पिता तुझा दास आहे. माझी आई तुझी दासी आहे. माझी शेंडी तुझ्याच सामर्थ्याच्या कब्जात आहे (अर्थात मी पूर्णत: तुझ्या ताब्यात आहे) तुझाच आदेश माझ्या मामल्यात चालतो. माझ्याबाबतीत तुझाच आदेश अगदी न्यायाला अनुसरून आहे मी तुझ्या त्या नावाच्या माध्यमाने, ज्याद्वारे तू मला घडविले आहे किंवा आपल्या ग्रंथात अवतरित केले आहे, किंवा आपल्या निर्मितीपैकी एखाद्यास शिकविले किंवा आपल्याजवळ अपरोक्षाच्या खजीन्यातच ते अध्यारूत राहू दिले, (त्या नावाच्या माध्यमाने) तुला विनवितो की तू या महान कुरआनला माझ्या हृदयाचा बहर, माझ्या नेत्रांचा नूर, माझ्या दु:खावरील उपाय आणि माझ्या हृदयाचे औषध बनवावे."

१२) अल्लाह न करो, जर संकटे व दु:ख-यातनांनी अशा प्रकारे वेढा घालावा की जगणे अशक्य व्हावे. आणि दु:खाने असे भयंकर रूप धारण करावे की तुम्हाला जीवन नकोसे व्हावे तरीही तुम्ही मरणाची इच्छा धरू नये आणि न आत्महत्या करण्याचा भेकड विचार मनात आणावा कारण हे घोर पाप आहे. अशा बेचैन अवस्थेत अल्लाहजवळ दुआ करीत राहावे.

"अल्लाहुम-म अहयिनी मा का-नतिल हयातु ख़ैरल्ली व त-वफ़्फ़नी इज़ा का-नतिल वफ़ातु ख़ैरल्ली"
(हदीस : बुखारी, मुस्लिम)
हे अल्लाह! जोपर्यंत माझ्यासाठी जिवंत राहणे अधिक चांगले असेल, मला जिंवत ठेव आणि जेव्हा माझ्यासाठी मरणे अधिक चांगले असेल तेव्हा मला मरण दे.

१३) जेव्हा एखाद्याला संकटग्रस्त स्थितीत पाहाल तेव्हा ही दुआ करत जा. अबू हुरैरा (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "ज्याने एखाद्या संकटग्रस्त माणसाला पाहून ही दुआ मागितली तर अल्लाहने इच्छिल्यास तो या संकटापासून सुरक्षित राहील."

"अल-हम्दु लिल्लाहिल्लज़ी आफ़ानी मिम्मब-तला-कल्लाहु बिही व फ़ज़-ज़-लनी अला कसीरिम मिम्मन ख़-ल-क़ तफ़्ज़ीला"
अल्लाहचा आभार आहे, ज्याने या संकटापासून मला सुरक्षित राखले, ज्या संकटात तुम्ही सापडला आहात आणि आपल्या सृष्ट निर्मिती (समस्त प्राणी मात्रांवर) मला श्रेष्ठता प्रदान केली."

# ९. भय व भीतीचे शिष्टाचार

१) दीन-धर्माच्या शत्रूंचा नि:पात, अत्याचार व अतिरेक आणि उत्पात व उपद्रवाचे भय असो किंवा नैसर्गिक आपत्तीद्वारे विनाशाचे भीती असो कोणत्याही स्थितीत ईमानपूर्ण सामंजस्यासह त्याच्या मूळ कारणांचा शोध घ्यावा आणि वरवरच्या उपाय योजनेत वेळ वाया घालविण्याऐवजी कुरआन व पैगंबर आचरणाद्वारे सांगितलेल्या ठोस व खऱ्या उपायांवर आपले सर्व सामर्थ्य लावावे कुरआनात असे फर्माविले गेले आहे,

"तुम्हा लोकांवर जे जे कोणते संकट आले आहे ते तुम्ही स्वत:च ओढवलेले आहे, आणि बऱ्याचशा चुकांकडे तो सहज दुर्लक्ष करीत असतो." *(दिव्य कुरआन, ४२ : ३०)*

आणि कुरआनने यावर उपायही सांगितला आहे,

"हे श्रद्धावंतांनो, तुम्ही सर्वजण मिळून अल्लाहजवळ पश्चात्ताप व्यक्त करा,"

*(दिव्य कुरआन, २४:३१)*

इथे मुळ अरबी वचनात "तौबा" हा शब्द वापरला गेला आहे, ज्याचा अर्थ आहे परतणे, रूजू होणे. जेव्हा अपराधांच्या दलदलीत फसलेली उम्मत (समस्त मुस्लिम सम्प्रदाय) आपल्या दुष्कर्मांवर लज्जित होऊन अल्लाहकडे उपासना व आज्ञा पालनाच्या भावनेने प्रेरित होऊन परततो आणि पश्चात्तापाच्या व क्षमा याचनेच्या आसवांनी आपल्या दुष्कर्मांची घाण स्वच्छ करून पुन्हा अल्लाहशी आपला संबंध जोडतो. अशा स्थितीचा कुरआनने "तौबा" या शब्दाद्वारे उल्लेख केला आहे आणि हीच पश्चात्तापयुक्त क्षमायाचना सर्व प्रकारच्या उत्पात उपद्रवापासून, भय-आतंकापासून सुरक्षित राहण्याचा उचित उपाय आहे.

२) इस्लामच्या शत्रूंनी माजविलेल्या उत्पात, उपद्रवाने आणि अत्याचार व अतिरेकाने घाबरून जाऊन भेकडपणाने निर्दयी लोकांजवळ दयेची याचना करण्याच्या अपमानाने कधीही तुमच्या सामुदायिक जीवनाला लांछन लावू नका. किंबहुना त्या दुर्बलतेवर नियंत्रण राखण्याकरिता कमर बांधा, ज्यामुळे तुमच्या अंगी भेकडता निर्माण होत आहे आणि दीन-धर्माच्या शत्रूंना तुमच्यावर अत्याचार करण्याचे दु:साहस होत आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी याची दोन कारणे सांगितली आहेत.

१) या जगाची आसक्ती
२) मृत्युचा तिटकारा

हे साहस करा की तुम्ही न केवळ तुमच्या मनातून, किंबहुना समस्त मुस्लिम संप्रदायातून हे रोग दूर केल्याविना राहणार नाहीत. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"माझ्या जनसमूहावर अशी वेळ येणार आहे, जेव्हा इतर जनसमूह (मऊ घास समजून) तुमच्यावर अशा प्रकारे तुटून पडतील, ज्या प्रकारे खाणारे, खाद्यावर तुटून पडतात. कोणी

विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! त्या काळात आमची संख्या इतकी कमी होईल काय की आम्हाला गिळून टाकण्याकरिता इतर समूह आमच्यावर हल्ला चढवतील?" पैगंबरांनी सांगितले, " नव्हे, त्या वेळी तुमची संख्या कमी नसेल, तथापि तुम्ही पुरात वाहून जाणाऱ्या कस्पटांसमान भारहीन असाल आणि तुमचा रोब, दबदबा नाहीसा होईल आणि तुमच्या मनात भेकडपणा आणि भित्रेपणा निर्माण होईल." यावर एका माणसाने विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स)! हा भेकडपणा कशामुळे निर्माण होईल?" सांगितले, "या कारणास्तव की तुम्ही या जगाशी प्रेम करू लागाल आणि मृत्युपासून दूर पळू लागाल व त्याचा तिटकारा करू लागाल." (हदीस : अबू दाऊद)

३) आत्मभक्ति, व्यभिचार, स्त्रियांचे पुढारीपण आणि अपराधकर्मापासून समाजाला मुक्त करा आणि सामूहिकतेला जास्तीतजास्त मजबूत बनवून सामुदायिक शक्तीद्वारे उत्पात व उपद्रवाचा बिमोड करण्याचा आणि समुदायात शौर्य, चैतन्य आणि धैर्य निर्माण करण्याचा प्रयत्न करा, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जेव्हा तुमचे शासक चांगले असतील आणि तुमचे सुखवस्तु लोक दानशूर असतील आणि तुमचे सामूहिक व्यवहार आपसातील सल्लामसलतीने पार पडत असतील तर खात्रीने तुमच्यासाठी धरतीची पाठ (जीवन) धरतीच्या कुशी (मृत्यू) हून अधिक चांगली आहे आणि जेव्हा तुमचे प्रमुख आणि शासक दुराचारी असतील आणि तुमच्या समाजाचे श्रीमंत, धनपूकड व कंजूस असतील आणि तुमचे व्यवहार तुमच्या पत्नींच्या हातात असतील तर मग तुमच्यासाठी जमिनीची कुशी (मृत्यु) जमिनीच्यापाठी (जीवना) पेक्षा अधिक चांगली आहे." (हदीस : तिर्मिजी)

४) परिस्थिती कितीही विचलीत करणारी असो, सत्याच्या समर्थनात प्राणार्पण करणे याहून कितीतरी चांगले आहे की माणसाने धर्महीनता व निर्लज्जतेसह जीवन जगावे. मोठमोठ्या कसोटी व भय-दहशतीच्या अवस्थेत सत्याची बाजू मुळीच सोडू नये. कोणी मरणाचे भय दाखवील तर स्मितहास्य करा आणि बलिदानाचा प्रसंग आल्यास उत्साह आणि आवड पूर्ण भावनेने त्याचे स्वागत करावे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी या संदर्भात सांगितले,

"इस्लामची चक्की भ्रमणात आहे, तेव्हा जिकडे कुरआनची दिशा असेल, त्या दिशेने तुम्हीही फिरा सावध राहा! कुरआन आणि सत्ता लवकरच वेगवेगळे होतील. खबरदार ! तुम्ही कुरआन सोडू नका. पुढे असे शासक असतील, जे तुमच्याबाबत फैसला करतील. जर तुम्ही त्याचे म्हणणे मान्य कराल तर ते तुम्हाला सरळ मार्गापासून विचलित करतील आणि जर तुम्ही त्याचे म्हणणे अमान्य कराल तर ते तुम्हाला ठार करतील." सहाबी (सहकारी) म्हणाले, तर मग आम्ही काय करावे? "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)!" पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "तेच करा जे ईसा (येशू) च्या सहकाऱ्यांनी केले. त्यांना करवतीने

चिरले गेले आणि सूळावर टांगले गेले. अल्लाहची अवज्ञा करीत जिवंत राहण्यापेक्षा अधिक चांगले आहे की माणसाने अल्लाहच्या आदेशांचे पालन करीत प्राणार्पण करावे."

५) त्या सामूहिक आपदाविरुध्द सतत संघर्ष करीत राहा ज्यांच्या परिणामस्वरूपी समाजावर भय-दहशतीचे सावट पसरते. दारिद्र्य, दुष्काळ, रक्तपात सर्वसामान्य होतो आणि शत्रूंच्या जुलमी कब्ज्यात संपूर्ण समाज अगतिक बनून राहतो.

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) सांगतात, "ज्या जनसमूहात अपहाराचे स्तोम माजेल, अल्लाह त्या समूहातील लोकांच्या मनावर शत्रूत्वाचे भय, आणि आतंकाचा पगडा बसवील आणि त्या समाजात व्यभिचाराचा रोग (साथीच्या रोगासारखा) सार्वत्रिक होईल. तो नाश पावल्याशिवाय राहणार नाही. त्या समाजात मोज-माप करण्यात बेईमानीची प्रथा पडेल, तो अवश्य भूकमरीला बळी पडेल आणि जिथे नाहक फैसले होतील तिथे अपरिहार्यत: रक्तपात सामान्य होईल. जो जनसमूहदेखील करारभंग करील त्यावर कोणत्याही स्थितीत शत्रूचे वर्चस्व प्रस्थापित होईल." (हदीस : मिश्कात)

६) जेव्हा शत्रूंतर्फे भय निर्माण होईल तेव्हा ही दुआ करावी,

"अल्लाहुम-म इन्ना नज-अलु-क फ़ी नुहूरिहिम व नऊजु बि-क मिन शुरूरिहिम."

(हदीस : अबू दाऊद, नसई)

"हे अल्लाह! आम्ही या शत्रूंच्या मुकाबल्यात तुलाच आपली ढाल बनवितो आणि त्यांच्या उपद्रव, बिघाडापासून सुरक्षित राहण्याकरिता तुझा आश्रय घेतो."

७) जेव्हा शत्रूंच्या वेढ्यात अडकून पडाल तेव्हा ही दुआ करावी,

"अल्लाहुम-मस्तुर औरातिना व आमिन रौआतिना" (हदीस : अहमद)

हे अल्लाह! तू आमच्या शील-प्रतिष्ठेचे रक्षण कर आणि दहशतीपासून शांती प्रदान कर.

८) जोरदार वादळ आणि आकाश काळ्या ढगांनी भरून आले असता भय जाणा. माननीय आएशा (रजि.) यांचे निवेदन आहे, मी पैगंबर मुहम्मद (स.) यांना अशा प्रकारे हसताना नाही पाहिले की संपूर्ण तोंड उघडे व्हावे. पैगंबर मुहम्मद (स.) केवळ स्मितहास्य करीत आणि वादळ व काळे ढग भरून आल्यावर घाबरून जात आणि दुआ करू लागत. भयाने कधी उठत कधी बसत आणि जोपर्यंत पर्जन्यवृष्टी होत नसे, तोपर्यंत त्यांची हीच अवस्था राहात असे. मी विचारले,

"हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) ! मी लोकांना पाहते की जेव्हा ते आकाश ढगांनी व्यापून आल्याचे पाहतात, तर मोठे आनंदित होतात की आता पाऊस पडेल. पण आपणास पाहते की जेव्हा आपण ढग दाटून आल्याचे पाहता तेव्हा आपल्या चेहऱ्यावर उद्विग्नता व क्लेश दिसू लागतो. " तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"आएशा (रजि.)! शेवटी मी कसा निर्भय होऊ की या ढगाळ वातावरणात अल्लाहचा प्रकोप तर नसेल, ज्याअर्थी आद जनसमूहावर वादळाचा ईशप्रकोप आलेला आहे. आद जनसमूहाने जेव्हा ढगांनी व्यापलेले आकाश पाहिले तेव्हा म्हटले होत, आता हे ढग आमच्यावर पाणी वर्षवतील." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

वादळाच्या वेळी ही दुआ करावी,

अल्लाहुम-मज-अलहा रियाहन व ला तजअलहा रीहन
अल्लाहुम-मज-अलहा रह-मतन व ला तज-अलहा अज़ाबन

"हे अल्लाह ! तू याला भलाईपूर्ण वारा बनव, वाईटपणाचा (विनाशकारक) वारा बनवू नको. हे अल्लाह ! तू याला तुझी दया-कृपा बनव, कोप बनवू नकोस." (तबरानी)

जर वादळासह गडद अंधारही असेल तर अशा स्थितीत "सूरह कुल अऊजु बिरब्बिल फ़-लक़ आणि कुल अऊजुबिरब्बिन्नास" चे पठण करावे. (हदीस : अबू दाऊद)

माननीय आएशा (रजि.) सांगतात की पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा वादळ उठलेले पाहत, तेव्हा ही दुआ मागत,

अल्लाहुम्मा इन्नी अस अलुक ख़ै रहा व ख़ै-र मा फ़ीहा व ख़ैर- र मा उर्सिलत बिही व अऊजु बि-क मिन शर्रिहा व शर्रि मा फ़ीहा व शर्रि मा उर्सिलत बिह.(हदीस : मुस्लिम, तिर्मिजी)

"हे अल्लाह ! मी तुझ्याजवळ या वादळाची भलाई आणि जे याच्यात आहे त्याची भलाई इच्छितो आणि ज्या हेतुने हे पाठविले गेले आह, त्याची भलाई इच्छितो आणि त्या वादळाच्या वाईटपणापासून आणि जे याच्यात आहे, त्याच्या वाईटपणापासून आणि ज्या उद्देशाने हे पाठविले गेले आहे, त्याच्या वाईटपणापासून तुझा आश्रय मागतो."

९) जेव्हा अत्याधिक पावसामुळे विनाशाचे भय असेल तेव्हा ही दुआ वाचावी.

अल्लाहुम-म हवालैना ला अलैना अल्लाहुम-म अ-लल आकामि वज़िराबि व बुतूनिल अवदियति व मनाबितिश-शजर (हदीस : बुखारी, मुस्लिम)

"हे अल्लाह! (पावसाची) आमच्या जवळपास वृष्टी व्हावी. आमच्यावर वृष्टी न व्हावी, हे अल्लाह! पर्वतांवर टेकड्यांवर, खोऱ्यांवर आणि शेत व झाडी उगण्याच्या ठिकाणांवर वृष्टी व्हावी."

१०) जेव्हा ढगांची गर्जना आणि विजेचे कडाडणे ऐकाल तेव्हा गप्पा गोष्टी बंद करून पवित्र कुरआनातील या आयतीचे पठण सुरू करावे.

व युसब्बिहुर-रअदु बिहमदिही वल मलाइकतु मिन ख़ी-फ़तिही

"मेघगर्जना त्याच्या स्तुतीबरोबर त्याचे पावित्र्यगान करते आणि दूत त्याच्या धास्तीने थरथर

कापत त्याचे पावित्र्य वर्णन करतात.'' *(दिव्य कुरआन, १३:१३)*

माननीय अब्दुल्लाह बिन जुबैर (रजि.) जेव्हा ढगांची गर्जना ऐकत, तेव्हा बोलणे बंद करीत आणि या आयतीचे पठण करीत. (अल-अदबुल मुफरद)

माननीय काब (रजि.) सांगतात, जो मनुष्य मेघगर्जनेच्या वेळी तीन वेळा या आयतीचे पठण करील तो मेघगर्जनेच्या संकटापासून सुरक्षित राहील. (हदीस : तिर्मिजी)

पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा मेघगर्जना आणि विजेचे कडाडणे ऐकत, तेव्हा ही दुआ मागत,

अल्लाहुम-म-ला तक़्तुलना बि-ग़-ज़बि-क व ला तुहलिक्ना बि अज़ाबि-क व आफ़िना क़ब-ल ज़ालिक. (अल अदबुल मुफरद)

"हे अल्लाह! आम्हाला आपल्या प्रकोपाने नष्ट करू नकोस, आपल्या प्रकोपाने आम्हाला बरबाद करू नकोस आणि अशी वेळ येण्यापूर्वीच आम्हाला आपल्या आश्रयात घे."

११) आग लागली असता तिला विझविण्याचा भरपूर प्रयत्न करीत "अल्लाहु अकबर" असे म्हणत राहा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जेव्हा आग लागल्याचे पाहाल तेव्हा "अल्लाहु अकबर" असे म्हणा. हे वचन आग विझविते."

१२) भय व भीतीच्या वेळी ही दुआ मागत जा. अल्लाहने इच्छिल्यास दहशत दूर होईल आणि समाधान प्राप्त होईल. माननीय बरा बिन आजिब (रजि.) कथन करतात, एका माणसाने पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ तक्रार केली की माझ्यावर दहशतीचे सावट असते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "ही दुआ करत जा "त्याने ही दुआ वारंवार मागितली. अल्लाहने त्याच्या मनातील दहशत दूर केली." (तबरानी)

"सुबहानल्लाहिल मलिकील कुद्दूसि रब्बिल मलाइकति वर्रूहि जल्लल-तस्समावाति वल-अर-ज़ बिल इज़्ज़ाति वल ज-बरूत."

पवित्र आणि सर्वश्रेष्ठ आहे अल्लाह, खराखुरा बादशहा, दोषापासून मुक्त. हे फरिश्त्यांच्या व जिब्रिलच्या पालनकर्त्या ! तुझाच सत्ताधिकार आणि दबदबा आकाशात व धरतीवर पसरलेला आहे.

# १०. आनंद व्यक्त करण्याचे शिष्टाचार

१) आनंदाच्या प्रसंगी आनंद अवश्य साजरा करा. आनंद माणसाची स्वाभाविक गरज आहे. दीन (धर्म इस्लाम) स्वाभाविक गरजांचे महत्त्व जाणतो आणि काही लाभदायक मर्यादा व शर्तींसह त्या गरजा भागविण्यास प्रवृत्त करतो. दीन-धर्म कधीही हे पसंत करीत नाही की तुम्ही कृत्रिम मोठेपणा, अनैच्छिक गांभीर्य, सदासर्वदाची उदासी आणि दु:खी चेहरा बनवून ठेवण्यात आपल्या चारित्र्याचे आकर्षण नाहीसे करावे. तो आनंदासह समस्त उचित प्रसगांवर आनंद साजरा करण्याचा पुरेपूर हक्क प्रदान करतो आणि असे इच्छितो की तुम्ही नेहमी अत्युच्च धैर्य, ताजा जोश आणि नव्या दमासह ताजेले राहावे. उचित प्रसंगी आनंद व्यक्त न करणे आणि आनंद साजरा करण्यास धार्मिक प्रतिष्ठेच्या विरुध्द समजणे धर्माच्या आकलनापासून वंचित राहणे होय.

तुम्हाला एखादे धर्मकर्तव्य पार पाडण्याची सुबुध्दी लाभो, तुम्ही किंवा तुमचा एखादा नातेवाईक ज्ञान व श्रेष्ठतेत उंच स्थान प्राप्त करीत अल्लाह तुम्हाला धन-दौलत किंवा अन्य एखाद्या देणगीने उपकृत करील, तुम्ही एखाद्या लांबच्या प्रवासाहून सुखरूपपणे घरी परत याल, तुमचा एखादा नातेवाईक एखाद्या लांब ठिकाणाहून प्रवास करून येईल, तुमच्या घरी एखाद्या सन्मानित अतिथीचे आगमन होईल. तुमच्याकडे लग्न समारंभ किंवा मूल जन्मास आल्याचा आनंदोत्सव असेल, एखाद्या नातेवाईकांची तब्येत किंवा क्षेम-कुशलवार्ता कळावी किंवा मुस्लिमांच्या सफलतेची बातमी कळेल अथवा एखादा सण असेल, अशा त्या सर्वच प्रसंगी आनंद साजरा करणे, आपला स्वाभाविक हक्क आहे. इस्लाम न केवळ आनंद साजरा करण्याची अनुमती देतो, किंबहुना त्याला धार्मिकताही ठरवितो.

माननीय काब बिन मलिक (रजि.) कथन करतात, जेव्हा अल्लाहने माझी तौबा (क्षमा याचना) कबुल केली आणि मला खूशखबर मिळाली तेव्हा मी त्वरीत पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत पोहोचलो. मी जाऊन सलाम केला. त्या वेळी पैगंबर मुहम्मद (स.) यांचा चेहरा प्रसन्नतेचे चमकत होता आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांना जेव्हादेखील एखादा आनंद होत असे तेव्हा त्यांचा चेहरा अशा प्रकारे चमकत असे जणू चंद्राचा एखादा तुकडाच! आणि आम्ही त्यांच्या चेहऱ्यावरील तेज पाहून समजून घेत की पैगंबर मुहम्मद (स.) या क्षणी मोठ्या आनंदात आहेत. (हदीस : रियाजुस्सालिहीन)

२) सणाच्या प्रसंगी इतमामासह खूप मोकळेपणाने आनंद साजरा करा आणि स्वभावाला थोडे स्वैर सोडा. पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा मदीना येथे आले. तेव्हा सांगितले, "तुम्ही वर्षातून दोन दिवस आनंद साजरा करता. आता अल्लाहने तुम्हाला त्याहून अधिक चांगले दोन दिवस प्रदान केले, अर्थात ईदुल फित्र आणि ईदुल अजहा."

यास्तव वर्षाच्या या दोन इस्लामी सणांमध्ये पूरेपूर आनंद जाहीर करा आणि मिळून मिसळून

काहीशा मोकळ्या वृत्तीने, काही हर्षोल-हासांची कामे स्वाभाविक शैलीने पत्करा. म्हणूनच या सणांच्या दिवशी रोजा राखण्यास मनाई केली गेली आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले आहे,

"हे दिवस खाण्यापिण्याचे, आपसात आनंद लुटण्याचे आणि अल्लाहचे स्मरण करण्याचे आहेत." (शरहे मआनिल आसार)

ईदच्या दिवशी साफसफाई आणि स्नान वगैरेची व्यवस्था करा तुमच्या ऐपतीनुसार चांगल्यात चांगले कपडे घाला. अत्तर लावा, चांगले खाद्य पदार्थ खा आणि मुलांना संधी द्या की त्यांनी उचित प्रकारच्या सहली व क्रीडा करमणुकीने मनोरंजन करावे आणि मोकळेपणाने आनंद साजरा करावा.

माननीय आएशा (रजि.) यांचे कथन आहे, तो ईदचा दिवस होता. काही मुली उफाच्या तालावर ती गाणी गात होत्या जी बुआसच्या युध्दप्रसंगी अन्सारने गायली होती, तेवढ्यात माननीय अबू बकर (रजि.) यांचे आगमन झाले, पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, अबू बक्र! राहू द्या. प्रत्येक जनसमूहाकरिता सणाचा दिवस असतो आणि आज आमचा ईदचा दिवस आहे.

एकदा ईदच्या दिवशी काही हब्शी तमासगीर फौजी करतब दाखवित होते. पैगंबर मुहम्मद (स.) त्यांचा हा खेळ स्वत:ही पाहीला आणि माननीय आएशा (रजि.) यांनाही आपल्या आड राखून दाखविला. पैगंबर मुहम्मद (स.) या तमासगीर शाबासकी देत जात. जेव्हा माननीय आएशा (रजि.) पाहता पाहता थकल्या तेव्हा पैगंबर म्हणाले,

"ठीक आहे आता जा." (हदीस : बुखारी)

३) आनंद साजरा करण्यात इस्लामी आवड आणि इस्लामी मार्गदर्शन व शिष्टाचाराला अवश्य विचाराधीन राखा. जेव्हा तुम्हाला एखादा आनंद लाभेल तेव्हा प्रथम आनंद देणाऱ्या अल्लाहचे आभार माना. त्याच्यापुढे कृतज्ञतेचा सजदा करा. आनंदाच्या भरात असे कोणतेही कृत्य किंवा वर्तन पत्करू नका जे इस्लामी स्वभावाशी सुसंगत नसावे आणि इस्लामी संस्कृती व मार्गदर्शनाच्या विरुध्द असावे. आनंद जरूर व्यक्त करा, परंतु मर्यादा सांभाळून, आनंदोत्सवात इतके पुढे जाऊ नका की घमेंड दिसू लागावी आणि आज्ञापालन, उपासना व विनम्रतेच्या भावनांची गळचेपी होऊ लागावी. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"आणि जे काही अल्लाह तुम्हाला प्रदान करील त्यावर तुम्ही फुगून जाऊ नये. अल्लाह अशा लोकांना पसंत करीत नाही जे आपल्या स्वत:ला फार मोठे समजतात आणि घमेंड दाखवितात," *(दिव्य कुरआन, ५७:२३)*

आणि आनंदाच्या भरात इतके बेभान होऊ नका की अल्लाहचा विसर पडू लागावा.

ईमानधारकांचा आनंद हा आहे की त्याने आनंद प्रदान करणाऱ्या अल्लाहचे अधिक स्मरण करावे. त्याच्या पुढे कृतज्ञतेचा सजदा करावा आणि आपल्या कार्याने, बोलण्याने अल्लाहच्या असीम कृपेला व त्याच्या महानता व प्रतापाला जास्त व्यक्त करावे.

रमजानच्या पवित्र महिन्याचे रोजे (उपवास) राखून रात्री कुरआनाचे पठण आणि तरावीहच्या नमाजची सुबुध्दी लाभून जेव्हा तुम्ही ईदचा चंद्र पाहता, तेव्हा अत्यानंदाने डोलू लागता की अल्लाहने जो आदेश दिला होता, तुम्ही अल्लाहच्या मदतीने तो पूर्ण करण्यात सफल झाले, आणि त्वरीत स्वत:च्या धन संपत्तीतून गरीब व गरजू बांधवांचा हिस्सा त्यांना पोहचविता. यासाठी की जर तुमच्या उपासनेत काही कमतरता राहिली असेल आणि अल्लाहचे आज्ञापालन करण्यात काही भूलचूक झाली असेल, तर ती कमी पूर्ण केली जावी आणि अल्लाहचे गरीब दासही ईदच्या आनंदोत्सवात सहभागी होऊन मिळून मिसळून या सणाचा आनंद साजरा करू शकतील. मग तुम्ही अल्लाहच्या या सुबुध्दिबद्दल ईदच्या सकाळी दोन रकात कृतज्ञतेची नमाज अदा करून आनंद खऱ्या अर्थाने व्यक्त करतात आणि अशा प्रकारे ईदुल अजहाच्या दिवशी आदरणीय इब्राहीम ( अ.) आणि आदरणीय इस्माईल( अ.) यांच्या महान त्याग आणि अनुपम बलिदानाच्या स्मरणार्थ आणि त्याग व बलिदानाच्या भावनेने अंत:करण ओतप्रोत करून कृतज्ञतेचा सजदा अदा करतात आणि मग तुमच्या प्रत्येक वस्तीतून, रस्त्या– रस्त्यातून अल्लाहु अकबर अल्लाहु अकबर 'ला इला इ इल्लल्लाहु वल्लाहु अकबर अल्लाहु अकबर व लिल्लाहिल हम्द' चा उद्घोष बुलन्द आवाजात होत राहतो आणि जेव्हा तुम्ही अल्लाहच्या शरीअतनुसार ईदच्या दिवसात चांगले खाता, चांगले कपडे घालता आणि आनंद व्यक्त करण्याकरिता उचित पध्दतींचा अवलंब करता तेव्हा तुमची प्रत्येक कृती अल्लाहचे स्मरण ठरते.

४) तुमच्या आनंदात दुसऱ्यांनाही सामील करून घ्या. आणि याचप्रमाणे इतरांच्या आनंदात स्वत:ही सहभागी व्हा आणि त्यांचा आनंद द्विगुणित करा आणि आनंदाच्या प्रसंगी अभिनंदन करण्याचाही काळजी घ्यावी.

माननीय काब बिन मालिक (रजि.) यांची जेव्हा तौबा (क्षमा-याचना) कबूल झाली आणि ईमानधारकांना माहीत पडले, तेव्हा लोक गटागटाने त्यांच्या अभिनंदनासाठी पोहचू लागले आणि आनंद व्यक्त करू लागले. येथपावेतो की माननीय तलहा (रजि.) यांच्यातर्फे अभिनंदन व आनंद व्यक्त केल्याने माननीय काब (रजि.) यांच्यावर इतका प्रभाव पडला की आयुष्यभर आठवण करीत राहिले. माननीय काब (रजि.) यांनी जेव्हा वृध्दावस्थेच्या काळात आपला पुत्र अब्दुल्लाह याला आपली कसोटी आणि तौबा (क्षमा–याचने) ची घटना सांगितली तेव्हा विशेषत: माननीय तलहा (रजि.) यांच्या आनंदाचा उल्लेख केला व सांगितले की मी तलहाने केलेले अभिनंदन व त्यांनी व्यक्त केलेला आनंद कधीही विसरू शकत नाही.

स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ही जेव्हा माननीय काब (रजि.) यांची तौबा कबूल केली गेल्याची खूशखबर ऐकविली तेव्हा खूप आनंद व्यक्त करीत सांगितले,

"काब! हा तुमच्या जीवनाचा सर्वात मोठा आनंदाचा दिवस आहे."

(हदीस : रियाजुस्सालिहीन)

एखाद्याचा विवाह असो किंवा एखाद्याच्या घरी मूल जन्मास आले असो तेव्हा त्या आनंदात सहभागी व्हा आणि अभिनंदन करा. माननीय अबू हुरैरा (रजि.) सांगता, पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा एखाद्याच्या विवाहाबद्दल अभिनंदन करताना सांगितले,

बा-र कल्लाहु ल-क व बा-र-क अलैकुमा व ज-म-अ बै-नकुमा फ़ी ख़ैर.

(हदीस : तिर्मिजी)

"अल्लाह तुम्हाला सुखासमाधानात ठेवोत आणि तुम्हा दोघांवर समृध्दी वर्षाव करो आणि चांगल्या प्रकारे तुम्हा दोघांचा निभाव करो."

एकदा माननीय हुसेन (रजि.) यांनी एखाद्या मुलाच्या जन्मावर अभिनंदन करण्याची पध्दती शिकविताना सांगितले की असे म्हणत जा,

"अल्लाह तुम्हाला आपल्या देणगीत सुख-समृध्दी प्रदान करो. तुम्ही कृतज्ञशील राहण्याची सुबुध्दी प्रदान करो. या मुलाला तारूण्याचा बहर दाखवो आणि त्याला तुमचा आज्ञाधारक करो."

५) जेव्हा तुमचा एखादा नातेवाईक किंवा परिचित लांबच्या प्रवासावरून येईल तर त्याचे स्वागत करा आणि तो सुखरूपपणे परत आल्याबद्दल आणि उद्देशात सफल झाल्याबद्दल आनंद व्यक्त करा. जर तो, सुखरूप परतण्याबद्दल एखादा आनंद समारंभ साजरा करील तर त्यात सहभागी व्हा. जेव्हा तुम्ही एखाद्या प्रवासाहून सुखरूप घरी परत याल व या आनंदाप्रित्यर्थ समारंभ साजरा कराल, तेव्हा आप्तस्वकीयांना सहभागी करा. तथापि अनुचित खर्च, अपव्यय आणि मोठेपणाचे प्रदर्शन करण्याचे टाळा, तसेच ऐपती व कुवतीपेक्षा जास्त खर्च करण्याचा प्रयत्न करू नका.

पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा तबूक युध्दावरून परतले तेव्हा ईमानधारक पुरुष व मुले त्यांच्या स्वागतासाठी सनीयतुल विदाअपर्यंत पोहोचले. (हदीस : अबू दाऊद)

पैगंबर मुहम्मद (स.) मक्केहून स्थलांतर करून मदीना येथे पोहोचले आणि दक्षिणेकडून शहरात प्रवेश करु लागले तेव्हा ईमानधारक पुरुष, स्त्रिया, मुले, मुली सर्वजण त्यांचे स्वागत करण्यासाठी घराबाहेर पडले आणि अन्सारच्या मुली आनंदाने हे गीत गात होत्या.

त-ल-अल बदरू अलैना मिन सनिय्या तिल विदाइ व-ज-बश-शुकरु अलैना मा दआ लिल्लाहि दाइ अय्युहल मब-ऊसु फ़ीना जिअ्-त बिल अम्रिल मुताइ

"(आज) आमच्यावर पौर्णिमेचा चंद्र निघाला (दक्षिणेकडचा पर्वत)सनीय्यतुल विदाअ कडून आमच्यावर कृतज्ञता व्यक्त करणे बंधनकारक आहे त्या आवाहन व शिकवणीबद्दल की आवाहकाने आम्हाला अल्लाहकडे बोलाविले.
हे आमच्या दरम्यान पाठविले जाणारे पैगंबर मुहम्मद (स.) ! आपण असा दीन (इस्लाम) घेऊन आलात, ज्याचे आम्ही अनुसरण करु."

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) एका प्रवासाहून मदीना पोहोचले तेव्हा त्यांनी आपले उंट जिबह करून लोकांना आमंत्रण दिले.

६) विवाहप्रसंगीही आनंद साजरा करा. या आनंदात आपल्या नातेवाईकांना व मित्रांनाही सहभागी करा. याप्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी काही चांगली गाणी गाण्याची व डफ वाजविण्याची अनुमती दिली. याचा उद्देश आनंभावनेचे समाधानही आहे आणि निकाहची आम घोषणा व प्रसिध्दीदेखील. माननीय आएशा (रजि.) यांनी आपल्या नात्यातील एका स्त्रीचा एका अन्सार पुरुषाशी विवाह करुन दिला. जेव्हा त्याला निरोप दिला, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"लोकांनी त्यांच्यासोबत एखादी दासी का नाही पाठविली, जिने डफ वाजवून काही गाणी गायली असती?" (हदीस : बुखारी)

जेव्हा माननीय रूबैअ बिन्त मुअव्वज (रजि.) यांचा निकाह झाला तेव्हा त्यांच्यजवळ बसून काही मुली डफ वाजवित होत्या आणि त्या थोर बुर्जूगांच्या प्रशंसेत काही गीत गात होत्या, जे बद्रच्या युध्दात शहीद झाले होते. एका मुलीने एक चरण म्हटले,

"आमच्या दरम्यान एक असा पैगंबर आहे, जो उद्या होणाऱ्या गोष्टीस जाणतो."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हे ऐकले तेव्हा सांगितले, "याला सोडा आणि तेच गीत गा जे पूर्वी गात होते." (हदीस : बुखारी)

७) विवाहाच्या आनंदात सामर्थ्यानुसार आपल्या नातेवाईकांना व दोस्तांना काही खाऊ-पिऊ घालण्याचा व्यवस्था करा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या विवाहप्रसंगी वलीमा (प्रितीभोजन) दिला आणि इतरांनाही असे करण्यास प्रवृत्त केले. पैगंबर मुहम्मद (स.) शुभकथन आहे,

"आणि काही नसेल तर एक बकरीच कापून खाऊ घाला." (हदीस : बुखारी)

लग्नात सहभागी होण्याची संधी नसेल तर निदान अभिनंदानाचा संदेश अवश्य पाठवा. लग्न आणि अशा प्रकारच्या इतर आनंदाच्या प्रसंगी भेट-नजराणे दिल्याने आपसच्या संबंधात तजेलपणा आणि मजबूती निर्माण होते आणि प्रेमात वृध्दी होते. मात्र हे ध्यानी राखावे की भेट- नजराणा पात्रतेनुसार असावा आणि प्रदर्शन करण्याचे टाळत सचोटीपूर्ण प्रेमाचा पडताळा अवश्य करीत राहा.

प्रकरण - २

# अल्लाहची उपासना

## ११. मशिदचे शिष्टाचार

१) अल्लाहच्या दृष्टीत जमीनीचा सर्वोत्कृष्ट हिस्सा तो होय, ज्यावर मशिद उभारली जाते. अल्लाहशी प्रेम राखणाऱ्यांची ओळख ही आहे की ते मशिदीशी प्रेम राखतात. कयामतीच्या भयानक दिवशी जेव्हा कुठेही सावली नसेल, अल्लाह त्या दिवशी आपल्या त्या दासाला आपल्या ईशसिंहासनाच्या सावलीत जागा देईल, ज्याचे मन मशिदीत लागलेले असते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"आणि तो मनुष्य (अल्लाहच्या सिंहासनाच्या छायेत राहील) ज्याचे मन माशिदीत अडकून राहात असेल." (हदीस : बुखारी)

२) मशिदीची सेवा करा आणि तिला आबाद करा. मशिदीची सेवा करणे व तिला आबाद राखणे ईमानचे लक्षण आहे. अल्लाहने फर्माविले आहे,

"अल्लाहच्या मस्जिदीचे सेवक तर केवळ तेच लोक होऊ शकतात ज्यांनी अल्लाह आणि परलोकाला मानावे आणि नमाज कायम करावी, जकात द्यावा व अल्लाहव्यतिरिक्त कोणाचीही भीती बाळगू नये." *(दिव्य कुरआन, ९:१८)*

३) फर्ज (पाच वेळच्या बंधनकारक) नमाज नेहमी मशिदीत जमातीसह अदा करा. मशिदीत अजान व जमातची पध्दतशीर व्यवस्था करा आणि मशिदीच्या व्यवस्थेशी तुमच्या जीवनाचा संबंध जोडा. मशिद एक असे केंद्र आहे की ईमानधारकांचे संपूर्ण जीवन तिच्या चहुबाजूंनी भ्रमण करते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ईमानधारकांमध्ये काही लोक असे आहेत, जे मशिदींमध्ये ठाण मांडून राहतात आणि तिथून हटत नाही. फरिश्ते अशा लोकांसोबत उठ-बस करतात. ते दिसेनासे होतात, तेव्हा फरिश्ते त्यांना शोधत फिरतात आणि जर ते आजारी पडतात तेव्हा फरिश्ते त्यांची विचारपूस करतात आणि एखाद्या कामात मग्न असतात, तेव्हा फरिश्ते त्यांना मदत करतात. मशिदीत बसणारा अल्लाहच्या रहमत (दयाकृपे) ची प्रतिक्षा करीत असतो."

(हदीस : मुसनद अहमद)

४) मशिदीत नमाजकरिता उत्साहाने व आवडीने जा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"सकाळ-संध्याकाळ मशिदीत नमाजकरिता जाणे असे आहे, जणू जिहाद (धर्मयुध्दा)करिता जाणे." "जे लोक प्रात:कालीन अंधारात मशिदकडे जातात कयामतच्या वेळी त्यांच्यासोबत पूर्ण प्रकाश असेल."

"जमातीसह अदा कल्या जाणाऱ्या नमाजकरिता जाणाऱ्याचे प्रत्येक पाऊल एक नेकी वाढविते आणि एक गुन्हा मिटविते." (इब्ने हिब्बान)

५) मशिदीला स्वच्छ राखा. मशिदीतला केर काढा, कचरा साफ करा. अत्तर लावा. विशेषत: जुमा (शुक्रवार) च्या दिवशी मशिदीतले वातावरण सुगंधित करण्याचा प्रयत्न करा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"मशिदीतला केर काढणे, मशिदीला स्वच्छ राखणे, मशिदीतला कचरा काढून फेकणे मशिदीत अत्तर लावणे, विशेषत: शुक्रवारी मशिदीचे वातावरण सुगंधित करणे, जन्नतमध्ये नेणारी कामे आहेत." (हदीस : इब्ने माजा)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले आहे,

"मसजिदीतील केर-कचरा साफ करणे, अतिशय सुंदर नेत्रांच्या परी (स्वार्गातील अत्यंत सुंदर स्त्रियां)चा महर होय." (तबरानी)

६) मशिदीत भय-कंपित अवस्थेत प्रवेश करा. प्रवेश करताना 'अस्सलामु अलैकुम' म्हणा आणि अगदी गप्प बसून अल्लाहचे अशा प्रकारे स्मरण करा की अल्लाहशी श्रेष्ठता व त्याचा प्रताप तुमच्या हृदयावर पसरलेला असावा. हसत बोलत गाफीलपणे मशिदीत प्रवेश करणे अशिष्ट आणि गाफील लोकांचे काम आहे, ज्यांचे हृदय अल्लाहच्या भया पासूनरिक्त असते काही लोक इमामसह रुकूत सामील होण्यासाठी आणि रकात सुटू नये म्हणून धाव घेतात, हे देखील मशिदीच्या सन्मानाविरुध्द आहे. रकात मिळो न मिळो, गंभीरता, प्रतिष्ठा आणि नम्रतापूर्वक मशिदीत चालावे आणि धावपळ करण्याचे टाळावे.

७) मशिदीत शांतीपूर्वक बसा. इहलोकीय गोष्टी करू नका, मशिदीत गोंधळ करणे, थट्टा-मस्करी करणे, बाजारभावाचे विचारणे व सांगणे, जगातल्या घडामोडींवर चर्चा करणे आणि खरेदी-विक्रीचा बाजार भरवणे, मशिदीचा अनादर करणे होय. मशिद अल्लाहच्या उपासनेचे घर आहे. तिथे फक्त उपासनाच करा.

८) मशिदीत अशा लहान मुलांना सोबत नेऊ नका. ज्यांना मशिदीचा मान-सन्मान राखण्याइतकी विवेकबुध्दी नाही आणि जे मशिदीत लघवी किंवा शौचास करतील किंवा थूंकतील.

९) मशिदीला जाण्या-येण्याचा रस्ता बनवू नका. मशिदच्या दरवाजात दाखल झाल्यानंतर, मशिदचा हा हक्क आहे की तुम्ही जिथे नमाज पढावी किंवा बसून अल्लाहचे स्मरण आणि कुरआन पठण करावे.

१०) जर तुमची एखादी वस्तू बाहेर हरवली असेल तर त्याचे ऐलान मशिदीत करु नका. पैगंबर (स.) यांच्या मशिदीत जर कोणी अशा प्रकारचे ऐलान करीत असे तर ते नाराज होऊन

सांगत,

ला रद्-दल्लाहु अलै-क जाल्-क-त-क

"अल्लाह करो तुला तुझी हरवलेली वस्तू न मिळो."

११) मशिदीत दाखल होताना प्रथम उजवा पाय ठेवा आणि पैगंबर (स.) वर दरूद व सलाम पाठवा. नंतर ही दुआ करा. पैगंबर (स.) यांनी सांगितले की, जेव्हा तुमच्यापैकी कोणी मशिदीत येईल तर त्याचे प्रथम पैगंबर (स.) वर दरूद पाठवावे. मग ही दुआ करावी,

"अल्लाहुम-मफ्तह ली अब-वा-ब-रहमतिक."

"हे अल्लाह ! माझ्यासाठी आपल्या दया-कृपेची द्वारे उघड."

मशिदीत दाखल झाल्यानंतर दोन रकात नफ्ल नमाज अदा करा. या नमाजला 'तहीयतुल मशिद' म्हणतात. अशा प्रकारे प्रवासाहून परतल्यावर प्रथम मशिदीत जाऊन दोन रकात नफ्ल नमाज अदा करा, त्यानंतर आपल्या घरी जा. पैगंबर (स.) जेव्हादेखील प्रवासाहून परत येत, तेव्हा प्रथम मशिदीत जाऊन दोन रकात नफ्ल नमाज पढत आणि मग आपल्या घरी जात असत.

१२) मशिदीतून बाहेर पडताना प्रथम डावा पाय बाहेर काढा, मग ही दुआ करा -

"अल्लाहुम-म इन्नी अस्अलु-क मिन फ़ज़्लिक" (हदीस : मुस्लिम)

"हे अल्लाह ! मी तुझ्याजवळ तुझ्या दयाकृपेची याचना करतो."

१३) मशिदीत व्यवस्थितरित्या अजान आणि जमातीसह नमाजचा प्रबन्ध कायम करा आणि अजान देण्यासाठी नमाज चे नेतृत्व करण्यासाठी अशा लोकांची नियुक्ति करा जे धर्मानुसरणात व चारित्र्यात एकंदरित सर्वापेक्षा अधिक चांगले असावेत. शक्यतोवर प्रयत्न करा की अशा लोकांनी अजान व नमाज चे नेतृत्व करण्याचे कर्तव्य पार पाडावे, जे मोबदला (पारिश्रमिक) घेत नसतील आणि आनंदाने आखिरतचा मोबदला प्राप्त करण्याच्या इच्छेने आपले कर्तव्य पार पाडत असतात.

१४) अजाननंतर ही दुआ करावी. पैगंबर (स.) यांनी फर्माविले, "ज्या माणसाने अजान ऐकून ही दुआ मागितली तर कयामतच्या दिवशी तो माझ्या शिफारशीस पात्र ठरेल."

(हदीस : बुखारी)

"अल्लाहुम-म रब-ब हाज़िहिद्दअ-वत्तित्ताम्मति वस्सलातिल क़ाइमति आति मुहम-म-द निल-वसी-ल-त वल फ़ज़ी-ल-त वब-असहु मक़ामम महमू-द-निल्लज़ी वअत्तहू."

(हदीस : बुखारी)

"हे अल्लाह! या शाश्वत चळवळीचे परिपूर्ण आवाहन आणि या कायम होणाऱ्या नमाजचे स्वामी! मुहम्मद (स.) यांना आपले सान्निध्य आणि श्रेष्ठत्व प्रदान कर आणि त्यांना त्या

मकामे महमूद (प्रशंसित) स्थानावर विराजमानकर ज्याचे तू त्यांना वचन दिले आहे.''

१५) अजान देणारा जेव्हा अजान देत असेल तेव्हा त्याची वचने ऐकून तुम्हीही त्यांची पुनरावृत्ती करावी, तथापि जेव्हा तो ''हय-य अलस्सल्लाह'' आणि ''हय-य अलल फ़लाह'' म्हणेल, तर उत्तरादाखल तुम्ही म्हणा, ''ला हौ-ल व ला कु-व्व-त इल्ला बिल्लाहिल अलीयिल अज़ीम'' आणि फज्र (प्रात:काळ) च्या अजानमध्ये जेव्हा अजान देणारा ''अस्सलातु ख़ैरुम मिनन्नौम'' असे म्हणेल, तेव्हा त्याच्या उत्तरादाखल तुम्ही म्हणा 'सदक़-त व ब-र्र-त' (तुम्ही सत्य सांगितले आणि भलाईची गोष्ट बोललात).

१६) तकबीर म्हणणारा जेव्हा 'क़दक़ा मतिस्सलाह' म्हणेल तेव्हा उत्तरादाखल तुम्ही म्हणा, 'अक़ाम-हल्लाहु व अदा महा' (अल्लाह नमाजला नेहमी कायम राखो).

१७) स्त्रियांनी मशिदीत जाण्याऐवजी घरीच नमाज अदा करावी (एकदा माननीय अबू हुमैद साअदी (रजि.) यांच्या पत्नीने पैगंबर (स.) यांना विनंती केली, हे अल्लाहचे पैगंबर (स.) ! आपल्यासोबत नमाज पढण्याची मोठी आवड आहे. पैगंबर (स.) यांना सांगितले, मला तुमची आवड माहीत आहे. परंतु तुमचे घरात नमाज अदा करणे याहून अधिक चांगले आहे की तुम्ही दालनात नमाज अदा करावी आणि दालनात नमाज अदा करणे याहून अधिक चांगले की अंगणात नमाज अदा करावी.

परंतु स्त्रियांनी मशिदीच्या गरजा पूर्ण करण्याचा भरपूर प्रयत्न करावा. पाण्याची व्यवस्था, चटाईची व्यवस्था आणि सुगंधित वस्तू (अत्तर अगरबत्ती वगैरे) पाठवाव्यात आणि मशिदीशी मनापासून संबंध कायम ठेवावा.

१८) हुशार मुलांना आपल्यासोबत मशिदीत न्या. मातांनी आपल्या किशोर मुलांना प्रवृत्त करुन मशिदीत पाठवावे, यासाठी की मुलांच्या मनात तशी आवड निर्माण व्हावी. मशिदीत त्यांच्याशी खाडी मृदुतेचा, स्नेह आणि प्रेमाचा व्यवहार करा. ते जर काही कमतरता करतील किंवा उनाडकी करतील तर त्यांना दाटदपट करण्याऐवजी स्नेह-प्रेमाने समज द्या आणि सद्वर्तन करण्यास प्रवृत्त करा.

# १२. नाजचे शिष्टाचार

१) नमाजकरिता स्वच्छ - शुद्धतेचे पुरेपूर ध्यान राखा. वुजू करताना मिस्वाक (दातून) ची काळजी घ्या. पैगंबर (स.) यांनी सांगितले -

"कयामतमध्ये माझ्या जनसमूहाची निशाणी ही असेल की त्यांचे कपाळ व वुजूचे अवयव तेजाने चकाचक असतील. यास्तव जो मनुष्य आपले तेज वाढवू इच्छित असेल त्याने वाढवावे."

२) स्वच्छ सभ्य सुशील, सुसंस्कृत, नीटनेटके कपडे घालून नमाज अदा करा. पवित्र कुरआनात उल्लेख आहे -

"हे आदमचे वंशज, प्रत्येक उपासनेच्या वेळी यथायोग्य पोषाख परिधान करा.आणि खा, प्या परंतु मर्यादांचे उल्लंघन करू नका, अल्लाह मर्यादेच्या बाहेर जाणाऱ्यांना पसंत करीत नाही." *(दिव्य कुरआन, ७:३१)*

३) वक्तशीरपणे नमाज अदा करा -

"जेव्हा शांतता लाभेल तर पूर्ण नमाज पठण करा. नमाज वास्तविक पाहता असे अनिवार्य कार्य आहे जे नियमित वेळेसह श्रद्धावंतांसाठी आवश्यक केले गेले आहे."

*(दिव्य कुरआन, ४:१०३)*

माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) यांनी एकदा पैगंबर (स.) यांना विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर (स.) अल्लाहच्या दृष्टीने कोणते आचरण सर्वाधिक पसंत आहे ? पैगंबर (स.) यांना सांगितले, "नमाजला तिच्या वेळेवर अदा करणे."

आणि पैगंबर (स.) यांनी असे ही सांगितले -

"अल्लाहने पाच वेळची नमाज फर्ज केली आहे. ज्या माणसाने या नमाजांना त्यांच्या ठरलेल्या वेळेवर चांगल्या प्रकारे वुजू करुन आणि मन लावून अदा केले तर अल्लाहवर त्यांचा हा हक्क आहे की त्याने त्या माणसाला क्षमा करावी आणि ज्याने या नमाजांना अदा करण्यात सुस्ती किंवा टाळाटाळ केली तर अल्लाहवर त्याची माफी व मुक्तिची कोणतीही जबाबदारी नाही. वाटल्यास अजाब (शिक्षा-यातना) देईल आणि वाटल्यास माफ करील. (हदीस :मालिक)

४) नमाज नेहमी जमातीसह (सामुदायिकपणे) अदा करा. जर कधी जमात मिळाली नाही, तरीही फर्ज नमाज मशिदीतच अदा करण्याचा प्रयत्न करा, तथापि सुन्नत नमाज घरी पढणे ही चांगले आहे.

पैगंबर (स.) यांचे शुभकथन आहे की -

"जो मनुष्य चाळीस दिवसापावेतो तक्बीरे ऊला (नमाजची पहिली तकबीर) सह जमातीसह नमाज अदा करेल. तो नरक आणि दांभिकता दोघांपासून सुरक्षित राखला जातो." (हदीस : तिर्मिजी)

पैगंबर (स.) यांनी असे सांगितले -

"जर लोकांना जमातीसह नमाज अदा करण्याचा मोबदला व पुण्य माहीत पडेल तर ते हजार प्रकारची विवशता असतानासुध्दा जमातीसह (सामुदायिकरित्या) नमाजकरिता धावत येतील. जमातीची पहिली रांग अशी आहे जणू फरिश्त्यांची एकटयाने नमाज पढण्यापेक्षा दोन माणसांची जमात अधिक चांगली आहे. मग जेवढी जास्त माणसे असतील तेवढी जास्त ही जमात अल्लाहला प्रिय असते." (हदीस : अबू दाऊद)

५) नमाज शांतीपूर्वक अदा करा आणि रुकू व सजदे अगदी समाधानाने करा. रुकूहून उठल्यानंतर समाधानपूर्वक सरळ उभे राहा. मग सजदा करा. अशा प्रकारे दोन्ही सजद्यांच्या दरम्यान या दुआचे पठण करीत जा.

"अल्लाहुम्मग़्फ़िर ली वरहम्नी वह्दिनी वज्बुरनी व आफ़िनी वर्ज़ुक़्नी"

(हदीस : अबू दाऊद)

"हे अल्लाह! तू माझ्या अपराधांना क्षमा कर. माझ्यावर दया कर. मला सरळ मार्गावर चालव. माझी खालावलेली स्थिती दूर कर. मला सलामती प्रदान कर आणि मला रोजी (आजीविका) दे".

पैगंबर (स.) यांचे शुभ कथन आहे-

"जो मनुष्य नमाज चांगल्या प्रकारे अदा करतो नमाज त्याला दुआ देते की अल्लाह असेच तुझे ही रक्षण करो. जसे तू माझे रक्षण केले."

पैगंबर (स.) यांनी असेही सांगितले,

"सर्वात वाईट चोरी नमाजची चोरी आहे." लोकांनी विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर (स.)! नमाजमध्ये चोरी कोणी कशी करु शकतो?" फर्माविले, "रुकू आणि सजदे अपूर्ण स्वरुपात करुन."

६) अजानचा आवाज ऐकताच नमाजच्या तयारीला लागा आणि वुजू करुन प्रथम मशिदीत जा आणि शांत बसून जमातसह पढल्या-जाणाऱ्या नमाजची प्रतिक्षा करा. अजान ऐकल्यानंतर सुस्ती करणे, उशीर लावणे आणि मनावर बोझा राखून नमाजला जाणे हे

मुनाफिक (दांभिक) लोकांचे लक्षण आहे.

७) अजानदेखील उत्साहाने व आवडीने देत जा. पैगंबर (स.) यांना एका माणसाने विचारले, हे अल्लाहचे पैगंबर (स.)! मला एखादे असे काम सांगा जे मला जन्नतमध्ये नेईल.

पैगंबर (स.) यांनी सांगितले - "नमाजकरिता अजान देत जा."

पैगंबरांनी हेही सांगितले, "अजान देणाऱ्याचा आवाज जेथपर्यंत पोहोचतो आणि जो त्याचा आवाज ऐकतो, तो कयामतीच्या दिवशी अजान देणाऱ्याच्या हक्कात साक्ष देईल. जो मनुष्य जंगलात आपल्या शेळ्या चारत असेल आणि अजानची वेळ झाल्यावर उंच स्वरात अजान देईल, तर जेथपर्यंत त्याचा आवाज पोहोचेल, कयामतच्या दिवशी त्या सर्व चीज वस्तू त्याच्यातर्फे साक्ष देतील." (हदीस : बुखारी)

८) जर तुम्ही इमाम (नमाजचे नेतृत्व करणारे) आहात, तर इमामच्या शिष्टाचार आणि शर्थींचा इतमाम राखून नमाज कर्तव्यणे पार पाडा आणि आपल्या मागे नमाज अदा करण्याचे सहज सुलभतेला ध्यानी राखून चांगल्या प्रकारे इमामत (नमाजचे नेतृत्व) करा. पैगंबर (स.) यांनी सांगितले,

"जो इमाम आपल्या मागे नमाज पढणाऱ्यांना चांगल्या प्रकारे नमाज पढवितात आणि असे समजून नमाज़ पढवितात की आम्ही आपल्या मागे नमाज़ पढणाऱ्यांच्या नमाजची हमी घेतो, त्यांना आपल्या मागे पढणाऱ्यांच्या नमाजचेही पुण्य प्राप्त होते. जेवढे पुण्य इतर नमाजींना मिळते, तेवढेच इमामलाही मिळते आणि इतर नमाजींच्या मोबदला व पुण्यप्राप्तीत काहीच कमी केले जात नाहीत." (तबरानी)

९) नमाज त्याच प्रकारे मन लावून अदा करा की मनावर अल्लाहची महानता व त्याच्या प्रतापाचा रोब-दबदबा बसावा आणि तुम्ही भय आणि शांती अशा संमिश्र भावनेने वेढलेले असावे. नमाजच्या स्थितीत अकारण हात-पाय हलवणे, अंग खाजवणे, दाढीत बोटे फिरवत राहणे, नाकात बोट घालणे, कपडे सांभाळणे इत्यादी मोठया अशिष्ट हरकती आहेत. या हरकतींपासून कटाक्षाने दूर राहिले पाहिजे.

१०) नमाजद्वारे अल्लाहचे सान्निध्य प्राप्त करण्याचा प्रयत्न करा. नमाज अशा प्रकारे पढा की जणू तुम्ही अल्लाहला आपल्यासमोर पाहात आहात किंवा निदान ही जाणीव राखा की अल्लाह तुम्हाला पाहात आहे. पैगंबर (स.) यांनी सांगितले,

"मनुष्य आपल्या पालनकर्त्या अल्लाहशी सर्वात जास्त निकट अशा वेळी असतो, जेव्हा तो त्याच्यासमोर सजदा करतो. यास्तव जेव्हा तुम्ही सजदा कराल तर त्या अवस्थेत खूप दुआ करत जा." (हदीस : मुस्लिम)

११) नमाज उत्साहाने व आवडीने पढत जा, मारुन मुटकून देखावा म्हणून अदा केलेली नमाज खऱ्या अर्थाने नमाज नाही. एका वेळेची नमाज अदा केल्यानंतर दुसऱ्या वेळच्या नमाजची बेचैनी व आवडीने प्रतिक्षा करा.

एक दिवस मगरीबच्या नमाजनंतर काही लोक इशा (रात्रीच्या) नमाजची प्रतिक्षा करीत होते. पैगंबर (स.) यांचे आगमन झाले. ते इतक्या वेगाने चालत आले की त्यांची दमछाक झाली होती. पैगंबर (स.) यांनी फर्माविले,

"लोक हो! आनंदित व्हा. तुमच्या पालनकर्त्याने आकाशाचा एक दरवाजा उघडून तुम्हाला फरिश्त्यांच्या समोर केले आणि अभिमानाने फर्माविले, पाहा ! माझे दास एक नमाज अदा करुन चुकले आणि दुसऱ्या नमाजची प्रतिक्षा करीत आहेत." (हदीस : इब्ने माजा)

१२) गाफील आणि बेपर्वा वृत्तीने घाईघाईने नमाज पढून डोक्यावरुन नमाजचे ओझे उतरवू नका, किंबहुना अगदी मनापासून अल्लाहचे स्मरण करा आणि मन, मस्तिष्क जाणीव, भावना, विचार सर्व अल्लाहकडे रुजू करुन पूर्ण एकाग्रतेसह नमाज अदा करा. नमाज, खऱ्या अर्थाने तीच नमाज होय, जिच्यात अल्लाहचे मनोभावे स्मरण केले जावे. दांभिक मुस्लिमांची नमाज अल्लाहच्या मन:पूर्वक स्मरणापासून रिक्त असते.

१३) नमाजच्या बाहेरही नमाजचा हक्क अदा करा आणि संपूर्ण जीवनात नमाजचे प्रतिबिंब दिसू द्या. कुरआनात फर्माविले गेले,

"नमाज निर्लज्जता व अवज्ञानेपासून रोखते." पैगंबर (स.) यांनी अतिशय प्रभावी उदाहरणाद्वारे फर्माविले, त्यांनी एका सुकलेल्या फांदीला जोरजोरात हलविले. फांदीला लागलेली पाने झडू लागली तेव्हा पैगंबर (स.) यांनी सांगितले,

"नमाज पढणाऱ्यांचे अपराध अशा प्रकारे गळून पडतात, ज्या प्रकारे या सुकलेल्या फांदीची पाने गळून पडली."

त्यानंतर पैगंबर (स.) यांनी कुरआनच्या या आयतीचे पठण केले.

"व अकिमिस्सला-त त-र-फ़ यिन्नहारि व जु-लफ़म-मिनल्लैलि, इन्नल-ह-स-नाति युज़्हिब-नस्सय्यिआति, जालि-क ज़िक्रा लिज़्ज़ाकिरीन.

"आणि पहा, नमाज कायम करा दिवसाच्या दोन्ही टोकांवर आणि थोडी रात्र उलटल्यावर वस्तुतः पुण्याई पापांना दूर सारत असते ही एक आठवण करून देणारी गोष्ट आहे त्या लोकांसाठी जे अल्लाहची आठवण ठेवणारे आहेत." *(दिव्य कुरआन, ११:११४)*

१४) नमाजमध्ये सावकाशपणे कुरआन पठण करा आणि नमाजच्या इतर जापांचेही थोडे थोडे थांबून पूर्ण एकाग्रतेने, मन-मस्तिष्काचे भान राखून पठण करा. अर्थ लक्षात घेऊन पढल्याने

आवड वाढते आणि नमाज खऱ्या अर्थाने नमाज बनते.

१५) नमाज नियमित (वक्तशीर) पणे अदा करा. कधीही खंड पाडू नका. ईमानधारकांचे वैशिष्ट्य हे आहे की ते नियमितपणे खंड पडू न देता नमाज पढतात.

"परंतु ते लोक (या दोघांपासून अलिप्त आहेत) जे नमाज अदा करणारे आहेत, जे आपल्या नमाजात नेहमी नियमितपणा ठेवतात," *(दिव्य कुरआन, ७०:२२-२३)*

१६) फर्ज नमाजच्या नियमित अदायगीसोबत नफ्ल नमाजाचाही इतमाम राखा आणि जास्तीतजास्त नफ्ल नमाज पढण्याचा प्रयत्न करा.

पैगंबर (स.) यांनी फर्माविले, "जो मनुष्य फर्ज नमाजांव्यतिरिक्त दिवस-रात्र मिळून बारा रकात नमाज पढतो, त्याच्यासाठी जन्नतमध्ये एक घर बनविले जाते." (हदीस : मुस्लिम)

१७) सुन्नत आणि नफ्ल कधीकधी घरी पढत जा. पैगंबर (स.) यांचे शुभकथन आहे -

"मशिदीत नमाज पढल्यानंतर काही नमाज घरी अदा करा. अल्लाह त्या नमाजच्या मोबदल्यात तुमच्या घरात भलाई प्रदान करील." (हदीस : मुस्लिम)

पैगंबर (स.) स्वत:देखील सुन्नत आणि नफ्ल नेहमी घरी पढत असत.

१८) फज्रच्या नमाजकरिता जेव्हा घराबाहेर पडाल, तेव्हा ही दुआ पढत जा,

"अल्लाहुम-मज-अल फ़ी क़ल्बी नूँरव- व फ़ी ब-स-री नूरवँ-व फ़ी सम-ई नूरवँ-व अन यमीनी नूरवँ-व अन शिमाली नूरवँ-व मिन खल्फ़ी नूरवँ -व मिन अमामी नूरवँ-वज-अल-ली नूरवँ-व फ़ी अ-स-बी नूरवँ-व फ़ी लहमी नूरवँ-व फ़ी दमी नूरवँ-व फ़ी शअरी नूरवँ-व फ़ी जिल्दी नूरवँ-व फ़ी लिसानी नूरवँ वज-अल फ़ी नफ़्सी नूरवँ- व अअ-ज़िमली नूरवँ-वजअलनी नूरवँ-वजअल मिन फ़ौक़ी नूरवँ-व मिन तहती नूरन, अल्लाहुम-म अअतिनी नूरा."

"हे अल्लाह! तू निर्माण कर माझ्या हृदयात तेज, माझ्या डोळ्यांत तेज, माझ्या श्रवणात तेज, माझ्या उजव्या बाजूला तेज, माझ्या डाव्या बाजूला तेज, माझ्या पाठीमागे तेज, माझ्या पुढे तेज आणि माझ्यासाठी तेजच तेज कर. माझ्या स्नायूंमध्ये तेज निर्माण कर. माझ्या मांसात तेज, माझ्या रक्तात तेज आणि माझ्या केसात तेज निर्माण कर, माझ्या त्वचेत तेज आणि माझ्या जीभेत तेज आणि माझ्या आत्म्यात तेज निर्माण कर आणि मला महान तेज प्रदान कर आणि मला डोक्यापासून पायापर्यंत तेज बनव आणि निर्माण कर माझ्या वर तेज, माझ्या खाली तेज हे अल्लाह! मला तेज प्रदान कर."

(हदीस : हिस्ने हसीन)

१९) फज्र आणि मगरिबची नमाज पढून झाल्यानंतर कोणाशी बोलण्याआधी सात वेळा ही दुआ पढा -

"अल्लाहुम-म अजिरनी मिनन्नार"

"हे अल्लाह! मला जहन्नमच्या आगीपासून वाचव."

पैगंबर (स.) यांनी फर्माविले, "फज्र आणि मगरिबच्या नमाजनंतर कोणाशी काही बोलण्यापूर्वी सात वेळा ही दुआ पढत जा. जर त्या दिवशी किंवा रात्री मरण पावाल तर तुम्ही जहन्नमपासून अवश्य मुक्ती प्राप्त कराल". (हदीस : मिश्कात)

२०) प्रत्येक नमाजच्या नंतर तीन वेळा 'अस्तग़फ़िरुल्लाह' (मी अल्लाहजवळ क्षमा- याचना करतो) म्हणा, मग ही दुआ मागा -

"अल्लाहुम-म अन्तस्सलामु व मिनकस्सलामु तबारक-त या ज़ल जलालि वल इकराम." (हदीस : मुस्लिम)

"हे अल्लाह! तू पूर्णपणे शांती सुरक्षा आहे. शांती-सुरक्षिततेचा स्त्रोत तुझ्याचकडून आहे. तू मांगल्य आणि समृद्धी बाळगणारा आहेस, हे सर्वश्रेष्ठ आणि कृपावंत."

माननीय सोबान (रजि.) कथन करतात की पैगंबर (स.) जेव्हा नमाजच्या समाप्तीवर सलाम फेरत तेव्हा तीन वेळा 'अस्तग़फ़िरुल्लाह' म्हणत, मग ही दुआ पढत.[1]

(हदीस : मुस्लिम)

२१) जमातसह पढल्या जाणाऱ्या नमाजमध्ये रांगा व्यवस्थित राखण्याकडे पुरेपूर ध्यान द्या. रांगा चांगल्या प्रकारे सरळ ठेवा आणि उभे राहण्यात अशा प्रकारे खांद्याला खांदा लावून उभे राहा की तुमच्या दरम्यान खाली जागा रहू नये आणि जोपर्यंत पुढच्या रांगा पूर्ण होत नाही, मागे रांगा बनवू नका. एकदा जमातच्या नमाजमध्ये एक मनुष्य अशा प्रकारे उभा राहिला की त्याची छाती बाहेर निघाली होती. अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी पाहिले तेव्हा ताकीद केली.

"अल्लाहच्या दासांनो! आपल्या रांगा सरळ आणि ठीक राखण्याचा जरुर इतमाम राखा, अन्यथा अल्लाह तुमचे तोंड एकमेकांविरुद्ध करील." (हदीस : मुस्लिम)

---

१.अल्लाहुमा जअल फी कल्बी नूरंव व फी बसरी नूरंव-व फी समई नूरंव व अन यमीनी नूरंव व अन शिमाली नूरंव व मिन खल्फी नूरंव व मिन अमामी नूरंव वज अल ली नूरंव व फी असबी नूरंव व फी लहमी नूरंव व फी दमी नूरंव व फी शअरी नूरंव व फी जिल्दी नूरंव व फी लिसानी नूरंव वज अल फी नफ्सी नूरंव व अअ जिमली नूरंव वजअलनी नूरंव वजअल मिन फौकी नूरंव व मिन तहती नूरन, अल्लाहुमा अअतिनी नूरा. (हदीस : हिस्ने हसीन)

एका प्रसंगी पैगंबर (स.) यांनी सांगितले - "जो मनुष्य नमाजच्या एखाद्या (अपूर्ण) रांगेत जोडेल, अल्लाह त्याला जोडील आणि जो एखाद्या रांगेला अपूर्ण ठेवील, अल्लाह त्याला अपूर्ण ठेवील." (हदीस : अबू दाऊद)

२२) लहान मुलांची रांग मोठया माणसांच्या मागे बनवा आणि मोठयांच्या सोबत त्यांना उभे करु नका तथापि ईदगाहच्या ठिकाणी किंवा जिथे वेगळे सोडण्यात त्रास असेल किंवा मुले हरवण्याची शक्यता असेल तिथे लहान मुलांना मागे राखण्याची गरज नाही, त्यांना आपल्या सोबतच ठेवा आणि स्त्रियांच्या रांगा एकतर सर्वांच्या मागे असाव्यात, किंवा वेगळ्या असाव्यात, जर मशिदीत त्यांच्यासाठी स्वतंत्र जागा बनविण्यात आली असेल. त्याचप्रमाणे ईदगाहमध्ये स्त्रियांसाठी वेगळ्या जागेची व्यवस्था करा.

# १३. कुरआन-पठणाचे शिष्टाचार

१) पवित्र कुरआनचे पठण मोठया आवडीने मन लावून करा आणि विश्‍वास राखा की पवित्र कुरआनची आसक्ती अल्लाहशी आसक्ती आहे. पैगंबर (स.) यांनी सांगितले - "माझ्या जनसमूहाकरिता सर्वोत्तम उपासना कुरआनचे पठण आहे."

२) जास्तीतजास्त कुरआन पठणात मग्न राहा आणि कधीही कुरआन पठणाने कंटाळून जाऊ नका. पैगंबर (स.) यांनी फर्माविले की अल्लाहचे सांगणे आहे,

"जो मनुष्य कुरआनच्या पठणात इतका मग्न असेल की त्याला माझ्याजवळ दुआ मागण्याचीही सवड मिळू नये तर मी त्याला न मागता, मागणाऱ्यांपेक्षा जास्त देईन."

(हदीस : तिर्मिजी)

पैगंबर (स.) यांनी सांगितले -"दास कुरआन पठणाद्वारेच अल्लाहचे सर्वाधिक सान्निध्य प्राप्त करतो

(हदीस : तिर्मिजी)

पैगंबर (स.) यांनी कुरआन पठणास प्रवृत्त करताना असे ही सांगितले,

"ज्या माणसाने कुरआन वाचले आणि तो दररोज त्याचे अध्ययन करीत राहतो, तर त्याचे उदाहरण असे आहे जणू केसर भरलेली थैली की जिचा सुगंध सर्वत्र दरवळत आहे आणि ज्या माणसाने कुरआन वाचले, परंतु त्याचे नित्य अध्ययन करीत नाही तर त्याचे उदाहरण असे आहे जणू केसर भरलेली बाटली की जिला बूच लावून बंद केले गेले असावे."

(हदीस : तिर्मिजी)

३) कुरआनचे पठण केवळ मार्गदर्शन प्राप्त करण्यासाठी करा. लोकांना आपले आसक्त बनवण्यापासून पठणशैलीचा रोब कायम करण्यापासून आणि लोकांमध्ये तुमचा धार्मिकतेचा दबदबा बसवण्यापासून कटाक्षाने दूर राहा. हे अगदी निकृष्ट दर्जाचे हेतु आहेत आणि या हेतुंनी कुरआन पठण करणारा कुरआनच्या मार्गदर्शनापासून वंचित राहतो.

४) कुरआन-पठण करण्यापूर्वी स्वच्छ-शुद्धतेकडे पूर्ण लक्ष द्या. वुजू न केलेल्या स्थितीत पवित्र कुरआनास स्पर्श करु नका आणि स्वच्छ जागी बसून कुरआन पठण करा.

५) कुरआन पठण करतेवेळी काबागृहाच्या दिशेने तोंड करुन बसा आणि मान झुकवून एकाग्रचित्ताने मन:पर्वूक व नीटपणे कुरआन पठण करा.

अल्लाहने फर्माविले आहे,

"जो ग्रंथ आम्ही आपल्याकडे पाठविला आहे, समृद्धीशाली आहे, यासाठी की त्यांनी यात विचार-चिंतन करावे आणि बुद्धी राखणाऱ्यांनी त्यापासून उपदेश प्राप्त करावा."

*(दिव्य कुरआन, ३८:२९)*

६) उच्चारण आणि थोडे थांबून पठण करण्याचाही शक्यतोंवर विचार राखा. अक्षरांचा यथायोग्य उच्चार करा व सावकाश गतीने पठण करा. पैगंबर (स.) यांचे शुभकथन आहे-

"आपल्या आवाज आणि स्वराने कुरआनास सुशोभित करा." (हदीस : अबू दाऊद)

पैगंबर (स.) प्रत्येक अक्षर स्पष्ट उच्चारुन आणि प्रत्येक आयतीला वेगवेगळे करुन पठण करीत असत. पैगंबर (स.) यांनी सांगितले,

"कुरआनचे पठण करणाऱ्याला कयामतच्या दिवशी सांगितले जाईल की ज्याप्रकारे थांबून थांबून व चांगल्या आवाजासह तुम्ही जगात नटवून सजवून कुरआन पठण करीत होते, त्याचप्रकारे कुरआन पठण करा आणि प्रत्येक आयतीच्या मोबदल्यात एक दर्जा उंच होत जा. तुमचे स्थान तुमच्या पठणाच्या शेवटच्या आयतीजवळ आहे." (हदीस : तिर्मिजी)

७) कुरआनला ना जास्त मोठयाने वाचावे आणि न अगदी हळू स्वरात किंबहुना मध्यम स्वरात पठण करा. अल्लाहचे फर्मान आहे -

"आणि आपली नमाज फार मोठ्या आवाजानेही अदा करू नका न फार खालच्या आवाजात, या दोहो दरम्यान मध्यम स्वरूपाच्या स्वराचा अवलंब करा."

*(दिव्य कुरआन, १७:११०)*

८) जेव्हा जेव्हा संधी मिळेल तेव्हा कुरआन पठण करा. परंतु पहाटे, तहज्जुदच्या नमाजमध्ये ही कुरआन पठण करण्याचा प्रयत्न करा. हा कुरआन पठणाच्या श्रेष्ठत्वाचा सर्वोच्च दर्जा होय. प्रत्येक ईमानधारकाने ही इच्छा बाळगावी की त्याने कुरआन पठणाचा जास्तीतजास्त उच्च दर्जा प्राप्त करावा.

९) तीन दिवसांपेक्षा कमी काळात संपूर्ण कुरआनचे पठण करण्याचा प्रयत्न करु नका. पैगंबर (स.) यांनी सांगितले -

"ज्याने तीन दिवसांपेक्षा कमी वेळेत कुरआनचे पूर्ण पठण केले, त्याला कुरआन मुळीच समजले नाही."

१०) कुरआनची श्रेष्ठता व त्याच्या दर्जाची जाणीव राखा आणि ज्या प्रकारे बाह्य पवित्रता आणि शुद्धतेचे ध्यान राखले आहे, त्याचप्रमाणे हृदयालाही घाणेरडे विचार, वाईट भावना आणि अपवित्र इराद्यांपासून अलिप्त राखा. जी मने घाणेरडया व अपवित्र विचारांनी व भावनांनी बरबटलेली आहेत, त्यांच्यात न पवित्र कुरआनची श्रेष्ठता आणि उच्चत्तमता बसू शकते आणि न ते कुरआनच्या गोष्टी आणि सत्यतेला समजू शकतात. माननीय इक्रिमा (रजि.) जेव्हा पवित्र कुरआन उघडत. तेव्हा जास्त करुन बेशुद्ध होत आणि सांगत, "ही माझ्या महाप्रतापि आणि सर्वश्रेष्ठ पालनकर्त्या (अल्लाह) ची वाणी आहे."

११) हे समजून कुरआन पठण करा की भूतलावर माणसाला जर मार्गदर्शन प्राप्त होऊ शकते, तर फक्त याच ग्रंथाद्वारे आणि हाच विचार मनात राखून त्यात सखोल विचार करा आणि त्यातल्या सभ्यतेला समजून घेण्याचा प्रयत्न करा. भराभर पाने उलटवित पठण करु नका, तर अर्थ नीट समजून घेऊन पठण करण्याची सवय लावा आणि त्यावर विचार चिंतन करण्याचा प्रयत्न करा.

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) सांगत असत मी 'अल् कारिअह' आणि 'अल कद्र' सारख्या लहान लहान सूरती (अध्यायां) न अर्थ ध्यानी घेऊन पढणे याहून अधिक चांगले

समजतो की 'अल् बक़रह 'आणि 'आले इमरान' सारख्या मोठमोठया सूरतीचे भरभर पठण करीत जावे आणि काही समजू नये.

पैगंबर (स.) एकदा संपूर्ण रात्र एकाच आयतीची पुनरावृत्ति करीत राहिले -

इन तु-अज़्ज़िब-हुम फ़-इन्नहुम इबादु-क व इन ताग्फ़िर लहुम फ़-इन्न-क अन्तल अज़ीज़ुल हकीम.

"आता जर तू त्यांना शिक्षा केलीस तर ते तुझे दास आहेत व जर तू माफी दिली तर तू प्रभुत्वसंपन्न व बुद्धिमान आहेस." *(दिव्य कुरआन, ५:११८)*

१२) अशा इराद्याने कुरआन पठण करा की मला त्याच्या आदेशानुसार जीवनात परिवर्तन आणायचे आहे आणि त्याच्या मार्गदर्शनाच्या प्रकाशात स्वत:चे जीवनाची जडणघडण करायची आहे आणि मग जे मार्गदर्शन लाभेल, त्यानुसार जीवन घडविण्याचा आणि दोष-उणिवांपासून जीवनाला मुक्त करण्याचा सतत प्रयत्न करा. कुरआन आरशाप्रमाणे तुमच्या चारित्र्यातील प्रत्येक डाग, प्रत्येक दोष तुमच्यासमोर स्पष्टत: मांडेल. आता हे तुमचे काम आहे की तुम्ही या दोष-उणिवांपासून तुमच्या जीवनाला मुक्त करावे.

१३) कुरआन पठण करत असतांना कुरआनच्या आयतींपासून प्रभावित होण्याचा प्रयत्न करा. जेव्हा अल्लाहची कृपा दया, क्षमादान आणि जन्नतच्या कधीही न संपणाऱ्या देणग्यांचा उल्लेख वाचण्यात येईल, तेव्हा आनंदाने डोलू लागा आणि जेव्हा अल्लाहचा प्रकोप आणि जहन्नमच्या शिक्षा-यातनांची विनाशकारिता वाचण्यात येईल तेव्हा भयकंपित व्हा, परिणामी तुमच्या नेत्रातून आसवे गळू लागावीत आणि हृदय क्षमा-याचना व लज्जाच्या अवस्थेत असण्यामुळे रडू लागावे. जेव्हा नेक-सदाचारी ईमानधारकांच्या सफलतेचा वृत्तांत वाचाल तेव्हा तुमच्या चेहऱ्यावर प्रसन्नतेचे तेज दिसू लागावे आणि जेव्हा पूर्वीच्या जनसमूहांच्या विनाशाचे वृत्तांत वाचाल, तेव्हा दु:खाने निढाल (गळितगात्र) होऊ लागावे. धमकी व भयभीत करणाऱ्या आयती वाचून अंगाचा थरकांप व्हावा आणि शुभ-समाचाराच्या आयती वाचून मन प्रसन्नतेने व अल्लाहशी कृतज्ञतेच्या भावनेने ओतप्रोत

व्हावे.

१४) कुरआन पठणानंतर ही दुआ मागा. माननीय उमर (रजि.) यांच्या एक दुआचे शब्द असे आहेत -

"अल्लाहुम्मर्जुक़्नित त-फ़क्कु-र वत्तदब्बु-र बिमा यत्लहु लिसानी मिन किताबि-क - वल-फ़ह-म लहू वल मअरि-फ़-त बि-मआ-नीहि वन-नज़-र फ़ी अज़ाइबिहि वल अ-म-ल-बिज़ालि-क मा बक़ीतु, इन्न-क अला कुल्लि शैइन क़दीर.

हे अल्लाह ! माझी जीभ तुझ्या ग्रंथामधून जे काही पठण करील, मला सुबुद्धी दे की मी विचार-चिंतन करावे. हे अल्लाह! मला याची समज प्रदान कर, याचा अर्थ व आशय समजून घेण्याची आध्यात्मिक योग्यता प्रदान कर आणि याच्या अद्‌भूत व नवलपूर्ण गोष्टी पाहू शकेल अशी दृष्टी प्रदान कर आणि जोपर्यंत मी जिवंत राहीन, मला ही सुबुद्धी प्रदान कर की मी त्यावर आचरण करीत रहावे. नि:संशय, तू प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो."

# १४. जुमा (शुक्रवार) च्या दिवसाचे शिष्टाचार

१) जुमा (शुक्रवार) च्या दिवशी साफ-सफाई, स्नान आणि सुशोभित होण्याचा पुरेपूर इतमाम राखा.

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) कथन करतात की पैगंबर (स.) यांनी असे सांगितले,

"जेव्हा कोणी जुमा (शुक्रवार) ची नमाज अदा करण्यास येईल तर त्याने स्नान करुन यावे." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

माननीय अबू हुरैरा (रजि.) कथन करतात, पैगंबर (स.) यांनी सांगितले -

"प्रत्येक ईमानधारकावर अल्लाहचा हा हक्क आहे की त्याने प्रत्येक आठवड्याला (शुक्रवारी) स्नान करावे डोके व सर्व अंग धुवावे."

माननीय अबू सईद (रजि.) कथन करतात, पैगंबर (स.) यांनी सांगितले -

"जुमाच्या दिवशी प्रत्येक वयात आलेल्या व तरुणांकरिता स्नान करणे आवश्यक आहे आणि उपलब्ध असेल तर मिस्वाक करणे व सुगंध लावणेही (हदीस : बुखारी, मुस्लिम)

माननीय सलमान (रजि.) कथन करतात, पैगंबर (स.) यांनी सांगितले -

"ज्या माणसाने जुमा (शुक्रवार) च्या दिवशी स्नान वगैरे केले आणि स्वत:च्या शक्तिनुसार शुद्धतेचा पुरेपूर इतमाम राखला, मग त्याने तेल लावले, सुगंध मळला, मग दुपारनंतर मशिदीत पोहचला आणि (मशिदीत जाऊन रांगेत बसला) दोन माणसांना एकमेकांपासून हटविले नाही. मग त्याने नमाज अदा केली जी त्याच्याकरिता निर्धारित होती. मग जेव्हा इमाम मेंबर (चबुतरा) कडे निघाला, तो गप्प बसून खुतबा (प्रवचन) ऐकत राहिला तर त्या माणसाचे ते सर्व अपराध माफ केले गेले जे एका जुमापासून दुसऱ्या जुमापर्यंत त्याच्याकडून झाले होते."

२) जुमाच्या दिवशी जास्तीतजास्त अल्लाहचे स्मरण, जप, कुरआन पठण आणि दुआ, दान-खैरात, रुग्णांची विचारपूस, जनाजा (अन्त्ययात्रे) मध्ये सहभाग, कब्रस्तानमध्ये जाणे आणि इतर नेक कामे करण्याचा इतमाम राखा.

माननीय अबू हुरैरा (रजि.) कथन करतात, पैगंबर (स.) यांनी सांगितले,

"सर्वात उत्तम दिवस, ज्यावर सूर्य उगवला, तो जुमा (शुक्रवार) चा दिवस होय. याच दिवशी आदम जन्मास आले होते आणि याच दिवशी त्यांना स्वर्गामध्ये दाखल केले गेले, आणि याच दिवशी त्यांना तेथून बाहेर काढले गेले (आणि धरतीवर अल्लाहचे प्रतिनिधी बनविले गेले) आणि याच दिवशी कयामत प्रस्थापित होईल."

माननीय अबू सईद खुदरी (रजि.) कथन करतात की पैगंबर (स.) यांनी सांगितल, पाच कर्मे अशी आहेत, जो मनुष्य त्यांना एका दिवसात करील, अल्लाह त्याचे नाव जन्नतवासी लोकांमध्ये लिहील.

१) रुग्णाची विचारपूस करणे.

२) जनाजा (अन्त्ययात्रे) मध्ये सहभागी होणे.

३) लज्जा राखणे.

४) जुमाची नमाज अदा करणे, आणि

५) गुलामास गुलामगिरीतून मुक्त करणे (इब्ने हिब्बान) ही सर्व सत्कृत्ये करणे तेव्हाच शक्य आहे जेव्हा जुमा (शुक्रवार) चा दिवस असेल.

माननीय अबू सईद खुदरी (रजि.) द्वारे हेही उल्लेखित आहे की पैगंबर (स.) यांनी सांगितले "जो मनुष्य जुमाच्या दिवशी सूरह काफचे पठण करील तर त्याच्याकरिता दोन्ही जुमांच्या दरम्यान एक नूर (दिव्य तेज) चमकत राहील. (हदीस : नसई)

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे की पैगंबर (स.) यांनी असे सांगितले -

"जो मनुष्य जुमा (शुक्रवार) च्या रात्री अर्थात गुरुवारचा दिवस पार पाडल्यानंतरच्या रात्री) सूरह दखानचे पठण करील तर त्याच्यासाठी सत्तर हजार फरिश्ते क्षमा-याचना करतात आणि त्याचे सर्व अपराध माफ केले जातात." (हदीस : तिर्मिजी)

तसेच पैगंबर (स.) यांनी सांगितले -

"जुमाच्या दिवशी एक अशी शुभ घडी आहे की दास त्या क्षणी जे काही मागतो कबूल केले जाते." (हदीस : बुखारी)

ती शुभ घडी कोणती आहे, याबाबत इस्लामच्या विद्वानांमध्ये मतभेद आहेत. यासाठी की कथनांमध्ये वेगवेगळ्या समयांचा उल्लेख आहे. तथापि विद्वानांची दोन कथने या संदर्भात फार उचित आहेत.

पहिले कथन : ज्या वेळी खतीब (खुतबा अर्थात प्रवचन देणारा) खुतबा देण्यासाठी मिंबरवर येतो, त्या वेळेपासून नमाज संपण्यापर्यंतचा समय.

दुसरे कथन : ही घडी जुमाच्या दिवसाची अंतिम घटिका होय, जेव्हा सूर्य अस्तास जाऊ लागेल.

उचित हे की तुम्ही या दोन्ही वेळा अतिशय अदबीने अल्लाहजवळ दुआ आणि क्षमायाचना करा. दुआ-प्रार्थनेसोबत खालील दुआ मागाल तर अधिक चांगले,

"अल्लाहुम-म अन-त रब्बी ला इला-ह इल्ला अन-त ख़लक़-तनि व अना अब्दु-क व अना अला अह-दि-क व वअदि-क मस-त-तअतु अबूउ ल-क बिनिअ्-मति-क अलय-य व अबूउ बिज़म्बी फ़ग़फ़िरली फ़ इन्नहू ला यग़्फ़िरुज़्ज़ुनू-ब इल्ला अन-त अऊज़ुबि-क मिन शर्रि मा स-नअतु."

(हदीस : बुखारी)

"हे अल्लाह! तूच माझा स्वामी व पालनकर्ता आहेस, तुझ्याखेरीज कोणीही उपास्य नाही. तू मला निर्माण केले, मी तुझा दास आहे आणि यथाशक्ती मी तुला दिलेल्या वचनांवर कायम आहे. मी तुझ्या देणग्या आणि तुझे उपकार मान्य करतो, जे तू माझ्यावर केले आहेत आणि माझ्या अपराधांना मान्य करतो. तेव्हा तू मला क्षमा कर, कारण तुझ्याखेरीज अपराधांना माफ करणारा दुसरा कोणी नाही आणि मी माझ्या दुष्कर्मांच्या दुष्परिणामापासून तुझा आश्रय मागतो."

३) जुमाच्या नमाजचा पुरेपूर इतमाम राखा. जुमाची नमाज प्रत्येक वयात आलेल्या, धडधाकट प्रकृतीच्या स्थायिक आणि भान राखणाऱ्या मुस्लिम पुरुषावर फर्ज (अनिवार्य) आहे. एखाद्या ठिकाणी इमामखेरीज दोन माणसेही असतील तरी जुमाची नमाज अवश्य अदा केली जावी. पैगंबर (स.) यांनी सांगितले -

"लोकांनी जुमाची नमाज कदापि सोडू नये अन्यथा अल्लाह त्यांच्या हृदयांवर मोहर लावील. मग (मागदर्शनापासून वंचित होऊन) ते गाफील राहणाऱ्यांपैकी बनतील."

(हदीस : मुस्लिम)

माननीय अबू हुरैरा (रजि.) कथन करतात, पैगंबर (स.) यांनी असे सांगितले -

"जो मनुष्य स्नान वगैरे करुन जुमाची नमाज पढण्याकरिता मशिदीत आला, मग त्याने सुन्नत (नमाज) अदा केली, जी अल्लाहने त्याच्याकरिता ठरविली होती. मग गप्प बसून (खुतबा ऐकत) राहिला. येथपावेतो की खुतबा (प्रवचन) पूर्ण झाला. मग इमामच्या सोबत फर्ज (नमाज) अदा केली, तर त्याचे एक जुमापासून दुसऱ्या जुमापर्यंतचे अपराध माफ केले जातील आणि तीन दिवसांचे आणखी जास्त".

माननीय यजीद बिन मरयम (रजि.) कथन करतात, मी जुमाच्या नमाजसाठी जात होतो. तेवढयात रस्त्यात माननीय हबाया बिन रिफाआ (रजि.) यांच्याशी भेट झाली. त्यांनी मला विचारले, कोठे निघालात ? मी म्हणालो, जुमाची नमाज पढण्यासाठी जात आहे. ते म्हणाले, अभिनंदन ! तुमचे हे चालणे अल्लाहच्या मार्गात चालणे होय."

पैगंबर (स.) यांनी सांगितले -

"ज्या दासाचे पाय अल्लाहच्या मार्गात धुळीने माखले त्यावर आग हराम आहे."

४) जुमाची अजान कानावर पडताच मशिदकडे धाव घ्या, त्याक्षणी आपला व्यापार-व्यवसाय व इतर कामकाज बंद करा आणि एकाग्रचित्त होऊन प्रवचन ऐकण्यात व नमाज पढण्यात मग्न व्हा आणि जुमाची नमाज पढून झाल्यावर पुन्हा आपापल्या उद्योगाला लागा. या संदर्भात कुरआनात सांगितले गेले,

"हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, जेव्हा पुकारले जाईल नमाजसाठी शुक्रवारच्या दिवशी तेव्हा अल्लाहच्या स्मरणाकडे धाव घ्या आणि खरेदी-विक्री सोडून द्या, हे तुमच्यासाठी अधिक उत्तम आहे जर तुम्ही जाणून घ्याल. मग जेव्हा नमाज पूर्ण होईल तेव्हा भूतलावर पसरले जा आणि अल्लाहच्या कृपाप्रसादाचा शोध घ्या. आणि अल्लाहचे मोठ्या प्रमाणात स्मरण करीत रहा कदाचित तुम्हाला सफलता प्राप्त होईल."

*(दिव्य कुरआन, ६२:९-१०)*

या आयतीत ईमानधारकांना ज्या ताकीदी दिल्या जातात त्या खालीलप्रमाणे :

अ) ईमान धारकाने अगदी काळजीपूर्वक जुमाच्या नमाजचा इतमाम राखला पाहिजे. आणि अजानचा आवाज ऐकताच सर्व काही सोडून त्वरीत मशिदीकडे धाव घेतली पाहिजे.

आ) जुमाची अजान ऐकल्यानंतर ईमान धारकासाठी हे उचित नव्हे की त्याने व्यापार-व्यवसायात किंवा अन्य एखाद्या ऐहिक कामात व्यस्त राहावे आणि अल्लाहशी गाफील ऐहिक भक्त बनून राहावे.

इ) ईमान धारकाच्या भलाईचे रहस्य हे आहे की त्याने या जगात अल्लाहचा दास आणि गुलाम बनून राहावे आणि जेव्हादेखील अल्लाहतर्फे पुकारले जाईल तर त्याने एखाद्या एकनिष्ठ व आज्ञाधारक दासाप्रमाणे सर्व आवडी-निवडी बाजूला सारुन आणि समस्त ऐहिक लाभांवर पाणी सोडून अल्लाहच्या पुकारीवर धाव घ्यावी आणि स्वत:च्या आचरणाने हे घोषित करावे की असफलता व विनाश हा नव्हे की धर्माच्या निकडींवर ऐहिक लाभांना बळी द्यावे, किंबहुना असफलता आणि विनाश हा आहे की माणसाने या जगाचा लाभ साधण्यात या धुंदीत आपल्या दीन-धर्माचा सर्वनाश ओढवून घ्यावा.

ई) या जगाच्या बाबतीत विचार करण्याची ही शैली उचित नव्हे की माणसाने ऐहिकतेकडे पूर्णत: डोळेझाक करावी आणि इतके धर्मानुयायी बनावे की या जगासाठी अगदी निरुपयोगी ठरावे. किंबहुना कुरआनची स्पष्ट ताकीद आहे की नमाज संपताच अल्लाहच्या विशाल धरतीवर पसरुन जा आणि अल्लाहने आपल्या धरतीत उपजीविका पोहचविण्यासाठी जी साधने व माध्यमे उपलब्ध करुन दिली आहेत, त्यांचा पुरेपूर लाभ घ्या आणि तुमच्या योग्यतेचा पूर्णत: वापर करुन स्वत:च्या हिश्श्याची आजीविका शोधा. अशासाठी की ईमानधारकासाठी न हे उचित आहे की त्याने स्वत:च्या गरजपूर्तिकरिता दुसऱ्यावर अवलंबून राहावे आणि न हे उचित आहे की त्याच्यावर अवलंबून असलेल्या

कुटुंबियांच्या व नातेवाईकांच्या गरजा पूर्ण करण्यात त्याने कुचराई करावी आणि त्रास-यातना व निराशेला बळी पडावे.

शेवटची महत्वपूर्ण ताकीद ही आहे की ईमान धारकाने या जगाच्या व्यापार-व्यवसायात अशा प्रकारे गुंतुन जाऊ नये की त्याला आपल्या पालनकर्त्या अल्लाहचा विसर पडावा. कोणत्याही स्थितीत त्याने हे लक्षात ठेवावे की त्याच्या जीवनाची खरी पूंजी आणि खरी रत्नमाणके अल्लाहचे स्मरण होय. माननीय सईद बिन जुबेर (रजि.) सांगतात. "अल्लाहचे स्मरण केवळ हे नव्हे की फक्त तोंडाने 'सुबहानल्लाह, अलहम्दु लिल्लाह, अल्लाहु अकबर' आणि 'ला इलाह इल्लल्लाह' चा जाप करत राहावे. किंबहुना असा तो प्रत्येक मनुष्य अल्लाहच्या स्मरणात मग्न आहे जो अल्लाहच्या आज्ञापालनाद्वारे त्याच्या जीवनाची व्यवस्था उभारण्यात मग्न राहत असेल.

५) जुमाच्या नमाजसाठी शक्य तितक्या लवकर मशिदीत जाण्याचा प्रयत्न करा; आणि सुरुवातीलाच जाऊन पहिल्या रांगेत स्थान प्राप्त करण्याचा इतमाम राखा.

माननीय अबू हुरैरा (रजि.) कथन करतात की पैगंबर (स.) यांनी सांगितले -

"ज्या माणसाने जुमाच्या दिवशी मोठया इतमानाने अशा प्रकारे स्नान केले, जसे पवित्रता प्राप्त करण्यासाठी स्नान करतात (अर्थात इतमामपूर्वक सर्वांगावर पाणी सोडून खूप चांगल्या प्रकारे सर्व अंग साफ केले), मग सुरुवातीला मशिदीत पोहोचला तर जणू त्याने एका उंटांची कुर्बानी केली आणि त्यानंतर दुसऱ्या घटिकेस पोहोचला तर जणू गाय (किंवा म्हैस) ची कुर्बानी केली. त्यानंतर तिसऱ्या घटिकेस पोहोचला तर जणू त्याने शिंगे असलेला मेंढा कुर्बान केला आणि त्यानंतर चौथ्या घटिकेस पोहोचला तर जणू त्याने अल्लाहच्या मार्गात एक अंडे दान दिले. मग जेव्हा खतीब (प्रवचक) खुतबा (प्रवचन) देण्यास येईल तेव्हा फरिश्ते मशिदचा दरवाजा सोडून खुतबा ऐकण्यासाठी व नमाज पढण्यासाठी मशिदीत येऊन बसतात." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

माननीय इरबाज़ बिन सारिया (रजि.) कथन करतात -

"पैगंबर (स.) पहिल्या रांगेत बसणाऱ्यांसाठी तीन वेळा अस्तगफार (क्षमा-याचना) सांगत आणि दुसऱ्या रांगेत बसणाऱ्यांकरिता एक वेळा" (हदीस : इब्ने माजानसई)

आणि माननीय अबू हुरैरा (रजि.) उल्लेखितात -

"लोकांना पहिल्या रांगेचा मोबदला व पुण्य माहीत नाही. जर त्यांना पहिल्या रांगेत बसणाऱ्यांचा मोबदला व पुण्य माहीत पडले तर लोक पहिल्या रांगेकरिता कुरआ (फासा) टाकू लागतील." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

६) जुमाची नमाज, जामा मशिदीत अदा करा आणि जिथे जागा मिळेल तिथे पाढा. लोकांची डोकी, खांदे ओलांडत जाऊन पुढे जाण्याचा प्रयत्न करु नका. अशाने लोकांना शारीरिक त्रास तर होतोच, मानसिक क्लेशही. आणि त्यांच्या शांततेत, एकाग्रता व धारणेत व्यत्यय येतो.

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) कथन करतात की पैगंबर (स.) यांनी सांगितले- "जो मनुष्य पहिल्या रांगेत अशासाठी उभा राहील की त्याच्या बांधवाला त्रास पोहचू नये तर सर्वश्रेष्ठ अल्लाह त्याला पहिल्या रांगेत बसणाऱ्यांपेक्षा दुप्पट मोबदला व पुण्य प्रदान करील." (तबरानी)

माननीय सलमान (रजि.) कथन करतात, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्या माणसाने जुमाच्या दिवशी स्नान वगैरे केले, आणि यथाशक्ती त्याने साफ-सफाईच्या व्यवस्थेची काळजी घेतली, मग तेल लावले, सुगंध लावला आणि दुपार ढळताच मशिदीत जाऊन पोहचला आणि (रांगेत बसलेल्या) दोन माणसांना एकमेकांपासून हटविले नाही. अर्थात त्याने त्यांच्या डोक्यांवरून व खांद्यांवरून ओलांडून जाण्याची रांगांना भेदून पुढे जाण्याची किंवा दोन बसलेल्या नमाजींच्या दरम्यान घुसून बसण्याची चूक केली नाही, किंबहुना जिथे जागा मिळाली तिथे शांतपणे सुन्नत नमाज अदा केली, जी अल्लाहने त्याच्या भाग्यात लिहीली होती. मग खतीब (प्रवचन देणारा) मिंबरवर आल्यावर गप्प (बसून खुतबा ऐकत) राहिला तर अशा माणसाचे ते सर्व अपराध माफ केले गेले, जे एका जुमापासून दुसऱ्या जुमापर्यंत त्याच्याकडून घडले." (हदीस : बुखारी)

७) खुतबा (प्रवचन) नमाजच्या तुलनेत नेहमी लहान द्या. यासाठी खुतबा खरे पाहता स्मरणिका आहे, ज्यात लोकांना अल्लाहचे आज्ञापालन व त्याच्या उपासनेसाठी प्रवृत्त केले जाते. नमाज सर्वात महत्वपूर्ण उपासना आहे. म्हणून हे कोणत्याही प्रकारे उचित नाही की खुतबा तर लांबलचक दिला जावा आणि नमाज मात्र घाईघाईने छोटीशी पढली जावी. या संदर्भात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"नमाजला दीर्घ करणे आणि खुतबा लहान करणे या गोष्टीचे लक्षण आहे की खुतबा देणारा समंजस आहे. यास्तव तुम्ही नमाज दीर्घ स्वरूपात पढत जा आणि खुतबा थोडक्यात द्या." (हदीस : मुस्लिम)

८) खुतबा अतिशय शांततेने, लक्षपूर्वक, एकाग्रचित्ताने आणि स्वीकृत करण्याच्या भावनेने ऐका आणि अल्लाह व पैगंबराचे जे आदेश माहीत पडतील, त्यावर मन:पूर्वक आचरण करण्याचा निश्चय करा. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"ज्या माणसाने स्नान केले, मग जुमाची नमाज पढण्यासाठी आला आणि येऊन त्याच्या नशीबात असलेली नमाज अदा केली. मग गप्प (बसून अतिशय लक्षपूर्वक एकाग्र चित्ताने)

खुतबा ऐकत राहिला. येथपावेतो की खुतबा देणाऱ्याचे प्रवचन संपले मग त्याने इमामच्या सोबत फर्ज नमाज अदा केली तर त्याचे ते सर्व अपराध माफ केले गेले, जे त्याच्याकडून एका जुमापासून दुसऱ्या जुमापर्यंत घडले, किंबहुना अधिक तीन दिवसांचे अपराधही माफ केले गेले."

(हदीस : मुस्लिम)

दुसऱ्या एका कथनानुसा, जेव्हा खुतबा देणारा खुतबा देण्याकरिता मिंबरवर येईल, तेव्हा कोणतीही नमाज पढणे उचित नाही आणि आपसात बोलणेही उचित नाही.

९) दुसरा खुतबा अरबी भाषेत द्या. तथापि पहिल्या खुतब्यात नमाजींना अल्लाह व पैगंबरांचे आदेश, गरजेनुसार काही उपदेश व मार्गदर्शन आणि स्मरणिकेचा इतमाम तुमच्या बोली भाषेतही करा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जुमाप्रसंगी जी प्रवचने दिली आहेत. त्यावरून हेच कळते की खुतबा देणाऱ्याने परिस्थितीनुसार मुस्लिमांना काही उपदेश व मार्गदर्शन करावे अर्थात हा हेतु त्याच वेळी साध्य होऊ शकतो जेव्हा खुतबा देणारा, श्रोत्यांच्या भाषेत त्यांना संबोधील.

१०) जुमाच्या फर्ज नमाजमध्ये सूरह 'अल आला' आणि सूरह 'गाशिया' पढणे किंवा सूरह 'मुनाफिकून' व सूरह 'जुमआ' पढणे अधिक चांगले व पैगंबर आचरणानुसार आहे. पैगंबर मुहम्मद (स.) जास्तकरून याच सूरतींचे पठण करीत असत.

११) जुमाच्या दिवशी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर जास्तीतजास्त दरूद व सलाम पाठविण्याचा खास इतमाम राखा. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ-कथन आहे,

"जुमाच्या दिवशी माझ्यावर जास्तीतजास्त दरूद पाठवा. त्या दिवशी दरूदमध्ये फरिश्ते हजर होतात आणि हे दरूद माझ्यासमोर प्रस्तुत केले जाते." (हदीस : इब्ने माजा)

# १५ जनाजाच्या नमाजचे शिष्टाचार

१) जनाजा (अन्त्ययात्रे) च्या नमाजमध्ये सहभागी होण्याचा इतमाम राखा. जनाजाची नमाज मयताकरिता क्षमा-याचनेची, दोजख (नरका) पासून मुक्ती मिळवण्याची दुआ आहे आणि हा मयतीचा महत्त्वपूर्ण हक्क आहे. जर हे भय असेल की वुजू करेपर्यंत जनाजाची नमाज समाप्त होईल तर तयम्मुम करून सहभागी व्हा. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे.

"जनाजाची नमाज अदा करा, कदाचित या नमाजव्दारे तुमच्यावर दुःख पसरावे. दुःखी मनुष्य अल्लाहच्या छायेत राहतो आणि दुःखी मनुष्य प्रत्येक नेक-सदाचारी माणसाचे स्वागत करतो." (हाकीम)

आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे ही सांगितले,

"ज्या मयतीवर मुस्लिमांच्या तीन रांगा जनाजाची नमाज अदा करतात, त्याच्यासाठी जन्नत आवश्यक व अनिवार्य ठरते." (हदीस : अबू दाऊद)

२) जनाजाच्या नमाजकरिता मयताची खाट अशा प्रकारे ठेवा की डोके उत्तरेकडे असावे आणि पाय दक्षिणेकडे व मयताचे तोंड काबागृहाकडे ठेवा.

३) जर तुम्ही जनाजाची नमाज पढत असाल तर अशा प्रकारे उभे राहा की तुम्ही मयतीच्या छाती समोर असावे.

४) जनाजाच्या नमाजमध्ये रांगाची संख्या नेहमी विषम ठेवा. जर थोडे लोक असतील तर एक रांग बनवा अन्यथा तीन, पाच, सात किंवा जास्त लोक असतील तर जास्त रांगा बनवा, परंतु रांगांची संख्या विषम ठेवा.

५) जनाजाची नमाज सुरू कराल तर ही नियत करा की आम्ही या मयतीकरिता सर्वात अधिक दया करणाऱ्या अल्लाहजवळ क्षमा-याचना करण्यास्तव याची जनाजाची नमाज पढतो इमामनेही हीच नियत करावी आणि नमाजींनी हीच नियत करावी.

६) जनाजाच्या नमाजमध्ये जे काही इमाम पठण करील तेच नमाजींनी पठण करावे नमाजींनी अगदी गप्प राहू नये. तथापि इमामचे पठण उंच स्वरात तर नमाजींचे हळू स्वरात.

७) जनाजाच्या नमाजमध्ये चार वेळा 'अल्लाहु अकबर'चा उद्घोष करा. पहिल्यांदा 'अल्लाहु अकबर' म्हणत हात काना पावेतो न्या आणि मग हात बांधून सना (अल्लाहची प्रशंसा पूर्ण वचना) चे पठण करा.

"सुबहा-न-क अल्लाहम-म व बिहम्दि-क व तबा-र-कस्मु-क व तआला जद्दु-क व जल्-ल सनाउ-क व ला इला-ह गैरू-क."

"हे अल्लाह तू पवित्रतम आणि श्रेष्ठतम आहे. आपल्या प्रशंसेसह तुझे नाव भलाईपूर्ण व समृध्दशाली आहे आणि तुझी थोरवी व महानता अतिशय उच्च आहे आणि तुझी प्रशंसा मोठी श्रेष्ठतम आहे आणि तुझ्याखेरीज कोणी उपास्य नाही."

आता दुसरी तकबीर (अल्लाहु अकबर) पठण करा. परंतु असे म्हणताना हात वर करू नका आणि न डोक्याने एखादा इशारा करा. दुसऱ्या तकबीरनंतर दरूद शरीफचे पठण करा.

"अल्लाहुम-म सल्लि अला मुहम्मदिंव-व अला आलि मुहम्मदिन कमा सल्लै-त अला इबराहीम-म व अला आलि इबराही-म इन्न-क हमीदुम मजीद। अल्लाहुम-म बारिक अला मुहम्मदिंव-व अला आलि मुहम्मदिन कमा बारक-त अला इब्राही-म व अला आलि इब्राही-म इन्न-क हमीदुम मजीद."

हे अल्लाह ! तू मुहम्मद (स.) यांच्यावर दाय व कृपा कर, आणि त्यांच्या संततीवर दया- कृपा कर, ज्याप्रमाणे तू इब्राहीम (अ.) व त्यांच्या संततीवर दया व कृपा केली. नि:संशय तू मोठा गुण संपन्न आणि महान आहेस. हे अल्लाह! तू समृध्दी अवतरित कर मुहम्मद (स.) यांच्यावर आणि त्यांच्या संततीवर, ज्याप्रमाणे तू इब्राहीम (अ.) वर आणि त्यांच्या संततीवर समृध्दी अवतरित केली. नि:संशय तू मोठा गुणसम्पन्न आणि महान आहेस."

आता हात वर न करता तिसऱ्यांदा "अल्लाहु अकबर" म्हणा आणि मयतीकरिता पैगंबर आचरणानुसार दुआ मागा. मग चौथ्या वेळी अल्लाहु अकबर म्हणून दोन्ही बाजूला सलाम फेरून नमाज समाप्त करा.

८) जर मयत वयात आलेल्या (प्रौढ) पुरुष किंवा स्त्रीची आहे तर तिसऱ्या तकबीरनंतर ही दुआ करावी -

"अल्लाहुम्मग़फ़िर लिहय्यिना व मय्यितिना व शाहिदिना व ग़ाइबिना व संग़ीरिना व कबीरिना व ज़—करिना व उनसाना, अल्लाहुम-म मन अहयै—तहू मिन्ना फ़ अह्यिही अलल् इस्लामि व मन त 'व फ्फैतहू मिन्ना फ़ तं वफ़्फ़हू अलल-ईमान.

हे अल्लाह! आमच्या जिवंत असलेल्यांची, आमच्या मृत पावलेल्यांच, आमच्या हजर असलेल्यांची, आमच्या अदृश्य झाले त्यांची, आमच्या लहानांची, आमच्या मोठ्यांची आमच्या पुरुषांची आमच्या स्त्रियांची तू (जहन्नमपासून) सुटका कर. हे अल्लाह! आमच्यातल्या ज्याला तू जिवंत राखशील, तू त्याला इस्लामवर जिवंत ठेव आणि ज्याला तू मरण देशील त्याला तू ईमानासह मरण दे." आणि जर मयत वयात न आलेल्या लहान मुलाची असेल तर ही दुआ करावी.

"अल्लाहुम्मज-अलहु लना फ़-र-तँव वज-अलहु लना
अज-रँव व ज़ुख़-रँव वज अलहु लना शाफ़िअँव-व मुशफ़्फ़आ."

हे अल्लाह! तू या मुलाला आमच्यासाठी मुक्ती चे साधन बनव आणि याला आमच्यासाठी मोबदला आणि आखिरत (मरणोत्तर जीवना) चा संग्रह बनव आणि असा शिफारस करणारा बनव, ज्याची शिफारस कबूल केली जावी.

जर मयत वयात न आलेल्या मुलीची आहे तर ही दुआ करावी. या दुआचा ही तोच अर्थ आहे जो मुलासाठी पढल्या जाणाऱ्या दुआचा आहे.

"अल्लाहुम्मज अलहा लना फ़-र-तँव वज-अलहा लना अजरवँ व ज़ुख़रवँ-वज अलहा लना शाफ़ि-अ-तवँ व मुशफ़-फ़-अह."

९) जनाजाकरिता जाताना स्वत:च्या परिणतीचाही विचार करीत राहावा आणि हे विचार-चिंतन करा की ज्याप्रमाणे तुम्ही दुसऱ्याला जमिनीच्या हवाली करीत आहात, ठीक त्याचप्रमाणे एक दिवस दुसरे लोक तुम्हाला घेऊन जातील. या दु:ख आणि विचार-चिंतनाच्या परिणामी तुम्ही निदान एवढ्या वेळेकरिता मरणोत्तर जीवनाच्या विचार चिंतनात झुरण्याचे सद्‌भाग्य प्राप्त कराल आणि या नश्वर जगाच्या गुंतावळ्यापासून सुरक्षित राहाल.

# १६. मयतीचे शिष्टाचार

१) जेव्हा एखाद्या अशा माणसाजवळ जाल, जो मरण्याच्या बेतात असेल तेव्हा उंच आवाजात कलिमा 'ला इलाह इल्लल्लाहु मुहम्मदुर्रसूलुल्लाह' चे पठण जारी राखावे. मरणासन्न इसमास पढण्यास विवश करू नये. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे.

"जेव्हा मरण पावणाऱ्यांजवळ बसाल तर कलिमाचे पठण करीत राहा."

(हदीस : मुस्लिम)

२) एखाद्याची मृत्युघटिका जवळ येऊन ठेपली असता सूरह यासीनचे पठण करा. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे की मरण पावणाऱ्यांजवळ सूरह यासीनचे पठण करा. (आलमगीरी, पृ.१०० भाग-१) मात्र, प्राण निघून गेल्यानंतर, जोपर्यंत मयतीला स्नान घातले न जाईल त्याच्याजवळ बसून पवित्र कुरआनचे पठण करू नका आणि ज्याला स्नान करणे आवश्यक आहे अशा माणसाने व विटाळ आलेल्या स्त्रीने मयतीजवळ येऊ नये.

३) मृत्युवार्ता ऐकून "इन्ना लिल्लाहि व इन्ना इलैहि राजिऊन" असे म्हणा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्माविले की जो मनुष्य एखाद्या संकटप्रसंगी "इन्ना लिल्लाहि व इन्ना इलैहि राजिऊन" असे म्हणतो, त्याच्यासाठी तीन प्रकारे मोबदला आहे.

१)त्याच्यावर अल्लाहतर्फे रहमत (दया कृपा) आणि सलामती अवतरते.

२)त्याला सत्याचा शोध केल्याचा मोबदला मिळतो.

३)त्याची नुकसानभरपाई केली जाते आणि त्याला नष्ट झालेल्या वस्तूचा त्याहून चांगला मोबदला दिला जातो. (तबरानी)

४) मयताचा शोक करताना जोरजोराने रडणे ओरडणे छाती बडविणे इ. गोष्टी टाळा तथापि दु:खातिरेकाने डोळ्यांतून अश्रू वाहणे स्वाभाविक आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे सुपुत्र माननीय इब्राहीम (रजि.) यांचे निधन झाले. तेव्हा पैगंबरांच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले त्याचप्रमाणे त्यांचे नातू इब्ने जैनब (रजि.) यांचे निधन झाले तेव्हादेखील त्यांच्या डोळ्यातून अश्रू निघाले. विचारले गेले, हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! हे काय? सांगितले,

"ही दया-कृपा आहे जी अल्लाहने आपल्या दासांच्या हृदयात ठेवली आहे आणि अल्लाह आपल्या दासांपैकी त्याच दासांवर दया-कृपा करतो जे दयावान आहेत."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे ही सांगितले की जो तोंडावर चापट मारील, सदऱ्याचा गळा फाडेल आणि अज्ञानकाळासारखा शोक-विलाप करील तर अशा माणसाचा आमच्याशी काहीही संबंधी नाही.

५) प्राण निघून गेल्यानंतर मयताचे हात-पाय सरळ करा. डोळे बंद करा आणि एक रूंद पट्टी हनुवटीच्या खालून काढून डोक्याच्या वर बांधा आणि पायाचे दोन्ही अंगठे जोडून एका चिंधीने बांधा आणि सर्व शरीर चादरीने झाका आणि या वचनाचे पठण करीत राहा - "बिस्मिल्लाहि व अला मिल्लति रसूलिल्लाह" (अल्लाहच्या नावाने आणि रसूलुल्लाह (स.) यांच्या जनसमूहावर) लोकांना या निधनासंबंधी सूचना द्या आणि मयतीला कबरीत ठेवतानाही, ही दुआ करावी.

६) मयतीच्या गुणवैशिष्टयांचे वर्णन करा आणि त्याच्या अवगुणांची चर्चा करू नका. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले "तुमच्या मयतांच्या गुणवैशिष्टयांची चर्चा करा, त्यांच्या वाईट गुणांबद्दल बोलण्यापासून तोंड बंद राखा." (हदीस : अबू दाऊद)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले,

"जेव्हा एखादा मनुष्य मरण पावतो, तेव्हा त्याचे चार शेजारी तो भला माणूस असल्याची साक्ष देतात, तेव्हा अल्लाह फर्मावितो, मी तुमची साक्ष मान्य केली आणि ज्या गोष्टी तुम्हाला माहीत नव्हत्या, त्या मी माफ केल्या." (इब्ने हिब्बान)

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पुढे त्यांच्या सहवासातील अनुयायी (रजि.) ने एका जनाजाची प्रशंसा केली. पैगंबरांनी सांगितले,

"त्याच्यासाठी जन्नत आवश्यक ठरली. लोक हो! तुम्ही धरतीवर अल्लाहचे साक्षीदार आहात. तुम्ही ज्याला चांगले म्हणता, अल्लाह त्याला जन्नतमध्ये दाखल करतो आणि ज्याला तुम्ही वाईट म्हणता!, त्याला दोजख (नरका) मध्ये पाठवितो."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले,

"जेव्हा एखाद्या रोग्याची विचार पूस करायला जाल किंवा एखाद्या जनाजा (अन्त्ययात्रे) मध्ये सहभागी व्हाल तेव्हा नेहमी तोंडाने भलाईपूर्ण बोल बोला. कारण फरिश्ते तुमच्या बोलण्यावर आमीन म्हणत जातात." (हदीस : मुस्लिम)

७) नेहमी मृत्युप्रसंगी धीर-संयम व्यक्त करा. कधीही तोंडाने कृतघ्नतादर्शक शब्द काढू नका. या संदर्भात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जेव्हा एखादा मनुष्य त्याच्या बाळाच्या मृत्युवर धीर-संयम राखतो, तेव्हा अल्लाह आपल्या फरिश्त्यांना सांगतो, "तुम्ही माझ्या दासाच्या मुलाचा जीव ताब्यात घेतला?" फरिश्ते उत्तर देतात, "पालनकर्त्या! आम्ही तुझ्या आज्ञेचे पालन केले." मग अल्लाह विचारतो, "तुम्ही माझ्या दासाच्या काळजाच्या तुकड्याचा जीव ताब्यात घेतला?" ते म्हणतात, होय! मग अल्लाह विचारतो, तर माझ्या दासाने काय म्हटले?" ते उत्तर देतात,

"पालनकर्त्या, त्याने तुझी स्तुति प्रशंसा केली आणि "इन्ना लिल्लाहि व इन्ना इलैहि राजिऊन" असे म्हटले." तेव्हा अल्लाह फरिश्त्यांना सांगतो, "माझ्या या दासाकरिता जन्नतमध्ये एक घर तयार करा आणि त्याचे नाव "बैतुल हम्द" (कृतज्ञतेचे घर) असे ठेवा."

(हदीस : तिर्मिजी)

८) मयतीला स्नान वगैरे देण्यात विलंब लावू नका. स्नानाकरिता पाण्यात बोरीच्या झाडाची पाने टाकून थोडे गरम करून घ्याल तर उत्तम. मयताला स्वच्छ लाकडी पाटावर झोपवा, कपडे उतरवून दुसऱ्या वस्त्राने शरीर झाका, हातांना कापड लपेटून प्रथम लघवी व शौचास साफ करा आणि असे करताना शरीरावरचे वस्त्र हटवू नका. स्नान करताना नाका-कानात कापसाचे बोळे ठेवा, यासाठी की पाणी आत शिरू नये. मग डोके साबणाने किंवा अन्य एखाद्या वस्तूने चांगले धुवून स्वच्छ करा. मग उजव्या कुशीवर झोपवून डोक्यापासून पायांपर्यंत पाणी सोडा, अशा प्रकारे डाव्या बाजूने डोक्यापासून पायापर्यंत पाणी टाका. आता भिजलेले अंतर्वस्त्र हटवून घ्या आणि कोरडे अंतर्वस्त्र नेसवा आणि मग मयताला उचलून खाटेवर कफन घातलेल्या स्थितीत ठेवा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

ज्याने एखाद्या मयतीला न्हाऊ घातले आणि त्याच्या व्यंग-दोषास लपविले, अल्लाह अशा दासाच्या चाळीस मोठ्या अपराधांना माफ करतो आणि ज्याने एखाद्या मयतीला कबरीत ठेवले, तर जणू त्याने मयतीला कियामतीपावेतोकरिता राहण्याचे घर उपलब्ध करून दिले."

(तबरानी)

९) कफन मध्यम प्रतीच्या शुभ्र वस्त्राचे बनवा. न जास्त मौल्यवान आणि न अगदी टाकाऊ दर्जाचे असावे. पुरुषाकरिता कफनात तीन वस्त्रे ठेवा. एक चादर एक अंतर्वस्त्र, आणि एक कफनी किंवा अंगरखा चादरीची लांबी मयताच्या उंचीपेक्षा जास्त ठेवा, यासाठी डोके आणि पाय दोन्ही बाजूंनी बांधता यावे आणि रुंदी इतकी ठेवा की मयताला चांगल्या प्रकारे गुंडाळले जावे. स्त्रियांच्या मयतीकरिता या कपड्यांवरीज एक डोक्याला गुंडाळण्याचे कापड (सरबंद) ठेवा, जे गजभर रूंद आणि त्याहून थोडे जास्त लांब असावे तसेच बगलीपासून गुडघ्यापर्यंत झाकण्यासाठी वेगळे वस्त्र (सीना बंद) ही ठेवा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्याने एखाद्या मयतीला कफन नेसविले, तर अल्लाह त्याला जन्नतमध्ये 'सुन्दुस' आणि 'इस्तबरकचा' पोषाख घालील."

(हाकीम)

१०) जनाजा कब्रस्तानच्या दिशेने थोड्या वेगाच्या पावलांनी न्यावा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "जनाजा वेगात न्यावे?" सांगितले,

"घाई-घाईने धावत जाण्याच्या वेगापेक्षा काही कमी वेगाने, मयत जर भला माणूस आहे

तर त्याला भल्या परिणतीप्रत लवकर पोहचवा आणि जर तो वाईट आहे, तर या वाईटपणास त्वरीत आपल्यापासून दूर करा.''

११) जनाजाच्या सोबत पायी चालत जा. पैगंबर मुहम्मद (स.) एका जनाजासह जात होते. तेव्हा त्यांनी पाहीले की काहीजण वाहनांवर स्वार आहेत. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यांना फर्माविले, ''तुम्हा लोकांना लाज नाही वाटत की अल्लाहचे फरिश्ते पायी चालत आहेत आणि तुम्ही जनावरांच्या पाठीवर आहात.''

तथापि जनाजाहून परत येताना वाहनांवर बसून येऊ शकता. पैगंबर मुहम्मद (स.) अबू वाहिदीच्या जनाजामध्ये पायी गेले आणि परतताना घोड्यावर बसून आले.

१२) जेव्हा तुम्ही जनाजा येत असलेला पाहाल तेव्हा उठून उभे राहा, मग जर त्यात सहभागी होण्याचा इरादा नसेल तर जनाजा थोडा पुढे जाईपर्यंत थांबा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्माविले,

''जेव्हा तुम्ही जनाजा येतांनापाहाल तर उभे राहा आणि जे लोक जनाजासोबत जातील, त्यांनी तोपर्यंत बसू नये, जोपर्यंत जनाजाखाली ठेवला जात नाही.''

१३) जनाजाची नमाज पढण्याचाही इतमाम राखा आणि जनाजाच्या सोबत जाण्याचा व खांदा देण्याचाही इतमाम राखा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''मुस्लिमांचा मुस्लिमांवर हा हक्क आहे की त्याने जनाजासोबत जावे आणि पैगंबरांनी हेही सांगितले, जो मनुष्य जनाजा (अंत्ययात्रे) मध्ये सहभागी झाला आणि जनाजाची नमाज अदा केली तर त्याला एक 'कीरात' इतका सवाब (पुण्य) लाभते. नमाजनंतर जो दफनविधीतही सहभागी होईल, त्याला दोन कीरात इतका सवाब दिला जातो. एकाने विचारले, दोन कीरात कीती मोठे असतील?'' सांगितले, ''दोन पर्वतांइतके.''

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

१४) मयताची कबर उत्तर-दक्षिण लांबीत खोदवा. आणि मयताला कबरीत उतारते वेळी काबागृहाच्या दिशाने राखून उतरवा. मयत जर हलकी असेल तर दोन माणसे कबरीत उतरविण्यास पुरेसे आहेत. अन्यथा गरजेनुसार तीन किंवा चार माणसांनी उतरवावे. उतरवितांना मयताचे तोंड काबागृहाकडे ठेवा आणि कफनाचे बंध खोलून टाका.

१५) स्त्रीला कबरीत उतरवतांना पडद्याचा इतमाम अवश्य राखा.

१६) कबरीवर माती टाकतांना डोक्याच्या दिशेने सुरुवात करा. आणि दोन्ही हातांत माती भरून तीन वेळा कबरीवर टाका पहिल्यांदा माती टाकताना म्हणा, ''मिनहा ख़-लक़्-नाकुम'' (याच जमिनीतून आम्ही तुम्हाला निर्माण केले) दुसऱ्यांदा माती टाकतांना म्हणा ''व फ़ीहा नु ईदुकूम'' (आणि हिच्यातच आम्ही तुम्हाला परतवीत आहो.) आणि जेव्हा तिसऱ्यांदा

माती टाकाल तेव्हा म्हणा - "व मिन्हा नुखरिजुकुम ता-र-तन उखरा" (आणि हिच्यातूनच आम्ही तुम्हाला दुसऱ्यांदा उठवू)

१७) मयतीच्या कबरीला न जास्त उंच करा आणि न चौकोर बनवा. फक्त तेवढीच माती टाका, जेवढी कबर खोदतांना निघाली आहे आणि माती टाकून झाल्यावर थोडे पाणी शिंपडा.

१८) दफन केल्यानंतर काही वेळ कबरीजवळ थांबा. मयतीसाठी जहन्नमपासून सुटकेची दुआ-प्रार्थना करा. थोडे कुरआन पठण करून त्याचा सवाब मयताला पोहचवा आणि लोकांनाही प्रवृत्त करा की त्यांनी मयतासाठी क्षमायाचना करावी. पैगंबर मुहम्मद (स.) दफन विधीनंतर स्वत:ही क्षमा-याचना करीत आणि लोकांनाही त्यासाठी प्रवृत्त करीत असत. तेव्हा ते सांगत -

"ही वेळ हिशोबाची आहे. तुमच्या बांधवाकरिता स्थैर्यशील राहण्याची दुआ करा आणि क्षमाप्राप्तीची प्रार्थना करा." (हदीस : अबू दाऊद)

१९) मित्रमंडळी, नातेवाईक किंवा शेजाऱ्या-पाजाऱ्यांच्या इथे मयत होईल, तिथे एक- दोन वेळचे जेवण पाठवून द्या, यासाठी की ते शोकाकुल आहते. जामेअ तिर्मिजीमध्ये आहे की जेव्हा माननीय जाफर (रजि.) यांच्या शहीद होण्याची बातमी आली, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, जाफरच्या कुटुंबियांसाठी भोजन तयार करा, ते आज शोकमग्न आहेत."

२०) तीन दिवसापेक्षा जास्त शोक विलाप करू नका. तथापि एखाद्या स्त्रीचा पती वारल्यास तिच्या शोक-विलापाची मुदत चार महिने दहा दिवस आहे. जेव्हा उम्मुल मोमिनीन (मोमीनाची अर्थात ईमानधारकांची माता) माननीय उम्मे हबीबा (रजि.) यांचे पिता अबू सुफियान (रजि.) यांचे निधन झाले, तेव्हा बीबी जैनब (रजि.) त्यांच्या सांत्वनासाठी गेली. माननीय उम्मे हबीबा (रजि.) यांनी सुंगधित अत्तर मागविले त्यात कस्तुरीचे मिश्रण होते. उम्मुल मोमीनीन तो सुंगध आपल्या दासीला लावला, मग थोडा आपल्या चेहऱ्यावर मळून घेतला आणि मग सांगितले,

"अल्लाह साक्षी आहे, मला सुगंधाची काहीच गरज नव्हती. परंतु मी पैगंबर मुहम्मद (स.) यांना हे सांगतांना ऐकले आहे की जी स्त्री अल्लाह आणि पारलौकिक जीवनाच्या दिवसावर ईमान राखते, तिने एखाद्या मयताचा शोक तीन दिवसांहून अधिक पाळू नये. तथापि पतीच्या शोकाची मुद्दत चार महिने व दहा दिवस आहे." (हदीस : अबू दाऊद)

मयतीच्या तर्फे तुमच्या ऐपतीनुसार दान-खैरातही करा. परंतु या संदर्भात गैर इस्लामी रीती-रिवाजांपासून दूर राहण्याचा प्रयत्न करा.

# १७. कब्रस्तानचे शिष्टाचार

१) जनाजाच्या सोबत कब्रस्तानातही जा आणि मयतीला दफन करण्यात सहभागी राहा आणि कधीकधी असेच कब्रस्तानात जात जा. अशाने आखिरतचे (परलोक) स्मरण ताजे होते आणि मरणोत्तर जीवनाच्या तयारीची भावना मनात निर्माण होते.

पैगंबर मुहम्मद (स.) एका जनाजासोबत कब्रस्तानात गेले आणि तिथे एका कबरीच्या किनाऱ्यावर बसून ते इतके रडले की जमीन ओली चिंब झाली. मग सहाबा (रजि.) (पैगंबरांचे निकटतम सहकाऱ्यां) न संबोधून सांगितले,

"बंधूनो! या दिवसाची तयारी करा." (हदीस : इब्ने माजा)

एकदा कबरीजवळ बसून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"कब्र दररोज मोठ्या भयानक स्वरात पुकारते की हे आदमची संतती ! काय तू मला विसरलास मी एकांताचे घर आहे, मी अनोळखेपण आणि भय-दहशतीचे स्थान आहे. मी कृमी-कीटकांचे घर आहे, मी तंगी आणि आपत्तीचे ठिकाण आहे. त्या भाग्यवानांखेरीज ज्यांच्यासाठी अल्लाह मला विस्तृत करील. मी सर्व मानवांकरिता अशीच क्लेश-यातनादायक आहे." आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, कब्र एकतर जहन्नमच्या खड्ड्यांपैकी एक खड्डा आहे किंवा जन्नतच्या बागांपैकी एक बाग आहे." (तबरानी)

२) कब्रस्तानात जाऊन बोध प्राप्त करा आणि संपूर्ण विचारशक्ती एकवटून मरणोत्तर जीवनावर विचार-चिंतन करण्याची सवय लावा. एकदा माननीय अली (रजि.) कब्रस्तानात गेले. त्यांच्यासोबत माननीय कुमैल (रजि.) सुध्दा होते. कब्रस्तानात पोहोचून अली (रजि.) यांनी एक नजर कबरींवर टाकली आणि मग कब्रवाल्यांना संबोधतांना सांगितले,

"हे कबरीत वास्तव्य करणाऱ्यांनो ! हे निर्जन स्थानी राहणाऱ्यांनो ! हे भय दहशतीत व एकांतात निवास करणाऱ्यांनो! सांगा, तुमची काय क्षेम-कुशल आहे? आमची दशा तर ही आहे की धन सम्पत्ती वाटून घेतली गेली. संतती अनाथ झाली. पत्नींनी दुसरे पती करून घेतले. ही झाली आमची अवस्था आता तुम्हीही आपले क्षेम-कुशल सांगा."

मग माननीय अली (रजि.) थोडावेळ गप्प राहिले. यानंतर माननीय कुमैल (रजि.) यांच्याकडे पाहिले आणि सांगितले,

"कुमैल! जर या कबरींमध्ये राहणाऱ्यांना बोलण्याची अनुमती असती तर ते म्हणाले असते, सवोत्तम प्रवाससामुग्री अल्लाहचे भय राखून केलेले आचरण होय." असे सांगून रडू लागले, बराच वेळ रडत राहिले, मग म्हणाले,

"कुमैल! कब्र आचरणाची पेटी आहे आणि मृत्युसमयीच ही गोष्ट कळून येते."

३) कब्रस्तानात प्रवेश करतांना ही दुआ मागा -

"अस्सलामु अलैकुम अह्लद्दियारि मिनल मूमिनी-न वल मुस्लिमी-न व इन्ना इनशा-अल्लाहु बिकुम लाहिकू-न अस-अलुल्ला-ह लना व लकुमुल आफ़ियह"

"शांती सलामती असो तुमच्यावर हे या वस्तीत राहणाऱ्यांनो! आज्ञाधारक ईमान धारकांनो! अल्लाहने इच्छिल्यास आम्हीही लवकरच तुम्हाला येऊन भेटू आम्ही स्वत:साठी व तुमच्यासाठी अल्लाहजवळ दुआ मागतो की त्याने आमचे शिक्षा-यातना व प्रकोपापासून रक्षण करावे."

४) कब्रस्तानात बेपर्वा आणि गाफील लोकांप्रमाणे थट्टा विनोद व या जगाच्या गोष्टी बोलू नका. कब्र पारलौकिक जीवनाचा दरवाजा आहे. हा दरवाजा पाहून चिंता स्वत:वर प्रभावी करण्याचा प्रयत्न करा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,

"मी तुम्हाला कब्रस्तानात जाण्यापासून रोखले होते (की एकेश्वरत्वादाची श्रध्दा तुमच्या मनात पूर्णत: ठसावी) परंतु आता जर तुम्ही इच्छित असाल तर जा. कारण कब्र पारलौकिक जीवनाचे स्मरण ताजे करते." (हदीस : मुस्लिम)

५) कबरींना पक्की मजबूत बनविण्याचे व तिला सुशोभित करण्याचे टाळा. पैगंबर मुहम्मद (स.) यांचा जेव्हा अंतिम समय आला. वेदनेच्या त्रासाने पैगंबर मुहम्मद (स.) अतिशय बेचैन होते. कधी ते चादर तोंडावर ओढून घेत तर कधी उलटून देत. या असाधारण बेचैन अवस्थेत, माननीय आएशा (रजि.) यांनी कान लावून ऐकले तर पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शुभ जीभेवर हे शब्द होते,

"यहूद्यांवर आणि ख्रिश्चनांवर अल्लाहचा धिक्कार! त्यांनी आपल्या पैगंबरांच्या कबरींना उपासनास्थळ बनविले!"

६) कब्रस्तानात जाऊन मृतांकरिता ईसाले सवाब (पुण्य पोहचविण्याचे काम) करा आणि अल्लाहजवळ क्षमायाचनेची प्रार्थना करा.

माननीय सुफियान (रजि.) यांचे निवेदन आहे की ज्याप्रमाणे जिवंत मनुष्य खाण्यापिण्याचे गरजवंत असतात, त्याचप्रमाणे मृत माणसे दुआ प्रार्थनेचे फार जास्त गरजवंत असतात.

तबरानीच्या कथनानुसार उल्लेखित आहे की अल्लाह जन्नतमध्ये एका नेक-सदाचारी दासाचा दर्जा उंचावील. तेव्हा तो विचारतो, "पालनकर्त्या ! मला हा दर्जा कशामुळे मिळाला?" अल्लाह फर्मावितो, "तुझ्या मुलामुळे की तो तुझ्या खातीर क्षमा-याचना करीत राहिला."

## १८. सूर्य व चंद्रग्रहणाचे शिष्टाचार

१) सूर्य किंवा चंद्राला ग्रहण लागले असता अल्लाहच्या स्मरणात मग्न व्हा. त्याच्याजवळ दुआ करा. "अल्लाहु अकबर व ला इलाह इल्लल्लाह" या वचनांचा जाप करा. दान-खैरात करा. या भल्या कामांच्या बरकतीने अल्लाह संकटांना टाळतो.

माननीय मुगीरह बिन शोबा (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"सूर्य आणि चंद्र अल्लाहच्या दोन निशाण्या आहेत. एखाद्याच्या जन्माने किंवा मृत्यु पावल्याने चंद्र-सूर्याला ग्रहण लागत नाही. जेव्हा तुम्ही यांना ग्रहण लागल्याचे पाहाल तर त्या वेळी अल्लाहला पुकारा, त्याच्याजवळ दुआ-प्रार्थना करा. नमाज अदा करा, येथपावेतो सूर्य किंवा चंद्र ग्रहणातून मुक्त व्हावा." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

२) जेव्हा सूर्याला ग्रहण लागेल, तेव्हा मशिदीत जमातसह नमाज अदा करा. परंतु त्या नमाजसाठी अजान व इकामत (जमातसह नमाज सुरू होण्या आधी बोलली जाणारी वचने) बोलू नये. लोकांना आवाहनाद्वारे एकत्र करा आणि चंद्रालाग्रहण लागल्यावर आपल्यापरिने नफील (गौण) नमाज अदा करा. जमाअत करू नका.

३) सूर्यग्रहण प्रसंगी जमातसह दोन रकअत नफील नमाज अदा करा. तेव्हा त्यात लांब कीरात वाचा आणि त्या वेळीपावेतो नमाज पढण्यात मग्न राहा, जोपर्यंत सूर्य साफ दिसू लागे आणि कीरात उंच स्वरात करा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या काळात एकदा सूर्यग्रहण लागले संयोगाने त्याच दिवशी त्यांच्या शिशु अवस्थेतील सुपुत्र माननीय इब्राहीम (रजि.) यांचे निधन झाले. लोकांनी असे सांगायला सुरुवात केली की ज्याअर्थी माननीय इब्राहीम बिन मुहम्मद यांचे निधन झाले आहे, म्हणूनच सूर्याला ग्रहण लागले आहे. तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी लोकांना एकत्र केले, दोन रकअत नमाज पढविली. या नमाजमध्ये त्यांनी अतिशय दीर्घ कीरात (दिव्य कुरआन, पठण) केली. सूरह बकरा इतके कुरआन पठण केले. दीर्घ स्वरुपाचे रुकू आणि सजदे केले. नमाज पढून झाल्यावर पाहिले तर सूर्यग्रहण समाप्त झाले होते. त्यानंतर पैगंबरांनी लोकांना सांगितले,

"सूर्य आणि चंद्र अल्लाहच्या दोन निशाण्या आहेत. यांना एखाद्याच्या जन्मामुळे किंवा मृत्युमुळे ग्रहण लागत नाही. लोकांनो! जेव्हा तुमच्यावर असा प्रसंग येईल, तेव्हा अल्लाहच्या स्मरणात मग्न व्हा. त्याच्याजवळ दुआ-प्रार्थना मागा "अल्लाहु अकबर" व "ला इलाह इल्लल्लाह" या वचनाचा जप करण्यात मग्न राहा. नमाज अदा करा आणि दान खैरात करा." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

माननीय अब्दुर्रहमान बिन समुरइ (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शुभकाळात एकदा सूर्यग्रहण लागले. मी मदीनाच्या बाहेर तीरंदाजी करीत होतो. मी त्वरीत तीर फेकले की पाहू या या घटने प्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) कोणते आचरण करतात? यास्तव मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत उपस्थित झालो. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपले हात उंचावले अल्लाहची स्तुती-प्रशंसा, अल्लाहु अकबर व ला इलाह इल्लल्लाह या वचनांचा जाप आणि दुआ-प्रार्थना करण्यात मग्न राहिले. नंतर पैगंबरांनी दोन रकअत नमाज अदा केली आणि त्यात दीर्घ असे कुरआन अध्यायांचे पठण केले आणि त्यावेळपर्यंत व्यस्त राहिले जोपर्यंत सूर्य साफ दिसू लागला नाही.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे सहवासातील सहकारी (सहाबा) देखील सूर्यग्रहण चंद्रग्रहणाच्या प्रसंगी नमाज पढत असत. एकदा मदीना येथे ग्रहण लागले, तेव्हा माननीय अब्दुल्लाह बिन जुबैर (रजि.) यांनी नमाज अदा केली. आणखी एका प्रसंगी ग्रहण लागले असता, माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) यांनी लोकांना एकत्रित केले व जमाअतसह नमाज पढविली.

४) सूर्यग्रहणाच्या नमाजमध्ये पहिल्या रकअतीत सूरह फातिहानंतर सूरह अनकबूतचे पठण करा आणि दुसऱ्या रकअतीत सूरह फातिहानंतर सूरह रूमचे पठण करा. या सूरतींचे पठण करणे पैगंबर आचरणानुसार आहे. तथापि आवश्यक नाही. याखेरीज इतर सूरतींचेही पठण केले जाऊ शकते.

५) सूर्य ग्रहणाच्या जमातसह अदा केल्या जाणाऱ्या नमाजमध्ये जर स्त्रियाही सहभागी होऊ इच्छितील आणि त्यांना सहभागी करून घेण्यात सहज सुलभता असेल तर अवश्य करून घ्या आणि असे करण्यास मुलांनाही प्रवृत्त करा. यासाठी की अगदी सुरवातीपासूनच त्यांच्या मनावर एकेश्वरत्वाचा ठसा बसवा आणि एकेश्वरत्वाच्या विरुध्द कोणत्याही विचाराला थारा मिळू नये.

६) ज्या वेळी शरीअतने नमाज पढण्यास मनाई केली आहे. अर्थात सूर्योदयाच्या वेळी, सूर्यास्ताच्या वेळी आणि सूर्य मध्यान्ही आला असता या सर्व वेळी जर सूर्यग्रहण लागल्यास नमाज पढू नका. परंतु अल्लाहचे स्मरण व त्याच्या स्तुती-प्रशंसेचे, पावित्र्यवर्णनाचे जाप अवश्य करा. गोर-गरिबांना व फकीरांना दान-खैरात द्या आणि जर सूर्योदयाच्या वेळी आणि मध्यान्हाची वेळ टळल्यानंतरही ग्रहण बाकी राहील तर मग नमाज अदा करा.

# १९. शुभ महिना रमजानचे शिष्टाचार

१) रमजानच्या पवित्र महिन्याचे, त्याच्या दर्जाला शोभेल असे स्वागत करण्याकरिता शाबानच्या महिन्यापासून स्वत:च्या बुध्दिला तयार करा आणि शाबानच्या पंधराव्या तारखेपूर्वी जास्तीतजास्त रोजे राखा. माननीय आएशा (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) इतर सर्व महिन्यांपेक्षा जास्त शाबानच्या महिन्यात रोजे राखत.

२) संपूर्ण काळाजीसह आणि मोठ्या आवडीने रमजानच्या पवित्र महिन्याचा चंद्रोदय पाहण्याचा प्रयत्न करा आणि चंद्र पाहून या दुआचे पठण करा -

"अल्लाहु अकबर अल्लाहुम-म अहिल्लहू अलैना बिल अम्नि वल ईमानि वस्सलामति वल इस्लामि वत्तौफ़ीक़ि लिमा तुहिब्बु व तर्ज़ा रब्बुना व रब्बु-कल्लाह."

"अल्लाह सर्वात मोठा आहे. हे अल्लाह ! हा चंद्र आमच्याकरिता शांती व ईमान व सलामती आणि इस्लामचा चंद्र बनवून काढ आणि त्या कामांची तौफीकसह जी तुला प्रिय आणि पसंत आहे. हे चंद्र! आमचा पालनकर्ता आणि तुझा पालनकर्ता अल्लाह आहे."

(हदीस : तिर्मिजी), इब्ने हिब्बान वगैरे)

प्रत्येक महिन्याचा नवा चंद्र (प्रथमेचा) पाहून हीच दुआ मागा.

३) रमजान महिन्यात उपासनेशी खास लगाव निर्माण करा. फर्ज नमाजांच्या खेरीज नफ्ल (गौण) नमाजांचा खास इतमाम राखा आणि जास्तीत जास्त नेकी कमविण्यास तत्पर व्ह. हा महान व समृध्दशाली महिना अल्लाहचा विशेष अनुग्रह आणि दया-कृपेचा महिना आहे. शाबानच्या शेवटच्या तारखेच पैगंबर मुहम्मद (स.) रमजानच्या महानतेचा उल्लेख करताना सांगितले,

"लोकांनो ! तुमच्यावर फार मोठा समृध्दशाली महिना छाया करणार आहे. हा तो महिना आहे ज्यात एक रात्र हजार महिन्यांपेक्षा जास्त श्रेष्ठ आहे." अल्लाहने या महिन्याचे रोजे फर्ज ठरविले आहेत आणि रात्री पढली जाणारी तरावीहची नमाज नफ्ल ठरविली आहे. जो मनुष्य या महिन्यात मन:पूर्वक स्वत:हून एखादे नेक काम करील, तो इतर महिन्यांच्या फर्जच्या बरोबरीने मोबदला प्राप्त करील आणि जो मनुष्य या महिन्यात एक फर्ज अदा करील अल्लाह त्याला इतर महिन्यांच्या सत्तर फर्ज (अनिवार्य) इतका सवाब प्रदान करील.

४) संपूर्ण महिन्याचे रोजे मोठ्या उत्साहाने व आवडीने व इतमामाने राखा आणि जर अत्यािधक आजारपण किंवा शरीअतसंमत सबबीमुळे रोजे राखणे शक्य नसेल, तरीही रमजानचा आदर राखण्यात उघडपणे खाण्यापिण्यापासून सक्तीने दूर राहा आणि अशा प्रकारे राहा, जणू तुम्ही रोजा राखला आहे.

५) पवित्र कुरआनच्या पठणाचा खास इतमाम राखा. या महिन्याचा पवित्र कुरआनशी विशेष संबंध आहे. पवित्र कुरआनचे अवतरण याच महिन्यात झाले, आणि इतर आकाशीय ग्रंथदेखील याच महिन्यात अवतरले. आदरणीय इब्राहीम (अ.) यांना याच महिन्याच्या पहिल्या किंवा तिसऱ्या तारखेस सहीफे (पोथी) दिले गेले. आदरणीय दाऊद (अ.) यांना याच महिन्याच्या बारा किंवा अठरा तारखेस जबूर हा ग्रंथ दिला गेला. आदरणीय मूसा (अ.) यांना याच शुभ महिन्याच्या सहा तारखेला तौरात हा ग्रंथ दिला गेला आणि आदरणीय ईसा (अ.) यांनाही याच महिन्याच्या बारा किंवा तेरा तारखेला इंजील हा ग्रंथ प्रदान केला गेला यास्तव या महिन्यात जास्तीतजास्त कुरआन पठण करण्याचा प्रयत्न करा. आदरणीय जिब्रिल (अ.) दरवर्षी रमजानमध्ये पैगंबर मुहम्मद (स.) यांना संपूर्ण कुरआन ऐकवित आणि त्यांच्याकडून ऐकत आणि शेवटच्या वर्षी त्यांनी दोनदा रमजान मध्ये पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासह कुरआन पठणाची पुनरावृत्ती केली.

६) पिंवित्र कुरआन थोडे थांबून व अर्थ नीट समजून वाचण्याचा प्रयत्न करा. कुरआन पठणाच्या अत्याधिकतेसह त्याचा अर्थ समजून घेण्याचा व त्याचा प्रभाव घेण्याची खास काळजी घ्या.

७) तरावीहच्या नमाजमध्ये संपूर्ण कुरआन ऐकण्याचा इतमाम राखा. एक वेळा रमजानमध्ये संपूर्ण कुरआन ऐकणे पैगंबरआचरणानुसार आहे.

८) तरावीहची नमाज मन लावून आणि उत्साह व आवडी ने अदा करा आणि कशीतरी वीस रकअतींची संख्या पूर्ण करू नका. किंबहुना नमाजला नमाजप्रमाणे अदा करा. यासाठी तिचा तुमच्या जीवनावर प्रभाव पडावा आणि अल्लाहशी असलेला संबंध मजबूत व्हावा. तसेच अल्लाहने सुबुध्दी दिल्यास तहज्जुदची नमाजही अदा करा.

९) दान खैरात करीत राहा. गोर गरबी, अनाथ विधवा यांची विचारपूस करून त्यांना यथाशक्ती मदत करा. असहाय व लाचार लोकांच्या सहरी व इफ्तारचा प्रबंध करा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

'हा मुवासात'चा महिना आहे.

माननीय इब्ने अब्बास (रजि.) सांगतात की पैगंबर मुहम्मद (स.) दानशूर तर होतेच, परंतु रमजान महिन्यात त्यांची दानशूरता खूप खूप वाढत असे. जेव्हा आदरणीय जिब्रिल (अ.) रोज रात्री त्यांच्याजवळ येत आणि कुरआन पठण करीत व ऐकत तर या दिवसात पैगंबर मुहम्मद (स.) वेगाने वाहणाऱ्या वाऱ्यापेक्षा जास्त दानी बनत.

१०) शबे कद्रमध्ये जास्तीतजास्त नफ्ल उपासनेचा इतमाम करा आणि कुरआन पठण करा. या रात्रीचे महत्व हे की या रात्री पवित्र कुरआनचे अवतरण झाले. कुरआनातील उल्लेख असा,

"आम्ही याला (कुरआनला) कद्रच्या रात्री अवतरले आहे. आणि तुम्हाला काय माहीत, 'कद्र'ची रात्र काय आहे? कद्रची रात्र हजार महिन्यांपेक्षा अधिक उत्तम आहे. दूत आणि रूह (जिब्रिल (अ.)) त्यात आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेने प्रत्येक आदेश घेऊन उतरतात. ती रात्र पूर्णत: 'शांती' आहे. उष:काळापर्यंत." *(दिव्य कुरआन, ९७: १-५)*

**हदीसवचनात उल्लेख आहे की शबे कद्र रमजानच्या शेवटी दहा रात्रींपैकी विषम रात्रीमधून एक रात्र असते. त्या रात्री ही दुआ करावी.**

**"अल्लाहुम-म इन्न-क अफुव्वुन तुहिब्बुल अफ़-व फ़अ-फु अन्नी"** (हिस्ने हसीन)

**"हे अल्लाह! तू अतिशय माफ करणारा आहेस, कारण माफ करणे तुला पसंत आहे. यास्तव तू मला माफ कर."**

**माननीय अनस (रजि.) यांचे निवेदन आहे की एका वर्षी रमजान आला तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,**

**"तुम्हा लोकांवर एका महिन्याचे आगमन झाले आहे ज्यात एक रात्र आहे जी हजार महिन्यांपेक्षा श्रेष्ठ आहे. जो मनुष्य या रात्रीपासून वंचित राहिला तो समस्त भलाईपासून वंचित राहिला आणि या रात्रीच्या भलाई व समृध्दीपासून वंचित तोच राहतो, जो खरोखर वंचित आहे."** (हदीस : इब्ने माजा)

११) **रमजानच्या अंतिम दहा दिवसात एतिकाफ करा. पैगंबर मुहम्मद (स.) रात्री जास्तीतजास्त जागून उपासना करीत आणि कुटुंबियांना ही तसे करण्यास प्रवृत्त करीत आणि पूर्णत: उत्साहाने व आवडीने अल्लाहच्या उपासनेत मग्न होत.**

१२) **रमजानमध्ये लोकांशी अतिशय नरमीने व प्रेमाने वागा. नोकरांना जास्तीतजास्त सहजता द्या आणि मोकळ्या मनाने त्यांच्या गरजा पूर्ण करा आणि कुटुंबियांशी ही दया स्नेहाचे व उदारतापूर्ण वर्तन करा.**

१३) **अतिशय विनम्रतेने व मनापासून दुआ करीत राहा, दुर्रे मंसूरमध्ये उल्लेख आहे की जेव्हा रमजानचा पवित्र महिना येत असे, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांचा रंग बदलून जात असे आणि नमाजचे प्रमाण वाढत असे आणि दुआ करण्यात खूप नम्रता दर्शवीत आणि अल्लाहचे भय खूप जास्त राहात असे.**

**हदीसमध्ये उल्लेख आहे,**

**अल्लाह रमजानमध्ये अर्श (ईश सिंहासन) उचलणाऱ्या फरिश्त्यांना आदेश देतो की आपली उपासना सोडा आणि रोजा राखणाऱ्यांच्या दुआ (प्रार्थना) वर आमीन म्हणा.**

१४) **फितरा (ईदच्या दिवशी दिले जाणारे दान) मनापासून आणि पूर्ण इतमामाने द्या आणि ईदची**

नमाज अदा करण्यापूर्वी द्या, किंबहुना इतके आधी द्या की गरीब लोकांनी सहजपणे ईदच्या गरजा पूर्ण कराव्यात आणि त्यांनीही सर्वांसोबत ईदगाह मध्ये जाऊ यावे आणि ईदच्या आनंदात सहभागी व्हावे.

हदीसमध्ये उल्लेख आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फितरा समस्त मुस्लिम जन समूहाकरिता अशासाठी आवश्यक ठरविला की हे दान त्या वाह्यात व निर्लज्जतेच्या गोष्टींचे ज्या रोजा राखणाऱ्याकडून कळत न कळत घडल्या असतील, प्रायश्चित्त ठरावे आणि पर्यायाने गोरगरिबांची व गरजवंताच्या खाण्यापिण्याची व्यवस्था व्हावी.

(हदीस : अबू दाऊद)

१५) रमजानच्या मांगल्यपूर्ण कालावधीत स्वत: जास्तीतजास्त नेकी (पुण्य) कमविण्यासोबत इतरांनाही अंत: प्रेरणेने, नरमीने आणि बुध्दीकौशल्याचा वापर करून नेकी आणि भलाईची कामे करण्यास प्रवृत्त करा. यासाठी की संपूर्ण वातावरणावर ईशोपासना, भलाईप्रियता, शुभ मांगल्याची छाया आच्छादित राहावी. आणि समाजाने जास्तीतजास्त रमजानच्या शुभ मांगल्याचा व भलाईपूर्ण समृध्दीचा लाभ घ्यावा.

# २०. रोजाचे शिष्टाचार

१) रोजाचा मोठा मोबदला आणि फायद्यांना ध्यानी घेऊन पूर्ण उत्साहाने व आवडीने रोजे राखण्याचा इतमाम करा. ही अशी उपासना आहे जिच्या बदली इतर कोणत्याही उपासना असू शकत नाही. याच कारणास्तव रोजा प्रत्येक काळात प्रत्येक जनसमूहावर अनिवार्य राहिला. अल्लाहने सांगितले आहे -

"हे ईमानधारकांनो! तुमच्यावर रोजे फर्ज केले गेले, ज्याप्रमाणे तुमच्या पूर्वीच्या लोकांवर फर्ज केले गेले होते. यासाठी की तुम्ही अल्लाहचे भय बाळगणारे व पापाचारापासून दूर राहणारे बनावे." *(दिव्य कुरआन, २: १८३)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी रोजाच्या या मोठ्या हेतुचे अशा प्रकारे वर्णन सांगितले,

"ज्या माणसाने रोजा राखून खोटे बोलणे आणि खोट्या गोष्टी आचरणात आणणे सोडले नाही. तर अल्लाहला यात कसलेही स्वारस्य नाही की तो उपाशी व तहानलेला राहतो." (हदीस : बुखारी)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्या माणसाने ईमान आणि अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्याच्या व पारलौकिक जीवनाचा मोबदला प्राप्त करण्याच्या भावनेने रमजानचा रोजा राखला तर अल्लाह त्याचे अपराध माफ करील, जे यापूर्वी झाले असतील." (हदीस : बुखारी)

२) चारचौघात आपल्या रोजाचे प्रदर्शन होऊ देऊ नका त्यासाठी नेहमी आनंदीत व उत्साही होऊन कामाला लागा. रमजानचे रोजे पूर्ण इतमामाने राखा आणि एखादा मोठा आजार किंवा शरीअतसंमत सबबीशिवाय कधीही रोजा सोडू नका. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्या माणसाने एखाद्या आजार किंवा शरीअतने मान्य केलेल्या सबबीशिवाय रमजानचा एकही रोजा सोडला तर आयुष्यभर रोजे राखूनही त्या एक रोजाची भरपाई होऊ शकणार नाही." (हदीस : तिर्मिजी)

३) रोजाचा देखावा करू नका. त्यासाठी नेहमीप्रमाणे आनंदी व तत्पर होऊन स्वत:च्या कार्यात मग्न राहा आणि आपल्या चालण्याबोलण्याने रोजाची कमजोरी व सुस्ती जाहीर करू नका. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे,

"रोजा राखणाऱ्या माणसाने नेहमीप्रमाणे (डोक्याला) तेल लावावे की त्याच्यावर रोजाचा प्रभाव दिसून येऊ नये.

४) रोजाच्या स्थितीत कटाक्षतेने प्रत्येक वाईट गोष्टीपासून दूर राहण्याचा पूरेपूर प्रयत्न करा.

यासाठी की रोजाचा उद्देश तर जीवनाला पावित्र्यपूर्ण बनविणे आहे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"रोजा ढाल आहे आणि जेव्हा तुमच्यापैकी कोणी रोजा राखून असेल तर त्याने तोंडून एखादी निर्लज्जपणाची गोष्ट बोलू नये आणि न आरडाओरड करावी. जर कोणी त्याच्याशी शिवीगाळ करू लागेल किंवा हाणामारी करु लागेल तर अशावेळी रोजा राखणाऱ्याने हा विचार करावा की मी तर रोजा राखला आहे (अशा स्थितीत मी शिवीगाळ व हाणामारी कशी करू शकतो)" (हदीस : बुखारी, मुस्लिम)

५) पैगंबरांच्या शुभवचनांमध्ये रोजाचा जो फार मोठा मोबदला सांगितला गेला आहे. त्याची इच्छा धरा आणि विशेष करून इफ्तार (सूर्यास्ताच्या वेळी रोजा सोडण्याचा) विधी जवळ आला असता अल्लाहशी दुआ करा, हे अल्लाह ! माझा रोजा कबूल कर ! आणि मला याचा तो मोबदला व ते पुण्य प्रदान कर ज्यांचा तू वायदा केला आहे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"रोजा राखणारे जन्नतमध्ये एका खास दरवाजाने दाखल होतील. या दरवाजाचे नाव "रय्यान" असे आहे. जेव्हा रोजा राखणारे दाखल होतील तेव्हा हा दरवाजा बंद केला जाईल, मग दुसरा कोणीही त्या दरवाजाने जाऊ शकणार नाही." (हदीस : बुखारी)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले की कयामतच्या दिवशी रोजा शिफारस करील आणि म्हणेल, हे पालनकर्त्या (अल्लाह)! मी या माणसाला दिवसा खाण्या-पिण्यापासून व इतर रूचीपासून रोखून ठेवले. हे अल्लाह! तू या माणसाच्याकरिता माझी शिफारस कबूल कर आणि अल्लाह त्याची शिफारस कबूल करील." (हदीस : मिश्कात)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले की इफ्तारच्या वेळी रोजादार जी दुआ मागील, त्याची दुआ कबूल केली जाते. रद्द केली जात नाही. (हदीस : तिर्मिजी)

६) रोजाच्या अवस्थेत होणाऱ्या कष्ट-यातना हसतमुखाने सहन करा आणि तहान भुकेची अत्याधिकता किंवा दुर्बलपणाची तक्रार करून रोजाची अवहेलना करू नका.

७) प्रवासात किंवा गंभीर स्वरुपाच्या आजारात रोजा राखणे शक्य नसेल तर शरीअतने अशा स्थिती रोजा सोडण्याची सूट दिली आहे, परंतु नंतरच्या दिवसांत रोजा राखा. पवित्र कुरआनात आहे,

"जो कोणी आजारी असेल किंवा प्रवासात असेल तर इतर दिवसांत रोजांची संख्या पूर्ण करुन घ्या." *(दिव्य कुरआन, २ : १८४)*

माननीय अनस (रजि.) सांगतात, जेव्हा आम्ही लोक पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासोबत रमजानमध्ये प्रवास करीत असू तेव्हा काहीजण रोजा राखत तर काही राखत नसत. मग न

रोजा राखणारा रोजा सोडणाऱ्यांवर आक्षेप घेई आणि न रोजा सोडणारा रोजा राखणाऱ्यांवर आक्षेप घेई (हदीस : बुखारी)

८) रोजाच्या अवस्थेत निंदा-नालस्ती आणि वाईट नजर टाकण्यापासून दूर राहण्याची विशेष दक्षता पाळा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले आहे,

"रोजा राखणारा सकाळपासून संध्याकाळपर्यंत अल्लाहच्या उपासनेत आहे. जोपर्यंत तो एखाद्याची निंदा करीत नाही आणि जेव्हा तो एखाद्याची निंदा-नालस्ती करतो तेव्हा त्याच्या रोजात भेग पडते." (अद. दैरमी)

९) हलाल (वैध) रोजी (आजिविका) प्राप्त करण्याचा इतमाम राखा. हराम कमाईने वाढणाऱ्या शरीराची कोणतीही उपासना कबूल होत नाही. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"हराम कमाईने जे शरीर वाढले आहे, ते जहन्नमच्याच योग्य आहे." (हदीस : बुखारी)

१०) सहरी अवश्य खात जा, अशासाठी की सहरी खाण्यात बरकत (समृध्दी) आहे. (हदीस : बुखारी)

११) सूर्यास्त झाल्यानंतर इफ्तारमध्ये उशीर लावू नका. यासाठी की रोजाचा खरा उद्देश अल्लाहशी आज्ञापालनाची भावना जागृत करणे होय, केवळ भूकेले-तहानलेले राहणे नव्हे. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे की,

"ईमानधारक चांगल्या अवस्थेत राहतील जोपर्यंत इफ्तार करण्यात त्वरा करतील." (हदीस : बुखारी)

१२) इफ्तार करताना (रोजा सूर्यास्तसमयी सोडताना) ही दुआ वाचावी,

"अल्लाहुम-म ल-क सुम्तु व अला रिज़्कि-क अफ़्तर-तु" (हदीस : मुस्लिम)

हे अल्लाह! मी तुझ्यासाठीच रोजा राखला आणि तू दिलेल्या आजीविकेनेच इफ्तार केला."

रोजा इफ्तार करुन झाल्यावर ही दुआ वाचावी,

"ज़-ह-बज़-जम-उ वब तल्लतिल उरूकु व स-ब-तल अजरू इन्शाअल्लाह." (हदीस : अबू दाऊद)

तहान जात राहिली, शिरा (नसा) भिजून ताज्या झाल्या आणि मोबदलाही अवश्य मिळेल अल्लाहने इच्छिल्यास.

१३) दुसऱ्याकडे रोजा अफ्तार करताना ही दुआ वाचावी,

"अफ़-त-र इन-द-कुमुस्साइमू-न व अ-क-ल तआ-मकुमुल अबरा-रु व सल्लत

अलैकुमुल मलाइकह." (हदीस : अबू दाऊद)

(अल्लाह करो) तुमच्या इथे रोजादारांनी रोजे इफ्तार करावा आणि फरिश्त्यांनी तुमच्यासाठी रहमत (दया कृपे) ची दुआ-प्रार्थना करावी.

१४) दुसऱ्यांचा रोजा इफ्तार करविण्याचाही काळजी घ्या, याचा फार मोठा मोबदला आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,

"जो मनुष्य रमजानमध्ये एखाद्याचा रोजा इफ्तार करवील तर त्याच्या मोबदल्यात अल्लाह त्याचे अपराध माफ करील आणि जहन्नमच्या आगीपासून त्याला मुक्ती देईल. आणि या इफ्तार करविणाऱ्याला रोजादार इतकाच सवाब (पुण्य) मिळेल आणि रोजादारच्या सवाबमध्ये कसलीही कमी होणार नाही. लोक म्हणाले, "हे अल्लाहचे पैगंबर ! आम्हा सर्वांच्या जवळ एवढे कोठे आहे की रोजादारला इफ्तार करावा (अर्थात त्याला खाऊ पिऊ घालावे)."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "केवळ एका खजुरीने किंवा दूध आणि पाण्याचा एक घोट पाजूनही इफ्तार करविणे पुरेसे आहे." (इब्ने खुजैमा)

# २१. जकात आणि सदकाचे शिष्टाचार

१) अल्लाहच्या मार्गात जे काही द्याल, फक्त अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी द्या. अन्य एखाद्या गरजेपोटी आपले काम कधीही खराब करु नका. ही इच्छा मुळीच धरू नका की ज्यांना तुम्ही दिले आहे, त्यांनी त्याचे उपकार मानावेत तुमचे आभार मानावे आणि तुमचा मोठेपणा स्वीकार करावा. ईमानधारक त्याच्या आचरणाचा मोबदला फक्त अल्लाहकडूनच इच्छितो. पवित्र कुरआनात ईमानधारकांच्या भावनेला अशा प्रकारे व्यक्त केले गेले आहे,

"आम्ही तुम्हाला केवळ अल्लाहसाठी जेवू घालीत आहोत, आम्ही तुमच्याकडून कोणताही मोबदला इच्छित नाही की आभारप्रदर्शन." *(दिव्य कुरआन, ७६:९)*

२) धोकेबाजी फसवणूक आणि वरवर देखावा दाखविण्यापासून दूर राहा. वरकरणी देखावा चांगल्यात चांगल्या कर्माला नष्ट करून टाकतो.

३) जकात (कर्तव्य-दान) उघडपणे द्या, यासाठी की इतरांमध्येही हे कर्तव्य पार पाडण्याची भावना निर्माण व्हावी. तथापि इतर प्रकारचे दान गुप्तपणे द्या, यासाठी की जास्तीतजास्त निष्ठा व प्रामाणिक भावना निर्माण व्हावी. अल्लाहच्या नजरेत फक्त त्याच आचरणाचे मूल्य आहे जे मनापासून व प्रामाणिक भावनेने केले गेले असेल. कयामतच्या भयानक मैदानात, जेव्हा कोठेही छाया नसेल, अल्लाह त्या दासाला अर्श (ईशसिंहासना) च्या सावलीत राखेल, ज्याने अतिशय गुप्तपणे अल्लाहच्या मार्गात खर्च केला असेल. येथपावेतो की डाव्या हाताला खबर नसेल की उजव्या हाताने काय खर्च केला. (हदीस : बुखारी)

४) अल्लाहच्या मार्गात खर्च केल्यानंतर (अर्थात दान-खैरात केल्यानंतर) उपकार केल्याचे दर्शवू नका. तसे काही बोलू नका आणि त्या लोकांना दु:ख देऊ नका, ज्यांना तुम्ही देत आहात. दिल्यानंतर गरीब, गरजवंताशी तुच्छतेने वागणे, त्यांच्या स्वाभिमानाला ठेस पोहचविणे, त्यांना केलेल्या उपकारांची वारंवार आठवण करून देऊन, टोमणे मारून त्यांची मने दुखविणे आणि असे गृहीत धरणे की त्यांनी उपकार मानवे. नतमस्तक राहावे, आणि मोठेपणाचा स्वीकार करावा, या सर्व अतिशय किळसवाण्या व निकृष्ट दर्जाच्या भावना आहेत. ईमानधारकाचे मन या भावनांपासून मुक्त असले पाहिजे. अल्लाहचे सांगणे आहे,

"ईमानधारकांना! तुमच्या दान-खैरातींना उपकार दर्शवून आणि गरिबांची मने दुखवून त्या माणसासारखे धुळीत मिळवू नका जो फक्त लोकांना दाखविण्यासाठी खर्च करतो." *(दिव्य कुरआन)*

५) अल्लाहच्या मार्गात खर्च केल्यानंतर गर्व-घमेंड करू नका. लोकांवर आपला मोठेपणा दर्शवू नका, किंबहुना या विचाराने भयभीत राहा की न जाणो अल्लाहच्या ठिकाणी मी केलेले दान कबूल झाले किंवा नाही. अल्लाहने सांगितले,

"आणि ज्यांची स्थिती अशी आहे की देतात जे काही देतात आणि हृदयाचा त्यांचा या विचाराने थरकांप होत असतो की आम्हाला आमच्या पालनकर्त्याकडे परतावयाचे आहे," *(दिव्य कुरआन, २३:६०)*

६) याचक आणि गरजवंतांशी नरमीचे वर्तन करा. त्यांना झिडकारू नका किंवा त्यांच्यावर रोब जमवू नका आणि त्यांच्यावर आपल्या मोठेपणाचा टेंभा मिरवू नका. याचकाला देण्यासाठी जर काहीच नसेल, तरीही मोठ्या नरमीने आणि सदाचाराने माफी मागा. यासाठी की त्याने, काहीही न मिळाल्यावर गप्पपणे दुआ देत निघून जावे. पवित्र कुरआनात सांगितले गेले आहे,

"जर तुम्ही यांच्यापासून तोंड फिरविण्यावर विवश व्हाल आपल्या पालनकर्त्याच्या मेहरबानीची आशा बाळगत त्यांना नरमीने बोलत जा." *(दिव्य कुरआन)*

अल्लाहने असेही सांगितले आहे, "आणि याचकाला झिडकारू नका."

*(दिव्य कुरआन, ९३:१०)*

७) अल्लाहच्या मार्गात मोकळ्या मनाने आणि आवडीने खर्च करा. संकुचित मनाने आणि जबरदस्तीचा दंड समजून खर्च करू नका. सफलतेचे मानकरी तेच लोक ठरतात, जे कृपणता, संकुचित मनोवृत्ती आणि हलक्या भावनांपासून आपले मन मुक्त राखतात.

८) अल्लाहच्या मार्गात हलाल (कष्टोपार्जित, वैध) धन खर्च करा. अल्लाह फक्त तेच धन कबूल करतो, जे शुध्द आणि निषिद्ध असते. जो ईमानधारक अल्लाहच्या मार्गात काही खर्च करण्याची प्रखर भावना बाळगतो तो कसे बरे सहन करू शकतो की त्याच्या कष्टाच्या कमाईत निषिद्ध माल सामील असावा. कुरआनात सांगितले गेले आहे,

"हे श्रद्धावंतांनो! जी संपत्ती तुम्ही कमविली आहे आणि जे काही आम्ही जमिनीतून तुमच्याकरिता उत्पन्न केले आहे, त्यापैकी उत्कृष्ट भाग अल्लाहच्या मार्गात खर्च करा."

*(दिव्य कुरआन, २:२६७)*

९) अल्लाहच्या मार्गात उत्तम माल (धन) खर्च करा.

कुरआनात सांगितले गेले आहे,

"तुम्ही जोपर्यंत (अल्लाहच्या मार्गात) तुमच्या सर्वाधिक प्रिय वस्तू खर्च करत नाही; तोपर्यंत तुम्ही पुण्य प्राप्त करू शकत नाही. जे काही तुम्ही खर्च कराल त्याविषयी अल्लाह सर्वज्ञ आहे." *(दिव्य कुरआन, ३:९२)*

दान केलेले धन आखिरत (मरणोत्तर जीवना) च्या सदैवकालीन जीवनाकरिता जमा होते. ईमानधारक कसे बरे विचार करू शकतो की तो स्वत:च्या चिरंतन जीवनासाठी खराब आणि निकृष्ट दर्जाचे धन जमा करील.

१०) जकात (कर्तव्यदान) आवश्यक असल्यावर ते अदाकरण्यात विलंब लाऊ नका. त्वरीत अदा करण्याचा प्रयत्न करा आणि चांगल्या प्रकारे हिशोब लावून द्या की अल्लाह न करो, तुमच्यावर काही ओझे बाकी राहावे.

११) जकात सर्वांनी मिळून अदा करा आणि त्याच्या खर्चाची व्यवस्थाही सर्वांनी मिळून करा. ज्या ठिकाणी मुस्लिमांची राज्य-सत्ता नाही, तिथे मुस्लिमांच्या जमातींनी बैतुलमालची स्थापना करून त्याची व्यवस्था करावी.

# २२. हजचे शिष्टाचार

१) हज-यात्रा करण्यात विलंब लाऊनका आणि टाळाटाळ तर मुळीच करू नका. जेव्हादेखील अल्लाह इतके देईल की तुम्ही या शुभकर्तव्यास पार पाडू शकला तर शक्य तितक्या लवकर हजयात्रेस रवाना व्हा. जीवंनाचा काहीच भरवसा नाही की तुम्ही या कर्तव्यास वर्षामागून दुसऱ्या वर्षावर टाळत राहावे. पवित्र कुरआनात उल्लेख आहे,

"लोकांवर अल्लाहचा हा हक्क आहे की या गृहापर्यंत पोहोचण्याची ऐपत आहे त्याने त्याची हजयात्रा करावी आणि जो कोणी या आदेशाचे पालन करण्यास नकार देईल त्याने समजून असावे की अल्लाह सकल जगवासियांपासून निरपेक्ष आहे." *(दिव्य कुरआन, ३:९७)*

माणसाचे याहून मोठा सर्वनाश आणि वंचितता आणखी काय असेल की अल्लाहने त्याच्याशी उपेक्षा आणि संबंधविच्छेदाचे एलान करावे. पैगंबरवचनातील उल्लेख असा,

"जो मनुष्य हजयात्रेचा इरादा करील, त्याने हज करण्यात त्वरा करावी कारण शक्य आहे तो आजारी पडेल, शक्य आहे सांडणी हरवून जाईल आणि शक्य आहे, एखादी अशी गरज उद्‌भवेल की हज अशक्य व्हावे." (हदीस : इब्ने माजा)

अर्थात हे की साधनसामुग्री असतानाही अकारण टाळाटाळ करू नये. न जाणो पुढे भविष्यात ही साधने आणि सहज-सुलभता बाकी राहील किंवा नाही. मग अल्लाहने करो मनुष्य हजयात्रेपासून वंचित राहील. अल्लाहच्या वंचिततेपासून प्रत्येक ईमानधारकांचे रक्षण करो. हदीसवचनात उल्लेख आहे,

"ज्या माणसाला एखाद्या आजाराने किंवा अनिवार्य आवश्यकतेने अथवा एखाद्या अत्याचारी शासकाने रोखून ठेवले नसेल आणि तरीही त्याने हज न करावे तर मग तो यहूदी होऊन मरो की ख्रिश्चन होऊन." (सुननेकुबरा- भाग ४)

आणि माननीय उमर (रजि.) यांना हे सांगताना ऐकले,

"जे लोक सामर्थ्य असतानाही हज करीत नाहीत, तर माझ्या मनात येते की त्यांच्यावर जिझिया लावावा. ते मुस्लिम नाहीत, ते मुस्लिम नाहीत." (अल मुंतका)

२) अल्लाहच्या घरा (काबागृहा) चे दर्शन आणि हज केवळ आपल्या अल्लाहच्या प्रसन्नते खातीर करा. अन्य एखाद्या ऐहिक गरजेने या पवित्र हेतुला कलंकीत करू नका. कुरआनातील उल्लेख असा,

"त्या लोकांना छळू नका जे आपल्या पालनकर्त्याची कृपा आणि त्याच्या प्रसन्नतेच्या शोधात पवित्र गृहा (काबा) कडे जात असतील." *(दिव्य कुरआन, ५:२)*

"आणि अल्लाहच्या (प्रसन्नते) साठी हज (मक्का यात्रा) आणि उमरा (हजचा कालावधी वगळता केलेली मक्का यात्रा) पूर्ण करा." *(दिव्य कुरआन, २ : १९६)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"हज्जे मबरूर[1] चा मोबदला जन्नतपेक्षा कमी नाहीच."(हदीस : मुस्लिम, किताबुल हज)

३) हजला जाण्याबाबत चर्चा करु नका. गवगवा न करता जा आणि परत या आणि अशा त्या प्रत्येक प्रथा व पध्दतीपासून कटाक्षाने दूर राहा, ज्यात धोका आणि दिखाव्याचा हिस्सा असेल. तसे पाहता, प्रत्येक कामाचे भले काम असणे आणि अल्लाहच्या ठायी स्वीकृत करणे या गोष्टीवर अवलंबून आहे की ते फक्त अल्लाहच्या प्रसन्नतेखातीर असावे. याखेरीज दुसरी कोणतीही इच्छा त्यामागे नसावी. विशेषत: हजच्या संदर्भात याचे विशेष ध्यान राखले पाहिजे की ही आध्यात्मिक क्रान्ती मन आणि चरित्राला शुध्द करण्याचा अंतिम उपाय आहे आणि जो मानसिक रोगी या सफल इलाजानेही बरा होणार नाही, तर मग त्याच्या रोग मुक्तीची आशा फार कमी असते.

४) हजला जाण्याचे सामर्थ्य नसेल तरीही अल्लाहचे घर पाहण्याची इच्छा, अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पवित्र कबरीवर सलाम पढण्याची इच्छा आणि हजद्वारे उत्पन्न होणाऱ्या इब्राहीमी भावनांनी स्वत:च्या हृदयाला आबाद आणि उज्वल राखा. या भावनांविरहित कोणतेही हृदय, हृदय नव्हे एक निर्जन भग्न अवशेष आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"हज आणि उमरासाठी जाणारे अल्लाहचे विशेष अतिथी होत. ते अल्लाहजवळ दुआ करतील तर अल्लाह त्यांची दुआ कबूल करतो आणि क्षमा-याचना करतील तर अल्लाह त्यांना माफही करतो."

(तबरानी)

५) हजकरिता रस्त्याचा उत्तम खर्च सोबत न्या आणि रस्त्याचा उत्तम खर्च "तकवा" (अल्लाहचे भय राखून केलेले आचरण) होय. या पवित्र प्रवासात अल्लाहची अवज्ञा करण्यापासून अलिप्त राहणारा आणि हजयात्रेच्या समृध्दीपासून जास्तीतजास्त लाभ प्राप्त करणारा ईमानधारक तोच होय, जो प्रत्येक स्थितीत अल्लाहचे भय राखतो आणि त्याची प्रसन्नता प्राप्त करण्याची प्रखर भावना राखतो. कुरआनात सांगितले गेले आहे,

"आणि हज्जच्या काळांत सोबत शिदोरी घ्या. सर्वोत्तम शिदोरी म्हणजे अल्लाहचे भय बाळगणे होय. आणि हे ज्ञानीजनहो माझे भय बाळगा." *(दिव्य कुरआन, २ : १९७)*

६) हजयात्रेचा इरादा करताच हजसाठी मानसिक व बौध्दिक एकाग्रता आणि इतर तयारीला आरंभ करा. हजच्या तारखेचे नित्य स्मरण राखा आणि हजच्या प्रत्येक कामाच्या हकीगतवर विचार चिंतन करा. तसेच अल्लाहचा दीन (इस्लाम), हजच्या विधीद्वारे ईमानधारकाच्या मनात ज्या भावना निर्माण करू इच्छितो त्यांना समजून घेण्याचा प्रयत्न

---

१. असे हज जे केवळ अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी संपूर्ण शिष्टाचार व शर्तींचे पालन करून अदा केले गेले असावे.

करा आणि मग एका चैतन्यशील ईमानधारकाप्रमाणे पूर्ण चेतनेसह हजच्या कार्यांना (विधींना) पार पाडून या सत्याला अंतर्यामी सामवून घेण्याचा व त्यानुसार जीवनात सदाचार पूर्ण क्रांती आणण्याचा प्रयत्न करा, ज्यासाठी अल्लाहने ईमानधारकांवर हज फर्ज (अनिवार्य कर्तव्य) ठरविले आहे. अल्लाहचे फर्मान आहे,

"मग जेव्हा अरफातहून निघाल तेव्हा मशअरे हराम (मुजदलफह) च्या जवळ अल्लाहचे स्मरण करा. आणि अशातऱ्हेने स्मरण करा जसे त्याने तुम्हाला मार्गदर्शन केले आहे.अन्यथा यापूर्वी तर तुम्ही भरकटलेले होतात." *(दिव्य कुरआन, २ : १९८)*

या उद्देशाकरिता पवित्र कुरआनाच्या त्या अध्यायांचे विचारचिंतनपूर्वक पठण करा ज्यात हजची वास्तविकता आणि महत्व तसेच हजद्वारे निर्माण होणाऱ्या भावनांना व्यस्त केले गेले आहे आणि त्यासाठी पैगंबर मुहम्मद (स.) यांची शुभवचने व त्या ग्रंथांना वाचणेही लाभदायक ठरेल ज्यात हजचा इतिहास आणि हजच्या समस्त विधींची हकीगत स्पष्ट केली गेली आहे.

७) हज करताना, ज्या पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या दुआ हदीसच्या ग्रंथात मिळतात, त्या तोंडी पाठ करा आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शब्दांत अल्लाहजवळ तेच मागा, जे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मागितले होते.

८) आपल्या हजचे पूर्ण रक्षण करा आणि लक्षात ठेवा की तुमचे हज कदाचित त्या ईहलोकी लोकांचे हज न ठरावे. ज्याचा आखिरतमध्ये काहीच हिस्सा नाही. यासाठी की ते पारलौकिक जीवनापासून डोळे मिटून सर्वकाही या जगातच प्राप्त करू इच्छितात. ते जेव्हा बैतुल्लाह (काबागृहाजवळ) पोहचतात, तेव्हा त्यांची दुआ हीच असते.

"रब्बना आतिना फ़िद् दुनया वमा लहू फ़िल आखिरति मिन ख़लाक़."

"जे म्हणतात कि, हे आमच्या पालनकर्त्या, आम्हाला या लोकीच सर्वकाही दे. अशा व्यक्तीसाठी परलोकमध्ये काहीही वाट्याला येणार नाही." *(दिव्य कुरआन, २ : २००)*

तुम्ही हजद्वारे इहलोक आणि परलोक दोन्ही जगांची सफलता मागा आणि अल्लाहजवळ दुआ करा की हे पालनकर्त्या ! मी तुझ्यासमोर अशासाठी आलो आहे की तू दोन्ही जीवनात मला सफल बनव आणि ही दुआ मागत राहा -

"रब्बना आतिना फ़िद-दुन्या ह-स-न-तवँ व फ़िल आख़िरति ह-स-न-तवँ-वक़िना अज़ाबन्नार."

"हे आमच्या पालनकर्त्या, आम्हाला ह्या लोकीही चांगले फळ दे आणि परलोकामध्येही चांगले फळ दे. आणि नरकाग्नीच्या यातनांपासून आम्हाला वाचव."

*(दिव्य कुरआन २ : २०१)*

९) हज करीत असता अल्लाहच्या अवज्ञेपासून दूर राहण्याच्या भावनेला सतत जागृत ठेवा. हजचा प्रवास अल्लाहच्या घरचा प्रवास आहे. या ठिकाणी तुम्ही अल्लाहचे अतिथी बनून आला आहात. त्याला दिलेले दास्यत्वाचे वचन ताजे करण्यासाठी आला आहात. हजरे अस्वद (काळ्या दगडा) ला चुंबन देऊन वारंवार "अल्लाहु अकबर" आणि "ला इलाह इल्लल्लाह" चा उद्घोष बुलंद करुन आपली निष्ठा जाहीर करतात. अशा वातावरणात विचार करा एखाद्या मामुली अपराधाची घाण ही किती किळसवाणी आहे. अल्लाहने आपल्या दरबारात हजर होणाऱ्या दासांना सचेत केले आहे,

"वला फुसू-क़' – अल्लाहच्या अवज्ञेच्या गोष्टी होता कामा नये."

*(दिव्य कुरआन, २ : १९७)*

१०) हज करीत असता भांडण-तंट्याच्या गोष्टीपासून दूर राहा. प्रवासात जेव्हा ठिकठिकाणी गर्दी असेल, त्रासदायक गोष्टी असतील, प्रत्येक पावलांवर स्वार्थ आडवा येत असेल. पावलापावलांवर भावनांना ठेच लागत असेल. तर या स्थितीत अल्लाहच्या अतिथीचे काम हे आहे की मोकळ्या मनाने आणि त्यागभावनेने वागावे आणि प्रत्येकाशी क्षमा व उदारतापूर्ण व्यवहार करावा येथपावेतो की आपल्या नोकराला दाटदपट करू नये. अल्लाहने सांगितले आहे,

"वला जिदा-ल फ़िल हज्ज"

आणि हज प्रसंगी भांडण तंट्याची गोष्ट होऊ नये. *(दिव्य कुरआन, २:१९७)*

११) हज करीत असताना विषयवासनापूर्ण गोष्टीपासून दूर राहण्याचा इतमाम राखा. प्रवास करताना जेव्हा भावनांचा उद्रेक होण्याचे आणि दृष्टी स्वैर होण्याचे भय काहीसे वाढते. यास्तव तुम्ही सचेत व्हा आणि आत्म्याच्या व सैतानांच्या चालींपासून स्वत:ला वाचविण्याचा जास्तीतजास्त प्रयत्न करा आणि जर तुमची पत्नी तुमच्यासोबत असेल तर, तिच्याशी शरीर-संबंध प्रस्थापित करु नका. एवढेच नव्हे तर अशा गोष्टींपासूनही सुज्ञतापूर्वक दूर राहा. ज्या विषयवासना भडकविण्यास कारक ठरू शकतात. अल्लाहने सावध करताना सांगितले,

"हजचे महिने सर्वांना माहीत आहेत, जो मनुष्य या निर्धारित महिन्यांमध्ये हजचा इरादा करील त्याने सावध राहिले पाहिजे की हजच्या अवधित विषयवासनेच्या गोष्टी होता कामा नये."

*(दिव्य कुरआन, २ : १९७)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,

"जो मनुष्य अल्लाहच्या या घराचे दर्शन करण्यासाठी इथे आला आणि तो विषयवासना आणि निर्लज्जतेच्या गोष्टीपासून दूर राहील आणि दुराचार व दुष्कृत्यात पडला नाही तर तो

शुध्द होऊन अशा प्रकारे परततो, ज्याप्रमाणे तो आईच्या उदरातून शुध्द (निष्कलक व निरपराध) जन्मला होता." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

१२) अल्लाहच्या निशाण्यांचा पुरेपूर इतमाम राखा. एखाद्या अंतरबाह्य सत्याची जाणीव करून देण्यासाठी व आठवण करून देण्यासाठी अल्लाहने जी वस्तू चिन्ह स्वरूपात निश्चित केली आहे, तिला अरबी भाषेत "शआीरा" म्हणतात, "शआइर" त्याचे अनेकवचन आहे. हजच्या संदर्भातील समस्त गोष्टी ईशोपासनेच्या कोणत्या न कोणत्या हकीगतीची जाणीव करून देण्यासाठी चिन्ह स्वरूपात निश्चित केली गेली आहे. या सर्वांचा आदर करा. कुरआनात अल्लाहने सांगितले आहे,

"हे श्रद्धावंतांनो, ईश्वरी प्रतीकांची विटंबना करू नका. निषिद्ध महिन्यांपैकी एखाद्याला वैध करू नका, कुर्बानीच्या जनावरांवर हात टाकू नका. त्या जनावरांवर हात टाकू नका ज्यांच्या गळ्यात ईश्वरार्पणाच्या खुणा म्हणून पट्टे घातले आहेत, त्या लोकांना छळू नका जे आपल्या पालनकर्त्याची कृपा आणि त्याच्या प्रसन्नतेच्या शोधात पवित्र गृहा (काबा) कडे जात असतील." *(दिव्य कुरआन, ५:२)*

सूरह हजमध्ये उल्लेख आहे,

"ही आहे वस्तुस्थिती (ती समजून घ्या) आणि जो अल्लाहच्या नेमून दिलेल्या प्रतिकांचा आदर करील ही हृदयाची ईशपरायणता आहे." *(दिव्य कुरआन, २२ : ३२)*

१३) हजचे विधी पार पाडताना मोठी नम्रता, लाचारी व अगतिकता जाहीर करा कारण अल्लाहला आपल्या दासाची नम्रता व अगतिकता सर्वाधिक प्रिय आहे.

१४) एहराम बांधल्यानंतर प्रत्येक नमाजनंतर, प्रत्येक उंच स्थानी चढताना प्रत्येक उतारा वरून येताना प्रत्येक काफिल्याशी भेट घेताना आणि प्रत्येक सकाळी झोपेतून जागे झाल्यावर उंच स्वरात ही वचने वाचा -

"लब्बैक अल्लाहुम-म लब्बैक लब्बैक ला-शरी-क ल-क लब्बैक इन्नल हम-द वन-निअ-म-त ल-क वल मुल-क ला-शरी-क ल-क" (हदीस : मिश्कात)

"मी हजर आहे हे अल्लाह! मी हजर आहे ! तुझा कोणी ही सहभागी नाही. मी हजर आहे. नि:संशय स्तुती-प्रशंसा फक्त तुझ्यासाठीच आहे. देणगी सर्व तुझी आहे. समस्त राज्य सत्ता तुझीच आहे. तुझा कोणीही सहभागी नाही."

१५) अरफातच्या मैदानात हजर होऊन जास्तीतजास्त तौबा (क्षमा-याचना) करा. कुरआनची ताकीद आहे,

"तेव्हा जिथून सर्व लोक परततात तुम्ही सुद्धा तिथून परत या. आणि अल्लाहजवळ क्षमा याचना करा.नि:संशय तो क्षमावंत आणि दयावंत आहे." *(दिव्य कुरआन, २:१९९)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"अल्लाहच्या जवळ अरफाचा दिवस सर्व दिवसांपेक्षा अधिक चांगला आहे. त्या दिवशी अल्लाह या जगाच्या आकाशावर खास लक्ष देऊन फरिश्त्यांसमोर आपल्या हज करणाऱ्या दासांच्या अवस्थेवर अभिमान करतो. फरिश्त्यांना फर्मावितो, फरिश्त्यांना! पाहा, माझे एकनिष्ठ दास त्रस्त, उन्हात माझ्यासमोर उभे आहेत. हे लोक लांब लांब अंतरावरून इथे आले आहेत. माझ्या दया-कृपेच्या आशेने त्यांना इथे आणले आहे. वास्तविक त्यांनी माझ्या शिक्षा-यातनेला पाहिले नाही. या अभिमानानंतर लोकांना जहन्नमच्या शिक्षा-यातनेपासून मुक्त करण्याचा आदेश दिला जातो. अरफाच्या दिवशी इतक्या लोकांना जहन्नमपासून मुक्त केले जाते की एवढ्या प्रमाणात कोणत्याही दिवशी केले जात नाही."

(इब्ने हिब्बान)

१६) मिना येथे पोहोचून त्याच भावनांसह कुर्बानी करा ज्या भावनांनी अल्लाहचे दोस्त आदरणीय इब्राहीम (अ.) यांनी आपल्या प्रिय पुत्र आदरणीय इस्माईल (अ.) च्या मानेवर सुरी ठेवली होती. कुर्बानीच्या या भावनांना मन-मस्तिष्कावर अशा प्रकारे बिंबवा की जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात तुम्ही बलिदानासाठी सर्वथा तत्पर राहावे आणि तुमचे जीवन खऱ्या अर्थाने या वचनाचे मूर्त स्वरूप बनावे,

"सांगा, माझी नमाज, माझ्या तमाम उपासनेच्या पद्धती, माझे जीवन व मरण, सर्वकाही समस्त विश्वांचा स्वामी अल्लाहसाठीच आहे, ज्याचा कोणीही भागीदार नाही."

*(दिव्य कुरआन, ६:१६२-१६३)*

१७) हजच्या दिवसांत सतत अल्लाहचे स्मरण करीत राहा. आणि कोणत्याही वेळी मनाला त्याच्या स्मरणापासून गाफील होऊ देऊ नका. अल्लाहचे स्मरण हेच सर्व उपासनांचे मूळ स्रोत आहे. अल्लाहचे फर्मान आहे,

"हे गणतीचे काही ठराविक दिवस आहेत जे तुम्ही अल्लाहच्या स्मरणामध्ये घालविले पाहिजेत."

*(दिव्य कुरआन, २ : २०३)*

आणि फर्माविले,

"नंतर जेव्हा हज्जसंबंधीचा विधी तुम्ही पूर्ण कराल तेव्हा त्यानंतर तुम्ही अल्लाहचे स्मरण करा जसे तुम्ही आपल्या पूर्वजांचे स्मरण करीत होतात. किंबहुना त्याहीपेक्षा अधिक स्मरण करा,"

*(दिव्य कुरआन, २ : २००)*

हजच्या विधी मागील हेतु हाच की तुम्ही या दिवसांमध्ये सातत्याने अल्लाहच्या स्मरणात मग्न राहावे आणि या दिवसांमध्ये त्याच्या स्मरणाने हृदयात अशा प्रकारे घर करावे की पुन्हा जीवनाच्या धावपळीत आणि संघर्षात कोणत्याही गोष्टीने त्याच्या स्मरणापासून तुम्हाला

गाफील करू नये. अज्ञान काळात लोक हजचे विधी पूर्ण न करता आपापल्या पूर्वजांचा महिमा वर्णन करीत आणि शेखी मिरवीत. अल्लाहने ताकीद केली की हे मोजके दिवस अल्लाहच्या स्मरणात घालवा आणि त्याचेच महिमा गान करा, जो खरोखर सर्वात महान आहे.

१८) अल्लाहच्या घराला (काबागृहाला) (दिव्याभोवती घिरट्या घालणाऱ्या) पतंगाप्रमाणे प्रदक्षिणा घाला. अल्लाहचे फर्मान आहे,

"आणि अल्लाहच्या घराला (काबागृहाला) प्रदक्षिणा घातली पाहीजे."

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे,

"अल्लाह दररोज आपल्या हज करणाऱ्या दासांकरिता एकशेवीस रहमती (दया, कृपा) अवतरीत करतो, ज्याने की साठ प्रकारच्या दया-कृपा त्यांच्यासाठी असते, जे काबागृहाची प्रदक्षिणा करतात. चाळीस त्यांच्यासाठी असते, जे तिथे नमाज पढतात आणि वीस त्यांच्यासाठी असते, जे फक्त काबागृहाला पाहत राहतात." (हदीस : बैहकी)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही फर्माविले,

"ज्याने पन्नास वेळा काबागृहाला प्रदक्षिणा घातली तो आपल्या अपराधांपासून असा शुध्द झाला की जणू त्याच्या मातेने त्याला आजच जन्म दिला." (हदीस : तिर्मिजी)

## प्रकरण - ३

# उत्तम समाज

## २३. माता-पित्याशी वर्तनाचे शिष्टाचार

१) माता-पित्याशी सदव्यवहार करा. आणि या सद्वर्तनाची जी सुबुध्दी तुम्हाला लाभली आहे तिला दोन्ही जगांचे सद्भाग्य समजा. अल्लाहच्या नंतर माणसावर सर्वाधिक हक्क त्याच्या माता पित्याचाच आहे. माता-पित्याच्या हक्काचे महत्त्व आणि श्रेष्ठतेचे अनुमान यावरून कळते की पवित्र कुरआनने ठिकठिकाणी माता-पित्याच्या हक्काला अल्लाहच्या हक्कासोबत निवेदिले आहे आणि अल्लाहशी कृतज्ञता राखण्याच्या ताकीदीसोबत माता-पित्याशी कृतज्ञता राखण्याचीही ताकीद केली आहे.

"तुझ्या पालनकर्त्याने निर्णय दिलेला आहे की तुम्ही लोकांनी इतर कोणाचीही भक्ती करू नये परंतु केवळ त्याची. आई-वडिलांशी सद्वर्तन करा," *(दिव्य कुरआन, १७:२३)*

"माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) म्हणतात मी पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले, कोणते कर्म अल्लाहला सर्वाधिक प्रिय आहे? पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, ती नमाज जी वेळेवर अदा केली जावी. मी पुन्हा विचारले, यानंतर कोणते कर्म अल्लाहला सर्वाधिक प्रिय आहे? फर्माविले, माता-पित्याशी सद्व्यवहार मी विचारले, यानंतर? फर्माविले, अल्लाहच्या मार्गात जिहाद करणे." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांचे कथन आहे की एक मनुष्य पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झाला. आणि म्हणू लागला,

"मी तुमच्या हातावर स्थलांतर (हिजरत) आणि जिहादची प्रतिज्ञा करतो आणि अल्लाहकडून त्याचा मोबदला इच्छितो. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विचारले, काय तुमच्या माता-पित्यापैकी कोणी जिवंत आहे? ते म्हणाले होय, किंबहुना (अल्लाहच्या कृपेने) दोघे ही जिवंत आहेत. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्माविले, तर काय खरोखर तुम्ही अल्लाहकडून स्थलांतर (हिजरत) आणि जिहादचा मोबदला प्राप्त करू इच्छिता? ते म्हणाले, होय (मी अल्लाहकडून मोबदला इच्छितो) पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्माविले, तर मग जा, आपल्या माता-पित्याच्या सेवेत राहून त्यांच्याशी चांगला व्यवहार करा."

(हदीस : मुस्लिम)

माननीय अबू उमामा (रजि.) कथन करतात की एका मनुष्याने पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले,

"हे अल्लाहचे पैगंबर! माता-पित्यांचा संततीवर कोणता हक्क आहे? पैगंबर मुहम्मद (स.)

यांनी सांगितले,

"माता-पिताच तुमची जन्नत आहे, आणि माता-पिताच तुमची जहन्नम."

(हदीस : इब्ने माजा)

त्यांच्याशी सद्व्यवहार करून तुम्ही जन्नतचे हक्कदार ठराल आणि त्यांच्या हक्कांना पायदळी तुडवून तुम्ही जहन्नमचे इंधन ठराल.

२) माता-पित्याशी कृतज्ञशील राहा. उपकारकर्त्याशी कृतज्ञशीलता व त्याच्या उपकाराची जाणीव राखणे ही सभ्यतेची प्रथम निकड आहे. खरे तर आमच्या अस्तित्वाची दिसून येणारी सबब माता-पिता आहे. माता-पित्याच्याच पालनपोषणात व देखरेखीत आम्ही वाढतो आणि तरूणावस्थेस पोहचतो आणि ते ज्या असाधारण त्यागाने, अनुपम धडपड व परिश्रम आणि स्नेह-प्रेमाने आमचे पालनपोषण करतात त्याची निकड ही की आमच्या हृदयात त्यांच्या विषयी श्रध्दा, प्रेम कृतज्ञशीलता ओतप्रोत असावी आणि आमच्या हृदयातला कानाकोपरा त्यांच्याविषयीच्या कृत्तज्ञतेने व्यापलेला असावा. याच कारणास्तव अल्लाहने आपल्याशी कृतज्ञशील राहण्यासोबत माता-पित्याशीही कृतज्ञशील राहण्याची ताकीद फर्माविली आहे-

"आणि ही वस्तुस्थिती आहे की आम्ही मानवाला आपल्या मातापित्यांचा हक्क ओळखण्याची स्वत: ताकीद केली आहे." *(दिव्य कुरआन, ३१:१४)*

३) माता-पित्यास सदैव खूश राखण्याचा प्रयत्न करा. त्यांच्या मर्जी व स्वभावाविरुध्द कधीही असे काही बोलू नका, जे त्यांना अप्रिय ठरावे. विशेषत: जेव्हा म्हातारपणात स्वभाव काहीसा चिडखोर बनतो आणि माता-पिता अशा काही मागण्या करू लागतात, ज्या अपेक्षविरुध्द असतात, अशा वेळी प्रत्येक गोष्ट आनंदाने सहन करा आणि त्यांच्या कोणत्याही गोष्टीने कंटाळून उत्तरादाखल असे काही कदापि बोलू नका, जे त्यांना अप्रिय वाटावे आणि त्यांच्या मनाला ठेच पोहचावी.

"जर तुमच्यापाशी त्यांच्यापैकी कोणी एक अथवा दोघे वृद्ध होऊन राहिले तर त्यांच्यासाठी 'ब्र' शब्ददेखील काढू नका व त्यांना झिडकारून प्रत्युत्तरदेखील देऊ नका. तर त्यांच्याशी आदरपूर्वक बोला," *(दिव्य कुरआन, १७:२३)*

वास्तविक म्हातारवयात वेडेवाकडे बोलणे सहन करण्याची ताकत नसते आणि कमजोरीमुळे आपल्या महत्तेची जाणीव वाटते. म्हणून क्षुल्लक गोष्टीही जाणवू लागते. म्हणून ही गोष्ट लक्षात ठेवून तुमच्या कोणत्याही कामाने किंवा बोलण्याने माता-पित्यास नाराज होऊ देऊ नका.

माननीय अब्दुल्लाह बिन अम्र (रजि.) म्हणतात की - पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे

सांगितले,

"अल्लाहची प्रसन्नता पित्याच्या प्रसन्नतेत आहे आणि अल्लाहची नाराजी पित्याच्या नाराजीत आहे." (हदीस : तिर्मिजी, इब्ने हिब्बान, हाकीम)

जर कोणी अल्लाहला प्रसन्न राखू इच्छित असेल तर त्याने आपल्या पित्यास खूश राखावे, पित्याला नाराज करून तो अल्लाहचा प्रकोप ओढवून घेईल.

माननीय अब्दुल्लाह (रजि.) निवेदन करतात की एक मनुष्य त्याच्या माता-पित्यास रडत असलेले सोडून पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत स्थलांतर (हिजरत) बाबत प्रतिज्ञा करण्यासाठी हजर झाला, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जा, आपल्या माता-पित्याजवळ परत जा आणि त्यांना त्याच प्रकारे खूश करून या ज्या प्रकारे त्यांना रडवून आलात." (हदीस : अबू दाऊद)

४) तन-मन-धन अर्पण करून माता पित्याची सेवा करा. जर अल्लाहने तुम्हाला ही संधी दिली आहे तर वस्तुत:ही या गोष्टीची सुबुध्दी आहे की तुम्ही स्वत:ला जन्नतचा हक्कदार बनवू शकावे आणि अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करू शकाले माता-पित्याच्या सेवेतच दोन्ही जगांची भलाई, सद्‌भाग्य आणि श्रेष्ठता प्राप्त होते आणि मनुष्य दोन्ही जगांच्या संकटापासून सुरक्षित राहतो.

माननीय अनस (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जो मनुष्य असे इच्छितो की त्याचे आयुष्य दीर्घ केले जावे आणि त्याच्या उपजीविकांचा विस्तार व्हावा तर त्याने आपल्या माता-पित्याशी भलाई करावी आणि नातेसंबंध जोडून राखावेत." (अत्तर्गीब वत्तर्हीब)

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे

"तो मनुष्य अपमानित होवो, पुन्हा अपमानित होवो आणि पुन्हा अपमानित होवो."

लोकांनी विचारले, हे अल्लाहचे पैगंबर कोणता मनुष्य? पैगंबरांनी सांगितले, "तो मनुष्य ज्याने आपल्या माता-पित्यास वृध्दावस्थेत पाहिले. दोघांना पाहिले किंवा दोघांपैकी एकाला मग (त्यांची सेवा करून) जन्नतमध्ये दाखल झाला नाही." (हदीस : मुस्लिम)

एका प्रसंगी तर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माता-पित्याच्या सेवेस जिहाद सारख्या महत्वपूर्ण उपासनेवर ही प्राधान्य दिले आणि एका सहकाऱ्याला जिहादमध्ये जाण्यापासून रोखून माता-पित्याची सेवा करण्याची ताकीद सांगितली.

माननीय अब्दुल्लाह बिन अम्र (रजि.) यांचे निवेदन आहे की एक मनुष्य पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जवळ जिहादमध्ये सहभागी होण्यासाठी हजर झाला. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विचारले, "तुमचे माता पिता जिवंत आहेत? तो म्हणाला, होय जिवंत आहेत. पैगंबर

मुहम्मद (स.) यांनी सांगितले, जा त्यांची सेवा करीत राहा, हाच जिहाद आहे."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

५) माता पित्याचा आदर सम्मान करा आणि असे कोणतेही कृत्य किंवा वक्तव्य करू नका. जे त्याच्या आदराविरुध्द असावे. कुरआनात सांगितले गेले आहे -

"आणि त्यांच्याशी आदर सन्मानाने बोला." *(दिव्य कुरआन, १७:२३)*

एकदा माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांनी माननीय इब्ने अब्बास (रजि.) यांना विचारले, "काय तुम्ही हे इच्छिता की जहन्नमपासून दूर राहावे आणि जन्नतमध्ये दाखल व्हावे? इब्ने अब्बास (रजि.) म्हणाले, का नाही? अल्लाहची शपथ ! हेच इच्छितो माननीय इब्ने उमर (रजि.) यांनी विचारले, तुमचे माता पिता जिवंत आहेत? "इब्ने अब्बास म्हणाले, होय माझी आई जिवंत आहे. इब्ने उमर (रजि.) यांनी फर्माविले, "जर तुम्ही त्यांच्याशी नरमीने बोलाल, त्यांच्या खाण्या-पिण्याची काळजी घ्याल तर अवश्य जन्नतमध्ये जाल. या अटीवर की तुम्ही मोठ्या अपराधांपासून दूर राहाल." (अलअदबुल मुफरद)

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांनी एकदा दोन माणसांना पाहिले. एकाला विचारले, हे दुसरे तुमचे कोण आहेत? तो म्हणाला, "हे माझे पिता आहेत. त्यांनी सांगितले, पाहा, त्यांना नाव घेऊन बोलवू नका, त्यांच्यापुढे चालू नका आणि कधी त्यांच्या अगोदर बसू नका."

(अल अदबुल मुफरद)

६) माता-पित्याशी नम्रतेने वागा, कुरआनात आहे,

"आणि नरमी व दयार्द्रतेने त्यांच्यासमोर नमून राहा." *(दिव्य कुरआन, १७:२४)*

प्रत्येक वेळी त्यांच्या दर्जाचे भान राखा आणि कधीही त्यांच्यासमोर आपला मोठेपणा दाखवू नका आणि त्यांच्या थोरपणाला गालबोट लागेल असे कृत्य करू नका.

७) माता-पित्याशी प्रेम राखा आणि याला स्वत:साठी सद्भाग्य आणि आखिरतच्या चांगल्या मोबदल्याचे कारण समजा. माननीय इब्ने अब्बास (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"कोणतीही नेक-सदाचारी संतती माता-पित्यावर प्रेमपूर्ण दृष्टी टाकते. त्याच्या मोबदल्यात अल्लाह त्याला एक स्वीकृत दर्जाच्या हजचे पुण्य प्रदान करतो. लोकांनी विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर! जर कोणी दिवसभरात शंभर वेळा अशा प्रकारे दया व प्रेमपूर्ण नजर टाकील पैगंबरांनी सांगितले, होय, जर कोणी शंभर वेळा असे करील तरीही अल्लाह (तुमच्या कल्पनेपेक्षा) फार फार मोठा आणि (संकुचिततासारख्या दोषांपासून) अगदी मुक्त आणि पवित्र आहे." (हदीस : मुस्लिम)

८) माता पित्याचे मन:पूर्वक आज्ञापालन करा. जर ते काहीसा अतिरेक ही करीत असतील,

तरीही आनंदी मनाने त्यांचे आज्ञापालन करा आणि त्यांच्या मोठमोठ्या उपकारांना डोळ्यांसमोर ठेवून त्यांच्या त्या मागण्या ही आनंदाने पूर्ण करा, ज्या आपल्या आवडी व स्वभावाच्या विरुध्द असाव्यात. मात्र त्या धर्म आणि शरीअतच्या विरुध्द नसाव्यात. माननीय अबू सईद (रजि.) यांचे निवेदन आहे की यमन देशाचा एक मनुष्य पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ आला. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्याला विचारले,

"यमनमध्ये तुमचा कोणी आहे? तो म्हणाला, (होय) माझे माता-पिता आहेत. पैगंबरांनी विचारले, त्यांनी तुम्हाला अनुमति दिली आहे? तो म्हणाला, नाही (मी त्यांच्याकडून परवानगी तर घेतली नाही) त्यावर पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, ठीक आहे. आता तुम्ही परत जा आणि आपल्या माता-पित्याकडून अनुमती घ्या. जर त्यांनी अनुमती दिली. तरच जिहादमध्ये सहभागी व्हा, अन्यथा (त्यांच्या सेवेत राहून) त्यांच्याशी सद्व्यवहार करीत राहा."

माता-पित्याचे म्हणणे मानण्याचे महत्त्व यावरून ओळखा की एक मनुष्य कित्येक मैलांच्या अंतरावरून येतो आणि इच्छितो की पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासोबत इस्लामचा ध्वज उंचविण्याकरिता सहभागी व्हावे, परंतु पैगंबर मुहम्मद (स.) त्याला परत फिरवितात आणि फर्मावितात की जिहादमध्ये सहभागी ही तुम्ही त्याच स्वरूपात होऊ शकता जेव्हा तुमचे माता- पिता दोघे तुम्हाला अनुती देतील.

माननीय इब्ने अब्बास (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्या माणसाने या अवस्थेत सकाळ केली की तो त्या मार्गदर्शन व आदेशांमध्ये अल्लाहचे फर्मान मानणारा राहिला, जे त्याने माता-पित्याच्या हक्कात अवतरित केले आहेत. तर त्याने या अवस्थेत सकाळ केली की त्याच्यासाठी जन्नतचे दोन दरवाजे खुले आहेत आणि जर माता-पित्यांपैकी कोणी एक असेल तर जन्नतचा एक दरवाजा खुला आहे आणि ज्या माणसाने या अवस्थेत सकाळ केली की माता-पित्या विषयी अल्लाहने पाठविलेल्या आदेशांपासून व मार्गदर्शनापासून तोंड फिरविले आहे तर त्याने या अवस्थेत सकाळ केली की त्याच्याकरिता जहन्नमचे दोन दरवाजे खुले आहेत आणि माता-पित्यांपैकी कोणी एक आहे तर जहन्नमचा एक दरवाजा खुला आहे त्या माणसाने विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! जर माता-पिता त्याच्यावर अत्याचार करीत असतील तरी ही? फर्माविले, हो जर अत्याचार करीत असतील तरीही. जर अत्याचार करीत असतील तरीही जर अत्याचार करत असतील तरीही."

(हदीस : मिश्कात)

९) माता-पित्यास तुमच्या सम्पत्तीचा मालक समजा आणि त्यांच्यावर मनमोकळेपणे खर्च करा. कुरआनात उल्लेख आहे,

"लोक त्यांना (प्रेषितांना) विचारतात की आम्ही काय खर्च करावा? तुम्ही सांगा "जे काही तुम्ही खर्च कराल तो आईवडिलांवर, नातेवाईकांवर, अनाथ आणि गोरगरिबांवर आणि

वाटसरूंवर खर्च करा आणि जे काही भले तुम्ही कराल ते अल्लाहला माहीत असेल."
*(दिव्य कुरआन, २:२१५)*

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ एक मनुष्य आला आणि त्याच्या पित्याची तक्रार करु लागला की वाटेल तेव्हा माझे धन घेतात. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्याच्या बापाला बालोवून घेतले, काठी टेकत एक म्हातारा, दुबळा माणूस हजर झाला. पैगंबरांनी त्या म्हाताऱ्या माणसाला विचारले, तर त्याने सांगायला सुरुवात केली.

"अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स)! एक काळ होता, जेव्हा हा कमजोर आणि बेबस होता आणि मी सशक्त होतो. मी धनवान होतो आणि हा रिक्त-हस्त होता. मी कधीही याला आपली वस्तू घेण्यापासून रोखले नाही. आज मी कमजोर आहे आणि हा सशक्त व स्वस्थ आहे. मी निर्धन आहे आणि हा धनवान आहे. आता हा आपले धन माझ्यापासून वाचवितो. वृध्दाचे हे निवेदन ऐकून पैगंबर मुहम्मद (स.) रडायला लागले आणि (वृध्दाच्या मुलाला संबोधून) फर्माविले, "तू आणि तुझी धन-सम्पत्ती, तुझ्या पित्याची आहे."

१०) माता-पिता जर मुस्लिमेतर असतील, तरीही त्यांच्याशी चांगला व्यवहार करा. त्यांचा आदर-सन्मान आणि त्यांची सेवा सतत करीत राहा. तथापि जर ते अल्लाहखेरीज दुसऱ्या कोणाची उपासना करण्याचा व दुष्कृत्ये करण्याचा आदेश देतील तर त्यांच्या आज्ञापालनास इन्कार करा आणि या बाबतीत त्यांचे काही एक ऐकू नका.

"परंतु जर त्यांनी तुझ्यावर दबाव आणला की माझ्यासमवेत तू अशा एखाद्याला भागीदार ठरवावेस की ज्याला तू जाणत नाही,तर त्यांचे म्हणणे अजिबात ऐकू नकोस. जगात त्यांच्याशी सद्व्यवहार करीत राहा" *(दिव्य कुरआन, ३१:१५)*

माननीय अस्मा (रजि.) यांचे निवेदन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शुभ-काळात माझी आई आली. त्या वेळी ती अनेकेश्वरवादी होती. मी पैगंबर मुहम्मद (स.) यांना सांगितले, माझ्याकडे माझी आई आली आहे आणि ती इस्लामचा तिरस्कार करते. काय मी तिच्याशी सद्व्यवहार करावा? पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, होय तुम्ही तुमच्या आईशी सद्व्यवहार करीत रहा." (हदीस : बुखारी)

११) माता-पित्याकरिता सतत दुआदेखील करीत राहा आणि त्यांच्या उपकारांचे स्मरण करुन अल्लाहसमोर गयावया करा आणि अतिशय मन:पूर्वक त्यांच्यासाठी दया-कृपेची प्रार्थना करा.

अल्लाहचे फर्मान आहे,

"आणि प्रार्थना करीत जा की, "हे पालनकर्त्या, यांच्यावर दया कर ज्याप्रमाणे यांनी दया व वात्सल्याने बालपणी माझे संगोपन केले." *(दिव्य कुरआन, १७:२४)*

हे अल्लाह! बालपणीच्या अगतिक अवस्थेत ज्या दया, परिश्रम आणि प्रेमाने माझे पालनपोषण केले आणि माझ्यासाठी आपल्या ऐश-आरामाचे बलिदान दिले हे पालनकर्त्या! आता हे वृध्दावस्थेच्या कमजोरी व लाचारीत माझ्याहून जास्त स्वत: दया-प्रेमाचे मोताद आहेत हे अल्लाह! मी त्यांच्या उपकारांची परतफेड करू शकत नाही. तूच त्यांचे पालकत्व कर आणि त्यांच्या या अवस्थेवर दया कृपेची नजर टाक.

१२) आईच्या सेवेची विशेष काळजी घ्या. आई स्वाभाविकपणे जास्त कमजोर असते. म्हणून तुमच्या सेवा व सद्वर्तनाची तिला जास्त गरज भासते. तसेच तिचे उपकार व बलिदान पित्याच्या तुलनेत कितीतरी जास्त आहेत आणि याच कारणाने इस्लाम धर्मात मातेचा हक्क जास्त सांगितला गेला आहे आणि मातेशी सद्व्यवहार राखण्याची खास ताकीद केली गेली आहे. या संदर्भात पवित्र कुरआनातील उल्लेख असा -

"आम्ही मनुष्याला आदेश दिला की त्याने आपल्या आईवडिलांशी सद्व्यवहार करावा, त्याच्या आईने कष्ट सोसून त्याला पोटात बाळगले आणि कष्ट करून त्याला प्रसवले, आणि त्याचा गर्भ व त्याचे दूध सोडविण्यात तीस महिने लागले." *(दिव्य कुरआन, ४६:१५)*

कुरआनने माता-पिता दोघांशीही सद्व्यवहाराची ताकीद करीत, विशेषत: मातेच्या सातत्याने दु:ख आणि यातना झेलण्याचे चित्र मोठ्या प्रभावशाली शैलीत रेखाटले आहे. मोठ्या वैशिष्ट्यासह हृदयस्पर्शी शैलीत या सत्याकडे संकेत केला आहे की पित्याच्या तुलनेत प्राणार्पण करणारी माता तुमच्या सेवा व सद्वर्तनाची जास्त हक्कदार आहे आणि मग याच वस्तुस्थितीला अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनीही स्पष्टपणे सांगितले आहे,

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की एक मनुष्य पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झाला आणि त्याने विचारले,

"हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) ! माझ्या सद्वर्तनास सर्वाधिक कोण हक्कदार आहे?"
पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, "तुझी आई."

त्याने विचारले, "त्यानंतर कोण?"
पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, "तुझी आई."
त्याने विचारले, "त्यानंतर कोण?"
पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "तुझी आई."
त्याने विचारले, "त्या नंतर कोण?"
त्यावर पैगंबरांनी सांगितले, "तुझे वडील."

(अल अदबुल मुफरद)

माननीय जाहमा (रजि.) पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झाले आणि म्हणाले,

"हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) ! माझी इच्छा आहे की मी आपल्यासोबत जिहादमध्ये सहभागी व्हावे आणि यासाठीच आलो आहे की आपल्याशी याबाबत सल्ला-मसलत करावी (तेव्हा सांगा, आपला काय आदेश आहे?) पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विचारले, "तुमची आई जिवंत आहे?"

जाहमा म्हणाले, "होय (जिवंत आहे)."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "तर मग जा आणि त्यांची सेवा करीत राहा कारण जन्नत त्यांच्या पायाशी आहे." (हदीस : इब्ने माजा, नसई)

माननीय उवैस करनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या काळात होते, पण पैगंबरांशी भेटीचे सद्भाग्य त्यांना लाभले नाही. त्यांची एक वृध्द माता होती. दिवस-रात्र आईच्या सेवेत राहात. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या दर्शनांची तीव्र इच्छा होती. अर्थात असा कोण ईमानधारक असेल जो या आकांक्षेत तळमळत नसेल की त्याचे डोळे पैगंबर मुहम्मद (स.) च्या दर्शनाचे दिपावेत. यास्तव माननीय उवैस (रजि.) यांनी यायचेही ठरविले. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मनाई केली. हजचे कर्तव्य पार पाडण्याचीही त्यांच्या मनात मोठी इच्छा होती. परंतु आई जिवंत असेपर्यंत त्या एकट्या पडतील या विचाराने हज केले नाही आणि आईच्या निधनानंतरच त्यांची ही इच्छा पूर्ण झाली.

१३) जिने जन्म दिला नाही. परंतु आपले दूध पाजून वाढविले अशा आईशी सद्व्यवहार करा. त्यांची सेवा करा आणि आदर सन्मानाने वागा. माननीय अबू तुफैल (रजि.) कथन करतात की मी जाराना नामक ठिकाणी पैगंबर मुहम्मद (स.) यांना पाहिले की ते मांस वाटत आहेत तेवढ्यात एक स्त्री आली आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या अगदी जवळ पोहोचली. पैगंबरानी तिच्याकरिता चादर अंथरली त्या चादरीवर ती बसली. मी लोकांना विचारले, "त्या कोण आहेत?" लोकांनी सांगितले की या पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आई होत, ज्यांनी त्यांना दूध पाजले होते. (हदीस : अबू दाऊद)

१४) माता-पित्याच्या निधनानंतरही त्यांची काळजी घ्या आणि त्यांच्याशी सद्व्यवहार करण्यासाठी खालील गोष्टींवर आचरण करावे

१) माता-पित्यासाठी क्षमा-याचनेची दुआ सतत करीत राहा. पवित्र कुरआनात ईमानधारकांना ही दुआ शिकविली आहे,

"रब्बनग़ाफिर ली वाली वालिदय-य व लिल मूमिनी-न यौ-म यकूमुल हिसाब."

"हे पालनकर्त्या! मला आणि माझ्या आई-वडिलांना आणि सर्व ईमानधारकांना त्या दिवशी माफ कर जेव्हा हिशेब प्रस्थापित होईल." *(दिव्य कुरआन, १४:४१)*

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की मृत्युनंतर जेव्हा मयताचे दर्जे उंचाविले

जातात, तेव्हा तो आश्चर्याने विचारतो, हे कसे झाले! अल्लाहतर्फे त्याला सांगितले जाते, तुमची संतती तुमच्यासाठी क्षमा-याचनेची दुआ करीत राहिली. आणि अल्लाहने त्यांची दुआ कबूल केली.

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे आणखी एक कथन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,

''जेव्हा एखादा मनुष्य मरण पावतो, तेव्हा त्याची कर्म-संधी समाप्त होते. फक्त तीनच गोष्टी अशा आहेत, ज्या मेल्यानंतरही लाभ पोहचवितात-

१)'सदका ए जारिया' (सतत चालू राहणारे दान).

२)त्याचे (विस्तृत) ज्ञान, ज्यापासून लोक लाभ घेत राहावेत.

३)ती नेक सदाचारी संतती, जी त्याच्यासाठी क्षमा-याचनेची दुआ करीत राहील.''

२) माता पित्याशी केलेले वचन करार पूर्ण करा. माता पित्यांनी त्याच्या जीवनात अनेक लोकांशी काही वायदे केले असतील, अल्लाहशी काही वचन-करार केला असेल, एखादा नवस मानला असेल, एखाद्याला काही देण्या-घेण्याचा वायदा केला असेल, त्यांच्यावर कोणाचे काही कर्ज बाकी असेल आणि अदा न करण्याची संधी लाभली नसेल, मरतांना काही गोष्टींची ताकीद (वसीयत) केली असेल, तुम्ही तुमच्या परिने ही सर्व कामे पार पाडा.

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) कथन करतात की माननीय साद बिन उबादा (रजि.) यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांना विनंती केली,

''हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! माझ्या आईने नवस मानला होता. परंतु तो नवस फेडण्याआधिच तिचे निधन झाले. काय मी तिच्यातर्फे हा नवस फेडू शकतो? पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, का नाही? तुम्ही अवश्य त्यांच्यातर्फे नवसाची फेड करा.''

३) पित्याच्या दोस्तांशी आणि आईच्या मैत्रिणींशीही चांगला व्यवहार करत राहा. त्यांचा आदर-सम्मान राखा. त्यांच्या आपल्या सल्लामसलतीत थोर-बुजूगीप्रमाणे सहभागी करा, त्यांच्या विचारांचा व सल्लयाचा यथोचित मान राखा.

एका प्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''सर्वात चांगले वर्तन हे आहे की माणसाने त्याच्या पित्याच्या मित्रांशी व सहकाऱ्यांशी भलाई करावी.''

एकदा माननीय अबू दर्दा (रजि.) आजारी पडले, आणि आजार वाढतच गेला. येथपावेतो की जीवनाची आशा राहिली नाही, तेव्हा माननीय युसूफ बिन अब्दुल्लाह (रजि.) फार लांब अंतरावरून प्रवास करुन त्यांची अवस्था जाणून घेण्याकरिता आले. माननीय अबू दर्दा

(रजि.) यांनी त्यांना पाहून आश्चर्याने विचारले, "तुम्ही इथे कसे?" युसूफ बिन अब्दुल्लाह म्हणाले, "मी इथे फक्त एवढ्यासाठी आलो आहे की तुमच्या तब्येतविषयी अवस्था जाणून घ्यावी, कारण वडिलांशी आपले मोठे घनिष्ठ संबंध होते."

माननीय अबू दर्द (रजि.) यांचे निवेदन आहे की जेव्हा मी मदीना येथे आलो, तेव्हा माझ्याजवळ अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) आले आणि म्हणाले, "अबुदर्दा! तुम्ही जाणता मी तुमच्याजवळ कशासाठी आलो आहे?" मी म्हणालो, "मी तर नाही जाणत की आपण कशासाठी आला आहात?" यावर माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांनी सांगितले,

"मी पैगंबर मुहम्मद (स.) यांना हे फर्मावितांना ऐकले आहे जो मनुष्य कबरीत त्याच्या पित्याशी सद्व्यवहार करु इच्छित असेल तर त्याने पित्याच्या मृत्युनंतर, पित्याच्या साथी-सहकाऱ्यांशी सद्व्यवहार करावा आणि मग सांगितले बंधू! माझे पिता माननीय उमर आणि तुमचे पिता, दोघांमध्ये गाढ मैत्री होती. मी या मैत्रीला निभवू इच्छितो आणि तिचे हक्क अदा करू इच्छितो." (इब्ने हिब्बान)

४) माता-पित्याच्या नातेवाईकांशी ही सतत चांगले वर्तन करीत राहा आणि नातेवाईकांचा पुरेपूर विचार राखा. या नातेवाईकांशी नि:स्पृहता वास्तविक माता-पित्याशी नि:स्पृहता आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"तुम्ही आपल्या वाड-वडिलांशी असभ्यपणाने मुळीच वागू नका. माता-पित्याशी असभ्यपणाने वागणे अल्लाहशी कृतघ्नता राखणे होय."

१५) अल्लाह न करो पण जीवनात जर माता पित्याशी सद्व्यवहार करण्यात आणि त्यांचे हक्क अदा करण्यात कुचराई झाली आहे तरीही अल्लाहच्या दया कृपेपासून निराश होऊ नका. त्यांच्या मृत्युनंतर त्यांच्यासाठी सातत्याने क्षमा-याचनेची प्रार्थना करीत राहा. आशा आहे, अल्लाह तुमच्या उणीवेस माफ करील आणि तुमची गणना आपल्या नेक-सदाचारी दासांमध्ये करील.

माननीय अनस (रजि.) यांचे कथन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जर अल्लाहचा एखादा दास जीवनास आपल्या माता-पित्याची अवज्ञा करणारा राहिला आणि माता-पित्यापैकी कोणी एक किंवा दोघेही मरण पावले याच अवस्थेत तर त्याने आपल्या मृत माता-पित्यांकरिता सतत दुआ करीत राहिले पाहिजे. आणि अल्लाहजवळ त्यांच्या क्षमा याचनेची प्रार्थना करीत राहिले पाहिजे. येथपावेतो की अल्लाहने त्या माणसाला आपल्या दया- कृपेने नेक-सदाचारी लोकांमध्ये लिहून घ्यावे."

# २४. पती आणि पत्नीचे शिष्टाचार

इस्लाम ज्या उच्च संस्कृतीचे व जीवनयापनाचे आवाहन करतो, ते त्याच वेळी अस्तित्वात येऊ शकते, जेव्हा आम्ही एका शुध्द समाजाची स्थापना करण्यात सफल ठरू. अशा समाजाच्या रचनेसाठी आवश्यक आहे की तुम्ही कुटुंबव्यवस्थेला जास्तीतजास्त मजबूत आणि सफल बनवावे. कौटुंबिक जीवनाचा आरंभ पती आणि पत्नीच्या प्रेमपूर्वक संबंधाने होतो या संबंधाची मधुरता व दृढता त्याच वेळी संभव आहे, जेव्हा पती-पत्नी दोघेही मिळून पार पाडल्या जाणाऱ्या जीवनाचे शिष्टाचार आणि कर्तव्यांना चांगल्या प्रकारे जाणत असतील आणि त्या शिष्टाचार व कर्तव्यांना पूर्ण करण्यासाठी अगदी मनापासून सचोटी व एकाग्रतेने तत्पर व व्यस्त असतील.

आम्ही प्रथम त्या शिष्टाचार व कर्तव्यांचे वर्णन करतो, ज्यांचा संबंध पतीशी आहे, त्यानंतर त्या शिष्टाचार व कर्तव्यांचा उल्लेख करायचा आहे, ज्यांचा संबंध पत्नीशी आहे.

## पतीच्या जबाबदाऱ्या :

१) पत्नीशी सद्व्यवहारपूर्वक जीवन व्यतीत करा. तिच्या हक्कांना मनमोकळेपणे अदा करा आणि प्रत्येक बाबतीत उपकार व त्यागाचे वर्तन अंगीकारा अल्लाहचे सांगणे आहे,

"त्यांच्याशी चांगल्या प्रकारे जीवन व्यतीत करा." *(दिव्य कुरआन, ४:१९)*

पैगंबर मुहम्मद (स.) निरोपाच्या हजप्रसंगी एका प्रचंड सभेला संबोधतांना मार्गदर्शन केले "लोकांनो, ऐका! स्त्रियांशी सद्व्यवहाराने वागा, कारण तुमच्या संरक्षणात त्या आहेत. तुम्हाला त्यांच्याशी कठोर वर्तन करण्याचा काही एक हक्क नाही. त्या परिस्थितीशिवाय की जेव्हा त्यांच्याकडून एखादी उघड स्वरूपाची अवज्ञा समोर यावी. जर त्या असे काही करून बसतील तर मग शयनगृहात त्यांच्यापासून वेगळे राहा आणि त्यांना मार द्याल तर असे मारू नका की एखादी गंभीर जखम व्हावी मग जेव्हा त्या तुमच्या म्हणण्यानुसार वागू लागतील तर त्यांना अकारण सतविण्याचे बहाणे शोधू नका. ऐका! तुमच्या पत्नींचे काही हक्क तुमच्यावर आहेत. त्यांच्यावर तुमचा हक्क हा की त्यांनी तुमच्या बिछान्यांना त्या लोकांद्वारे पायदळी तुडवू नये ज्यांना तुम्ही नापसंत करता आणि तुमच्या घरात अशा लोकांना मुळीच प्रवेश करु देऊ नये, ज्यांचे आगमन तुम्हाला अप्रिय असावे आणि ऐका, त्यांचा तुमच्यावर हक्क आहे की तुम्ही त्यांना चांगले खाऊ- पिऊ घाला आणि चांगले वस्त्र नेसवा."

(हदीस : रियाजुस्स्वालेहीन)

त्यांच्या खाण्या-पिण्याची अशी व्यवस्था करा जी पती-पत्नीच्या अनुपम अतिनिकट व हृदयस्थ संबंधांना आणि साहचर्याच्या भावनेला शोभेल अशी असावी.

२) शक्यतो पत्नीशी चांगले गुमान राखून वागा आणि तिच्याच सोबत निभाव करण्यात सहनशक्ती आणि धैर्यशीलतेचे वर्तन अंगीकारा. जर तिच्यात चेहरा-मोहरा, सवयी व नैतिकता किंवा नीटनेटकेपणा या बाबतीत जर काही वैगुण्य असेल तरीही धीर-संयम राखून ते सहन करा आणि तिच्या गुणवैशिष्ट्यांवर नजर ठेवीत मोकळ्या मनाने व मोठ्या हिंमतीने त्याग व समझोत्याने वागा. अल्लाहचे सांगणे आहे,

"समझोता भलाईच आहे."

आणि ईमान राखणाऱ्यांना ताकीद केली गेली आहे,

"जर त्या तुम्हाला नापसंत असतील तर शक्य आहे की एखादी गोष्ट तुम्हाला पसंत नसेल परंतु अल्लाहने त्यांच्यातच बरेचसे भले ठेवले असेल." *(दिव्य कुरआन, ४:१९)*

हीच गोष्ट पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हदीस वचनात अशा प्रकारे सांगितले आहे,

"कोणत्याही ईमानधारक पुरुषाने आपल्या ईमानधारक पत्नीचा तिरस्कार करू नये. जर पत्नीची एखादी सवय त्याला नापसंत आहे तर शक्य आहे तिची दुसरी सवय त्याला पसंत पडेल."

खरे तर प्रत्येक स्त्रीमध्ये कोणत्या न कोणत्या पैलूनेकोणती न कोणती कमजोरी अवश्य असते आणि जर पती एखादा दोष पाहताच तिच्याकडून तोंड फिरविल आणि मन कलुषित करील, तर मग कोणत्याही कुटुंबात गृहसौख्य लाभूच शकणार नाही. बुध्दिकौशल्याची निकड हीच की माणसाने क्षमाशीलतेने, दोषांना दृष्टीआड करून वागावे. आणि अल्लाहवर भरवसा राखीत स्त्रीशी आनंदी मनाने निभाव करण्याचा प्रयत्न करावा. शक्य आहे की अल्लाह त्या स्त्रीच्या माध्यमाने पुरुषाला अशी काही भलाई प्रदान करील. ज्यापर्यंत पुरुषाची संकुचित दृष्टी पोहचत नव्हती. उदाहरणार्थ, त्या स्त्रीत धर्म व ईमान आणि आचरणाची काही अशी गुण वैशिष्ट्ये असतील ज्यांच्यामुळे ती संपूर्ण कुटुंबाकरिता अल्लाहची दया-कृपा ठरेल किंवा तिच्या उदरातून एखादा सदाचारी आत्माजन्मास येईल, जो भविष्यात एका मोठ्या वस्तीला लाभ पोहचवील आणि आयुष्य भर पित्याच्या हक्कात सदका-ए-जारिया (सतत जारी राहणारी नेकी) बनेल. किंवा त्या स्त्रीने पुरुषात सुधार निर्माण करावा आणि त्याला जन्नतच्या जवळ करण्यात सहाय्यक ठरावे. अथवा तिच्या भाग्याने जगात अल्लाहने त्या पुरुषाला विपुल आजीविका आणि सुख-समृध्दी द्यावी. तात्पर्य स्त्रीच्या एखाद्या बाह्य दोषास पाहून आततायी वृत्तीने पती-पत्नीच्या संबंधाला तडा पडू देऊ नका, किंबहुना बुध्दिकौशल्यासोबत हळूहळू घरच्या वातावरणाला जास्तीतजास्त सहज सुगम बनविण्याचा प्रयत्न करावा.

३) क्षमाशीलतेचे व मेहरबानी करण्याचे वर्तन अंगीकारा आणि पत्नीच्या उणिवा, नादानी आणि विद्रोहाकडे डोळेझाक करा. स्त्री, सुज्ञता आणि बुध्दिमत्तेच्या दृष्टीने कमजोर आणि अतिशय भावुक असते. यासाठी संयम, शांती, दया व प्रेम आणि मनाच्या सचोटीसह तिच्यात सुधार आणण्याचा प्रयत्न करा आणि धीर व संयमाने निभावून घ्या.

या संदर्भात अल्लाहने सांगितले आहे,

“हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, तुमच्या पत्नीं आणि तुमच्या संततीपैकी काही तुमचे शत्रू आहेत, त्यांच्यापासून सावध रहा. आणि जर तुम्ही क्षमा आणि दुर्लक्ष करण्याच्या व्यवहाराने त्यांना माफ केले तर अल्लाह क्षमाशील व परमकृपाळू आहे.”

*(दिव्य कुरआन, ६४:१४)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

“स्त्रियांशी सद्व्यवहार करा. स्त्री फासळीपासून निर्माण केली गेली आहे आणि फासळ्यांमध्ये सर्वात वरचा हिस्सा वाकडा आहे. तिला सरळ कराल तर तुटून जाईल आणि तसेच सोडून ठेवाल तर वाकडीच राहील. अत: स्त्रियांशी सद्व्यवहार करा.”

(हदीस : मुस्लिम, बुखारी)

४) पत्नीशी सद्चारित्र्याने वागा आणि प्रेमाने वागा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,

“परिपूर्ण ईमानधारक तेच आहेत, जे स्वत:च्या चारित्र्यात सर्वात चांगले असावेत आणि तुमच्यात सर्वात चांगले लोक ते आहेत, जे स्वत:च्या पत्नींच्या बाबतीत सर्वात चांगले असावेत.”

(हदीस : तिर्मिजी)

मनुष्याच्या चांगल्या चारित्र्यास आणि कोमल स्वभावास पारखण्याचे खरे मैदान गृहस्थी जीवन होय. कुटुंबियांशी सातत्याने संबंध येतो आणि घरच्या नि:संकोच जीवनातच स्वभाव आणि चारित्र्याचा प्रत्येक पैलू समोर येतो. ही वस्तुस्थिती आहे की तोच ईमानधारक त्याच्या ईमानात परिपूर्ण आहे जो स्वत:च्या कुटुंबियांशी सद्व्यवहार, मोकळे मनाने आणि स्नेहप्रेमाने वागेल. घरातल्या मंडळीचे मन दुखवणार नाही आणि त्यांना प्रेमाच्या शीतल छायेत राखेल.

एकदा हजप्रसंगी माननीय सफिया (रजि.) यांचा उंट बसला आणि त्या सर्वांच्या मागे राहिल्या. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पाहिले की त्या जोरजोराने रडत आहेत. पैगंबर मुहम्मद (स.) थांबले आणि आपल्या शुभ हातांनी चादराचा पदर घेऊन त्यांची आसवे पुसली. पैगंबर मुहम्मद (स.) त्यांचे अश्रु पुसत गेले आणि त्या अनावर होऊन रडत राहिल्या.

५) अगदी मन:पूर्वक तुमच्या जीवनसाथीच्या गरजा पूर्ण करा आणि त्यांच्या खर्चात कधीही कमतरता करु नका. कष्टाची कमाई कुटुंबियांवर खर्च करुन मन:शांती व आनंदाची अनुभूती प्राप्त करा. खाणे-पिणे, कपडा-लत्ता पत्नीचा हक्क आहे आणि हा हक्क मुक्तहस्ते, आणि मनापासून अदा करण्याकरिता परिश्रम करणे पतीची नैतिक जबाबदारी आहे. ही जबाबदारी मोकळ्या मनाने पार पाडल्याने, न केवळ पती-पत्नीला भल्या जीवनाची देणगी लाभते किंबहुना ईमानधारक आखिरतमध्ये (मरणोत्तर जीवनात) ही मोबदला व इनामास पात्र ठरतो. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे.

"एक दीनार तर तो आहे, जो तुम्ही अल्लाहच्या मार्गात खर्च केला. एक दीनार तो आहे जो तुम्ही एखाद्या गुलामास स्वतंत्र करण्यासाठी लावला. एक दीनार तो आहे जो तुम्ही एखाद्या भिकाऱ्याला दान म्हणून दिला आणि एक दीनार तो आहे जो तुम्ही आपल्या कुटुंबियांवर खर्च केला. या सर्वात, सर्वाधिक जास्त मोबदला व पुण्य त्या दीनाराचे खर्च करण्यावर आहे जो तुम्ही आपल्या कुटुंबियांवर खर्च केला." (हदीस : मुस्लिम)

६) पत्नीला धार्मिक आदेश आणि संस्कृती शिकवा, धर्माचे शिक्षण द्या. इस्लामकुटुंबी नीतीमत्तेच्या अलंकारांनी सजवा. तिच्या प्रशिक्षण व सुधारणेसाठी शक्य तो प्रयत्न करा. यासाठी की ती एक चांगली पत्नी चांगली आई आणि अल्लाहची सदाचारी दासी बनू शकेल. आपल्या कौटुंबिक जबाबदाऱ्या चांगल्या प्रकारे पार पाडू शकेल. अल्लाहचे फर्मान आहे,

"हे ईमानधारकांनो! स्वत:ला व आपल्या कुटुंबियांना जहन्नमच्या आगी पासून वाचवा."
*(दिव्य कुरआन, ६६:६)*

पैगंबर मुहम्मद (स.) ज्याप्रमाणे धर्माच्या प्रसार व प्रचार कार्यात व धर्माची शिकवण देण्यात मग्न राहात त्याचप्रमाणे घरातही जबाबदाऱ्या पार पाडीत असत. याच गोष्टीकडे संकेत करीत कुरआनचे पैगंबर मुहम्मद (स.) च्या आदर्श पत्नींना संबोधून सांगितले आहे,

"आणि तुमच्या घरात अल्लाहच्या ज्या आयतींचे पठण केले जाते आणि बुध्दी कौशल्याच्या ज्या गोष्टी ऐकविल्या जातात, त्या स्मरणात राखा."

कुरआनात पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या माध्यमाने ईमानधारकांना ताकीद केली गेली आहे,

"आपल्या कुटुंबियांना नमाजचा आदेश द्या आणि स्वत: देखील त्याचे पालन करीत राहा."
*(दिव्य कुरआन, २०:१३२)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"जेव्हा एखादा पुरुष रात्री आपल्या पत्नीला जागे करतो आणि ते दोघे मिळून दोन रकअत

नमाज पढतात तर पतीचे नावस्मरण करणाऱ्यांमध्ये आणि पत्नीचे नाव स्मरण करणारीमध्ये लिहीले जाते." (हदीस : अबू दाऊद)

दुसरे खलीफा माननीय उमर (रजि.) रात्री अल्लाहसमोर उभे राहून उपासना करीत, मग पहाटेची वेळ होत असता आपल्या पत्नीला जागे करीत आणि म्हणत, उठा उठा नमाज अदा करा. मग ही आयतही पठण करीत असत.

"वअ्-मुर अह-ल-क बिस्सलाति वस-तबिर अलैहा."

"आपल्या कुटुंबियांना नमाजचा आदेश द्या आणि स्वतः देखील त्याचे पालन करीत रहा."

*(दिव्य कुरआन, २०:१३२)*

७) जर अनेक पत्नी असतील तर सर्वांशी एकसमान व्यवहार करा. पैगंबर मुहम्मद (स.) पत्नींशी वर्तन करताना समानतेचा मोठा इतमाम राखत. प्रवासाला जाताना फासा टाकत आणि त्याद्वारे ज्या पत्नीचे नाव निघत असे तिलाच सोबत नेत.

माननीय अबू हुरैरा (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जर एखाद्या माणसाच्या दोन पत्नी असतील आणि त्याने त्यांच्याशी न्याय व समानतापूर्वक व्यवहार केला नाही तर कयामतीच्या दिवशी तो मनुष्य अशा अवस्थेत येईल की त्याचे अर्धे धड गळून पडले असेल." (हदीस : तिर्मिजी)

न्याय आणि समानतेशी अभिप्रेत समस्त व्यवहारात आणि वर्तमान समानता राखणे होय. राहिली ही गोष्ट की कोणा एका पत्नीकडे मनाचा झुकाव आणि प्रेम-भावना जास्त असेल तर हे माणसाच्या अवाक्यातले नाही आणि याबाबत अल्लाहतर्फे कसलीही पकड नाही.

## पत्नीच्या जबाबदाऱ्या

१) मोठ्या आनंदाने आपल्या पतीचे आज्ञापालन करा. आणि या आज्ञापालनात आनंद व मन:शांतीची अनुभूती घ्या. कारण हा अल्लाहचा आदेश आहे आणि जी नेक दासी अल्लाहचा आदेश पूर्ण करते ती अल्लाहला प्रसन्न करते. कुरआनातील उल्लेख असा आहे,

"नेक (सत्कर्मी) पत्नी (पतीचे) आज्ञा पालन करणाऱ्या असतात."

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे की,

"कोणत्याही स्त्रीने पतीच्या अनुमतीविना रोजा पाळू नये." (हदीस : अबू दाऊद)

पतीचे आज्ञापालनाचे महत्त्व सांगताना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्त्रीला ताकीद केली आहे,

"दोन प्रकारची माणसे आहेत, ज्यांची नमाज त्यांच्या डोक्यापेक्षा उंच जात नाही. त्या गुलामाची नमाज, जो मालकापासून फरार होतो आणि जोपर्यंत तो परतून येत नाही आणि

त्या स्त्रीची नमाज, जी पतीची अवज्ञा करीत असेल, जोपर्यंत पतीच्या अवज्ञाकारीतेपासून परावृत्त होत नाही." (अत तर्गीब वत तर्हीब)

२) स्वत:चे शील आणि पावित्र्याच्या रक्षणाची काळजी घ्या आणि त्या समस्त गोष्टी व कामांपासून दूर रहा ज्यामुळे प्रतिष्ठा कलंकीत होण्याचे भय असते. अल्लाहच्या ताकीदीची निकड हीच आहे आणि पती-पत्नीच्या जीवनास अधिक चांगले राखण्याकरिता हे अतिशय आवश्यक आहे. जर पतीच्या मनात अशा प्रकारची एखादी शंका निर्माण झाल्यास स्त्रीची कोणतीही सेवा व आज्ञापालन आणि कोणतीही भलाई पतीला आपल्याकडे आकर्षित करू शकत नाही आणि या संदर्भात किंचित मात्र कमतरतेने पतीच्या मनात संशय निर्माण करण्यात सैतान यशस्वी होतो. म्हणून मानवी दुर्बलता दृष्टीसमोर ठेवून अतिशय सावधगिरी पाळा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे

"स्त्री जेव्हा पाच वेळची नमाज अदा करील, शील-अब्रूचे रक्षण करील, पतीची आज्ञाधारक राहील तर ती जन्नतमध्ये ज्या दरवाजाने इच्छिल, प्रवेश करेले." (अत तर्गीब वत तर्हीब)

३) पतीच्या अनुमती व मर्जीविना घराबाहेर पडू नका आणि अशा घरात जाऊ नका जिथे जाणे पतीला पसंत नसेल आणि न अशा लोकांना घरात येण्याची अनुमती द्यावी ज्यांचे येणे पतीला अप्रिय असेल.

माननीय मुआज बिन जबल (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,

"अल्लाहवर ईमान राखणाऱ्या स्त्रीकरिता हे उचित नाही की तिने आपल्या पतीच्या घरात एखाद्या अशा माणसाला येण्याची अनुमती द्यावी, ज्याचे येणे पतीला अप्रिय असावे आणि तिने अशा अवस्थेत घराबाहेर पडावे, जेव्हा तिचे बाहेर पडणे पतीला अप्रिय असावे आणि स्त्रीने पतीच्या संदर्भात दुसऱ्या कोणाचे म्हणणे मान्य करु नये." (अत तर्गीब वत तर्हीब)

अर्थात पतीच्या संदर्भात म्हणजे त्याच्या मामल्यात पतींची मर्जी आणि त्याच्या इशाऱ्यावरच आचरण करा आणि त्याच्याविरुध्द दुसऱ्या कोणाच्या सल्लामसलतीला मुळीच मानू नका.

४) नेहमी आपल्या कामाने, वागण्याने, नीटनेटकेपणाने पतीला खूष राखण्याचा प्रयत्न करा. वैवाहिक जीवनाच्या सफलतेचे हेच रहस्य आहे आणि अल्लाहची प्रसन्नता व जन्नत (स्वर्ग) प्राप्तीचा मार्गदेखील हाच आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"ज्या स्त्रींचे अशा अवस्थेत निधन झाले की तिचा पती तिच्याशी राजी व खुष होता तर ती

जन्नतमध्ये दाखल होईल." (हदीस : तिर्मिजी)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले,

"जेव्हा एखादा मनुष्य आपल्या पत्नीला संभोगासाठी बोलावील आणि ती येत नसेल आणि या कारणाने पती रात्रभर तिच्यावर नाराज राहील तर अशा स्त्रीचा सकाळ होईपर्यंत फरिश्ते धिक्कार करीत राहतात." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

५) आपल्या पतीशी प्रेम राखा आणि त्याच्या साहचर्याची कदर करा. हा जीवनाच्या सौंदर्याचा आधार आणि मोठा सहाय्यक आहे. अल्लाहच्या या मोठ्या देणगीबद्दल त्याचेही आभार माना आणि या देणगीची मनापासून कदर राखा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एकाप्रसंगी सांगितले,

"निकाहपेक्षा उत्तम कोणतीही गोष्ट दोन प्रेम करणाऱ्यांकरिता आढळली नाही."

माननीय सफिया (रजि.) यांना पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याशी अमर्याद प्रेम होते. यास्तव जेव्हा पैगंबर आजारी पडले, तेव्हा त्या प्रेमापोटी म्हणाल्या, "तुमच्याऐवजी मीच आजारी पडले असते तर बरे झाले असते!"

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या इतर पत्नींनी प्रेमाच्या अशा अभिव्यक्तीवर आश्चर्याने त्यांच्याकडे पाहिले तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"हे वरकरणी नाही तर अगदी खरे बोलतेय."

६) पतीचा उपकार माना त्याच्याशी कृतज्ञशील राहा. तुमचा सर्वात मोठा सहानुभूती राखणारा पतीच आहे, जो सर्वथा तुम्हाला आनंदात राखण्याच्या प्रयत्नात मग्न आहे. तुमची प्रत्येक गरज पूर्ण करतो आणि तुम्हाला सर्व प्रकारचा आराम पोहचवून मानसिक समाधान मिळवितो.

माननीय अस्मा (रजि.) कथन करतात की एकदा पैगंबर मुहम्मद (स.) माझ्या जवळून गेले. मी आपल्या शेजारच्या मैत्रिणीसह होती. पैगंबरांनी मला सलाम केला आणि सांगितले,

"तुमच्यावर ज्याचा उपकार आहे त्याच्याशी कृतघ्नता करण्यापासून दूर राहा. तुमच्यापैकी एक आपल्या माता पित्याच्या घरी अनेक दिवस लग्नाविना बसून राहते. मग अल्लाह तिला पती प्रदान करतो, मग अल्लाह तिला संतती प्रदान करतो (या सर्व उपकारानंतरही) जर केव्हा एखाद्या गोष्टीवर पतीवर नाराज होते, तेव्हा उद्‌गाराते मी कधीही तुमच्याकडून भलाई पाहिलीच नाही." (अल अदबुल मुफरद)

कृतघ्न आणि उपकार विसरणाऱ्या पत्नीला ताकीद करताना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी

सांगितले,

"अल्लाह कयामतच्या दिवशी त्या स्त्रीकडे नजर उचलूनही पाहणार नाही जी पतीशी कृतघ्न असेल वास्तविकता स्त्री कोणत्याही स्थितीत पतीशी निःस्पृश होऊ शकत नाही."

(हदीस : नसई)

७) पतीच्या सेवेने आनंदाची अनुभूति घ्या आणि शक्य तोवर स्वतः कष्ट-यातना झेलून पतीला आराम द्या. तसेच सर्व प्रकारे त्याची सेवा करून त्याचे मन जिंकण्याचा प्रयत्न करा.

माननीय आएशा (रजि.) आपल्या हातांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांचे कपडे धूत, डोक्याला तेल लावीत, केस विंचरीत, सुगंध लावीत आणि हीच अवस्था आपल्या पतींशी इतर सहाबी स्त्रियांचीही होती.

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"एखाद्या माणसाकरिता हे उचित नाही की त्याने दुसऱ्या एखाद्या माणसाला सजदा करावा (त्याच्या पुढे माथा टेकावा) जर या गोष्टीची अनुमती असती तर पत्नीला आदेश दिला गेला असता की त्यांनी आपल्या पतीला सजदा करावा. पतीचा आपल्या पत्नीवर फार मोठा हक्क आहे. इतका मोठा की जर पतीचे संपूर्ण शरीर घायाळ असेल आणि पत्नी, पतीच्या घायाळ शरीराला जीभेने चाटेल, तरीही पतीचा हक्क अदा होऊ शकत नाही."

(हदीस : मुसनद अहमद)

८) पतीच्या घरादाराचे व त्याच्या मालमत्तेचे रक्षण करा. विवाहनंतर पतीचे घर हेच आपले घर माना आणि पतीच्या सम्पत्तीला त्याच्या घराची शोभा वाढविण्यासाठी, त्याची मान प्रतिष्ठा उंचावण्यासाठी आणि त्याच्या मुलांचे भविष्य उज्वल करण्यासाठी बुध्दिकौशल्याने, किफायतीने, आणि नीटनेटकेपणाने खर्च करा. पतीच्या उन्नती व सुख समृध्दीला आपली उन्नती व सुख समृध्दी समजा. कुरैश कबिल्याच्या स्त्रियांची प्रशंसा करताना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"कुरैशच्या स्त्रिया किती चांगल्या स्त्रिया आहेत. मुलाबाळांवर अतिशय मेहरबान आहेत आणि पतीच्या घरादाराचे अतिशय रक्षण करणाऱ्या आहेत." (हदीस : बुखारी)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी नेक सदाचारी पत्नींची गुणवैशिष्टये सांगताना सांगितले,

"ईमानधारकाकरिता अल्लाहच्या भयानंतर सर्वाधिक लाभदायक आणि भलाईपूर्ण ईशदेणगी सदाचारी पत्नी आहे. जेव्हा तो तिला काही काय करण्यास सांगेल तेव्हा तिने आनंदी मनाने ते काम पार पाडावे आणि जेव्हा तो तिच्यावर नजर टाकील तर तिने पतीला (आपल्या हावभावाने) खूष करावे आणि जेव्हा तो तिच्या भरवशावर शपथ घेईल तर तिने त्याची शपथ पूर्ण करावी आणि जेव्हा तो कोठे निघून जाईल तर त्याच्या पश्चात तिने

आपल्या शील-अब्रुचे रक्षण करावे आणि पतीच्या मालमत्तेची देखरेख करण्यात पतीची हितचिंतक आणि एकनिष्ठ राहावे." (हदीस : इब्ने माजा)

९) स्वच्छता, नीटनेटकेपणा आणि सजावट या गोष्टींचाही पुरेपूर इतमाम राखा. घरदार साफ-सुथरे राखा आणि प्रत्येक वस्तू पध्दतशीरपणे सजवून ठेवा आणि नीटनेटकेपणाने वापरा स्वच्छ घर, नीटनेटकेपणे सजविलेल्या स्वच्छ खोल्या, घरातल्या कामांमध्ये नीटनेटकेपणा, सुशोभित पत्नी व तिचे स्मितहास्य इ. गोष्टींनी न गृहस्थ जीवनात प्रेम आणि शुभ, मांगल्याची, सुख-समृध्दीची वृध्दी होते तर एका पत्नीकरिता आखिरत (मरणोत्तर जीवन) बनविण्याचे व अल्लाहला प्रसन्न करण्याचेही हेच साधन आहे.

एकदा बेगम उस्मान बिन मजऊन (रजि.) यांच्याशी माननीय आएशा (रजि.) यांची भेट झाली, तेव्हा त्यांनी पाहिले की बेगम उस्मान अगदी साध्या कपड्यात आहे आणि त्यांनी कसलाही साजशृंगार केलेला नाही. तेव्हा माननीय आएशा (रजि.) यांना फार आश्चर्य वाटले. त्यांनी विचारले,

"बहीण! काय उस्मान कोठे बाहेर प्रवासावर गेले आहेत?"

या आश्चर्यावरुन अनुमान लावा की विवाहित स्त्रियांने पतींसाठी सजणे-सवरणे किती पसंत केले गेलेले काम आहे.

# २५. संततीच्या पालनपोषणाचे शिष्टाचार

१) संततीला अल्लाहची देणगी जाणा त्यांच्या जन्मावर आनंद साजरा करा. शुभ-मांगल्य आणि समृध्दीच्या दुआ-प्रार्थनेसह त्यांचे स्वागत करा आणि अल्लाहचे आभार माना की त्याने तुम्हाला आपल्या एका दासाच्या पालनपोषणाची सुबुध्दी प्रदान केली आणि ही संधी दिली की तुम्ही आपल्या पश्चात लोक-परलोकाचा उताराधिकारी म्हणून सोडून जावे.

२) अपत्य नसेल तर अल्लाहजवळ नेक सदाचारी संततीकरिता दुआ करा. ज्याप्रमाणे अल्लाहचे पैगंबर जकरिया (अ.) यांनी सदाचारी संततीकरिता दुआ केली. कुरआनात उल्लेख आहे,

"हे प्रभू! आपल्या सामर्थ्याने मला प्रामाणिक संतान प्रदान कर, तूच प्रार्थना ऐकणारा आहेस." *(दिव्य कुरआन, ३:३८)*

३) मूल जन्मल्यावर कधीही मनात संकोच आणू नका. खाण्या-पिण्यात तंगी किंवा स्वास्थ्यात बिघाड अथवा अन्य एखाद्या कारणाने मूल जन्मल्यावर कुढत बसण्यापासून किंवा त्याला आपल्या हक्कात एक संकट समजण्यापासून कटाक्षाने दूर राहा.

४) मूल कदापि वाया घालवू नका. जन्माआधी किंवा जन्मानंतर मूल वाया घालवणे निकृष्ट दर्जाची संकुचित मनोवृत्ती, भयंकर अत्याचार, मोठा भेकडपणा आणि दोन्ही जगांचा सर्वनाश आहे. अल्लाहचे फर्मान आहे,

"खचितच नुकसानीत आले ते लोक ज्यांनी आपल्या मुलांना अज्ञानाने व नादानपणे ठार केले." *(दिव्य कुरआन, ६:१४०)*

अल्लाहने मानवी संकुचित दृष्टीचे हृदयस्पर्शी उत्तर देताना स्पष्टत: मनाई केली आहे की संततीला अकारण ठार करू नका.

"आपल्या संततीला दारिद्र्याच्या भीतीने ठार करू नका. आम्ही त्यांनाही उपजीविका देऊ आणि तुम्हालासुद्धा. वस्तुत: त्यांना ठार करणे एक मोठा अपराध आहे." *(दिव्य कुरआन, १७:३१)*

एकदा एका सहाबीने विचारले, हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! सर्वात मोठा अपराध कोणता? फर्माविले, दुसऱ्याला अल्लाहसमान लेखणे, विचारले, यानंतर? फर्माविले, माता- पित्याची अवज्ञा, पुन्हा विचारले, यानंतर? फर्माविले, तुम्ही आपल्या संततीला या भयाने ठार करावे की ती तुमच्यासोबत खाईल."

५) प्रसवसमयी जन्म देणाऱ्याजवळ आयतुल कुर्सी आणि सूरह आराफच्या निम्नलिखित दोन आयतींचे पठण करा आणि सूरह फलक आणि सूरह नासचे वारंवार पठण करून फुंकत जा.

"अल्लाहु ला इला-ह इल्ला हुव अल हय्युल कय्यूम, ला ताखुजुहू सि-न तुवँ व ला नौम लहू मा

फ़िस्समावाति व मा फ़िल अर्ज़, मन ज़ल्लज़ी यशफ़उ इन-दहू इल्ला बिइज़्निहि यअ-लमु मा बै-न ऐदीहिम वमा ख़ल-फ़हुम वला युहीतू-न बिशैइम मिन इल्मिही इल्ला बिमाशा-अ, वसि-अ कुर्सीयुहुस्समावाति वल अर-ज़ वला यऊदुहू हिफ़्ज़ु हुमा व हुवल अलीयुल अज़ीम."

"अल्लाह तो चिरंतनजीवी आहे ज्याने तमाम सृष्टीचा भार सांभाळलेला आहे, त्याच्याशिवाय इतर कोणीही ईश्वर नाही, तो झोपतही नाही आणि त्याला झोपेची गुंगीही येत नाही, पृथ्वी आणि आकाशांत जे काही आहे त्याचेच आहे. असा कोण आहे जो त्याच्या पुढे त्याच्या परवानगीशिवाय शिफारस करू शकेल? जे काही दासांच्या समक्ष आहे त्यालाही तो जाणतो आणि जे काही त्यांच्यापासून अदृश्य आहे त्यालाही तो जाणतो आणि त्याच्या माहितीपैकी कोणतीही गोष्ट त्यांच्या बुद्धिकक्षेत येऊ शकत नाही याव्यतिरिक्त की एखाद्या गोष्टीचे ज्ञान तो स्वत:च त्यांना देऊ इच्छित असेल. त्याचे राज्य आकाश आणि पृथ्वीवर पसरले आहे, आणि त्यांचे संरक्षण काही त्याला थकवून सोडणारे काम नव्हे. फक्त तोच एकटा महान व श्रेष्ठ आहे." *(दिव्य कुरआन, २:२५५)*

**सूरह आराफच्या दोन आयती या आहेत.**

**"इन-न रब्बकुमुल्लाहुल्लज़ी ख़-ल-क़स्समावाति वल अर-ज़ फ़ी सित्तति अय्यामिन सुम्मस-तवा अलल अर्श, युग़शिल लैलन्नहा-र यतलुबुहू हसीसँव वश्शम-स वल क़-म-र वन्नुजू-म मुसख़्ख़रातिम बिअमरिही, अला लहुल ख़ल्कु वल अम्र, तबारकल्लाहु रब्बुल आ-लमीन उद-ऊ रब्बकुम त-ज़र्रु अवँ-व खुफ़्य: इन्नहूला युहिब्बुल मुअ-तदीन."**

"वस्तुत: तुमचा पालनकर्ता अल्लाहच आहे ज्याने आकाशांना व पृथ्वीला सहा दिवसांत निर्माण केले,मग आपल्या सिंहासनावर (अर्श) विराजमान झाला. जो रात्रीला दिवसावर झाकतो व परत दिवस रात्रीच्या पाठीमागे धावत येतो. ज्याने सूर्य, चंद्र व तारे निर्माण केले, सर्व त्याच्या आदेशाच्या अधीन आहेत. सावध रहा त्याचीच सृष्टी आहे व त्याचाच हुकूम आहे. फार समृद्धशाली आहे अल्लाह, सर्व विश्वाचा मालक व पालनकर्ता. (५५) आपल्या पालनकर्त्याला हाक मारा विनवणी करून आणि मौनपणे. खचितच तो मर्यादांचे उल्लंघन करणाऱ्याला पसंत करीत नसतो." *(दिव्य कुरआन, ७:५४-५५)*

६) **जन्मानंतर स्नान घालून उजव्या कानात अजान आणि डाव्या कानात इकामतची वचने म्हणा. जेव्हा माननीय हुसैन (रजि.) यांचा जन्म झाला तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अजान व इकामतीचे बोल उच्चारले.** (तबरानी)

**पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे ही फर्माविले की "ज्याच्या घरी मूल जन्मास येईल आणि तो जन्मास आलेल्या मुलाच्या उजव्या कानात अजान आणि डाव्या कानात इकामत म्हणेल तर ते मूल 'उम्मुस्सिबयान' (या आजारात मुले बेशुध्द होतात, त्या आजाराच्या)**

त्रासापासून सुरक्षित राहील." (अबु यअला इब्ने सुन्नी)

जन्मताक्षणीच मुलाच्या कानात अल्लाह आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांचे नाव बोलण्यात फार मोठे दुध्दिकौशल्य आहे. अल्लामा इब्ने कय्यिम आपल्या "तोहफतुलवदूद" या पुस्तकात फर्मावितात,

"याचा अर्थ असा की माणसाच्या कानात सर्वात प्रथम अल्लाहच्या महानतेचा स्वर पोहचावा आणि ज्या साक्षीला तो विचारपूर्वक अदा केल्यानंतर इस्लाममध्ये दाखल होईल. त्याची ताकीद जन्मदिवसापासूनच केली जावी. ज्याप्रमाणे मृत्युसमयी त्याला एकेश्वरत्त्वादाच्या वचनाची ताकीद केली जाते. अजान आणि इकामतचा दुसरा फायदा हाही आहे की सैतान जो टपून बसलेला असतो आणि इच्छितो की जन्म होताच माणसाला कसोटीत टाकावे, अजान ऐकताच पळ काढतो आणि सैतानाच्या आवाहना आधी नवजात अर्भकाला इस्लाम आणि अल्लाहच्या उपासनेचे आवाहन केले जाते."

७) अजान व इकामतनंतर एखाद्या नेक पुरुष किंवा स्त्रीद्वारे तहनीक करा म्हणजे खजूर वगैरे दातांनी चावून मुलाच्या डोक्यावर मध्यभागी लावा आणि मुलाकरिता भलाईची व समृध्दीची दुआ करा व इतरांनाही करायला सांगा.

माननीय अस्मा (रजि.) फर्मावितात की अब्दुल्लाह बिन जुबैर (रजि.) जेव्हा जन्मले तेव्हा मी त्यांना पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या मांडीवर दिले. पैगंबरांनी खुरमा मागविला आणि दातांनी चावून शुभकाळ अब्दुल्लाह बिन जुबैर यांच्या तोंडास लावली आणि खुरमा त्यांच्या टाळ्यावर लावला मग भलाई व समृध्दीची दुआ केली.

माननीय आएशा (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ नुकतेच जन्मलेली मुले आणली जात. पैगंबर मुहम्मद (स.) तहनीक करीत आणि त्यांच्यासाठी भलाई व समृध्दीची दुआ करीत. (हदीस : मुस्लिम)

माननीय इमाम अहमद बिन हंबल यांच्या घरी मूल जन्मास आले तर त्यांनी त्याच्या तहनीक विधीकरिता मक्केची खजूर मागविली, जी त्यांच्या घरात होती आणि एक नेक स्त्री उम्मे अली (रजि.) यांना तहनीक करण्याची विनंती केली.

८) मुलाकरिता एखादे चांगले नाव ठेवा, जे एक तर पैगंबरांचे नावावर असावे किंवा अल्लाहच्या नावापुढे अब्द (दास-गुलाम) लावून बनविलेले असावे. उदा. अब्दुल्लाह, अब्दुर्रहमान वगैरे

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"कयामतच्या दिवशी तुम्हाला आपापल्या नावांनी पुकारले जाईल. यास्तव उत्तम नावे ठेवा." (हदीस : अबू दाऊद)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले, अल्लाहला तुमच्या नावांपैकी अब्दुल्लाह आणि

अब्दुर्रहमान ही नावे सर्वाधिक पसंत आहेत. आणि पैगंबरांनी हेही सांगितले, पैगंबरांच्या नावावर आपली नावे ठेवा.

बुखारी या हदीस संकलनातील उल्लेखानुसार पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"माझ्या नावावर नाव ठेवा. माझ्या वंश-गोत्रावर ठेवू नका."

९) जर कधी नकळत चुकीचे नाव ठेवले गेले असेल तर ते बदलून चांगले व योग्य नाव ठेवा. पैगंबर मुहम्मद (स.) चुकीचे नाव बदलून टाकत असत. माननीय उमर (रजि.) यांच्या एका कन्येचे नाव आसिया होते. पैगंबरांनी ते बदलून जमीला नाव ठेवले. (हदीस : मुस्लिम)

माननीय जैनब अबू सलमा यांची कन्या होती. तिचे नाव प्रथम बिर्रा होते. बिर्राचा अर्थ आहे "पावित्र्यशील" पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हे ऐकल्यावर सांगितले,

"स्वत:च आपल्या पावित्र्यशीलतेचा दावा करते? लोक म्हणाले, मग काय नाव ठेवावे? पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, "जैनब" नाव ठेवा." (हदीस : अबू दाऊद)

१०) सातव्या दिवशी अकीका करा. मुलातर्फे दोन बोंकड आणि मुलीच्यातर्फे एक बोकड द्या. परंतु मुलातर्फे दोन बोकड देणे अत्यावश्यक नाही. एक बोकडही देऊ शकता आणि मुलाचे केश वपन करून त्याच्या वजना इतके सोने किंवा चांदी दान द्या, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"सातव्या दिवशी मुलाचे नामकरण केले जावे आणि त्याचे केश वपन करून त्याच्यातर्फे अकीका केला जावा." (हदीस : तिर्मिजी)

**(अकीकाची दुआ पुढे पाहा)**

११) सातव्या दिवशी खतना विधीही करा. परंतु काही कारणाने शक्य नसल्यास सात वर्षे वयाच्या आत अवश्य करून घ्या. खतना इस्लामी लक्षण आहे आणि स्वच्छता व आरोग्याच्या दृष्टीनेही उत्तम आहे.

१२) जेव्हा मूल बोलायला लागेल तर सर्वात प्रथम त्याला 'ला इलाह इलल्लाह' शिकवा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे -

"जेव्हा तुमची मुले बोलायला लागतील, तेव्हा त्यांना

"ला इलाह इलल्लाह" बोलायला शिकवा मग पर्वा करू नका की केव्हा मरतील आणि जेव्हा दुधाचे दात पडतील तेव्हा नमाजचा आदेश द्या." (इब्ने सुन्नी)

हदीस वचनात हाही उल्लेख आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या कुटूंबात जेव्हा एखाद्या मुलाला वाचा फुटत असे. तेव्हा पैगंबर त्याला सूरह फुर्कानची दुसरी आयत शिंकवीत,

ज्यात तौहीद (एकेश्वरत्त्व) ची शिकवण मोठ्या खूबीसह सामावलेली आहे -

“अल-लजी लहू मुस्कुस्समावाति वल अर्ज़ि व लम यत-तख़िज़ वल-दवँ-व लम यकुल्लहू शरीकुन फ़िल मुल्कि व ख़-ल-क़ कुल शैइन फ़-क़द-द-रहू तक़दीरा.”

“तो जो पृथ्वी व आकाशांचा स्वामी आहे ज्याने कोणाला पुत्र बनविलेले नाही, साम्राज्यामध्ये ज्याच्याबरोबर कोणीही भागीदार नाही, ज्याने प्रत्येक वस्तू निर्माण केली, मग तिचे एक मोजमाप (तकदीर) निश्चित केले.” *(दिव्य कुरआन, २५:२)*

१३) मुलास आपले दूध पाजा. मातेवर मुलाचा हा हक्क आहे. कुरआनने संततीला मातेच्या याच उपकाराची आठवण करून देऊन मातेशी असाधारण सद्व्यवहार करण्याची ताकीद केली आहे. मातेचे कर्तव्य हे की तिने आपल्या बाळाला दुधाच्या एकेक थेंबासोबत तौहीद (एकेश्वरत्त्व) चा पाठ, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याविषयी निष्ठा आणि प्रेम आणि धर्मप्रेमही पाजावे आणि या प्रेमास त्याच्या अंत:करणात खोलवर रूजविण्याचा प्रयत्न करावा. पालनपोषणाची, संगोपनाची जबाबदारी पगारदार आयावर सोपवून आपले ओझे हलके करू नका. किंबहुना या उत्तम धार्मिक कर्तव्यास स्वत: पार पाडून मानसिक शांती व समाधान प्राप्त करा.

१४) मुलांना शांती व समाधान प्राप्त करा. दहशत आयुष्यभर मन मस्तिष्कावर पसरलेली राहते आणि अशी मुले सामान्यत: जीवनात काही महान कार्य करण्यायोग्य राहात नाही.

१५) मुलांना एवढ्या-तेवढ्या गोष्टींवर सतत दाट-दपट करणे, झिडकारणे आणि बरेवाईट बोलण्याचे कटाक्षाने टाळा आणि त्यांच्या दोष-उणीवांवर उद्विग्न होण्याऐवजी आणि त्यांचा तिटकारा करण्याऐवजी पूर्ण बुध्दिकौशल्याने त्यांच्यात योग्य तो सुधार आणण्याचा प्रेमपूर्ण प्रयत्न करा. आपल्या कार्याने त्यांच्या बुध्दीवर हे भय अवश्य प्रभावी राखा की त्यांचे कोणतेही शरीअतविरोधी कृत्य तुम्ही मुळीच सहन करणार नाहीत.

१६) मुलांशी नेहमी प्रेमाचे व नरमीचे वर्तन राखा आणि गरज आणि पात्रतेनुसार त्यांच्या गरजा भागवून त्यांना आनंदीत राखा आणि त्यांच्यात आज्ञापालनाची भावना वाढवा.

एकदा माननीय मुआविया (रजि.) यांनी अहनफ बिन कैस (रजि.) यांना विचारले, सांगा, संततीच्या संदर्भात कसे वर्तन असावे?” अहनफ बिन कैस म्हणाले,

“हे ईमानधारकांचे प्रमुख! संतती आमच्या मनाचे फळ आहे. कमरेचा टेका आहे. आमचे स्वरूप त्यांच्यासाठी जमिनीसारखे आहे, जी अतिशय मृदु आणि अहानिकारक आहे. आणि आमचे अस्तित्व त्यांच्याकरिता पसरलेल्या आकाशासमान आहे आणि आम्ही यांच्याचद्वारे मोठमोठी कामे पार पाडण्याची हिंमत करतो. म्हणून जर हे तुमच्याजवळ काही मागतील तर त्यांना भरपूर द्या आणि जर कधी ते उदास होतील तर त्यांचे दु:ख दूर करा. परिणामी ते तुमच्याशी प्रेम राखतील तुमचे पिता या नात्याने केलेले प्रयत्न पसंत करतील

आणि कधीही त्यांच्यावर असह्य ओझे बनू नका, की त्यांना तुमच्या जीवनाचा कंटाळा यावा आणि त्यांनी तुमच्या मृत्युची इच्छा धरावी. तुमच्याजवळ येण्याचा तिटकारा करावा."

माननीय मुआविया (रजि.) यांच्यावर या कथनाचा मोठा प्रभाव पडला आणि त्यांनी सांगितले,

"अहनफ! अल्लाहची शपथ! ज्या वेळी आपण माझ्याजवळ येऊन बसलात, मी यजीदच्या विरुध्द क्रोधायमान होऊन बसलो होतो."

मग जेव्हा माननीय अहनफ परत गेले, तेव्हा माननीय मुआविया यांचा राग शांत झाला आणि ते यजीदशी राजी झाले आणि त्याच क्षणी त्यांनी यजीदला दोनशे दिरहम आणि दोनशे घोडे पाठविले. यजीदजवळ जेव्हा-जेव्हा हे भेट नजराणे पोहचले तेव्हा यजीदने दोन समान भागांत वाटणी करून शंभर दिहरम व शंभर घोडे माननीय अहनफ बिन कैस (रजि.) यांच्या सेवेत पाठविले.

१७) लहान मुलांच्या डोक्यावरून प्रेमाने हात फिरवा, त्यांना कवेत घ्या, स्नेह प्रेम करा, त्यांच्याशी खेळा उठता-बसता सक्त आणि कडक स्वभावाचे शासक बनू नका, कारण अशाने मुलांच्या मनात माता-पित्याकरिता प्रेमाची अथांग भावना निर्माण होत नाही. त्यांच्या अंगी आत्म-विश्वासही निर्माण होत नाही आणि त्यांच्या स्वाभाविक पालनपोषणावरही चांगला प्रभाव पडत नाही.

एकदा माननीय अकरा बिन हाबिस (रजि.) पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ आले. पैगंबर मुहम्मद (स.) त्यावेळी माननीय हसन (रजि.) यांचा लडीवाळ करत होते. अकरा यांना पाहून आश्चर्य वाटले आणि म्हणाले,

'हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! तुम्हीदेखील लहान मुलांवर प्रेम करता? माझी तर दहा मुले आहेत, परंतु मी कधी कोणाचा लडीवाळ केला नाही. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अकरा (रजि.) कडे पाहिले आणि सांगितले, जर अल्लाहने तुमच्या मनातून दया-प्रेम काढून टाकले आहे, तेव्हा मी काय करू शकतो?"

माननीय उमर फारुक (रजि.) यांच्या काळात माननीय आमिर (रजि.) एका उच्चपदावर होते. एकदा माननीय उमर (रजि.) यांना भेटण्याकरिता त्यांच्या घरी पोहोचले. पाहतात तर माननीय उमर (रजि.) पहुडले आहेत, आणि लाहन मुले छातीवर बसून खेळत आहेत. माननीय आमीर (रजि.) हे काहीसे अवघड वाटले. ईमानधारकांचे प्रमुखांनी त्यांच्या चेहऱ्यावरचे हावभाव पाहून त्यांना अप्रिय वाटल्याचे जाणले आणि माननीय आमीर (रजि.) यांना म्हणाले, "सांगा तुमचे आपल्या मुला-बाळांशी कसे वर्तन असते?"

आमिर यांना बोलण्याची संधी मिळाली म्हणाले, हे ईमानधारकांचे प्रमुख! जेव्हा मी घरात

प्रवेश करतो, तेव्हा कुटुंबीयांवर नि:स्तब्धता पसरते. सर्व आपापल्या ठिकाणी श्वास रोखून गप्प बसतात. माननीय उमर (रजि.) यांनी मोठ्या कारूण्याने म्हटले,

"आमिर! तुम्ही मुहम्मदी सम्प्रदायाचे सुपुत्र असतानाही एवढे जाणत नाही की ईमानधारकांने आपल्या कुटूंबीयांशी कशा प्रकारे नरमी व प्रेमाने वागले पाहिजे."

१८) संततीला पावित्र्यपूर्ण शिकवण व संस्कारांनी सुशोभित करण्याकरिता आपले सर्व प्रयत्न खर्ची घाला आणि या मार्गात मोठ्यात मोठा त्याग देण्यास कचरू नका. ही आपली धार्मिक जबाबदारी आहे. संततीशी फार मोठा अनुग्रह आणि स्वत:शी सर्वांत मोठी भलाईदेखील.

पवित्र कुरआनातील उल्लेख असा,

"हे लोकहो! ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, वाचवा स्वत:ला आणि आपल्या कुटुंबियांना त्या अग्नीपासून जिचे इंधन मनुष्य आणि दगड असतील," *(दिव्य कुरआन, ६६:६)*

अर्थात जहन्नमच्या आगीपासून (नरकाग्नी) बचाव करण्याचा एकमेव मार्ग हा की माणसाला धर्माचे आवश्यक ते ज्ञान असावे आणि त्याचे जीवन अल्लाह आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आज्ञापालनानुसार पार पडत असावे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"पिता आपल्या संततीला जे काही देऊ शकतो, त्याच सर्वोत्तम उपहार संततीचे चांगली शिकवण आणि चांगले संस्कार होत." (हदीस : मिश्कात)

आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले की जेव्हा मनुष्य मरण पावतो तेव्हा त्याचे आचरण समाप्त होते, परंतु तीन प्रकारची कर्मे अशी आहेत की त्यांचा मोबदला व पुण्य मेल्यानंतरही लाभत राहते.

१) सदका ए जारिया (सातत्यशील दान).

२) ते ज्ञान ज्याचा लोकांनी सदैव लाभ घेत राहावा.

३) नेक-सदाचारी संतती, जी पित्याकरिता दुआ प्रार्थना करीत राहील(हदीस : मुस्लिम)

वास्तविक संततीच तुमच्या पश्चात तुमच्या धार्मिक परंपरा, धार्मिक शिक्षण आणि एकेश्वरत्त्वाच्या संदेशाला जिवंत राखण्याचे माध्यम आहे आणि ईमानधारक सदाचारी संततीची आकांक्षा अशासाठी करतो की त्या संततीने त्याच्या पश्चात त्याचा संदेश जिवंत राखावा.

१९) मुले जेव्हा सात वर्षांची होतील तर त्यांना नमाज पढणे शिकवा, नमाजची ताकीद करा आणि आपल्यासोबत मशिदीत नेऊन आवड निर्माण करा आणि जेव्हा ती दहा वर्षाची

होतील आणि नमाज पढण्यात टाळाटाळ करतील तर त्यांना योग्य ती शिक्षा द्या, तसेच आपल्या बोलण्या-वागण्याने दाखवून द्या की तुम्ही नमाजबाबत टाळाटाळ करणे सहन करणार नाही.

२०) वयाच्या दहाव्या वर्षी मुलांचे अंथरूण वेगळी करा आणि प्रत्येकाला वेगवेगळ्या खाटेवर झोपवा. याबाबत पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे की,

"आपल्या मुला-मुलींना नमाज पढण्याची ताकीद करा, जेव्हा ते सात वर्षांचे होतील आणि नमाजसाठी त्यांना शिक्षा द्या जेव्हा ते दहा वर्षांचे होतील आणि या वयास पोहचल्या नंतर त्यांची अंथरूणे वेगळी करा."

२१) मुलांना नेहमी साफ-स्वच्छ राखा. त्यांच्या स्वच्छतेची स्नान वगैरेची काळजी घ्या. त्यांचे कपडेही स्वच्छ राखा. परंतु अधिक शोभा-शृंगार, सजणे-सवरणे व लोकांना दाखविण्यापासून स्वत:ही दूर राहा आणि मुलांनाही दूर ठेवा. मुलींचे कपडे फार साधे ठेवा आणि भडकदार कपडे नेसवून मुलांचा स्वभाव बिघडवू नका.

२२) इतरांच्या समोर मुलांचे व्यंग दोष काढू नका आणि कोणाच्याही समोर त्यांना लज्जित करू नका आणि त्यांच्या स्वाभिमानाला ठेच पोहचविण्यापासून कटाक्षतेने दूर राहा.

२३) मुलांच्या समोर कधीही त्यांच्यात सुधारणाबाबत निराशा दाखवू नका, किंबहुना त्यांची हिंमत वाढविण्यासाठी त्यांच्या मामूली गुणांची मनापासून कदर करा, नेहमी त्यांच्यात हिंमत व आत्मविश्वास वाढविण्याचा प्रयत्न करा. यासाठी की त्यांनी जीवनाच्या मैदानात मोठ्यात मोठे स्थान प्राप्त करू शकावे.

२४) मुलांना पैगंबरांचे किस्से, सदाचारी लोकांच्या कहाण्या, आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या निष्ठावान व निकटतम सहकाऱ्यांचे शौर्यपूर्ण गाथा अवश्य ऐकवित राहा. चांगले संगोपन व चांगले संस्कार घडविण्यासाठी आणि दीन (धर्मा)शी लगाव निर्माण करण्यासाठी हे अत्यावश्यक जाणा आणि हजारो कामे असतानाही याच्यासाठी वेळ काढा. त्यांना वारंवार उंच स्वरात चांगल्या प्रकारे कुरआनाचे पठण ऐकवा आणि प्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) यांची प्रभावपूर्ण वचनेही सांगा आणि सुरुवातीपासून त्यांच्या मनात पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याविषयी उत्कट प्रेम निर्माण करण्याचा प्रयत्न करा.

२५) कधी कधी मुलांच्या हातांनी गोरगरिबांना भोजन किंवा पैसे वगैरेचे दान द्या, यासाठी की त्यांच्या मनात गरीबांशी दयापूर्ण वर्तन आणि दान पुण्याची भावना निर्माण व्हावी आणि प्रसंगी असा अवसरही प्रदान करा की खाण्या पिण्याच्या वस्तू भाऊ-बहिणींनी आपसात वाटून घ्याव्यात. यासाठी त्यांना एकमेकांचे हक्क अदा करण्याची व न्यायपूर्ण वर्तनाची सवय व्हावी.

२६) मुलांची प्रत्येक उचित अनुचित जिद्द पूर्ण करू नका, उलट बुध्दिकौशल्याने त्यांची ही सवय

सोडविण्याचा प्रयत्न करा. प्रसंगी योग्य ती सक्तीही करा, तुमच्या अनुचित लाडाने त्यांना जिद्दी आणि बंडखोर बनवू नये.

२७) कडक आवाजात बोलण्यापासून आणि गळा फाडून आरडा-ओरडा करण्यापासून स्वत:लाही वाचवा आणि मुलांनाही सक्त ताकीद करा की त्यांनीही मध्यम आवाजात नरमीने बोलावे आणि आपसातही एकमेकांवर ओरडण्यापासून दूर राहावे.

२८) मुलांना स्वत:चे काम स्वत:च करायची सवय लावा. प्रत्येक कामात नोकरांची मदत घेऊ नये. अशाने मुले सुस्त, कामचोर आणि आळशी बनतात. मुलांना कष्टाळू, मेहनती आणि सक्त प्रयत्न करणारा बनवा.

२९) मुलांमध्ये आपसात भांडण झाल्यास मुलांचे अनुचित समर्थन करु नका. हा विचार राखा की ज्या भावना स्वत:च्या मुलांविषयी तुमच्या मनात आहेत, त्याच भावना इतरांच्या मनातही त्याच्या मुलांविषयी आहेत. तुम्ही नेहमी आपल्या मुलांच्या चुकांवर लक्ष ठेवा आणि प्रत्येक घडणाऱ्या अनपेक्षित घटनेत मुलाचा दोष शोधून हिकमतीने व सतत लक्ष देऊन त्यांच्यातील दोष-उणीव दूर करण्याचा प्रयत्न करा.

३०) आपल्या मुलांशी नेहमी समानतेची वागणूक करा आणि या संदर्भात मधला मार्ग अंगीकारण्याचा पुरेपूर प्रयत्न करा. जर स्वाभाविकपणे एखाद्या मुलांकडे जास्त झुकाव असेल तर नाइलाज आहे. परंतु वागणूक व संगोपन आणि देण्या-घेण्यात नेहमी न्याय व समानतेची काळजी राखा आणि कधीही कोणा एकाशी भेदभाव करणारे वर्तन राखू नक, जे इतर मुलांना जाणवेल. अशाने इतर मुलांमध्ये हीनभाव, घृणा, नैराश्य आणि शेवटी विद्रोहाची भावना निर्माण होईल आणि या वाईट भावना, स्वाभाविक योग्यता वाढीस लागण्यात फार मोठा अडथळा आणि नैतिक उन्नतीला नष्ट करणाऱ्या विषवल्ली आहेत.

एकदा माननीय नोमान (रजि.) यांचे पिता माननीय बशीर (रजि.) आपल्या मुलास सोबत घेऊन हजर झाले आणि म्हणाले, हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! माझ्याजवळ एक गुलाम होता. त्याला मी आपल्या मुलाला देऊन टाकले. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विचारले, काय तुम्ही आपल्या प्रत्येक मुलाला एक एक गुलाम दिला आहे, बशीर म्हणाले नाही. हे ऐकून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले या गुलामास परत घ्या आणि सांगा अल्लाहचे भय बाळगा आणि आपल्या मुलांशी समानता पूर्ण व्यवहार करा. आता माननीय बशीर (रजि.) घरी परत आले आणि नोमानकडून आपला दिलेला गुलाम परत घेतला.

एका कथनानुसार पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"तर मग मला अपराधावर साक्षी बनवू नका कारण मी अत्याचाराचा साक्षीदार बनणार नाही." आणखी एका कथनात आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विचारले, "काय तुम्ही हे पसंत करता की सर्व मुलांनी तुमच्याशी सद्व्यवहार करावा," माननीय बशीर (रजि.)

म्हणाले, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! का नव्हे!" पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "तुम्ही असे करू नका."

३१) मुलांसमोर नेहमी चांगल्या आचरणाचा नमुना सादर करा. तुमचे जीवन मुलांकरिता सदैव एक मूकशिक्षक आहे. ज्याच्याकडून मुले सतत शिकत असतात. मुलांसमोर कधीही थट्टा-मस्करीतसुध्दा खोटे बोलू नका.

माननीय अब्दुल्लाह बिन आमिर (रजि.) आपला एक किस्सा सांगतात की एके दिवशी पैगंबर मुहम्मद (स.) यांचे आमच्या घरी आगमन झाले. माझ्या आईने मला बोलावले आणि म्हणाली, "इकडे ये मी तुला एक वस्तू देईन." पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हे ऐकले आणि विचारले, "तुम्ही मुलाला काय देऊ इच्छिता?" आई म्हणाली, "मी याला खजूर देऊ इच्छिते."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्या मातेला सांगितले,

"जर तुम्ही देण्याचा बहाणा करून बोलविले असते आणि मूल जवळ आल्यावर काहीच दिले नसते तर तुमच्या कर्म-लेखात खोटे बोलणे लिहिले गेले असते."

३२) मुलगी जन्मास आल्यावर तसाच आनंद साजरा करा, जसा मुलगा जन्मल्यावर साजरा करतात. मुलगी असो की मुलगा दोघेही अल्लाहची देणगी आहेत. अल्लाहच अधिक चांगले जाणतो की तुमच्यासाठी मुलगी चांगली आहे की मुलगा. मुलीच्या जन्मावर तोंड वेडे वाकडे करणे आणि मन दु:खी होणे हे खऱ्या ईमानधारकांचे लक्षण नाही. ही कृतघ्नता आहे आणि दयावान अल्लाहचा अपमानही हदीसमध्ये उल्लेख आहे,

"जेव्हा एखाद्याच्या घरी मुलगी जन्माला येते तेव्हा अल्लाह त्याच्या घरी फरिश्त्यांना पाठवितो. ते येऊन म्हणतात, हे घरातल्या लोकांनो! तुमच्यावर सलामती असो. ते मुलीला आपल्या पखांच्या छायेत घेतात आणि तिच्या डोक्यावर हात फिरवित म्हणतात की हा दुर्बल जीव आहे. जो एका दुर्बल जीवापासून जन्मली आहे. जो या मुलींची देखरेख व पालनपोषण करील, कयामतपावेतो अल्लाहची मदत त्याच्या पाठीशी राहील." (तबरानी)

३३) मुलींचे संगोपन व पालनपोषण मोठ्या आनंदी मनाने, मनापासून करा आणि त्याच्या मोबदल्यात अल्लाहकडून जन्नत (स्वर्ग) ची अभिलाषा धरा. याबाबत पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्या माणसाने तीन कन्या किंवा तीन बहिणींचे पालनपोषण केले, त्यांना शिकवून सुसंस्कृत बनवले आणि त्यांच्याशी दयापूर्ण व्यवहार केला. येथपावेतो की अल्लाहने त्यांना नि:स्पृह करावे, तर अशा माणसाकरिता अल्लाहने जन्नत आवश्यक ठरविली. त्यावर एक माणूस म्हणाला, "जर दोनच (मुली) असतील तर? पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, दोन मुलींच्या पालनपोषणाचाही हाच मोबदला आहे." माननीय इब्ने अब्बास (रजि.)

कथन करतात, जर लोकांनी एक मुलगीविषयी विचारले असते तरीही पैगंबरांनी त्या एकीबद्दलही हीच खूशखबरी दिली असती. (हदीस : मिश्कात)

माननीय आएशा (रजि.) यांचे निवेदन आहे की एक दिवस आपल्या दोन मुलींना घेऊन एक स्त्री माझ्याजवळ आली आणि तिने काही मागितले. माझ्याजवळ फक्त एकच खजूर होती. ती मी तिच्या हातावर ठेवली. त्या स्त्रीने खुजरीचे दोन तुकडे केले आणि अर्धी-अर्धी दोघां मुलींना वाटून दिली. आणि स्वत: काहीच खाल्ले नाही. त्यानंतर ती उठून उभी राहीली आणि निघून गेली. त्याचवेळी पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभागमन झाले. मी त्यांना हा वृत्तान्त सांगितला. ते ऐकून पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"जो मनुष्यदेखील मुलींच्या जन्माद्वारे अजमाविला जाईल अर्थात त्याची कसोटी घेतली जाईल आणि तो त्यांच्याशी सद्व्यवहार करून कसोटीत सफल होईल, तर या मुली त्यांच्यासाठी कयामतच्या दिवशी जहन्नम आगीपासून रक्षण करणारी ढाल बनतील."

(हदीस : मिश्कात)

३४) मुलीला तुच्छ लेखू नका. न मुलाला तिच्यावर कोणत्याही बाबतीत प्राधान्य द्या. दोघांशी समानरित्या प्रेम राखा आणि समान वर्तन करा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्याच्या घरी मुलगी जन्माला आली आणि त्याने अज्ञानकाळातील पध्दतीनुसार तिला (जिवंत) गाडले नाही आणि न तिला तुच्छ जाणले आणि न मुलाला तिच्या तुलनेत प्राधान्य दिले व उत्तम जाणले, तर अशा त्या माणसाला अल्लाह जन्नतमध्ये दाखल करील."

(हदीस : अबू दाऊद)

३५) सपत्ती व मिळकतीत मुलींचा निर्धारित हिस्सा पूर्णआनंदी मनाने व इतमामाने द्या. हा अल्लाहने अनिवार्य केलेला हिस्सा आहे. यात उण-अधिक करण्याचा कसलाही अधिकार नाही. मुलींचा हिस्सा देण्यात टाळाटाळ करणे किवा आपल्या हिशोबाने काहीतरी देऊन समाधान करून घेणे खऱ्या ईमानधारकांचे काम नव्हे. असे करणे अपहार आहे आणि अल्लाहच्या धर्माची अवहेलनाही.

३६) त्या समस्त कृतीशील उपाययोजनांसोबत मानसिक समाधान व अगदी अंत:करणापासून मुलामुलींसाठी दुआ (प्रार्थना) ही करीत राहा. अल्लाहतर्फे आशा आहे की तो माता-पित्याच्या अंत:करणापासून निघालेली कारूण्यपूर्ण दुआ-प्रार्थना विफल होऊ देणार नाही.

# २६. मैत्रीचे शिष्टाचार

१) मित्रांशी प्रेम राखा आणि मित्रांकरिता प्रेमाचे केंद्रस्थान बना. तो मनुष्य मोठा भाग्यशाली आहे ज्याला त्याचे मित्र प्रिय राखतात आणि तो मित्रांना प्रिय जाणत असेल आणि तो मनुष्य अतिवंचित आहे ज्याच्यापासून लोक उद्विग्न राहतात आणि तो लोकांपासून दूर पळतो. गरीब तो नव्हे, ज्याच्याजवळ धन संपत्ती नसावी, किंबहुना वस्तुत: सर्वाधिक गरीब तो आहे, ज्याचा कोणी मित्र नाही. मित्र जीवनाची शोभा, जीवनाच्या प्रवासाचा आधार आणि अल्लाहचे इनाम आहे. मित्र बनवा आणि मित्र बना.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"ईमानधारक डोक्यापासून पायापर्यंत प्रेमच प्रेम आहे आणि त्या माणसात सुरुवातीपासूनच कसलीही भलाई व गुणवत्ता नाही, जो न इतरांशी प्रेम करेल आणि न इतरही त्यांच्याशी प्रेम करतील." (हदीस : मिश्कात)

पवित्र कुरआनात आहे,

"ईमानधारक पुरुष आणि ईमानधारक स्त्रियाआपसात एकमेकांचे सहाय्यक आहेत."
*(दिव्य कुरआन, ९:७१)*

पैगंबर मुहम्मद (स.) आपल्या सहकाऱ्यांशी मोठ्या प्रेमाने वागत आणि प्रत्येकाला असे जाणवत असे की पैगंबर मुहम्मद (स.) सर्वात जास्त त्यालाच प्रिय जाणतात.

माननीय अम्र बिन आस (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) एवढे लक्ष देऊन व अगदी मनापासून माझ्याशी बोलत आणि एवढी आपुलकी राखत की मला वाटू लागले की मी आपल्या जनसमूहाचा कदाचित सर्वात उत्तम माणूस आहे. एक दिवस मी पैगंबर (स.) यांना शेवटी विचारले की "हे अल्लाहचे पैगंबर (स.)! मी श्रेष्ठ आहे की अबू बक्र?" पैगंबर (स.) यांनी सांगितले, "अबू बक्र श्रेष्ठ आहेत." मग मी विचारले, "मी श्रेष्ठ आहे की उमर?" पैगंबर म्हणाले, "उमर." मी पुन्हा विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर (स.)! मी श्रेष्ठ आहे की उस्मान?" सांगितले, "उस्मान!" मग मी पैगंबर (स.) कडून उघडपणे हकीगत जाणून घेतली आणि त्यांनी नि:पक्षपातीपणाने साफ-साफ सांगितले, तेव्हा मला आपल्या हरकतीची लाज वाटली आणि मी मनात विचार करु लागलो की, हे असले प्रश्न विचारण्याची मला काय आवश्यकता होती?

२) मित्रांशी मिळूनमिसळून स्नेह प्रेमाचे जीवन व्यतीत करा आणि सच्चा प्रेमाचे संबंध प्रस्थापित करण्याचा व त्यांना कायम राखण्याचा प्रयत्न करा. मित्रांशी तिरस्कार, उद्विग्नता आणि देत-घेत राहण्याची (स्वार्थीपणाची) वर्तणूक सोडून द्या. जेव्हा मनुष्य मित्रांशी मिळूनमिसळून राहतो आणि त्याच्या सुख-दु:खात सहभागी राहतो, तर परिणामस्वरूपी

त्याला वेगवेगळ्या प्रकारचा त्रास पोहचतो, कधी त्याच्या भावनांना ठेच पोहोचते तर कधी त्याच्या मान-प्रतिष्ठेला धक्का बसतो. कधी त्याच्या आरामात खंड पडतो तर कधी त्याच्या दैनंदीन कार्यक्रमावर परिणाम होतो. कधी त्याची इच्छा आणि ओढीविरुध्द काही गोष्टी समोर येतात. कधी त्याचा धैर्य संयम व सहनशक्तीची कसोटी घेतली जाते. कधी त्याला आर्थिक नुकसान पोहचते. परंतु जेव्हा तो मनुष्य या सर्व गोष्टींना सहन करतो तर त्याच्या मनात अशाने तेज निर्माण होते. चांगले नैतिक गुण वाढीस लागतात आणि तो संगोपन व आत्मशुध्दीच्या स्वाभाविक मजली पार पाडत आध्यात्मिक व नैतिक प्रगती साध्य करतो. त्याच्या अंगी सहनशीलता, त्याग, प्रेम, सहानुभूती, परोपकार, निष्ठा, हितचिंतन, सहकार्य, सचोटी, शौर्य आणि स्नेह दया इत्यादी मोठमोठ्या उच्च दर्जाच्या भावना निर्माण होतात आणि असा मनुष्य मानवसमाजाकरिता अगदी भलाई व समृध्दीकारक ठरतो. प्रत्येक मनात त्याच्यासाठी आदर भावना निर्माण होते आणि प्रत्येक मनुष्य त्याच्या अस्तित्वाला आपल्यासाठी ईशकृपेचे छत्र समजतो पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"जो ईमानधारक लोकांशी मिळून मिसळून राहतो आणि त्यांच्याकडून दिल्या जाणाऱ्या त्रासाला सहन करतो, तो त्या माणसापेक्षा कितीतरी पटींनी जास्त चांगला आहे. जो लोकांपासून विभक्त राहतो आणि त्यांच्याकडून पोहचणाऱ्या त्रासामुळे दु:खी मनाने राहतो." (हदीस : तिर्मिजी)

३) नेहमी नेक व सदाचारी लोकांशी मैत्री करा. मित्रांची निवड करताना ही गोष्ट अवश्य ध्यानी राखा की ज्या लोकांशी तुम्ही मानसिक संबंध वाढवित आहात ते धर्म आणि नैतिकतेच्या दृष्टीने तुमच्यासाठी कोठपावेतो लाभप्रद ठरू शकतात. एक प्रसिध्द कथन आहे, "जर एखाद्याचे चारित्र्य जाणून घ्यायचे असेल तर त्याच्या मित्रांच्या चारित्र्यावर नजर टाका आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

मनुष्य आपल्या मित्राच्या धर्मावर असतो यास्तव प्रत्येक माणसाने नीट विचार करून घ्यावा की तो कोणाशी मैत्री करीत आहे." (मुसनद अहमद, मिश्कात)

मित्राच्या धर्मावर असण्याचा अर्थ असा की जेव्हा तो मित्राच्या संगतीत बसेल तेव्हा मित्राच्या भावना व विचार, त्याच्या आवडी निवडी त्याच्याही अंगी निर्माण होतील. तसेच पसंत नापसंतीचे तेच मापदंड त्याचेही बनेल जे त्याच्या मित्राचे आहे. म्हणून प्रत्येक माणसाला दोस्ताची निवड करताना दक्षता बाळगली पाहिजे. मैत्रीचे नाते त्याच्याशीच जोडले पाहीजे ज्याची आवड- निवडी, विचारसरणी, आणि धावपळ ईमानच्या निकडीनुसार असेल. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ताकीद केली की ईमानधारकाशीच प्रेमाचे नाते मजबूत करा आणि त्याच्याच सोबत आपले खाणे-पिणे राखा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ईमानधारकाच्याच सहवासात राहा आणि तुमच्या भोजनावळीत चादरीवर अल्लाहचे भय राखून वागणाऱ्यानेच भोजन करावे."

एक दस्तरख्वान (ते कपडा ज्यावर भोजनाचे ताट ठेवून जेवण करतात) वर बसून खाण्या-पिण्यामुळे मानसिक संबंध व प्रेम स्वाभाविकपणे निर्माण होते. अर्थात हे संबंध व प्रेम त्याच माणसाशी असले पाहिजे जो अल्लाहचे भय राखून दुराचारापासून दूर राहणारा असेल. अल्लाहशी बेपर्वा, बेजबाबदार, कर्मशून्य आणि चरित्रहीन लोकांपासून सदैव दूर राहा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी चांगल्या व वाईट मित्राशी संबंधाच्या अवस्थेस एक चांगले उदाहरण देऊन वर्णन केले आहे.

"चांगल्या आणि वाईट मित्राचे उदाहरण केशर (कस्तुरी) विकणाऱ्या आणि भट्टी पेटविणाऱ्या (लोहारा) सारखे आहे. कस्तुरी विकणाऱ्याच्या संगतीने तुम्हाला काही लाभ निश्चितच होईल. तुम्ही एकतर कस्तुरी खरेदी कराल किंवा कस्तुरीचा सुगंध तरी प्राप्त कराल, परंतु लोहाराची भट्टी तुमचे घर किंवा कपडे जाळून टाकील किंवा तुमच्या डोक्यात तिचा दुर्गंध पोहोचेल." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

अबू दाऊदमधील हदीसचे शब्द असे आहेत,

"नेक सदाचारी मित्राचे उदाहरण असे आहे, जणू कस्तुरी विक्रेत्याचे दुकान, की आणखी काही लाभ होवो न होवो, तिचा सुगंध अवश्य मिळेल आणि वाईट मित्राचे उदाहरण असे जणू एखादी भट्टी की तिच्यापासून आग लागत नसली तरी धुराने कपडे जरूर काळे पडतील."

४) मित्रांशी केवळ अल्लाहसठी खातीर प्रेम करा अल्लाहचे प्रिय दास तेच होत जे अल्लाहच्या धर्माच्या आधारे आपसात मिळतात आणि खांद्याशी खांदा आणि मनाशी मनाला जोडून अशा प्रकारे धर्मास प्रस्थापित करण्याची व त्याच्या रक्षणाची जबाबदारी पार पाडतात की ते शिसे ओतलेली भिंत वाटतात.

"अल्लाहला तर प्रिय ते लोक आहेत जे त्याच्या मार्गात अशाप्रकारे फळी बांधून एक दिलाने लढतात जणूकाय ते शिसे पाजलेली भिंत असावेत." *(दिव्य कुरआन, ६१:४)*

"कयामतच्या दिवशी अल्लाह सांगेल की ते लोक कोठे आहेत जे केवळ माझ्याकरिता प्रेम राखत होते. आज मी त्यांना आपल्या छायेत जागा देईन." (हदीस : मुस्लिम)

आणि कयामतच्या दिवशी अशा लोकांना जे ईर्ष्या करण्यायोग्य असतील, त्यांचा उल्लेख करताना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाहच्या दासांपैकी काही असे (भाग्यवान) आहेत, जे पैगंबर आणि शहीद तर नाहीत, परंतु कयामतच्या दिवशी अल्लाह त्यांना असे उच्च दर्जे प्रदान करील की पैगंबर आणि

शहीददेखील त्यांच्या दर्ज्यांवर ईर्ष्या करतील, पैगंबरांच्या निकटतम सहकाऱ्यांनी विचारले, "हे कोण भाग्यवान असतील, हे अल्लाहचे पैगंबर?"

त्यावर पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले -

"हे ते लोक होत जे आपसात एकमेकांशी केवळ अल्लाहच्या धर्माच्या आधारावर प्रेम करीत असत. न ते आपसात नातेवाईक होते, न त्यांच्या दरम्यान कसले आर्थिक देण्याघेण्याचा संबंध होता. अल्लाह शपथ! कयामतच्या दिवशी त्यांचे चेहरे तेजाने चकाकत असतील, किंबहुना हे नखशिखान्त तेज पुंज असतील आणि जेव्हा लोक भयकंपित होतील आणि सारेजण दु:खात असती. अशा वेळी यांना किंचित मात्र दु:ख नसेल."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पवित्र कुरआनातील या आयतीचे पठण केले,

"ऐका, जे अल्लाहचे मित्र आहेत, ज्यांनी श्रद्धा ठेवली व ज्यांनी ईशपरायण वर्तन अंगिकारले, त्यांच्याकरिता कसलेच भय अथवा दु:खाचा प्रसंग नाही,"

*(दिव्य कुरआन, १०:६२-६३)*

माननीय अबू दर्दा (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"कयामतच्या दिवशी काही लोक आपल्या कबरीमधून येतील आणि त्यांचे चेहरे तेजाने चकाकत असतील. ते मोत्यांच्या मिंबर (उंचासना) वर बसविले जातील. लोक त्यांच्या या शान व प्रतिष्ठेवर ईर्ष्या करतील. हे लोक न पैगंबर असतील, न शहीद." एका ग्रामीण अरबने विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर (स.)! हे कोणते लोक आहेत आम्हाला यांची ओळख करून द्या." सांगितले, "हे ते लोक आहेत, जे आपसात केवळ अल्लाहकरिता प्रेम राखतात."

(तबरानी)

५) सदाचारी लोकांशी प्रेमाला आखिरतची मुक्ती आणि अल्लाहच्या प्रसन्नतेचे साधन जाणा आणि अल्लाहजवळ दुआ करा की हे अल्लाह! नेक सदाचारी लोकांचे प्रेम प्रदान कर आणि आमचा नेक लोकांमध्ये समावेश कर. माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) कथन करता, एक मनुष्य पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झाला आणि म्हणाला, हे अल्लाहचे पैगंबर! एक मनुष्य एखाद्या सदाचारी माणसाशी त्याच्या नेकी, सदाचारामुळे प्रेम राखतो, परंतु स्वत: त्या नेक माणसासारखे चांगले आचरण करीत नाही? त्यावर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, काही हरकत नाही! मनुष्य कयामतच्या दिवशी त्याच्याच सोबत असेल ज्याच्याशी तो प्रेम राखत असेल." (हदीस : बुखारी)

एका रात्री पैगंबर मुहम्मद (स.) यांना अल्लाहचे दर्शन घडले. अल्लाहने पैगंबर मुहम्मद (स.) यांना सांगितले, "मागा." तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ही दुआ मागितली -

"अल्लाहुम-म इन्नी अस-अलु-क फ़िअ-लल ख़ैराति व तर्कल मुन-कराति व हुब्बल मसाकी-न व अन तग़फ़ि-र-ली व तर-ह-म-नी व इज़ा अ-र-त्त फ़ित-न-तन फ़ी क़ौमिन फ़-त-वफ़्फ़नी ग़ै-र मफ़्तूनिन व अस-अलु-क हुब्ब-क व हुब-ब मँय्युहिब्बु-क व हुब-ब अ-मलियँ युक़र्रिबुनी इला हुब्बिक." (हदीस : मुस्नद अहमद)

"हे अल्लाह ! मी तुझ्याकडून सत्कर्मांची सुबुध्दी इच्छितो आणि दुष्कर्मांपासून दूर राहण्याची शक्ती मागतो आणि गरीबांशी प्रेम इच्छितो आणि हे की तू मला क्षमा कर आणि माझ्यावर दया कर आणि जेव्हा तू एखाद्या जनसमूहाला प्रकोपग्रस्त करण्याचे ठरवशील, तेव्हा मला अशा स्थितीत उठव (मृत्यु दे) की मी त्या (प्रकोपा)पासून सुरक्षित राहावे आणि मी तुझ्याजवळ तुझ्या प्रेमाची याचना करतो आणि त्या माणसाच्या प्रेमाची याचना करतो, जो तुझ्याशी प्रेम राखतो आणि त्या आचरणाची सुबुध्दी मागतो जी तुझ्या सामीप्याचे साधन असेल."

माननीय मुआज बिन जबल (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"सर्वश्रेष्ठ अल्लाहचे सांगणे आहे की माझ्यावर हे बंधनकारक आहे की मी त्या लोकांशी प्रेम राखावे जे माझ्याकरिता आपसात प्रेम आणि मैत्री राखतात आणि माझे स्मरण करण्याकरिता एका जागी एकत्र येऊन बसतात आणि माझ्या प्रेमामुळे एकमेकांशी भेट घेतात आणि माझी प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी एकमेकांशी सदाचार पूर्ण वर्तन करतात."

(अहमद, तिर्मिजी)

पैगंबर मुहम्मद (स.) दोन मित्रांच्या भेटीचे ईमानपूर्ण चित्र रेखाटताना सांगतात,

"एक मनुष्य आपल्या मित्राशी, जो एका दुसऱ्या वस्तीत होता, भेटीसाठी गेला. अल्लाहने त्याच्या मार्गात एका फरिश्त्याला बसवले फरिश्त्याने त्याला विचारले, "कुठे निघालात? त्याने उत्तर दिले, त्या गावात, आपल्या भावाच्या भेटीसाठी चाललो, फरिश्ता म्हणाला, काय तुमचे त्याच्यावर काही घेणे आहे, जे तुम्ही वसूल करण्यासाठी जात आहात? तो म्हणाला, नाही, फक्त या गरजेने त्याच्याजवळ जात आहे की मी त्याच्याशी अल्लाहकरिता प्रेम राखतो. फरिश्ता (ईशदूत) म्हणाला, तर ऐका! मला अल्लाहने तुमच्याजवळ पाठविले आहे आणि ही खूशखबरी दिली आहे की तोदेखील अल्लाह तुमच्याशी असेच प्रेम राखतो, जसे तुम्ही त्याच्याकरिता आपल्या मित्राशी राखता."

(हदीस : मुस्लिम)

६) मैत्री अशा लोकांशी राखा जे इस्लामी दृष्टीकोनातून मैत्री राखण्यायोग्य असावेत आणि मग आयुष्यभर या मैत्रीला कायम राखण्याचा प्रयत्न करा. ज्याप्रमाणे हे आवश्यक आहे की मैत्रीकरिता चांगल्या लोकांची निवड केली जावी, त्याचप्रमाणे हेही आवश्यक आहे

की मैत्री सतत निभावण्याचा व कायम राखण्याचाही प्रयत्न केला जावा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे की कयामतच्या दिवशी जेव्हा अल्लाहच्या अर्श (सिंहासना) खेरीज कोणतीही सावली नसेल, त्या दिवशी सात प्रकारची माणसे अल्लाहच्या सिंहासनाच्या सावलीत असतील. त्यापैकी एक प्रकारची माणसे ती दोन माणसे असतील, जी अल्लाहकरिता एकमेंकाचे मित्र असतील. अल्लाहच्या प्रेमानेच त्यांना आपसात जोडले असेल आणि याच आधारावर ते एकमेकांपासून विभक्त होतील. अर्थात त्यांची मैत्री अल्लाहकरिता असेल आणि आयुष्यभर ते आपली मैत्री कायम राखण्याचा प्रयत्न करतील जेव्हा त्यांच्यापैकी कोणी एकमेकांपासून वेगळा होऊन या जगाचा निरोप घेत असेल तेव्हा याच अवस्थेत त्यांची ही मैत्री कायम राहील आणि याच मैत्रीपूर्ण अवस्थेत एकमेकांपासून वेगळे होतील.

७) मित्रांवर भरवसा राखा. त्यांच्यात मिसळून हसत बोलत राहा. स्वत: दु:खी राहण्यापासून व मित्रांना दु:खी करण्यापासून अलिप्त राहा. मित्रांच्या संगतीत नि:संकोच आणि चांगल्या स्वभावाने राहा. भुवया चढवून ठेवण्यापासून व देण्या-घेण्यापासून दूर राहा. मित्रांशी एक मनमोकळा साथी हसत मुख मित्र आणि नेहमी आनंदी राहणारा, मित्र बनण्याचा प्रयत्न करा. तुमच्या संगतीत मित्रांनी कंटाळून जाऊ नये, किंबहुना आनंद, जीवन आणि आकर्षण अनुभवावेत.

माननीय अब्दुल्लाह बिन हारिस (रजि.) यांचे निवेदन आहे की "मी पैगंबर मुहम्मद (स.) पेक्षा अधिक दुसऱ्या कोणाला स्मितहास्य करताना पाहिले नाही." (हदीस : तिर्मिजी)

माननीय जाबिर बिन समुरा (रजि.) कथन करतात "पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सहवासात शंभराहून अधिक बैठकीत मी बसलो आहे. या बैठकींमध्ये पैगंबरांचे सहकारी शेर वगैरेही पढत असत आणि अज्ञानकाळातील किस्से कहाण्याही ऐकवित असत किंबहुना प्रसंगी स्वत:देखील त्यांच्यासोबत हसण्यात सहभागी होत असत. (हदीस : तिर्मिजी)

माननीय शरीद (रजि.) कथन करतात की मी एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासह वाहनावर त्यांच्यामागे बसलो होतो. वाहनावर बसल्या बसल्या मी पैगंबर मुहम्मद (स.) यांना उमैया बिन सल्तचे शंभर शेर (काव्यपदे) ऐकविले. प्रत्येक शेर झाल्यावर पैगंबर मुहम्मद (स.) सांगतात, आणखी काही ऐकवा, आणि मी ऐकवित असे.

(हदीस : तिर्मिजी)

अशा प्रकारे पैगंबर मुहम्मद (स.) आपल्या बैठकीत स्वत:ही कधीकधी किस्से ऐकवित माननीय आएशा (रजि.) कथन करतात, एकदा त्यांनी कुटुंबियांना एक किस्सा ऐकविला एक स्त्री म्हणाली, हा विचित्र किस्सा तर अगदी खुराफाच्या किश्श्यांप्रमाणे आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले कि तुम्हाला खुराफाचा खरा किस्सा माहीत तरी आहे?

आणि मग स्वत:च त्यांनी खुराफचा खरा किस्सा सविस्तरपणे ऐकविला.

अशा प्रकारे एकदा माननीय आएशा (रजि.) यांना अकरा स्त्रियांची एक अतिशय मनोरंजक कथा ऐकविली.

माननीय बिक्र बिन अब्दुल्लाह, सहाबा (रजि.) यांचा नि:संकोचपणा आणि थट्टा विनोदाचे वर्णन करतांना सांगतात

"सहाबा (रजि.) (पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सहवासातील एकनिष्ठ सहकारी) हास्य-मनोरंजन म्हणून एकमेकांकडे टरबुजाच्या साली फेकत असत. परंतु जेव्हा लढण्याचा व संरक्षणाचा प्रसंग येई, तेव्हा युध्दभूमीचे वीर-योध्दादेखील सहाबा (रजि.) च असत."

(अल अदबुल मुफरद)

माननीय मुहम्मद बिन जियाद (रजि.) यांनी निवेदन आहे,

"मी थोर बुजूर्गांना पाहिले आहे की त्यांचे अनेक परिवार एकाच हवेलीत राहत. कित्येकदा असे होई की त्यांच्यापैकी एखाद्याकडे पाहुणे येत आणि दुसऱ्या एखाद्याच्या घरी चुलीवर हंडी चढलेली असे. तेव्हा अतिथी बाळगणारा मित्र आपल्या पाहुण्याकरिता मित्राची हंडी उतरवून नेत असे. नंतर हांडीचा मालक आपली हंडी शोधत फिरे आणि लोकांना विचारत असे, माझी हंडी कोणी नेली? तो अतिथी बाळगणारा मित्र सांगत असे, हे बंधु! आपल्या पाहुण्यांसाठी मीच घेऊन गेलो होतो. त्या वेळी तो हंडीचा मालक म्हणत असे, अल्लाह तुमच्यासाठी यात समृध्दी देवो."

मुहम्मद बिन जियाद (रजि.) यांनी निवेदन आहे की हे लोक जेव्हा भाकरी तयार करत, तेव्हादेखील असेच घडत असे. (अल अदबुल मुफरद)

माननीय अली (रजि.) द्वारे उल्लेखित आहे,

"मनाला थोडे स्वैरही सोडत जा. आनंदीत करणाऱ्या गोष्टींवर विचार करा. कारण शरीराप्रमाणे मनालाही थकवा येतो.

८) रुक्ष आणि मृतवत मनाचे बनू नका. आनंदित राहा आणि हसत बोलत राहा. परंतु या गोष्टीचे भान जरूर राखा की तुमचे आनंदीत राहणे आणि हसणे-बोलणे मर्यादा सांभाळून असावे. आनंदी स्वभाव आणि मनोरंजानाबरोबर धार्मिक गांभीर्य, लज्जा-संकोच आणि समतोल राखण्याचीही काळजी घ्या.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे सहकारी माननीय अब्दुर्रहमान (रजि.) यांचे निवेदन आहे, पैगंबर मुहम्मद (स.) यांचे सहकारी (सहाबा) न रूक्ष स्वभावाचे होते आणि न मृतवत बोलणे-चालणे राखणारे होते. ते आपल्या बैठकीत शेर शायरीही करीत. अज्ञानकाळाच्या विरुध्द एखाद्या गोष्टीची मागणी असल्यास त्यांच्या डोळ्यांतून क्रोधाच्या अशा ठिणग्या

उडत जणू त्यांच्यावर वेडेपणाचा उन्माद आहे. (अल अदबुल मुफरद)

सुप्रसिध्द हदीस ज्ञाता माननीय सुफियान बिन उयैना (रजि.) यांना कोणी म्हटले, थट्टा-मस्करी ही एक आपत्ती आहे. त्यांनी उत्तर दिले, नव्हे, किंबहुना एक सुन्नत (पैगंबर आचरण पध्दती) आहे. परंतु अशा माणसाकरिता जो प्रसंगावधान जाणत असेल व चांगला विनोद करु शकत असेल. (शरह शिमाइले तिर्मिजी)

९) तुम्ही ज्या माणसाशी प्रेम राखता, त्याच्याजवळ आपले प्रेम अवश्य व्यक्त करा. त्याच्या मनावर योग्य प्रभाव पडेल आणि त्यालाही निकट होण्याची अनुभूती होईल. ती दोन्हीकडच्या भावना व जाणिवांच्या देवाण-घेवाणीने परस्पर प्रेम व निष्ठेत असामान्य वाढ होईल. मग प्रेम केवळ मन:स्थितीचे नाव राहणार नाही. किंबहुना त्याच्या निकडी कृतीशील जीवनावर प्रभाव पाडतील आणि अशा प्रकारे व्यक्तिगत मामल्यात रूची घेण्यात आणि जास्तीतजास्त एकमेकांच्या निकट होण्याचा अवसर लाभेल.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे,

"जेव्हा एखाद्या माणसाच्या मनात आपल्या भावाकरिता निष्ठा आणि प्रेमाच्या भावना असतील तर त्याने आपल्या मित्रालाही त्या भावनांशी अवगत करावे आणि त्याला सांगावे की तो त्याच्याशी प्रेम राखतो." (हदीस : अबू दाऊद)

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या समोरून एक मनुष्य गेला. काही लोक पैगंबरांजवळ बसले होते. त्यांच्यापैकी एकजण म्हणाला, हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) ! मला त्या माणसाशी केवळ अल्लाहकरिता प्रेम आहे. हे ऐकून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विचारले, तर काय तुम्ही त्या माणसाला ही गोष्ट सांगितली आहे? तो म्हणाला, नाही पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, जा आणि त्याला सांगा की तुम्ही अल्लाहकरिता त्याच्याशी प्रेम राखता. तो मनुष्य त्वरीत उठला आणि त्या जाणाऱ्या इसमाजवळ आपल्या भावना व्यक्त केल्या. त्याचे उत्तर देताना तो म्हणाला, तुझ्याशी तो (अल्लाह) प्रेम राखो, ज्याच्यासाठी तू माझ्याशी प्रेम राखतो." (हदीस : तिर्मिजी) अबू दाऊद)

मैत्रीसंबंधांना अधिकाधिक दृढ करण्यासाठी आणि मित्रांशी निकट होण्यासाठी आवश्यक आहे की तुम्ही मित्रांच्या व्यक्तिगत मामल्यात एक मर्यादेपर्यंत रूची घ्यावी आणि आपली निकटता व विशेष संबंध जाहीर करावा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जेव्हा एक मनुष्य दुसऱ्याशी मैत्री आणि बंधुभावाचे नाते जोडील तर त्याच्याकडून त्याचे नाव, त्याच्या पित्याचे नाव आणि त्याची पारिवारिक परिस्थिती माहीत करून घ्यावी. अशाने परस्पर प्रेमाची मुळे मजबूत होतात." (हदीस : तिर्मिजी)

१०) प्रेम व्यक्त करण्यात आणि संबंध जोडण्यात नेहमी मधला मार्ग पत्करा. न तर असा थंडपणा दाखवा की तुमच्या प्रेम आणि संबंधात संशय व्हावा आणि न प्रेमाच्या उधाणात इतके पुढे जा की तुमच्या प्रेमाने वेडेपणाचे स्वरुप धारण करावे आणि अल्लाह ना करो, प्रसंगी पश्चात्ताप करण्याची वेळ यावी. समतोल राखण्याची सदैव काळजी घ्या आणि सर्वथा मधल्या मार्गाचा अवलंब करा. ज्याला तुम्ही सतत निभावू शकाल. माननीय असलम यांचे कथन आहे,

माननीय उमर (रजि.) यांचे निवदेन आहे की तुमच्या प्रेमाने वेडेपणाचे रूप धारण करू नये आणि तुमचे शत्रुत्व त्रास-यातना पोहचविण्याचे कारण ठरू नये. मी म्हणालो, माननीय, ते कसे? ते म्हणाले, "(ते असे की) जेव्हा प्रेम करू लागाल तेव्हा लहान मुलांसारखे बिलगू लागाल व पोरकट हरकती करू लागाल आणि जेव्हा एखाद्याशी नाराज व्हाल, तेव्हा त्याच्या प्राण-वित्तास हानी पोहचविण्यास तयार व्हाल." (अल अदबुल मुफरद)

माननीय उबैद किन्दी (रजि.) यांनी निवेदन केले की मी माननीय अली (रजि.) यांच्याकडून ऐकले, ते सांगत होते.

"आपल्या मित्रांशी मैत्री राखताना मृदुता आणि मधला मार्ग अंगीकारा, संभवत: तो प्रसंगी तुमचा शत्रु बनावा. त्याचप्रमाणे शत्रूशी शत्रुत्व राखतांना मृदुता व मधल्या मार्गाचा अवलंब करा, संभवत: तो प्रसंगी तुमचा मित्र बनावा." (अल अदबुल मुफरद)

११) मित्रांशी निष्ठापूर्ण आणि हितचिंतनाचा व्यवहार करा. मित्रासोबत सर्वात मोठी भलाई ही आहे की तुम्ही त्याला नैतिकदृष्टया जास्तीतजास्त उंचाविण्याचा प्रयत्न करावा आणि त्याला ऐहिक लाभ पोहचविण्यापेक्षा त्याला आखिरतचा लाभ घडविण्याची काळजी घ्या.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"धर्म पुरेपूर भलाई इच्छितो. भलाई इच्छिण्याशी अभिप्रेत हे की तुम्ही तुमच्या मित्रांसाठी तेच पसंत करावे, जे स्वत:साठी पसंत करता. यासाठी की मनुष्य आपले वाईट कधीही इच्छित नाही."

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"त्या अस्तित्वाची (अल्लाहची) शपथ, ज्याच्या हाती माझा प्राण आहे. कोणीही मनुष्य मोमीन (ईमान राखणारा) असू शकत नाही. जोपर्यंत तो त्याच्या भावासाठी तेच पसंत करीत नाही, जे स्वत:साठी पसंत करतो."

मुस्लिमांवर मुस्लिमांचे सहा हक्क सांगतांना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"आणि हे की त्याने त्याच्या भावाचे भले होवो अशी इच्छा करावी, मग तो अंनुपस्थित असो किंवा उपस्थित."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले,

"नि:संशय, अल्लाहने त्या माणसावर आगीला अनिवार्य केले आहे आणि जन्नत हराम (अवैध) केली आहे, ज्याने शपथ घेऊन एखाद्या मुस्लिमांचा हक्क गिळंकृत केला." (सहाबापैकी एकाने विचारले) "जर ती एखादी मामूली वस्तू असेल तर? पैगंबरांनी सांगितले, होय, ती पीलू झाडाची मामुली फांदी का असेना."

१२) मित्रांच्या दु:खात सहभागी राहा आणि तद्वतच त्यांच्या आनंदातही सहभागी व्हा. त्यांच्या दु:खात भाग घेऊन दु:ख निवारण करण्याचा प्रयत्न करा आणि त्यांच्या आनंदात भाग घेऊन आनंद द्विगुणित करण्याचा प्रयत्न करा. प्रत्येक मित्र आपल्या सच्चा मित्रांकडून हीच अपेक्षा करतो की त्यांनी संकटातही साथ द्यावी आणि वेळप्रसंगी साथ न सोडावी. त्याचप्रमाणे तो हीदेखील अपेक्षा करतो की मित्रांनी त्याचा आनंद वाढवावा आणि त्याच्या सामूहीक समारंभाची शोभा आणखी वाढवावी.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"एक मुस्लिम दुसऱ्या मुस्लिमांकरिता एका इमारतीसमान आहे की एकमेंकास शक्तीसामर्थ्य पोहचवितो व आधार देतो, ज्याप्रमाणे इमारतीची एक वीट दुसऱ्या विटेचा आधार बनते व तिला सामर्थ्य पोहचविते. त्यानंतर पैगंबरांनी आपल्या एका हाताची बोटे दुसऱ्या हाताच्या बोटांमध्ये गुंतवली (आणि अशा प्रकारे मुस्लिमांचे परस्पर संबंध आणि निकटता स्पष्ट केली)." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले,

"तुम्ही ईमानधारकांना, परस्पर दयाशीलता, परस्पर स्नेह प्रेम आणि एकमेकांच्या दु:ख यातनांच्या अनुभूतीत असे पाहाल जणू शरीराचा एक अवयव जर आजारी पडला तर संपूर्ण शरीर ताप आणि वेदनांमध्ये त्याचा सहभागी असतो." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

१३) मित्रांशी आनंदी मनाने, मृदुतेने व निष्कपटतेने भेट आणि अगदी मोकळ्या मनाने त्यांचे स्वागत करा. बेपर्वा वृत्ती, नि:स्पृहता, उपेक्षा आणि रूक्ष वर्तनापासून अलिप्त राहा. या सर्व मनाला दुभंगविणाऱ्या गोष्टी आहेत. भेटीप्रसंगी नेहमी आनंद, समाधान आणि अल्लाहशी कृतज्ञता दर्शविणारे व त्याच्या प्रशंसेची वचने बोला. निराशा व मृतवत मन दर्शविणारी वचने मुळीच बोलू नका. भेटीच्या प्रसंगी अशी शैली अंगीकारा की तुमच्या मित्राला भेटीचा आनंद व्हावा. दु:खी मनाने त्याला भेटू नका की तोही दु:खी व्हावा आणि तुमच्या भेटीला त्याने भार समजू लागावे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे,

"सत्कर्मांमध्ये कोणत्याही सत्कर्मास मामुली समजू नका, मग ती एवढीच का असेना की

तुम्ही तुमच्या भावांशी मोकळ्या मनाने भेटावे." (हदीस : मुस्लिम)

आणखी एका प्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"आपल्या बांधवास पाहून तुमचे स्मितहास्य करणे हेदेखील दान आहे." (हदीस : तिर्मिजी)

मृदुभाष्य, सद्व्यवहार आणि मधुर संभाषणानेच मनात प्रेम निर्माण होते आणि याच गुणवैशिष्टायांमुळे चांगला व आदर्श समाज उदयास येतो.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"मी तुम्हाला त्या माणसाचे लक्षण सांगतो, ज्यावर जहन्नमची आग हराम आहे आणि तो आगीवर हराम आहे. हा तो माणूस होय जो मृदुभाषी, मृदु स्वभावाचा आणि मृदु सवयी बाळगणारा असेल." (हदीस : तिर्मिजी)

सहाबा (रजि.) यांचे निवेदन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा भेटीच्या वेळी एखाद्याकडे लक्ष देत तर सर्वांगाने लक्ष देत आणि जेव्हा कोणी त्यांच्याशी संभाषण करीत असे, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) पूर्णत: लक्ष देऊन त्याचे म्हणणे ऐकत.

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) मशिदीत बसले होते. एक मनुष्य आला, तेव्हा पैगंबरांनी आपल्या शरीराला चालना दिली व थोडे संकुचित झाले. तो मनुष्य म्हणाला, "हे अल्लाहचे पैगंबर! जागा तर खूप विस्तृत आहे. त्यावर पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"ईमानधारकांचा हक्क हा आहे की जेव्हा त्याचा भाऊ त्याला पाहील तर त्याने त्याच्याकरिता थोडी आपल्या शरीराला चालना द्यावी." (हदीस : बैहकी)

ईमानधारकांची स्तुती करतांना कुरआन सांगते,

"ते ईमानधारकांकरिता फार कोमल स्वभावाचे असतात."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी या हकीगतीस अशा शब्दांत सांगितले

"ईमानधारक सहनशील आणि कोमल मनाचे असतात. त्या उंटाप्रमाणे ज्याच्या नाकात वेसण घातलेली असावी. त्याला खेंचले गेल्यास तो सरळ चालत येतो आणि दगडावर बसवल्यास त्वरीत बसतो." (हदीस : तिर्मिजी)

१४) जर एखाद्या गोष्टीबाबत मतभेद झाल्यास त्वरीत तडजोड करून एकमेकांची मने साफ करा आणि नेहमी माफी मागण्यात व आपली चूक कबूल करण्यात अग्रसर राहा.

माननीय अबू दर्दा (रजि.) निवेदन करतात, एकदा माननीय अबू बकर (रजि.) आणि माननीय उमर (रजि.) यांच्या दरम्यान एका गोष्टीबाबत कठोर संभाषण झाले. नंतर माननीय अबू बकर (रजि.) यांना ते फार जाणवले आणि ते फार दु:खी झाले, मग पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेस पोहोचले आणि म्हणाले, हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स)!

माझ्या आणि उमरच्या दरम्यान काही मतभेद झाला. मला राग आला आणि आमच्यात कठोर बोलणे झाले. मला नंतर वाईट वाटले आणि मी उमर (रजि.) जवळ माफी मागितली. परंतु हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स)! ते माफ करायला तयार झाले नाहीत. मी उद्विग्न होऊन आपल्या सेवेत आलो. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "अल्लाह तुम्हाला माफ करील आणि तुम्हाला माफ करील आणि तुम्हाला क्षमा करील. या अवधित माननीय उमर (रजि.) यांना आपल्या चुकीची जाणीव झाली आणि ते धावत धावत माननीय अबू बकर (रजि.) यांच्या घरी पोहोचले. तिथे हे कळाले की अबू बकर (रजि.) पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झाले आहेत. तर तेही त्याच वेळी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत उपस्थित झाले. माननीय उमर (रजि.) यांना पाहून पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या चेहऱ्यावर नाराजी पसरली. हे पाहून माननीय अबू बकर फार घाबरले आणि अगदी विनम्रतेने गुडघे टेकून पैगंबर मुहम्मद (स.) यांना विनंती केली, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स)! उमर (रजि.) यांची काहीच चूक नाही. सगळा दोष माझाच आहे. मीच चूक केली. मीच त्यांना कठोरतेने बोललो." हे पाहून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाहने मला तुमच्याजवळ पैगंबर बनवून पाठविले आहे आणि सुरुवातीला जेव्हा तुम्ही लोक खोटे ठरवित होता. त्या वेळी अबू बकर (रजि.) यांनी माझ्या सत्यतेचे समर्थन केले आणि तन-मन-धन अर्पण करून मला सर्वथा साथ दिली. तर काय आता तुम्ही माझ्या साथीदाराला दु:खी करून सोडाल?"

तडजोड करण्यात कधीही विलंब करू नका. कारण जेवढा विलंब होईल तेवढे वैमनस्य वाढत जाते आणि दूरी निर्माण होते. इंजीलमध्ये माननीय ईसा (अ.) यांचा हा उपदेश मोठा ईमानवर्धक आहे.

"यास्तव जर तू बलिदानाच्या ठिकाणी आपला नवस फेडत असेल आणि तिथे तुला आठवण यावी की बांधवाला माझ्याबद्दल तक्रार आहे. तर तिथेच बलीवेदीसमोर आपला बळी सोडून दे आणि जाऊन आपल्या भावाशी मिलाप कर. मगच आपला नवस फेड."

(इंजील)

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे,

"लोकांची कर्मे प्रत्येक सोमवारी आणि गुरूवारी सप्ताहात दोन दिवस (अल्लाहसमोर) सादर होतात, प्रत्येक ईमानधारकास माफ केले जाते. त्याच्याखेरीज, ज्याच्या मनात त्याच्या ईमानधारक बांधवाशी एखादे शत्रूत्व असेल. सांगितले जाते की त्यांना सोडून द्या, यासाठी की त्यांनी आपसात समझोता करून घ्यावा.

कोण जाणे, पुढचा क्षण जीवनाचा आहे की मृत्युचा आणि कोणाला माहीत आहे की त्याला सोमवार किंवा गुरुवारचा दिवस जीवनात पाहायला मिळेल किंवा नाही. तेव्हा कलुषित

मनांना साफ करण्यात आणि मित्रांच्या तक्रारी दूर करण्यात विलंब का व कोणत्या आशेवर! काय आखिरतच्या दिवसावर विश्वास ठेवणारा, बुध्दिमान या गोष्टीस तयार आहे की त्याने द्वेष- मत्सराने भरलेले काळेकुट्ट आणि किळसवाणे हृदय घेऊन अल्लाहसमोर पोहोचावे?

याचसोबत या गोष्टीचेही भान राखावे की जेव्हा मित्र त्यांची चूक मान्य करील आणि माफी मागेल, तेव्हा त्याची सबब मान्य करा आणि त्याला माफ करा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"ज्याने एखाद्या ईमानधारक बांधवाजवळ आपल्या चुकीबद्दल क्षमा-याचना केली आणि त्याने त्याला माफ केले नाही तर त्याच्यावर एवढा गुन्हा लागू होईल जेवढा एका अयोग्य महसूल वसूल करणाऱ्यावर त्याच्या अत्याचार व अतिरेकाचा गुन्हा असतो.

१५) मित्रांकडून एखादी गोष्ट जर तुमच्या स्वभाव व आवडीविरुध्द झाली तरीही तुम्ही जिभेवर नियंत्रण राखा आणि तोंडाने काही बरे-वाईट किंवा अपशब्द बोलू नका. किंबहुना हिकमत आणि सौम्य शब्दांत घटनेला कलाटणी द्या.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

माननीय मूसा (अ.) यांनी अल्लाहला विचारले, "हे माझ्या पालनकर्त्या! तुमच्या दृष्टीत तुमच्या दासांमध्ये कोण सर्वाधिक प्रिय आहे?" अल्लाहने उत्तर दिले, "तो जो सूड घेण्याचे सामर्थ्य असतानाही माफ करील." (हदीस : मिश्कात)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले,

"ईमानधारकाच्या तराजूत कयामतच्या दिवशी जी सर्वात जास्त वजनाची वस्तू ठेवली जाईल, ती त्याचे सदाचरण असेल आणि अल्लाहला तो मनुष्य अतिशय अप्रिय आहे जो जिभेने निर्लज्जतेची गोष्ट बोलतो आणि शिवीगाळ करतो."

माननीय अब्दुल्लाह बिन मुबारक (रजि.) यांनी चांगल्या नीतीमत्तेची व्याख्या तीन गोष्टींद्वारे केली आहे,

१) जेव्हा मनुष्य कोणाशी भेटेल तर हसतमुखाने भेट घेईल.

२) अल्लाहच्या असहाय्य व गरजवंत दासांवर खर्च करील आणि

३) कोणाला त्रास पोहचविणार नाही.

माननीय आएशा (रजि.) यांचे शुभकथन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाहच्या दृष्टीत सर्वात जास्त वाईट माणूस कयामतच्या दिवशी तो असेल ज्याच्या वाईट

व घाणेरड्या जिभे (बोलण्या) मुळे लोकांनी त्याला भेटणे सोडावे."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

१६) तुमच्या मित्रांचा सुधार व त्यांना चांगले संस्कार घडविण्यापासून कधीही गाफील राहू नका आणि मित्रांमध्ये ते वैगुण्य कधीही निर्माण होऊ देऊ नका जे सुधारणा व प्रशिक्षणाच्या मार्गात सर्वात मोठा अडसर आहे, अर्थात आत्मप्रेम आणि घमेंड. मित्रांना नेहमी प्रवृत्त करीत राहा की त्यांनी स्वत:च्या दोष उणीवांची जाणीव करून घ्यावी. स्वत:च्या चुका मान्य करण्यात हिंमत दाखवावी आणि या सत्याला सदैव डोळ्यांसमोर राखावे की स्वत:च्या दोष-उणिवांची जाणीव न राखल्याने आणि वेगळेपणाची जिद्द ठेवल्याने आत्म्याला सर्वात वाईट भोजन मिळते.

वास्तविक बेगडी विनम्रता केवळ शब्दांनी स्वत:ला तुच्छ लेखणे आणि बोलण्या-वागण्यात मृदूता व्यक्त करणे फार सोपे आहे. परंतु स्वत:च्या मनावर आघात सहन करणे, स्वत:च्या दोष उणिवांबाबत शांतपणे ऐकणे व मानणे आणि मनाविरुध्द मित्रांची टीका सहन करणे मोठे कठीण काम आहे. परंतु खरे मित्र तेच होत जे अगदी विशुध्द बुध्दीने एकमेकांच्या जीवनावर नजर ठेवतात आणि या पैलूने एकमेंकावर चांगले संस्कार घडवितात व सुधारणा करीत गर्व आणि आत्मप्रेमापासून अलिप्त राहतात.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "तीन गोष्टी विनाशग्रस्त करणाऱ्या आहेत–

१) अशी इच्छा की मनुष्य तिच्या अधीन व गुलाम बनून राहावा.

२) अशी लालच, जिला नेता मानून माणूस तिच्या मार्गावर चालू लागावे आणि

३) आत्मप्रियता हा विकार या तिघांमध्ये सर्वाधिक धोकादायक आहे."

(हदीस : बैहकी, मिश्कात)

टीका-टिप्पणी आणि समीक्षा एक असे शस्त्र आहे जे नैतिक अस्तित्वाच्या समस्त दूषित व घाणेरड्या तत्त्वांना छाटून बाहेर फेकते आणि नैतिक सामर्थ्यांना बाटवून व्यक्ती आणि समाजात नवजीवनाचे प्रमाण फुंकते, मित्रांच्या टीका-टिप्पणीवर रागात येणे, तोंड वेडे-वाकडे करणे आणि स्वत:ला बेपर्वा समजणे हेही विनाशकारक आहे. या अप्रिय जबाबादारीला पार पाडण्यात कमतरता दर्शविणेही विनाशकारक आहे.

मित्रांच्या चारित्र्यावर कीळसवाणे कलंक दिसल्यास बेचैन हाऊन जाणवा ते मिटविण्याचे बुध्दीपूर्ण उपाय करा आणि अशा प्रकारे स्वत:ही मोकळ्या मनाने व राज-खुशीने मित्रांना नेहमी संधी द्या की त्यांनीही तुमच्यातले दोष उणिवा तुम्हाला स्पष्ट दाखवून द्याव्यात. आणि जेव्हा तेही कटू जबाबदारी पार पाडतील, तेव्हा स्वत:च्या मनाला क्रोधित होण्याऐवजी मोठ्या हिंमतीने आनंद व कृतज्ञतापूर्ण भावनेने त्यांच्या समीक्षेचे स्वागत करा आणि

त्यांच्या निखालस प्रेमाचे व मेहरबानीबद्दल कृतज्ञता व्यक्त करा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आदर्श मैत्रीच्या या अवस्थेला एका उत्तम उदाहरणाद्वारे या शब्दात व्यक्त केले आहे, "तुमच्यापैकी प्रत्येकजण आपल्या बांधवाचा आरसा आहे. यासाठी जर त्याला आपल्या भावात काही वैगुण्य दिसेल तर ते दूर करावे."

(हदीस : तिर्मिजी)

याच उदाहरणात पाच असे दिव्य संकेत मिळतात ज्यांना दृष्टीपथात राखून तुम्ही तुमच्या मैत्रीला खरोखर आदर्श मैत्री बनवू शकता.

१) आरसा तुमचे डाग वगैरे तेव्हाच दाखवितो, जेव्हा तुम्ही आपले डाग पाहण्याच्या इराद्याने त्याच्या समोर उभे राहता आणि जेव्हा त्याच्या समोरून हटता, तेव्हा तो ही गप्प राहतो.

अशाच प्रकारे तुम्हीही आपल्या मित्राच्या. दोष-उणीवा त्याच वेळी दाखवा जेव्हा तो स्वत:ला समीक्षाकरिता तुमच्या समोर प्रस्तुत करील आणि मोकळ्या मनाने टिका करण्याची संधी देईल आणि तुम्हालाही जाणवावे की या वेळी तो मानसिकदृष्ट्या टीका ऐकून घेण्यास तयार आहे. जर अशी अवस्था तुम्हाला आढळून आली नाही तर हिकमतीने टीका दुसऱ्या एखाद्या प्रसंगी बोलण्यासाठी राखून ठेवा आणि गप्प राहावे. मात्र त्याच्या अनुपस्थितीत एवढी सावधगिरी अवश्य पाळावी की तुमच्या तोंडून असा एखादा शब्द निघू नये ज्याद्वारे त्याच्या दोष-उणिवांकडे संकेत व्हावा. यासाठी की ही निंदा आहे आणि निंदा केल्याने मने जुळत नाहीत, किंबहुना दुभंगतात.

२) आरसा चेहऱ्याच्या त्याच डागांना दाखवितो, जे खरोखर चेहऱ्यावर असतात. यात कमी-अधिक दाखवित नाही. तसेच तो चेहऱ्यांचे तेच डाग दाखवितो, जे त्याच्यासमोर असतात. पडद्याआड लपलेल्या डागांना तो अनावरित करीत नाही आणि न अशा डागांचे एखादे काल्पनिक चित्र प्रस्तुत करतो. अशा प्रकारे तुम्हीही तुमच्या मित्रांचे दोष-व्यंग कमीअधिक न करता सांगा, अनुचित संकोच आणि खुशामतीने व्यंग झाकू नका आणि न स्वत:च्या पल्लेदार वक्तव्याने त्यात वाढ करा आणि फक्त तेच व्यंग-दोष दाखवा जे सामान्य जीवनात तुमच्यासमोर येतात. शोध घेण्याच्या प्रयत्नात पडू नका. लपलेल्या व्यंग-दोषांना उकरून काढणे ही काही नैतिक सेवा नाही, किंबहुना फार वाईट व्यंग आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) एकदा मिंबरवर चढले आणि मोठ्या स्वरात लोकांना तंबी दिली, "मुस्लिमांच्या व्यंग-दोषांच्या पाठीशी लागू नका जो मनुष्य ईमानधारक बांधवांच्या लपलेल्या व्यंग-दोषांना उघड करतो, तर अल्लाह त्याच्या लपलेल्या व्यंग-दोषांना उघड करण्यास आतुर होतो आणि ज्याचे व्यंग-दोष उघड करण्यास अल्लाह आतुर होईल तर त्याला अपमानित केल्याशिवाय राहात नाही. मग तो स्वत:च्या घरात घुसून बसून का राहीना."

(हदीस : तिर्मिजी)

३) आरसा नि:स्वार्थपणे नि:संकोच शैलीत आपली जबाबदारी पार पाडतो आणि जो मनुष्यदेखील त्याच्यासमोर आपला चेहरा सादर करतो, तर तो नि:स्वार्थपणे त्याचे खरे रूप त्याला दाखवितो. न तो कोणाशी द्वेष-भावना राखतो आणि न कोणाचा सूड घेतो. तेव्हा तुम्हीदेखील कोणताही स्वार्थ किंवा सूडाची भावना न राखता विशुध्द बुध्दीने मित्राला त्यांचे व्यंग-दोष दाखवा. या हेतुने की मित्राने स्वत:ला सुधारून घ्यावे ज्याप्रमाणे मनुष्य आरसा पाहून स्वत:ला सुशोभित करतो.

४) आरशात स्वत:चे खरे रूप पाहून कोणीही चिडत नाही. न रागाने अनावर होऊन आरसा फोडून टाकण्याचा मूर्खपणा करतो, किंबहुना त्वरीत आपले रूप व्यवस्थित करण्याचा प्रयत्न करतो मनातल्या मनात आरशाचे महत्त्व व मूल्य जाणून त्याचे आभार मानतो आणि म्हणतो खरोखर आरशाने मला सुशोभित करण्यात मोठी मदत केली आणि स्वाभाविक जबाबदारी पार पाडली. मग मोठ्या इतमामाने दुसऱ्या वेळेकरिता त्याला सांभाळून ठेवतो. अशा प्रकारे जेव्हा तुमचा मित्र आपल्या शब्दांच्या आरशात तुमच्यासमोर तुमचे खरे रूप ठेवील, तेव्हा चिडून जाऊन मित्रावर प्रत्युत्तरात आग पाखडू नका, किंबहुना त्याचे आभार माना की त्याने मैत्रीचा हक्क अदा केला. केवळ जीभेनेच नव्हे तर मनापासून त्याचे आभार मानत त्याच क्षणापासून आपल्यात सुधारणा घडवून आणण्याची काळजी घ्या. मोकळ्या मनाने व कृतज्ञतेने मित्राचे महत्त्व जाणून घेत त्याला विनंती करा की यापुढेही त्याने स्वत:च्या बहूमूल्य सल्ल्याने उपकृत करावे.

५) अंतिम संकेत हा आहे की ईमानधारकांपैकी प्रत्येकजण "त्याच्या बांधवाचा आरसा आहे" आणि एक भाऊ दुसऱ्या भावाकरिता निष्कपटता व प्रेमाचे मूर्त स्वरूप असतो. एकनिष्ठ आणि हितचिंतक असतो. सहानुभूती राखणारा आणि सच्चा मित्र असतो. आपल्या बांधवाला संकटग्रस्त पाहून तळमळू लागतो आणि त्याला आनंदीत पाहून स्वत: आनंदविभोर होतो. यासाठी बंधु आणि मित्र जी समीक्षा करील त्यात अतिशय प्रेम व निष्कपटता असेल, सहानुभूती असेल आणि प्रत्येक शब्द हितचिंतनाच्या भावनेने ओत-प्रोत असेल आणि अशाच प्रकारच्या समीक्षाने मने जुळतात आणि जीवन खऱ्या अर्थाने जीवन बनते.

१७) मित्रांशी स्नेह प्रेम वृध्दिंगत करण्याकरिता भेट नजराण्यांची देवाण-घेवाण करा. भेटवस्तू व उपहार दिल्या घेतल्याने मने तर जुळतातच, स्नेह प्रेम वाढीस लागते. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"एकमेकांना भेट उपहार पाठवत जा. अशाने आपसात प्रेम निर्माण होईल आणि मनातली कटूता (द्वेष-मत्सर) नाहीशी होईल." (हदीस : मिश्कात)

"पैगंबर मुहम्मद (स.) स्वत: आपल्या साथीदारांना जास्तीतजास्त भेट उपहार देत असत

आणि त्यांचे सहकारी (सहाबादेखील आपसात जास्तीतजास्त उपहार व भेट वस्तू देत."

भेटवस्तू उपहार देताना स्वत:च्या ऐपतीचाही विचार करा आणि असा विचार करू नका की तुम्ही ज्याला भेटवस्तू द्याल तर मौल्यवान उपहारच द्यावा, जे जमेल ते द्या. उपहाराचे मोल तुमच्या स्नेह प्रेमावर आणि निष्कपट भावनेवर आधारित आहे आणि याच भावनांनी मने जुळतात, उपहाराच्या किंमतीने जुळत नाहीत. तसेच मित्राच्या उपहारास मामुली समजू नका. त्याच्या निष्कपट प्रेमावर नजर राखा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे, "जर मला भेट म्हणून कोणी बकरीचा एक पाया दिला तर तो मी अवश्य कबूल करेन. जर कोणी आमंत्रणात एक पाया खाऊ घालील तर मी अवश्य ते आमंत्रण स्वीकारीन." (हदीस : तिर्मिजी)

भेटवस्तूच्या मोबदल्यात भेटवस्तू अवश्य द्या. पैगंबर मुहम्मद (स.) याची विशेष काळजी घेत. पैगंबरांच्या दृष्टीने आवडती भेटवस्तू सुगंधाचा उपहार होता. तुम्हीदेखील या उपहारास प्रिय जाणा आणि आजच्या परिस्थितीत चांगले पुस्तक हादेखील उत्तम उपहार आहे.

या संदर्भात प्रसंगी सहभोजनाचा इतमाम राखा. मित्रांना आपल्या घरी जेवायला बोलवा. मित्रमंडळी जर आमंत्रण देतील तर आनंदाने त्यांच्या घरी जा. अशाने प्रेमभावना दृढ होते. तथापि अशा प्रसंगी असाधारण संबंध दाखविण्याऐवजी व खाद्यसामुग्रीत अधिकता दाखविण्याऐवजी तुम्ही निष्कपट प्रेमभावनांचे प्रमाण वाढविण्यावर जास्त लक्ष द्या.

१८) मित्रांची खबरदारी राखा. गरज पडल्यावर त्यांच्या उपयोगी पडा आणि प्राण-वित्ताने त्यांना सर्वथा सहाय्य करा.

इस्बहानीच्या एका कथनात उल्लेख आहे की माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांच्याजवळ एक मनुष्य आला आणि विचारले, "लोकांमध्ये अल्लाहच्या दृष्टीने सर्वाधिक प्रिय कोण आहे?" त्यांनी उत्तर दिले, "समस्त लोकांमध्ये अल्लाहच्या दृष्टीने सर्वाधिक प्रिय तो मनुष्य आहे. जो लोकांना सर्वात जास्त लाभ पोहचविणारा असेल आणि आचरणात अल्लाहच्या दृष्टीने सर्वात जास्त आवडते हे की एखाद्या मुस्लिमास खूष करावे. अशा प्रकारे की त्यांचे संकटनिवारण करावे किंवा त्याची भूक शमवावी आणि हे की मी एखाद्या बांधवासोबत त्याची गरज पूर्ण करण्याकरिता जावे. मला याहून जास्त पसंत आहे की मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या या मशिदीत एतिकाफ करावा. ज्या माणसाने आपला राग अशा अवस्थेत गिळला की त्याने इच्छिले असते तर तो राग पूर्ण व्यकत असता. कयामतच्या दिवशी अल्लाह त्याच्या मनाला आपल्या प्रसन्नतेने भरून टाकील. जो आपल्या बांधवासोबत त्याची गरज पूर्ण करण्याकरिता निघाला आणि त्याची गरज पूर्ण केली तर अल्लाह त्याच्या दोन्ही पायांना त्या दिवशी मजबूती देईल. जेव्हा पाय अडखळू लागतील."

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे, "जो मनुष्य आपल्या बांधवाची गरज पूर्ण करील तर अल्लाह त्याची गरज पूर्ण करीत राहील आणि जो एखाद्या ईमानधारकाचे संकट निवारेल तर अल्लाह कयामतीच्या संकटांपैकी एखादे संकट त्याच्या वरून दूर सारेल."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले, "अल्लाह आपल्या दासाची मदत त्या वेळपावेतो करीत राहतो, जोपर्यंत दास आपल्या बांधवाच्या मदतीत व्यस्त राहतो."

(हदीस : तिर्मिजी)

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) यांचे कथन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "एखाद्या ईमानधारकाची गरज पूर्ण करण्याचा मोबदला व पुण्य दहा वर्षांच्या एतिकाफपेक्षाही जास्त आहे." (तबरानी)

आणि माननीय अनस (रजि.) यांचे कथन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "जो मनुष्य आपल्या ईमानधारक बांधवाजवळ आनंदाची बातमी घेऊन पोहोचला आणि त्या बातमीने त्याला आनंदित करतो तर अल्लाह कयामतच्या दिवशी त्या दासाला खूश करील." (तबरानी)

१९) उत्तम मित्र बना जर तुमच्यावर भरवसा करून तुमच्याशी मनातले काही सांगेल तर त्याचे रक्षण करा आणि कधीही मित्राचा विश्‍वासघात करू नका. स्वत:च्या मनाला रहस्यांचे भांडार बनवा, यासाठी की मित्रांनी अगदी नि:संकोचपणे प्रत्येक मामल्यात तुमचा सल्ला घ्यावा आणि तुम्ही मित्रांना चांगला परामर्श द्यावा.

माननीय उमर (रजि.) यांचे निवेदन आहे की हफ्सा (रजि.) जेव्हा विधवा झाल्या, तेव्हा मी उस्मान (रजि.) यांची भेट घेतली आणि सांगितले जर तुमची इच्छा असेल तर हफ्साचा निकाह तुमच्याशी करून देतो. उस्मान (रजि.) यांनी उत्तर दिले, "मी या गोष्टीवर विचार करेन." मी अनेक रात्रीपावेतो वाट पाहिली. मग उस्मान मला भेटले आणि म्हणाले, "माझा अजून लग्नाचा विचार नाही." मग मी अबू बकर (रजि.) यांच्याजवळ गेलो आणि म्हणालो, जर आपणास पसंत असेल तर हफ्सा (रजि.) यांच्याशी विवाह करू शकता. ते गप्प राहिले आणि काहीच उत्तर दिले नाही. मला त्यांचे गप्प राहणे फार बोचले. उस्मानपेक्षाही जास्त बोचले. अशा प्रकारे अनेक दिवस निघून गेले. मग पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हफ्सा (रजि.) यांना विवाहाचा प्रस्ताव पाठविला आणि मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याशी हफ्साचा निकाह करविला. त्यानंतर अबू बकर (रजि.) मला भेटले आणि म्हणाले, "तुम्ही माझ्याजवळ हफ्साचा उल्लेख केला होता आणि मी गप्प राहिलो होता, संभवत: तुम्हाला माझ्या गप्प राहण्याने त्रास झाला असेल. मी म्हणालो,होय मला (मानसिक) त्रास तर झाला. त्यांनी सांगितले, मला माहीत होते की अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचा स्वत: असा विचार आहे आणि हे त्यांचे एक गुपित होते, जे मी जाहीर

करू इच्छित नव्हतो. जर स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हफ्सा (रजि.) यांचा उल्लेख केला नसता तर तुमचा प्रस्ताव मी अवश्य कबूल करून घेतला असता." (हदीस : बुखारी)

माननीय अनस (रजि.) एक दिवस मुलांबरोबर खेळत होते. तेवढ्यात पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ आगमन झाले आणि त्यांनी आम्हाला सलाम केला. मग आपली एक गरज सांगून मला पाठविले. मला ते काम करण्यात उशीर झाला काम आटोपल्यावर जेव्हा घरी गेलो तेव्हा आईने विचारले, एवढा उशीर का लावला? मी म्हणालो, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या एका कामासाठी पाठविले होते. ती म्हणाली, "काय काम होते?" मी म्हणालो, "ती एक गोपनीय बाब आहे. आई म्हणाली, हे बघ अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांची गोपनीय बाब कोणाला ही सांगू नको." (हदीस : मुस्लिम)

२०) सामुदायिक चरित्रात एवढा विस्तार आणि व्यापकता निर्माण करा की प्रत्येक आवडी-निवडीच्या, विचारसरणीच्या आणि अभिरूची राखणाऱ्या माणसाला तुमच्याविषयी असाधारण आकर्षण वाटावे आणि प्रत्येकाच्या आवडी-निवडी व अभिरुची लक्षात घेऊन असा बुध्दीमत्तपूर्ण व्यवहार करा की कोणाचेही मन दुखावले न जावे. प्रत्येकाला स्वत:च्या आवडी व अभिरूचीच्या परिणामाने तोलण्याचा प्रयत्न करू नका आणि प्रत्येकाला आपल्या इच्छेनुसार घडविण्याचाही प्रयत्न करू नका. आवडी-निवडी व स्वभावातील मतभेद एक स्वाभाविक सौंदर्य आहे. स्वाभाविक सौंदर्याला बेगडी सौंदर्याने विद्रुप करू नका. प्रत्येक मित्राला त्याच्या स्वाभाविक स्थानी ठेवून त्यात रूची घ्या आणि त्याचे मूल्य जाणा आणि आपल्या सद्व्यवहाराद्वारे त्याच्याशी संबंध कायम राखण्याचा प्रयत्न करा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या व्यक्तिमत्वाची ही अवस्था होती की प्रत्येक आवडी-निवडी व स्वभावाच्या मनुष्याला त्यांच्या बैठकीत शांती-समाधान लाभत असे. त्याला कसलाही परकेपणा जाणवत नसे. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या बैठकीत अबू बकर (रजि.) सारखे मूर्तिमंत प्रेमी होते, उमर फारूक (रजि.) सारखे म्यान नसलेली तलवार. हस्सान बिन साबित (रजि.) सारखे भयकंपित होणारे आणि माननीय अली (रजि.) सारखे खैबर जिंकणारे, अबू जर गिफारी (रजि.) सारखे गरीब स्वभावाचे आणि अब्दुर्रहमान बिन औफ (रजि.) सारखे धनवान ही. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या उच्चतम चारित्र्यांचा, चांगल्या नैतिकतेचा आणि हिकमतपूर्ण सुज्ञतेचा हा चमत्कार होता की हे सर्व सहकारी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याशी अनुपम संबंध आणि प्रेम राखत आणि स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) देखील त्यांच्याशी इतक्या आपुलकीने वागत की प्रत्येकजण हे समजत असे की पैगंबर मुहम्मद (स.) कदाचित सर्वात जास्त माझ्याशीच प्रेम राखतात. याच असाधारण चारित्र्य आणि अनुपमेय त्यागामुळे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या निष्ठावान व सच्चा सहकाऱ्यांचा तो आदर्श समूह तयार केला ज्यात विभिन्न स्वभाव असतांनाही अद्वितीय ऐक्य, संबंध आणि परस्पर प्रेम होते. मानवी इतिहासाच्या आपल्या हया पृष्ठांना मानवी इतिहास

स्वत:च्या प्रदीर्घ जीवनाचे सार समजतो. तुमची मैत्री खऱ्या अर्थाने त्याच वेळी यशस्वी आणि मजबूत बनू शकते, जेव्हा तुम्ही सामूहिक चारित्र्यात हिकमतपूर्ण लवचिकता आणि असाधारण स्थैर्य आणि सहनशीलता निर्माण कराल मैत्रीपूर्ण संबंधात एकमेकांचा आदर आणि एकमेकांच्या चुकांना माफी, त्याग भावना, परस्पर सूट, सहानुभूती, प्रेम, एकमेकांच्या भावनांचा विचार व हितचिंतन इ. गोष्टींची काळजी घ्याल. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आदर्श जीवनाच्या काही घटनांवरून बोध प्राप्त करा की ते किती उच्च प्रतीच्या स्वाभाविक सहृदयता, उदारता, मृदुता, संयम आणि सहीष्णूतेसह लोकांच्या स्वाभाविक गरजा, भावना व दुर्बलतेचा विचार राखत.

"मी नमाजसाठी येतो आणि वाटते की दीर्घ नमाज पढवावी, मग एखाद्या बाळाच्या रडण्याचा स्वर कानावर येतो, तेव्हा मी नमाज छोटी करतो, कारण माझ्यावर ही गोष्ट मोठ्या ओझ्यासमान आहे की नमाजला दीर्घ करून बाळाच्या आईला अडचणीत टाकावे." (हदीस : बुखारी)

माननीय मालिक बिन हुवैरस (रजि.) यांचे निवेदन आहे की आम्ही काही समवयस्क तरूण धार्मिक शिक्षण घेण्यासाठी पैगंबर मुहम्मद (स.) जवळ पोहोचलो. आम्ही वीस दिवस त्यांच्याकडे राहिलो. पैगंबर मुहम्मद (स.) मोठे दयाळू आणि मृदु व्यवहार करणारे होते. (जेव्हा त्यांच्याकडे रहायला आम्हाला वीस दिवस पूर्ण झाले तेव्हा) त्यांना जाणवले की आम्हाला आमच्या घरी जाण्याची ओढ लागली. तेव्हा त्यांनी आम्हाला विचारले, "तुम्ही घरी तुमच्या मागे कोणाकोणाला सोडून आलात? आम्ही घरची परिस्थिती सांगितली, तेव्हा त्यांनी सांगितले जा, आपल्या मुलाबालांजवळ परत जा आणि त्यांच्यात राहून त्यांनाही ते शिकवा, जे तुम्ही इथे शिकलात आणि त्यांना सत्कर्मास प्रवृत्त करा आणि अमुक नमाज अमक्या वेळी पढा आणि जेव्हा नमाजची वेळ होईल तर तुमच्यापैकी एखाद्याने अजान द्यावी आणि जो तुमच्यात ज्ञान व चारित्र्याच्या दृष्टीने श्रेष्ठतम असेल, त्याने नमाज पढवावी." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

माननीय मुआविया बिन हकम सुलमी (रजि.) आपला किस्सा ऐकवितात की मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासोबत नमाज पढत होते. तेवढ्यात एका माणसाला शिंक आली. नमाज पढत असतानाच माझ्या तोंडून "यर्हमुकल्लाह" हा शब्द निघाला. तेव्हा लोक मला रागाने पाहू लागले. मी म्हणालो, अल्लाह तुम्हाला सलामतीने राखो. मला असे रागारागाने का पाहता? मग जेव्हा मी पाहिले की ते मला गप्प राहण्यास सांगत आहेत, तेव्हा मी गप्प झालो. जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांची नमाज संपली, माझे माता पिता पैगंबर मुहम्मद (स.) वर अर्पण ! मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या अधिक उत्तम शिकवण व संस्कार घडविणारा न पूर्वी पाहिला न नंतर. त्यांनी न तर मला दाटले-दरडाविले, न मारले आणि न बरे-वाईट बोलले, फक्त एवढेच म्हणाले, "ही नमाज आहे. नमाज पढतांना बोलणे उचित

नाही. नमाज तर नाव आहे अल्लाहची पवित्रता वर्णन करण्याचे, त्याची महानता वर्णन करण्याचे आणि कुरआन पठण करण्याचे." (हदीस : मुस्लिम)

२१) दुआचा खास इतमाम राखा स्वत:ही मित्रांसाठी दुआ करा आणि त्यांनाही दुआ करण्याची विनंती करा. दुआ मित्रांच्या समोरही करा आणि त्यांच्या पश्चातही. माननीय उमर (रजि.) कथन करतात की मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडून उमरा करण्याची अनुमती मागितली तेव्हा त्यांनी अनुमती देतांना सांगितले, "हे माझ्या बांधवा! तुमच्या दुआ-प्रार्थनेत आम्हाला विसरू नका." माननीय उमर (रजि.) कथन करतात मला या गोष्टीचा आनंद आहे की जर याच्याऐवजी मला सगळे जगही मिळाले असते तरी एवढा आनंद झाला नसता."

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे की "जेव्हा एखादा ईमानधारक आपल्या ईमानधारक बांधवाकरिता त्याच्या अनुपस्थितीत दुआ करतो तर अल्लाह ती दुआ कबूल करतो. दुआ करणाऱ्याच्या डोक्याशी एक फरिश्ता नेमतो की जेव्हा तो मनुष्य आपल्या बांधवाकरिता चांगली दुआ करतो तेव्हा हा फरिश्ता आमीन म्हणतो आणि असे म्हणतो, तुझ्याकरिता ही तेच आहे, जे तू तुझ्या बांधवासाठी मागत आहे." (हदीस : मुस्लिम)

तुमच्या निष्कपट व अंत:करणपूर्वक दुआ-प्रार्थनामध्ये अल्लाहजवळ ही प्रार्थना करीत राहा की, हे अल्लाह ! आमच्या हृदयांना व्देष, कपट आणि शत्रुत्वाच्या धुळीपासून स्वच्छ कर आणि आमच्या मनांना निष्कपटता व प्रेमाने जुळव आणि आमच्या संबंधाना परस्पर भेटीगाठी आणि ऐक्याद्वारे मनोहारी व रम्य बनव. पवित्र कुरआनातील या दुआचाही इतमाम राखा,

"रब्बनग़फ़िर लना व लि इख़्वानिनल्लज़ी-न स-ब कूना बिल ईमानि वला तज-अल फ़ी कुलूबिना ग़िल्लत लिल्लज़ी-न आमनू रब्बना इन्न-क रऊ-फ़ुर्रहीम."

"हे आमच्या पालनकर्त्या आम्हाला आणि आमच्या त्या सर्व बांधवांना क्षमा प्रदान कर ज्यांनी आमच्यापूर्वी श्रद्धा ठेवलेली आहे. आणि आमच्या मनामध्ये श्रद्धावंतांविषयी कोणताही द्वेष ठेवू नकोस, हे आमच्या पालनकर्त्या, तू मोठा मेहरबान आणि दयावान आहेस." *(दिव्य कुरआन, ५९:१०)*

## २७. आतिथ्य शिष्टाचार

१) अतिथीच्या आगमनावर आनंद व्यक्त करा आणि आनंदी मनाने व सन्मानपूर्वक त्यांचे स्वागत करा. संकोच मनाने रूक्षपणे व वेडा वाकडा चेहरा करून संकट आल्यासारखे दाखवू नका.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"जे लोक अल्लाह आणि अंतिम दिनावर विश्वास ठेवतात त्यांनी आपल्या अतिथींचा आदर सत्कार केला पाहिजे." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

आदर सत्कार करण्यात त्या सर्व गोष्टी सामील आहेत ज्या अतिथीच्या मान-सन्मान, आराम, शांती, विश्रांती आणि भावनांच्या समाधानाकरिता असाव्यात. मोकळ्या मनाने वागणे, हसतमुखाने बोलून मन प्रसन्न ठेवणे, सन्मानपूर्वक बसण्या झोपण्याची व्यवस्था करणे, आपल्या प्रिय मित्रांशी परिचय व भेटी करविणे, त्यांच्या गरजांचा विचार राखणे, मोठ्या आनंदाने व सहृदयतेने त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था राखणे आणि आदरातिथ्यात व्यस्त राहणे या सर्व गोष्टी अतिथींच्या आदर सत्कारात सामील आहेत.

प्रिय पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ अतिथी येत, तेव्हा ते स्वत: त्यांच्या आदरातिथ्याचे कर्तव्य पार पाडत. जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) अतिथींना आपल्या भोजनाच्या चादरीवर जेऊ घालीत तेव्हा वारंवार सांगतात, "आणखी खा, आणखी खा." जेव्हा अतिथी तृप्त होई आणि इन्कार करीत असे तेव्हा आग्रह करण्याचे थांबवत.

२) अतिथीच्या आगमनांवर सर्वात प्रथम त्याला दुआ-सलाम करा व त्याचे क्षेमकुशल जाणून घ्या. पवित्र कुरआनातील उल्लेख असा,

"जेव्हा ते त्याच्या येथे आले तेव्हा त्यांनी सांगितले, आपल्याला सलाम. त्याने सांगितले, "आपणांससुद्धा सलाम - काही अनोळखी लोक आहेत." *(दिव्य कुरआन, ५१:२५)*

३) अगदी मनापासून अतिथीचे स्वागत करा आणि वेळेवर जे काही चांगल्यात चांगले (खाद्य) उपलब्ध होईल ते अतिथीसमोर त्वरीत सादर करा. आदरणीय इब्राहीम (अ.) यांचे अतिथी जेव्हा आले तेव्हा आदरणीय इब्रहीम (अ.) त्वरीत त्यांच्या खाण्या-पिण्याच्या व्यवस्थेत गुंतले आणि जो सुदृढ बछडा त्यांच्या जवळ होता, त्याचे मांस भाजून अतिथींच्या सेवेत सादर केले.

कुरआनतील उल्लेख असा,

"मग तो गुपचुप आपल्या कुटुंबियांकडे गेला, आणि एक (भाजलेले) जाडजूड वासरू आणून पाहुण्यांच्या पुढे ठेवले." *(दिव्य कुरआन, ५१:२६)*

इथे मूळ ग्रंथात जे अरबी शब्द आले आहेत, त्यांचा एक अर्थ असाही आहे की ते नकळतपणे घरात अतिथीच्या सत्काराची व्यवस्था करण्यास निघून गेले. यासाठी की अतिथींना दाखवून व प्रदर्शन करून त्यांच्या भोजनाची व सत्काराची धावपळ केल्यास शरमेने व यजमानाला उगिच त्रास नको. या भीतीने वर्ज्य करतील आणि हे पसंत करणार नाहीत की त्यांच्यामुळे यजमान नको त्या अडचणीत सापडावा. मग यजमानालाही संधी लाभणार नाही की अतिथींचा यथायोग्य सत्कार करावा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आदरातिथ्यावर ज्या शैलीत प्रोत्साहित केले आहे त्याचे चित्र रेखाटतांना अबू शुरैह (रजि.) सांगतात,

"माझ्या या दोन डोळ्यांनी पाहिले आणि या दोन कानांनी ऐकले, वास्तविक पैगंबर मुहम्मद (स.) ही ताकीद करीत होते की, जे लोक अल्लाह आणि अंतिम दिनावर विश्वास ठेवत असतील, त्यांनी आपल्या अतिथींचा आदर केला पाहिजे. अतिथीच्या इनामाची संधी पहिली रात्र आणि दिवस आहे." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

पहिली रात्र आणि दिवासाच्या आतिथ्याला इनाम म्हटले जाण्याचा अर्थ असा की ज्याप्रमाणे इनाम देणारा अगदी आनंदी मनाने व सखोल प्रेम भावनेने इनाम देताना मानसिक आनंदाची अनुभूती घेतो, अगदी हीच अवस्था पहिल्या रात्री व दिवसाच्या आतिथ्याची असली पाहिजे. आणि ज्याप्रमाणे इनाम प्राप्त करणारा आनंदाच्या भावसागरात बुडून इनाम देणाऱ्याच्या उपकाराची कदर जाणत आपला हक्क समजून इनाम वसूल करतो. अगदी असेच पहिल्या रात्री व दिवशी अतिथीतनेही जाहीर केले पाहिजे आणि नि:संकोचपणे आपला हक्क समजून आनंदाने व आत्मीयतेच्या भावनेने यजमानाची भेट स्वीकारली पाहिजे.

४) अतिथीचे आगमन होताच, त्याच्या स्वाभाविक गरजांना पूर्ण करण्याचा इतमाम राखावा. हात-पाय धुण्याची व्यवस्था करावी. गरज पडल्यास स्नान वगैरेचीही व्यवस्था करावी. जेवणाची वेळ नसली तरीही त्याला काय हवे ते जाणून घ्या. अशा उत्तम रीतीने की अतिथीने संकोच करून इन्कार करू नये. ज्या खोलीत बसण्या-झोपण्याची व आरामाची व्यवस्था असेल ती खोली अतिथीला दाखवावी.

५) सदोदित अतिथी शेजारी बसून राहू नका आणि अशाच प्रकारे रात्री उशीरापर्यंत अतिथीशी बोलत राहून त्याला त्रास देऊ नका. यासाठी की अतिथीला आराम करण्याची संधी मिळावी आणि त्याला त्रास जाणवू नये. माननीय इब्राहीम (अ.) यांच्याजवळ जेव्हा अतिथी आले तेव्हा त्यांच्या खाण्या-पिण्याची व्यवस्था केल्यानंतर अतिथीपासून थोडा वेळ दूर झाले.

६) अतिथींच्या खाण्या-पिण्यावर आनंदाची अनुभूती घ्या. आतिथ्य करतांनासंकोच उद्विग्नता

येऊ देऊ नका. अतिथी क्लेश-यातना नव्हे तर अल्लाहची दया-कृपा व समृध्दीचे माध्यम असतो आणि अल्लाह ज्याला तुमच्याकडे पाठवितो. त्याची अन्न सामुग्रीदेखील अवतरित करतो. तो तुमच्या भोजनाच्या थाळीत तुमच्या भाग्याचे खात नाही, तर आपल्याच भाग्याचे अन्न खातो आणि तुमच्या आदरातिथ्यात वृध्दीकारक ठरतो.

७) अतिथीच्या मान प्रतिष्ठेचाही विचार राखा आणि त्याच्या मान-प्रतिष्ठेला आपली मान-प्रतिष्ठा जाणा. तुमच्या अतिथीच्या प्रतिष्ठेवर जर कोणी हल्ला करील तर त्याला आपली मानहानी समजा.

कुरआनात आहे की जेव्हा लूत (अ.) यांच्या अतिथींवर वस्तीचे लोक वाईट इराद्याने चाल करून आले, तेव्हा त्यांना रोखण्यासाठी ते उठून उभे राहिले आणि म्हणाले की हे लोक माझे अतिथी आहेत. यांच्याशी वाईट वर्तन करून मला अपमानित करु नका. यांची बदनामी माझी बदनामी आहे. लूत (अ.) म्हणाले,

"लूत (अ.) ने सांगितले, "बंधूनो! हे माझे पाहुणे आहेत, माझी फजिती करू नका, अल्लाहच्या कोपाचे भय बाळगा, मला अपमानित करू नका."

*(दिव्य कुरआन, १५:६८-६९)*

८) तीन दिवसपावेतो मोठ्या आवडीने व आनंदाने आदरातिथ्य करा. तीन दिवसांपर्यंतचे आतिथ्य अतिथीचा हक्क आहे आणि हक्क अदा करण्यात ईमानधारकाने विशालहृदयी असले पाहिजे. पहिला दिवस खास आदर-सन्मानाचा दिवस आहे म्हणून पहिल्या दिवशी आदरातिथ्य संपूर्ण इतमामीने करा. नंतरच्या दोन दिवसात तसा असाधारण इतमाम राखला न गेल्यास काही हरकत नाही.

पैगंबर (स.) यांचे शुभकथन आहे.

"आणि पाहुणचार तीन दिवसांपावेतो आहे. त्यानंतर यजमान जे काही करील ते त्याच्यासाठी दान असेल." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

९) अतिथी सेवा आपले नैतिक कर्तव्य समजा आणि अतिथीना नोकरांच्या व मुलांच्या हवाली करण्याऐवजी स्वत: त्यांची सेवा व आरामाकरिता तत्पर राहा. पैगंबर (स.) आपल्या प्रिय अतिथींचा पाहुणचार स्वत: करीत. माननीय इमाम शाफई जेव्हा इमाम मालिक यांच्या घरी जाऊन अतिथी रूपाने राहिले. तेव्हा इमाम मालिक यांनी मोठ्या आदर-सन्मानांने त्यांना एका खोलीत झोपविले. पहाटे इमाम शाफई यांना दरवाजा ठोठावण्याचा आवाज ऐकू आला. त्यासोबत त्यांनी ऐकले की कोणी मोठ्या प्रेमाने हाक मारली, तुमच्यावर अल्लाहची रहमत (दया कृपा) असो. नमाजची वेळ झाली. इमाम शाफई त्वरीत उठले आणि दरवाजा उघडून पाहतात. तर इमाम मालिक हातात पाण्याचे भांडे घेऊन उभे आहेत. इमाम शाफई यांना ओशाळल्यासारखे झाले. इमाम मालिक यांनी ते जाणले आणि

मोठ्या प्रेमाने म्हणाले, बंधु! तुम्ही काहीही मनात आणू नका. अतिथीची सेवा तर केलीच पाहिजे.

१०) अतिथीची राहण्याची व्यवस्था करतांना शौचालयही दाखवा. पाण्याची व्यवस्था करा आणि काबागृहाची दिशाही दाखवा. नमाजचे ठिकाण आणि काबागृहाची दिशाही दाखवा आणि मुसल्ला वगैरे उपलब्ध करून द्या. इमाम मालिक यांच्या सेवकाने इमाम शाफई यांना एका खोलीत स्थानापन्न केल्यावर म्हटले, महोदय, काबागृहाची दिशा ही आहे, पाण्याचे भांडे या ठिकाणी ठेवले आहे. शौचालय या बाजूला आहे.

११) भोजनासाठी प्रथम हात धुवून दस्तरख्वान (भोजनासाठी अंथरलेल्या चादरी) वर पोहचा आणि मग अतिथी चे हात धुवा. इमाम मालिक यांनी जेव्हा हीच गोष्ट अमलात आणली, तेव्हा इमाम शाफई याचे कारण विचारले, तेव्हा त्यांनी सांगितले, जेवणापूर्वी तर यजमानाने प्रथम हात धुतले पाहिजे आणि भोजनाच्या चादरीपर्यंत पोहचून, अतिथीच्या स्वागतास सज्ज झाले पाहिजे. आणि जेवणानंतर अतिथीचा हात धुतला पाहिजे आणि सर्वांच्या नंतर यजमानाने हात धुवून घ्यावेत. संभवत: उठता उठता आणखी कोणी येऊन पोहचावा.

१२) भोजनाच्या चादरीवर खाद्य-पेयसामुग्री आणि भांडी वगैरे पाहुण्यांच्या संख्येपेक्षा जास्त ठेवा. संभवत: जेवण चालू असतांना आणखी एखाद्या पाहुण्याचे आगमन व्हावे आणि मग त्याच्यासाठी व्यवस्था करण्यासाठी धावपळ करावी लागावी. जर भांडी व सामुग्री आधीच असेल तर नव्याने येणाऱ्याला संकोच न वाटता मोकळेपणा व प्रतिष्ठा जाणवेल.

१३) अतिथीकरिता त्यागाची भावना राखा स्वत: त्रास सहन करून अतिथीला आराम पोहचवा.

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत एक मनुष्य आला आणि म्हणाला, "हुजूर! मी भुकेने अनावर झालोय." त्यांनी आपल्या पत्नीला सांगून पाठविले की "जेवणासाठी जे काही उपलब्ध असेल, पाठवा." उत्तर आले, "त्या अल्लाहची शपथ, ज्याने तुम्हाला पैगंबर बनवून पाठविले आहे, इथे तर माझ्याखेरीज आणखी काही नाही." मग पैगंबरांनी दुसऱ्या पत्नीला सांगून पाठवले, "तिथूनही हेच उत्तर मिळाले. येथपावेतो की पैगंबरांनी आपल्या सर्व पत्नींच्या घरी सांगून पाठविले, परंतु सगळीकडून हेच उत्तर मिळाले. आता पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या सहकाऱ्यांना संबोधिले, "आज रात्री या अतिथीचा कोण स्वीकार करतो?" एका अन्सारी सहाबी (रजि.) म्हणाले, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! मी कबूल करतो."

अन्सारी अतिथीला आपल्या घरी घेऊन गेले आणि घरात जाऊन पत्नीला म्हणाले, माझ्यासोबत हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे अतिथी आहेत, यांचा पाहुणचार करा. पत्नी म्हणाली, माझ्याजवळ फक्त मुलांपुरते भोजन आहे. अन्सारी सहाबी म्हणाले, मुलांना कसेही करून झोपवा आणि जेव्हा अतिथी समोर भोजन ठेवाल तेव्हा काही तरी सांगून दिवा

विझवा यासाठी की त्यांना वाटावे आपणही त्यांच्यासोबत जेवत आहोत.

अशा प्रकारे त्या अतिथीने पोटभर जेवण घेतले आणि सगळ्या कुटुंबाने ती रात्र उपाशी काढली. सकाळी जेव्हा हे सहाबी (रजि.) पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झाले. तेव्हा पैगंबरांनी त्यांना पाहताच सांगितले,

"तुम्ही दोघांनी आपल्या अतिथीशी जो सद्‌व्यवहार केला, तो अल्लाहला अतिशय पसंत पडला." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

१४) जर तुमच्या अतिथीने तुमच्याशी विमुखतापूर्ण आणि रूक्षतापूर्ण व्यवहार केला असेल तरीही तुम्ही त्याच्याशी मोकळ्या मनाने वागा.

माननीय अबुल अहवस जश्मी (रजि.) आपल्या पित्याविषयी सांगतात की एकदा त्यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले,

"जर एखाद्याच्या घरी माझे जाणे झाले आणि त्याने माझ्या पाहुणचाराचा हक्क अदा केला नाही आणि मग काही दिवसानंतर त्याचे माझ्याकडे येणे झाले, तर काय मी त्याच्या पाहुणचाराचा हक्क अदा करावा? की त्या (च्या विमुखता व उपेक्षा) चा बदला त्याला चाखवावा? पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"नव्हे, किंबहुना तुम्ही त्याच्या पाहुणचाराचा हक्क अदा करा." (हदीस : मिश्कात)

१५) अतिथीला आपल्या स्वत:साठी भलाई व समृध्दीची दुआ करण्याकरिता विनंती करा. विशेषत: जर अतिथी नेक-सदाचारी, धार्मिक वृत्तीचा व थोर बुजुर्ग असेल. माननीय अब्दुल्लाह बिन बिस्र (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) माझ्या पित्याच्या घरी अतिथी म्हणून आले. आम्ही त्यांच्यासमोर हरीसा ठेवला. पैगंबरांनी थोडेसे खाल्ले, मग आम्ही खजुरी सादर केल्या. पैगंबर खजुरी खात आणि बिया तर्जनी व मधल्या बोटाने पकडून फेकत जात. मग पिण्याकरिता काही दिले गेले. पैगंबरांनी पिऊन घेतले आणि आपल्या उजव्या बाजूला बसलेल्या समोर दिले. जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) जाण्यास निघाले तेव्हा पिता महोदयांनी पैगंबरांच्या वाहनाची लगाम धरली आणि विनंती केली की हुजूर आमच्यासाठी दुआ करा मग पैगंबर मुहम्मद (स.) ही दुआ केली.

"अल्लाहुम-म बारिक लहुम फ़ीमा र-ज़क-तहुम वग़िफ़र लहुम वरहमहुम."

हे अल्लाह! तू यांना जी आजीविका प्रदान केली आहे, तिच्यात समृध्दी दे, यांचे अपराध माफ कर आणि यांच्यावर दया कर.

# २८. पाहुणचाराचे शिष्टाचार

१) एखाद्याच्या घरी अतिथी म्हणून जाल तर आपल्या ऐपतीनुसार यजमान किंवा यजमानाच्या मुला-बाळांकरिता काही भेटवस्तू सोबत न्या असे करताना यजमानाच्या आवडी- निवडीचा विचार राखा. भेटवस्तू आणि उपहार दिल्याघेतल्याने प्रेम आणि परस्परसंबंध मजबूत होऊन वाढीस लागतात आणि भेटवस्तू देणाऱ्यासाठी मनात स्थान निर्माण होते.

२) ज्याच्या घरीदेखील पाहुणे म्हणून जाल, तर तीन दिवसापेक्षा जास्त न थांबण्याचा प्रयत्न करा. याखेरीज की एखादी बिकट परिस्थिती निर्माण व्हावी आणि यजमानाने राहण्याचा आग्रह धरावा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे, "अतिथीकरिता हे उचित नव्हे की त्याने यजमानाच्या घरी इतके राहावे की त्याला त्रासदायक ठरावे." (अल अदबुल मुफरद)

सही मुस्लिम या हदीसग्रंथातील उल्लेख असा आहे, "ईमानधारकाकरिता हे उचित नव्हे की त्याने आपल्या बांधवाकडे इतके राहावे की त्याला अपराधी बनवावे."

लोकांनी विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! अपराधी कसे बनवील?"

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "ते अशा प्रकारे की त्याने त्याच्याकडे इतके थांबावे की यजमानाजवळ पाहुणचाराकरिता काहीच राहू नये."

३) नेहमी दुसऱ्यांच्या घरी अतिथी बनू नका. इतरांनाही आपल्या घरी येण्याचे आमंत्रण द्या आणि त्यांचा मोकळ्या मनाने आदर-सत्कार करा.

४) अतिथी म्हणून जातांना ऋतुमानानुसार आवश्यक ती सामुग्री आणि अंथरूण वगैरे सोबत घ्या. विशेषत: थंडीच्या दिवसांत अंथरूणाविना मुळीच जाऊ नका अन्यथा यजमानाला त्रास होईल आणि हे कदापि योग्य नव्हे की अतिथी आपल्या यजमानाकरिता, जीवावरचे संकट बनावा.

५) यजमानाच्या कामांचा व जबाबदाऱ्यांचाही विचार राखा आणि या गोष्टीची काळजी घ्या की तुमच्यामुळे यजमानाच्या कामावर परिणाम होऊ नये आणि त्याच्या जबाबदाऱ्यांमध्ये खंड पडू नये.

६) यजमानाजवळ वेगवेगळ्या प्रकारच्या मागण्या करू नये. तो तुमच्या आदरातिथ्यासाठी आणि तुमचे मन राखण्यासाठी स्वत: जो काही इतमाम राखील, तेवढ्यावरच त्याचे आभार माना आणि त्याला एखाद्या अनुचित कष्ट यातनेत टाकू नका.

७) तुम्ही यजमानाच्या स्त्रियांकरिता नामहरम आहात (अर्थात तुमच्यासमोर त्यांनी पडदा

करणे आवश्यक असेल) तर यजमानाच्या अनुपस्थितीत अकारण त्यांच्याशी बोलत बसू नका, न त्यांच्या आपसात बोलणे कान लावून ऐका आणि अशा पद्धतीने राहा की तुमच्या वागण्या-बोलण्याने त्यांना कसलाही त्रास होऊ नये आणि कोणत्याही वेळी बेपर्दा अवस्था होऊ नये.

८) काही कारणाने तुम्ही यजमानासोबत खात नसाल किंवा तुमचा रोजा (उपवास-व्रत) असेल तर चांगल्या पध्दतीने तसे सांगा आणि यजमानाकरिता भलाई आणि समृध्दीची दुआ मागा.

जेव्हा आदरणीय इब्राहीम (अ.) यांनी येणाऱ्या प्रिय अतिथींच्या समोर संकोचपूर्ण पणे भोजन ठेवले आणि त्यांनी जेवणासाठी हात पुढे केला नाही. तेव्हा आदरणीय इब्राहीम (अ.) यांनी विनंती केली. आपण का नाही जेवत? उत्तरादाखल फरिश्त्यांनी आदरणीय इब्राहीम यांना सांत्वना देत म्हटले,

"तुम्ही वाईट वाटून घेऊ नका. वास्तविक आम्ही जेऊ शकत नाही. आम्ही तर फक्त तुम्हाला एक सुपुत्राच्या जन्माचा शुभसमाचार देण्यासाठी आलो आहोत."

९) जेव्हा एखाद्याकडे भोजनाच्या आमंत्रणावर जाल, तेव्हा भोजन आटोपल्यावर यजमानाकरिता उत्तम आजीविका, भलाई-समृध्दी आणि अल्लाहतर्फे क्षमा प्राप्ती व दया-कृपेची दुआ करा.

माननीय अबुल हैसम बिन तैहान (रजि.) यांनी पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांच्या निष्ठावान सहकाऱ्यांना जेवणाचे आमंत्रण दिले. जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"आपल्या बांधवाला मोबदला द्या. सहाबा (रजि.) नी विचारले, मोबदला काय द्यावा? हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! सांगितले, जेव्हा एखादा मनुष्य आपल्या बांधवाकडे जाईल, तिथे खाणे पिणे करील तर त्याने त्याच्यासाठी भलाई व समृध्दीची दुआ करावी. हा त्याचा मोबदला आहे." (हदीस : अबू दाऊद)

पैगंबर मुहम्मद (स.) एकदा माननीय साद बिन उबादा (रजि.) यांच्या घरी गेले. माननीय साद यांनी भाकरी व जैतून सादर केले. पैगंबरांनी खाल्ले आणि ही दुआ केली,

"अफ़-तर इन्दकुमुस्साइमू न व अ-क-ल तआ-म-कुमुल अब रारु व सल्लत अलैकुमुल मलाइकह." (हदीस : अबू दाऊद)

तुमच्या घरी रोजा राखणाऱ्यांनी रोजा (व्रत) सोडवावे. सदाचारी लोकांनी तुमचे भोजन घ्यावे आणि फरिश्त्यांनी तुमच्यासाठी दया-कृपा व क्षमाप्राप्तीची दुआ करावी.

# २९. सभेचे शिष्टाचार

१) नेहमी चांगल्या लोकांच्या संगतीत बसण्याचा प्रयत्न करा.

२) सभेत होत असलेल्या कार्यक्रमात सहभाग घ्या. सभेच्या कार्यात, भाग न घेणे आणि कपाळावर आठया ताणून बसणे गर्वाचे लक्षण आहे. सभा सम्मेलनात सहाबा (र.) ज्या कार्यात मग्न असत, पैगंबर मुहम्मद (स.) देखील त्यात सहभागी होत. सभेत उदास व सुस्त होऊन बसू नका. हसतमुखाने व प्रसन्नचित्र होऊन बसा.

३) तुमची कोणतीही सभा किंवा बैठक अल्लाह आणि आखिरतच्या स्मरणाविना नसावी आणि जेव्हा तुम्हाला असे जाणवेल की उपस्थित लोक धार्मिक गोष्टीत रस घेत नाहीत तर बोलण्याचा ओघ एखाद्या ऐहिक समस्येकडे वळवा आणि उचित संधी मिळताच बोलण्याचा ओघ कुशलतेने धर्माच्या एखाद्या बाबीकडे वळविण्याचा प्रयत्न करा.

४) सभा किंवा मैफिलीत जिथे जागा मिळेल तिथे बसा. बसलेल्या लोकांना तुडवीत, ओलांडत पुढे जाण्याचा प्रयत्न करू नका. अशाने आधी बसलेल्यांना व नंतर येणाऱ्यांनाही त्रास होतो आणि असे करणाऱ्यांमध्ये आपला मोठेपणा मिरविण्याची घमेंड निर्माण होते.

५) सभेत आधीपासून बसलेल्या व्यक्तीस उठवून त्याच्या जागी बसण्याचा प्रयत्न करू नका. ही अतिशय वाईट सवय आहे. अशाने दुसऱ्यांच्या मनात तिरस्कार निर्माण होतो आणि स्वत:ला श्रेष्ठ समजणे आणि आपली महत्ता दर्शविणेही व्यक्त होते.

६) जर सभेत लोक वर्तुळाकारात बसले असतील तर त्यांच्या मध्यभागी जाऊन बसू नका. ही फार मोठी असभ्यता आणि विदुषकता आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे करणाऱ्याचा धि:क्कार केला आहे.

७) सभेत बसलेल्या लोकांपैकी जर कोणी एखाद्या गरजेखातीर उठून चालला जाईल तर लगेच त्याच्या जागेवर कब्जा करू नका. त्याची जागा सुरक्षित राखा. परंतु तो मनुष्य आता परत येणार नाही अशी खात्री झाल्यास नि:संकोचपणे त्याच्या जागेवर बसा.

८) जर सभेत दोन माणसे एकमेका शेजारी बसले असतील तर त्यांची अनुमती घेतल्याविना त्यांना अलग करू नका. कारण ते आपसातील घनिष्ठता व प्रेम अथवा अन्य एखाद्या हेतुने एकत्र बसले असतील आणि त्यांचा विभक्त केल्याने त्यांच्या मनाला ठेच पोहोचेल.

९) सभेत एखाद्या विशिष्ट स्थानी बसण्याचा अट्टाहास टाळा. एखाद्याकडे गेल्यावर तिथेही त्याच्या खास जागेवर बसण्याचा प्रयत्न करू नका. त्याने स्वत:च बसण्याचा आग्रह धरल्यास हरकत नाही. सभेत नेहमी अदबशीरपणे बसा. पाय पसरून किंवा पोटऱ्या-उघड्या करून बसू नका.

१०) कसेही करून सभेच्या अध्यक्षा शेजारीच बसण्याचा प्रयत्न करू नका, किंबहुना जिथे जागा मिळेल तिथे बसा आणि अशा प्रकारे बसा की नंतर येणाऱ्या लोकांना जागा मिळण्यात व बसण्यात त्रास होऊ नये. जेव्हा अधिक संख्येने लोक येऊ लागतील, तेव्हा शरीराला थोडे संकुचित करून बसा आणि येणाऱ्या लोकांना मनमोकळेपणाने जागा द्या.

११) सभेत एखाद्याच्या समोर किंवा जवळपास उभे राहू नये. आदर सन्मानाची ही पध्दत इस्लामी स्वभावाच्या विरुध्द आहे.

१२) सभेत बसून दोन माणसांनी आपसात गुपचुप किंवा हलक्या आवाजात बोलू नये. अशाने इतरांना या गोष्टीचीही जाणीव होते की त्यांनी आपल्या रहस्यभेदात सहभागी करण्यायोग्य समजले नाही आणि हा गैरसमज होतो की कदाचित आमच्याचविषयी बोलत आहेत.

१३) सभेत जे काही बोलायचे ते सभेच्या अध्यक्षाची अनुमती घेऊन बोला आणि बोलण्यात किंवा प्रश्नोत्तरात अशी शैली अंगीकारू नका की तुम्हीच सभेचे अध्यक्ष आहात असे वाटू लागावे. हे स्वत:चा मोठेपणा मिरवणे आहे आणि सभेच्या अध्यक्षावर अन्यायही.

१४) एका वेळी एकाच माणसाने बोलावे आणि प्रत्येकाचे म्हणणे लक्षपूर्वक ऐकावे. स्वत:चे म्हणणे मांडण्याकरिता इतकी अधीरता दाखवू नका की सर्वांनी एकाच वेळी बोलू लागावे आणि सभेत कल्लोळ माजावा.

१५) सभेत ज्या गोष्टी गोपनीय स्वरूपाच्या असतील त्या ठिकठिकाणी उघडपणे बोलू नये. सभेचा हा हक्क आहे की त्यातल्या गोपनीय गोष्टींचे रक्षण केले जावे.

१६) सभेतूज्या विषयावर चर्चा होत असेल, तोपर्यंत त्याविषयी एखादा निर्णय घेतला जात नाही, दुसऱ्याविषयाची चर्चा सुरू करू नये आणि न दुसऱ्याचे म्हणणे पूर्ण होण्याआधी आपले म्हणणे सुरू करावे. जर प्रसंगी अत्यावश्यक स्वरूपात तुमचे त्वरीत बोलणे जरूरीचे असेल तर आधी बोलणाऱ्याकडून तशी अनुमती घ्या, मग बोला.

१७) सभेच्या अध्यक्षाने बोलताना समस्त लोकांकडे लक्ष दिले पाहिजे आणि डाव्या- उजव्या बाजूला तोंड फिरवून बोलले पाहिजे आणि मुक्तपणे प्रत्येकाला आपले विचार व्यक्त करण्याची संधी दिली पाहिजे.

१८) सभा बरखास्त होण्यापूर्वी ही दुआ करावी नंतर सभा बरखास्त करावी.

"अल्लाहुम्माक़्सिम लना मिन ख़श्यति-क मा तहूलु बै-नना व बै-न मअ-सि-य-ति-क व मिन ताअति-क मा तुबल्लिगुना बिही जन्न-त-क, व मिनल यक़ीनि मा तूहनु बिही अलैना मज़र्रुदुन्या। अल्लाहुम-म मत्तिअ्ना बिअस्माइना व अब्सारिना व कुव्वतिना मा अहयैतना वज-अलहुल वारि-स मिन्ना, वज-अल सा-रना अला मन ज़-ल-म-ना वन सुरना अला मन आदाना व ला तज-अल मुसी-ब-तना फ़ी दीनिना वला तज-अलिद-दुन या अक-ब-

र हम्मिना, व ला मबल-ग़ इल्मिना व ला तुसल्लित अलैना मल्ला यर-हमुना''
(हदीस : तिर्मिजी)

“हे अल्लाह! तू आम्हाला आपले भय प्रदान कर जे आमच्या व अवज्ञाकारींच्या दरम्यान आड बनावे आणि ती आज्ञाधारकता प्रदान कर जी आम्हाला तुझ्या जन्नतमध्ये पोहचवील आणि आम्हाला दृढविश्वास प्रदान कर, ज्यामुळे आमच्यासाठी जगात नुकसान मामुली व्हावे. हे अल्लाह! तू जोपर्यंत आम्हाला राखशील आम्हाला आमच्या ऐकण्या-पाहण्याच्या सामर्थ्या आणि शारीरिक शक्तीपासून लाभ प्राप्त करून घेण्याची संधी दे आणि या भलाईला आमच्या पश्चातही बाकी ठेव आणि जो आमच्यावर अत्याचार करील, त्याच्याशी आमचा सूड घे. जो आमच्याशी शत्रुत्व राखील त्याच्यावर आम्हाला वर्चस्व प्रदान कर आणि आम्हाला धर्माच्या कसोटीत टाकू नको आणि जगाला आमचे सर्वात मोठे ध्येय बनवू नको आणि जगाला आमच्या ज्ञान व विवेकाची सीमा ठरवू नको आणि ना आमच्यावर त्या माणसाला नियंत्रण देवू नकोस जो आमच्यावर करीत नाही.”

# ३०. सलामचे शिष्टाचार

१) जेव्हा एखाद्या ईमानधारक बांधवाशी भेट होईल तेव्हा त्याच्याशी आपला संबंध व आनंद व्यक्त करण्याकरिता "अस्सलामु अलैकुम" म्हणा.

पवित्र कुरआनात उल्लेख आहे,

"जेव्हा तुमच्याजवळ ते लोक येतील जे आमच्या वचनांवर श्रद्धा ठेवतात तेव्हा त्यांना सांगा, "तुमच्यावर शांती असो." *(दिव्य कुरआन, ६:५४)*

या आयतीत पैगंबर मुहम्मद (स.) यांना संबोधितांना समस्त मुस्लिम सम्प्रदायाला ही तात्विक शिकवण दिली गेली आहे की एक ईमानधारक जेव्हा दुसऱ्या ईमानधारकाशी भेटेल तर दोघांनी ही आपसात प्रेम व आनंदाचे आदान-प्रदान करावे अर्थात याची उत्तम पध्दत ही आहे की एकमेकांसाठी सलामतीची व क्षेम-कुशलतेची दुआ करावी. एकाने "अस्सलामु अलैकुम" म्हणावे तर दुसऱ्याने प्रत्युत्तरात "व अलैकुमस्सलाम" असे म्हणावे. सलाम आपसात प्रेम आणि आत्मियता वाढविण्याचे व ते मजबूत करण्याचे साधन आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे,

"तुम्ही जन्नतमध्ये जाऊ शकत नाही, जोपर्यंत मोमीन (ईमानधारक) बनत नाही. आणि तुम्ही मोमीन बनू शकत नाही जोपर्यंत एकमेकांशी प्रेम राखत नाही. मी तुम्हाला तो उपाय का न सांगावा की ज्याचा अंगीकार करून तुम्ही आपसात एकमेकांशी प्रेम करू लागाल. आपसात सलाम पसरवा." (हदीस : मिश्कात)

२) नेहमी इस्लामी पध्दतीने सलाम करा. एखाद्याशी वार्तालाप करताना किंवा पत्र व्यवहार करताना नेहमी कुरआन व पैगंबर आचरणाने दर्शविलेल्या शब्दांचा वापर करा. इस्लामी पध्दती सोडून समाजात प्रचलित शब्द आणि शैलीचा अंगिकार करू नका. इस्लामने दर्शविलेली संबोधनशैली मोठी साधी, अर्थपूर्ण आणि प्रभावशालीही आहे आणि सलामती आणि खुशालीपूर्ण दुआही. तुम्ही जेव्हा आपल्या एखाद्या बांधवांशी भेटताना "अस्सलामु अलैकुम" म्हणतात तर त्याचा अर्थ हा होतो की अल्लाह तुम्हाला प्रत्येक प्रकारची सलामती व खुशाली प्रदान करो, तुमच्या घरादाराला सलामतीने राखो. कुटुंबियांना व संबंधित लोकांनाही शांती सलामतीने राखो. दीन (धर्म) व ईमान सलामत राखो. तुमची ऐहिकता व आखिरत दोन्ही आबाधित राहो. अल्लाह तुम्हाला त्यात सलामतीही प्रदान करो, ज्या मला माहीत आहेत, आणि त्या सलामतींनीही उपकृत करो ज्या मला माहीत नाही. माझ्या हृदयात तुमच्या हितचिंतनाच्या, प्रेमाच्या, तुमचे क्षेमकुशल व खुशाली इच्छिण्याच्या सखोल भावना आहेत. यास्तव तुम्ही माझ्यातर्फे कधीही कसलेही भय बाळगू नका. माझ्या वागण्याने तुम्हाला कसलेही दुःख पोहचणार नाही. "सलाम" शब्दापुढे अस जोडून "अस्सलामु" असे म्हणून तुम्ही समोरच्या व्यक्तीकरिता सलामती आणि खुशालीच्या सर्व

दुआ प्रार्थना एकवटून घेता. तुम्ही कल्पना करा की जर हे शब्द सचेतपणे, आशय लक्षात घेऊन तुमच्या मुखातून निघतील तेव्हा संबोधिताच्या भेटीवर मन:पूर्वक आनंद व्यक्त करण्याचे, तसेच प्रेम, हितचिंतन व निष्ठा इ. भावना व्यक्त करण्यासाठी याहून अधिक चांगले शब्द आणखी काय असू शकतात?

"अस्सलामु अलैकुम"च्या शब्दांनी बांधवाचे स्वागत करताना तुम्ही म्हणतात, "तुम्हाला त्या सर्वोच अस्तित्वातर्फे शांती सलामती लाभो जो सलामती व खुशालीचा स्त्रोत आहे आणि पूर्णत: शांती सलामती आहे." ज्याचे नावच "अस्सलाम" आहे त्याच माणसाला सलामती व क्षेमकुशलता लाभू शकते ज्याला तो सलामतीपूर्वक राखू इच्छिल आणि ज्याला तो सलामतीपासून वंचित करील, तर तो इहलोक व परलोक दोन्ही जगात अशांत व असुरक्षित राहील.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"अस्सलाम" अल्लाहच्या अनेक उत्तम नावांपैकी एक नाव आहे. जे अल्लाहने धरतीवर राहणाऱ्यांकरिता ठेवले आहे. यासाठी "अस्सलाम" ला आपसात खूप पसरवा."

(अल अदबुल मुफरद)

माननीय अबू हुरैरा (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाहने जेव्हा आदरणीय आदम (अ.) यांची निर्मिती केली, तेव्हा त्यांना फरिश्त्यांच्या एका जमातीकडे पाठविताना हा आदेश दिला की जा आणि त्या बसलेल्या फरिश्त्यांना सलाम करा आणि ते सलामच्या प्रत्युत्तरात जी दुआ देतील, ती नीट लक्षपूर्वक ऐका (आणि सुरक्षित ठेवा) यासाठी की हीच तुमची व तुमच्या संततीची दुआ असेल. यास्तव आदरणीय आदम (अ.) फरिश्त्यांजवळ पोहोचले आणि म्हणाले, "अस्सलामु अलैकुम" फरिश्त्यांनी उत्तरादाखल म्हटले, "व अलैकुम अस्सलाम व रहमतुल्लाहि" अर्थात 'व रहमतुल्लाहि' हा शब्द वाढवून उत्तर दिले." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

कुरआनत आहे की फरिश्ते जेव्हा ईमानधारकाचा प्राण ताब्यात घेण्यास येतात तेव्हा येऊन सलाम करतात,

"असा मोबदला देतो अल्लाह ईशपरायण लोकांना.त्या ईशपरायणांना ज्यांचे आत्मे शुचिर्भूत अवस्थेत जेव्हा दूत हरण करतात तेव्हा म्हणतात, "सलाम असो तुम्हांवर या स्वर्गामध्ये आपल्या कर्माच्या मोबदल्यात." *(दिव्य कुरआन, १६:३१-३२)*

जन्नतच्या दरवाज्यावर जेव्हा हे अल्लाहचे भय राखून सदाचाराने वागणारे लोक पोहचतील तेव्हा जन्नतचे राखणदारही अशाच शब्दांत त्यांचे भव्य स्वागत करतील.

"आणि जे लोक आपल्या पालनकर्त्याच्या अवज्ञेपासून अलिप्त राहात होते ते जथ्याजथ्याने

स्वर्गाकडे नेले जातील येथपावेतो की जेव्हा ते तेथे पोहचतील आणि त्याची दारे अगोदरच उघडली गेली असतील तेव्हा त्याचे व्यवस्थापक त्यांना म्हणतील की, "सलाम असो तुमच्यावर, फारच चांगले राहिला तुम्ही, दाखल व्हा यात नेहमीसाठी."

*(दिव्य कुरआन, ३९:७३)*

**आणि जेव्हा हे लोक जन्नतमध्ये दाखल होतील, तेव्हा फरिश्ते जन्नतच्या प्रत्येक दरवाजातून प्रवेश करून त्यांना "अस्सलामु अलैकुम" म्हणतील पवित्र कुरआनातील उल्लेख असा -**

"दूत चोहोंबाजूनी त्यांच्या स्वागताकरिता येतील. आणि त्यांना सांगतील, "तुम्हावर शांतिवर्षाव आहे. तुम्ही जगात ज्याप्रकारे संयम पाळला त्यामुळे आज तुम्ही याचे हक्कदार ठरला आहात." तर किती छान आहे हे परलोकाचे घर!" *(दिव्य कुरआन, १३: २४)*

**जन्नतमध्ये राहणारेही एकमेकांचे स्वागत याच शब्दांनी करतील.**

**तिथे त्यांच्या जीभेवर हा स्वर असेल की, "हे अल्लाह ! तू पवित्र आणि श्रेष्ठतम आहे." आणि त्यांची आपसात ही दुआ असेल की "सलाम असो (तुमच्यावर)."**

**अल्लाहतर्फेही त्यांच्याकरिता सलाम आणि रहमतचा ध्वनी निनादेल -**

"आज स्वर्गातील लोक मौज करण्यात मग्न आहेत.त्यांची जोडपी गडद छायेत आहेत. आसनावर लोड लावून, हर तऱ्हेचे स्वादिष्ट पदार्थ खाण्यापिण्यासाठी त्यांच्याकरिता तेथे उपलब्ध आहेत, जे काही ते मागतील त्यांच्यासाठी हजर आहे.परमकृपाळू पालनकर्त्याकडून त्यांना सलाम सांगितला गेला आहे." *(दिव्य कुरआन, ३६:५५-५८)*

**तात्पर्य, जन्नतमध्ये ईमानधारकांकरिता चहुकडे सलामचा स्वर निनादत असेल.**

"तेथे ते कोणतेही असभ्य शब्द अथवा पापाची गोष्ट ऐकणार नाहीत. जी काही गोष्ट होईल ती शांती असेल." *(दिव्य कुरआन, ५६:२५-२६)*

**कुरआन व पैगंबर आचरणाच्या या स्पष्ट मार्गदर्शन व साक्षी असतानाही ईमानधारकाकरिता कोणत्याही प्रकारे हे उचित नव्हे की त्याने अल्लाह आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितलेल्या पध्दतीला सोडून प्रेम व आनंद व्यक्त करण्यासाठी दुसऱ्या पध्दतीचा अवलंब करावा.**

३) **प्रत्येक ईमानधारकाला सलाम करा, मग त्यांच्याशी पूर्वीपासून ओळख असो किंवा नसो. संबंध आणि परिचयासाठी एवढी गोष्ट पुरेशी आहे की तो तुमचा ईमानधारक बांधव आहे. अर्थात कोणत्याही ईमानधारक बांधवाकरिता, ईमान धारकाच्या मनात स्नेह प्रेम, भलाई आणि निष्ठा इ. भावना असल्या पाहिजेत.**

**एका माणसाने पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले, "इस्लामचे सर्वोत्तम आचरण कोणते**

आहे? पैगंबरांनी सांगितले,

"गरीबांना जेऊ घालणे आणि प्रत्येक मुसलमानाला सलाम करणे, मग तुमची त्याच्याशी ओळख असो किंवा नसो." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

४) जेव्हा तुम्ही आपल्या घरात दाखल व्हाल तर घरातल्या लोकांना सलाम करा. कुरआनातील उल्लेख असा,

"तथापि जेव्हा घरांत प्रवेश कराल तेव्हा आपल्या लोकांना सलाम करीत जा - अभिष्टचिंतन, अल्लाहकडून निश्चित केले गेलेले, मोठ्या समृद्धीचे आणि पवित्र."

*(दिव्य कुरआन, २४:६१)*

माननीय अनस (रजि.) यांचे निवेदन आहे की मला पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ताकीद दिली की, "प्रिय मुला! जेव्हा तुम्ही आपल्या घरात प्रवेश कराल तर प्रथम आपल्या धरच्या लोकांना सलाम करत जा. हे तुमच्यासाठी आणि तुमच्या कुटुंबियांसाठी भलाईची व समृध्दीची गोष्ट आहे." (हदीस : तिर्मिजी)

अशा प्रकारे जेव्हा तुम्ही दुसऱ्या कोणाच्या घरी जाल तर त्या घरात प्रवेश करण्याआधी सलाम करा. सलाम केल्याविना घरात दाखल होऊ नका.

"हे लोकहो! ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, आपल्या घराशिवाय दुसऱ्यांच्या घरात प्रवेश करीत जाऊ नका जोपर्यंत त्या घरातील लोकांची सम्मती मिळत नाही आणि त्या घरातील लोकांना तुम्ही सलाम करीत नाही." *(दिव्य कुरआन, २४:२७)*

आदरणीय इब्राहीम (अ.) यांच्या जवळ जेव्हा फरिश्ते सन्मानित अतिथींच्या स्वरूपात पोहचले तेव्हा त्यांनी येऊन सलाम केला आणि इब्राहीम (अ.) यांनी उत्तरादाखल त्यांना सलाम केला.

५) "लहान मुलांनाही सलाम करा, ही मुलांना सलाम शिकविण्याची पध्दत ही आहे आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांची आचरणशैलीदेखील. माननीय अनस (रजि.) लहान मुलांच्या जवळून गेले तेव्हा त्यांना सलाम केला आणि म्हणाले, पैगंबर मुहम्मद (स.) देखील असेच करीत होते." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

आणि माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) पत्रातही लहान मुलांना सलाम लिहीत असत. (अल अदबुल मुफरद)

६) स्त्रियादेखील पुरूषांना सलाम करू शकतात, तसेच पुरूषदेखील स्त्रियांना सलाम करू शकतात. माननीय अस्मा अन्सारीया (रजि.) सांगतात की, "मी आपल्या मैत्रिणीसोबत बसले होते की पैगंबर मुहम्मद (स.) यांचे आमच्या जवळून जाणे झाले, तेव्हा त्यांनी आम्हा सर्वांना सलाम केला." (अल अदबुल मुफरद)

आणि माननीय उम्मे हानी (रजि.) सांगतात की, मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झाले. त्यावेळी पैगंबर मुहम्मद (स.) स्नान करीत होते. मी त्यांना सलाम केला, तेव्हा त्यांनी विचारले, कोण? मी म्हणाले, उम्मे हामी आहे. सांगितले, छान ! स्वागत आहे !

७) जास्तीतजास्त सलाम करण्याची सवय लावून घ्या आणि सलाम करण्यात आळस करू नका. आपसात जास्तीतजास्त सलाम करा. सलाम केल्याने प्रेम वाढते आणि अल्लाह प्रत्येक प्रकारच्या हानीपासून वाचवितो. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"मी तुम्हाला असा उपाय सांगतो जो अंगीकारल्याने तुमच्या दरम्यान मैत्री व प्रेम वाढेल. आपसात एकमेकांना जास्तीतजास्त सलाम करत जा."

तसेच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले,

"सलामला खूप पसरवा अल्लाह तुम्हाला सलामतीपूर्वक राखेल."

माननीय अनस (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांचे सहकारी (सहाबा) खूप जास्त सलाम करीत, सलामच्या अत्याधिकतेची ही अवस्था होती की जर एखाद्या वेळी त्यांचे सहकारी एखाद्या झाडाआड होत आणि मग समोर येत तेव्हा पुन्हा सलाम करीत.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जो मनुष्य आपल्या मुस्लिम बांधवास भेटेल तर त्याने त्याला सलाम करावा आणि जर झाड किंवा भिंत अथवा दगडाच्या आड होईल आणि तो पुन्हा त्याच्यासमोर येईल तर त्याला पुन्हा सलाम करावा." (हदीस : रियाजुस्सालिहीन)

माननीय तुफैल (रजि.) कथन करतात की मी नेहमी माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांच्या सेवेत हजर होत असे आणि त्यांच्यासोबत बाजारात जात असे, जेव्हा आम्ही दोघे बाजारात जात, तेव्हा माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) ज्याच्या जवळूनही जात, त्याला सलाम करीत. मग तो एखादा भंगार विकणारा असो कोणी दुकानदार असो किंवा एखादा गरीब, गरजू असो. तात्पर्य कोणीही असो, ते त्याला सलाम जरूर करीत.

एकदा मी अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांच्या सेवेत हजर झालो तेव्हा ते म्हणाले,

"चला बाजारात जाऊ या." मी म्हणालो, "माननीय! बाजारात जाऊन काय कराल? तुम्ही तर ना सौदा खरेदी करण्यासाठी उभे राहता न एखाद्या मालाविषयी माहिती बाळगता, न मोल-भाव करता आणि न बाजाराच्या बैठकीत बसता ! या इथेच बसून काही गप्पा गोष्टी करू."

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) म्हणाले, "हे अबू बल! (ढेरीवाले) आम्ही तर फक्त सलाम करण्याच्या हेतुने बाजारात जातो की जो कोणी भेटेल त्याला आम्ही सलाम

करावा!''                                                                                                                                                  (हदीस : मुअत्ता इमाम मालिक)

८) सलामला मुस्लिमाचा हक्क समजा आणि हक्क अदा करण्यात उदारता दाखवा. सलाम करण्यात कधीही कमतरता करू नका.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"एका मुस्लिमांचा दुसऱ्या मुस्लिमांवर हा हक्क आहे की जेव्हा मुस्लिम बांधवास भेटेल तर त्याला सलाम करावा."
(हदीस : मुस्लिम)

माननीय अबू हुरैरा (रजि.) सांगितले की सर्वात मोठा कंजूष तो आहे जो सलाम करण्यात कंजूषी करेल.
(अल अदबुल मुफरद)

९) सलाम करण्यात नेहमी पुढाकार घ्या आणि जर अल्लाह न करो. एखाद्याशी बिनसले तरीही सलाम करण्यात आणि समझोता करण्यात पुढाकार घ्या.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"तो मनुष्य अल्लाहच्या जास्त निकट आहे जो सलाम करण्यात पुढाकार घेतो."
(हदीस : अबू दाऊद)

तसेच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"कोणत्याही मुस्लिमांकरिता हे उचित नव्हे की त्याने आपल्या मुस्लिम बांधवाशी तीन दिवसापेक्षा जास्त काळपर्यंत संबंध तोडून ठेवावेत की जेव्हा दोन्ही भेटतील तर एक इकडे वळेल तर दुसरा तिकडे यांच्यात श्रेष्ठ तो आहे, तो सलाम करण्यात पुढाकार घेईल."
(अल अदबुल मुफरद)

पैगंबर मुहम्मद (स.) यांना कोणीतरी विचारले, जेव्हा दोन माणसे एकमेकांना भेटतील तर दोघांपैकी कोणी प्रथम सलाम करावा. सांगितले, "जो त्या दोघांमध्ये अल्लाहच्या दृष्टीने जास्त चांगला असेल."
(हदीस : तिर्मिजी)

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) सलाम करण्यात पुढाकार घेण्याचा इतका इतमाम राखत की कोणीही त्यांच्याशी सलाम करण्यात पुढाकार घेऊ शकत नव्हता.

१०) नेहमी जीभेने "अस्सलामु अलैकुम" म्हणून सलाम करा आणि जरा मोठ्या आवाजात सलाम करा, यासाठी की समोरच्या माणसाला ऐकू जावे. तथापि एखाद वेळी जीभेने "अस्सलामु अलैकुम" म्हणण्यासोबत डोके हलवून इशारा करण्याचीही गरज असेल तर काही हरकत नाही. उदा. ज्याला तुम्ही सलाम करू इच्छिता, तो दूर आहे आणि कदाचित तुमचा आवाज त्याच्यापर्यंत पोहोचू शकत नसेल अथवा एखादा मनुष्य बधीर आहे, तुमचा आवाज त्याच्यापर्यंत पोहोचू शकत नसेल तर अशा स्थितीत इशारा करा.

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) सांगतात,

"जेव्हा एखाद्यास सलाम कराल तर आपला सलाम त्याला ऐकवा, यासाठी की सलाम अल्लाहतर्फे अतिशय पवित्र आणि समृध्दीदायक दुआ आहे." (अल अदबुल मुफरद)

माननीय अस्मा बिन्त यजीद (रजि.) कथन करतात.

एक दिवस पैगंबर मुहम्मद (स.) मशिदी जवळून गेले. तिथे काही स्त्रिया बसल्या होत्या. तेव्हा पैगंबरांनी त्यांना आपल्या हाताच्या इशाऱ्याने सलाम केला. (हदीस : तिर्मिजी)

अर्थात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या जीभेने "अस्सलामु अलैकुम" असे म्हणण्यासोबत हाताच्या इशाऱ्यानेही सलाम केला. याच गोष्टीचे समर्थन त्या कथनाद्धारेही होते, जे अबू दाऊदमध्ये आहे. माननीय अस्मा (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) आमच्या जवळून गेले, तेव्हा त्यांनी आम्हाला सलाम केला. यास्तव खरी गोष्ट हीच की सलाम जीभेनेही करा, तथापि गरज पडल्यास हाताच्या किंवा डोक्याच्या इशाऱ्यानेही करा.

११) आपल्या वडीलधाऱ्यांना, थोरा-मोठ्यांना सलाम करण्याचा इतमाम राखा. जेव्हा तुम्ही पायी चालत असाल आणि काही लोक बसलेले असतील, तेव्हा बसलेल्यांना सलाम करा आणि जेव्हा तुम्ही एखाद्या लहानशा गटासह असाल आणि तुमच्यापेक्षा मोठा गट असलेल्या लोकांशी भेट होईल. तेव्हा तुम्ही प्रथम सलाम करा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"लहानाने मोठ्याला, चालणाऱ्याने बसलेल्याला आणि थोड्या लोकांनी जास्त लोकांना सलाम करण्यात पुढाकार घ्यावा."

१२) जर तुम्ही वाहनावर असाल तर पायी चालणाऱ्यांना, आणि रस्त्याने बसलेल्या लोकांना सलाम करा."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,

"वाहनावर जाणाऱ्यांनी पायी चालणाऱ्यांना आणि पायी चालणाऱ्यांनी बसलेल्या लोकांना आणि संख्येने कमी असलेल्यांनी जास्त लोकांना सलाम करण्यात पुढाकार घ्यावा." (अल अदबुल मुफरद)

१३) एखाद्या कडे भेटीस जाल किंवा एखाद्या बैठकीत पोहोचाल किंवा एखाद्या समूहाजवळून जाल अथवा एखादा सभेत पोहोचाल तर पोहोचल्यानंतरही सलाम करा आणि जेव्हा तिथून निरोप घ्याल तेव्हाही सलाम करा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"जेव्हा तुम्ही एखाद्या सभा सम्मेलनात पोहोचाल तेव्हा सलाम करा आणि जेव्हा तिथून परत निघाल तेव्हा पुन्हा सलाम करा आणि लक्षात ठेवा की पहिला सलाम दुसऱ्या सलामपेक्षा अधिक मोबदल्याचा हक्कदार नाही की येते वेळी तर तुम्ही सलामचा फार काळजी घ्यावी आणि तिथून निघते वेळी सलाम न करावा आणि निरोपाच्या सलामला महत्व न द्यावे."

(हदीस : तिर्मिजी)

१४) सभेत याल तर संपूर्ण सभेला संबोधून सलाम करा. विशेषत: एखाद्याचे नाव घेऊन सलाम करू नका.

एक दिवस माननीय अब्दुल्लाह (रजि.) सभेत होते, तेवढ्यात एक याचक आला आणि त्याने त्यांचे नाव घेऊन सलाम केला. माननीय अब्दुल्लाह (रजि.) म्हणाले, "अल्लाहने सत्य सांगितले आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी धर्माच्या प्रसाराचा हक्क अदा केला." आणि मग ते घरी निघून गेले. लोक वाट बघत बसून राहिले की त्यांच्या म्हणण्याचा अर्थ काय आहे. जेव्हा ते परत आले तेव्हा माननीय तारिक (रजि.) यांनी विचारले, "माननीय अब्दुल्लाह (रजि.)! आम्हाला आपल्या त्या बोलण्याचा अर्थ कळू शकला नाही." तेव्हा सांगितले, "पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की कयामत जवळ आली असता लोक सभा संमेलनामध्ये, लोकांना विशेषत्वाने सलाम करू लागतील." (अल अदबुल मुफरद)

१५) जर आपल्या एखाद्या बुजुर्ग, दोस्त किंवा नातेवाईकास दुसऱ्या कोणामार्फत सलाम सांगून पाठवायची संधी असेल किंवा पत्रात सलाम लिहून पाठवायची संधी असेल तर अशा संधीचा अवश्य लाभ घ्या आणि सलाम सांगून पाठवा.

माननीय आएशा (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मला सांगितले, "आएशा! जिब्रिल (अ.) तुम्हाला सलाम करीत आहेत." मी म्हणाले, "व अलैकुमस्सलाम व रहमतुल्लाहि व बरकातुहू."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

१६) जर तुम्ही एखाद्या अशा ठिकाणी पोहोचाल, जिथे काही लोक झोपले आहेत तेव्हा अशा आवाजात सलाम करा की जागे असलेल्यांना ऐकू यावे आणि झोपेत असणाऱ्यांची निद्रा भंग होऊ नये.

माननीय मिकदाद (रजि.) सांगतात की आम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकरिता थोडे दूध राखून ठेवत असू. जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) काही रात्र लोटल्यावर येत, तेव्हा ते अशा प्रकारे सलाम करीत की झोपेत असलेल्याला जाग न यावी आणि जागे असलेल्याने ऐकावे. यास्तव पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभागमन झाले आणि नित्यनेमानुसार सलाम केला.

१७) सलामचे उत्तर मोठ्या आनंदी मनाने आणि हसतमुखाने द्या. हा मुसलमान बांधवाचा हक्क

आहे. हा हक्क अदा करण्यात कधीही गफलत करू नका.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

ईमानधारकांचे ईमानधारकावर पाच हक्क आहेत.

सलामचे उत्तर देणे, आजारी लोकांची विचारपूस करणे, जनाजासोबत (अंत्ययात्रेत) जाणे, आमंत्रण स्वीकारणे आणि शिंकेला उत्तर देणे. (हदीस : बुखारी, मुस्लिम)

आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "रस्त्यात बसून राहणे टाळा." लोक म्हणाले, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! आमचे रस्त्यात बसणे तर जरूरीचे आहे." त्यावर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "जर तुमचे रस्त्यात बसणे इतके जरूरीचे आहे तर बसा, परंतु रस्त्याचा हक्क जरूर अदा करा." लोक म्हणाले, "रस्त्याचा हक्क कोणता?" अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "नजर खाली राखणे, दु:ख न देणे, सलामचे उत्तर देणे, सत्कर्मे करण्यास प्रवृत्त करणे आणि दुराचारापासून रोखणे."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

१८) सलामचे उत्तर देण्यात "व अलैकु मस्सलाम" एवढेच म्हणून थांबू नका तर "व रहमतुल्लाहि व बरकातुहू" या शब्दांची ही वाढ करा.

कुरआनात उल्लेख आहे,

"आणि जेव्हा एखादा अदबीने तुम्हाला सलाम करील तर त्याला त्यापेक्षाही अधिक चांगल्या प्रकारे उत्तर द्या किंवा कमीतकमी त्याचप्रमाणे, अल्लाह प्रत्येक गोष्टीचा हिशेब घेणारा आहे." *(दिव्य कुरआन, ४:८६)*

"सलामचे उत्तर देण्यात कमतरता करू नका सलामच्या शब्दांमध्ये थोडी वाढ करून त्याहून चांगली दुआ द्या. अन्यथा, निदान त्याच शब्दांची पुनरावृत्ती करा. मात्र उत्तर अवश्य द्या."

माननीय इम्रान बिन हसीन (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभागमन झाले होते की तेवढ्यात एक मनुष्य आला आणि त्याने येऊन "अस्सलामु अलैकुम" म्हटले. पैगंबरांनी सलामचे उत्तर दिले आणि सांगितले,

"दहा." (अर्थात दहा सत्कर्मे केल्याचे पुण्य) मिळाले. मग एक दुसरा मनुष्य आला आणि त्याने "अस्सलामु अलैकुम व रहमतुल्लाहि" असे म्हटले. पैगंबरांनी सलामचे उत्तर दिले आणि सांगितले, "वीस" (अर्थात वीस सत्कर्मे केल्याचे पुण्य) मिळाले. त्यानंतर एक तिसरा मनुष्य आला आणि "अस्सलागु अलैकुम व रहमतुल्लाहि व बरकातुहू" असे म्हणाला. पैगंबरांनी सलामचे उत्तर दिले आणि सांगितले, "तीस." (अर्थात तीस सत्कर्मे केल्याचे पुण्य) मिळाले. (हदीस : तिर्मिजी)

माननीय उमर (रजि.) कथन करतात की एकदा मी माननीय अबू बकर (रजि.) यांच्या मागे वाहनावर होतो. आम्ही ज्या लोकांच्या जवळून जात, अबू बक्र (रजि.) त्यांना "अस्सलामु अलैकुम" म्हणत आणि ते उत्तर देत, व "अलैकुमुस्सलामु व रहमतुल्लाहि व बरकातुहू" यावर अबू बकर (रजि.) यांनी सांगितले, की आज तर लोक थोरवीत आमच्याहून फार पुढे गेले." (अल अद्बुल मुफरद)

१९) जेव्हा एखाद्याशी भेट होईल, तेव्हा सर्वात प्रथम "अस्सलामु अलैकुम" म्हणा. अचानक बोलणे सुरु करू नका. जेदेखील बोलायचे असेल, सलाम केल्यानंतरच बोला.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"जो कोणी सलाम करण्यापूर्वी काही बोलू लागेल, त्याला उत्तर देऊ नका."

(हदीस : मुस्लिम)

२०) पुढील परिस्थितीत सलाम करू नका.

* जेव्हा लोक कुरआन व हदीसच्या अध्ययन अध्यापनात किंवा ऐकण्या-ऐकविण्यात मग्न असतील.
* जेव्हा कोणी प्रवचन देण्यात व ऐकण्यात मग्न असेल.
* जेव्हा कोणी अजान किंवा तकबीर म्हणत असेल.
* जेव्हा एखाद्या सभेत एखाद्या धार्मिक विषयावर चर्चा होत असेल अथवा कोणी धार्मिक आदेश समजावित असेल.
* जेव्हा अध्यापक शिकविण्यात मग्न असेल.
* जेव्हा कोणी आपली आवश्यकता पूर्ण करण्यास बसला असेल.

आणि खाली दिलेल्या परिस्थितीत न केवळ सलाम करण्याचे टाळा, किंबहुना आपला नि:संकोचपणा व मानसिक त्रास हिकमतीने जाहीर करा.

* जेव्हा कोणी दुराचार आणि शरीअतविरुध्द खेळ तमाशात मग्न होऊन दीन (धर्मा) ची अवमान करीत असेल.
* जेव्हा कोणी शिवीगाळ, व्यर्थ बडबड, खोटे-नाटे वाह्यात गोष्टी, अश्लील विनोद करून दीन (धर्मा) ला बदनाम करीत असेल.
* जेव्हा कोणी दीन व शरीअतच्या विरुध्द नियम आणि सिध्दान्ताचा प्रचार करीत असेल आणि लोकांना धर्मापासून बिचकून जाण्यास आणि धर्मबाह्य प्रथा व धर्मशून्य आचरण अंगिकारण्यास प्रवृत्त करीत असेल.

* जेव्हा कोणी धार्मिक श्रध्दा व धर्मचिन्हांचा अवमान करीत असेल आणि शरीअतच्या नियमांची व आदेशांची थट्टा उडवून आपल्या आंतरिक खराबी व कपटनितीचा पुरावा देत असेल.

२१) जेव्हा एखाद्या सभेत ईमानधारक आणि मूर्तीपूजक दोन्ही एकत्र असतील तर तिथे सलाम करा. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे एकदा अशा सभे जवळून जाणे झाले, ज्यात ईमानधारक व मूर्तीपूजक सर्वच सामील होते तेव्हा पैगंबरांनी सर्वांनाच सलाम केला.

(अल अदबुल मुफरद)

२२) जर एखाद्या मुस्लिमेतर व्यक्तीस सलाम करण्याची गरज उद्‌भवेल तर "अस्सलामु अलैकुम" असे म्हणू नका. तर 'आदाब अर्ज' आणि उत्तरा दाखल 'तस्लीमात' यासारखे शब्द वापरा आणि हाताने किंवा डोक्यानेही असा कोणताही इशारा करू नका जो इस्लामी श्रध्दा व आचरणाविरुध्द असावा.

हिरकल बादशहाच्या नावाने पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जे पत्र पाठविले होते, त्यात सलामचे शब्द हे होते.

"सलाम आहे त्यावर जो मार्गदर्शनाचे अनुसरण करील."

२३) सलामनंतर प्रेम व आनंदाची श्रध्दा व्यक्त करण्याकरिता मुसाफा (हस्तांदोलन) देखील करा. पैगंबर मुहम्मद (स.) स्वत:ही मुसाफा करीत आणि त्यांचे निकटतम सहकारीदेखील आपसात भेट घेताना मुसाफा करीत असत. पैगंबरांनी आपल्या सहकाऱ्यांना मुसाफा करण्याची ताकीद केली आणि त्यांचे महत्त्व विविध पैलूंनी विशद केले.

माननीय कतादा (रजि.) यांनी माननीय अनस (रजि.) यांना विचारले, "काय पैगंबरांच्या सहकाऱ्यांमध्ये मुसाफा करण्याचे प्रचलन होते?" माननीय अनस (रजि.) यांनी उत्तर दिले, "होय होते."

माननीय सलमा बिन वरदान (रजि.) कथन करतात की मी माननीय मालिक बिन अनस (रजि.) यांना पाहिले की ते लोकांशी मुसाफा (हस्तांदोलन) करीत आहेत. मला विचारले, "तुम्ही कोण आहात?" मी म्हणालो, "बनी लैसचा गुलाम आहे." त्यांनी माझ्या डोक्यावरून तीन वेळा हात फिरविला आणि सांगितले, "अल्लाह तुम्हाला भलाई व समृध्दीने उपकृत करो."

एकदा जेव्हा यमन देशाचे काही लोक आले, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या निकटतम सहकाऱ्यांना सांगितले, "तुमच्याजवळ यमन देशाचे लोक आले आहेत आणि येणाऱ्यांमध्ये हे मुसाफाचे जास्त हक्कदार आहेत." (हदीस : अबू दाऊद)

माननीय हुजैफा बिन यमान (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी

सांगितले, "जेव्हा दोन ईमानधारक आपसात भेटतात आणि सलाम केल्यानंतर एकमेकांचा हात आपल्या हाती घेतात, तेव्हा त्या दोघांचे अपराध अशा प्रकारे झडून जातात, ज्याप्रमाणे झाडावरून (वाळलेली) पाने." (तबरानी)

माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) कथन करतात, "परिपूर्ण सलाम हा की मुसाफाकरिता हातही मिळविले जावेत."

२४) एखादा दोस्त-प्रियजन किंवा थोर बुजुर्ग प्रवासाहून परत आल्यास आलिंगन द्या. माननीय जैद बिन हारिसा (रजि.) जेव्हा मदीना आले, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या येथे पोहोचून दरवाजा ठोठावला. पैगंबर मुहम्मद (स.) आपली चादर ओढीत दरवाजावर पोहोचले, त्यांना आलिंगन दिले आणि माथ्याचे चुंबन घेतले. (हदीस : तिर्मिजी)

माननीय अनस (रजि.) कथन करतात की जेव्हा सहाबा (रजि.) आपसात भेटत, तेव्हा मुसाफा करत आणि जर प्रवासाहून परत येत तेव्हा एकमेकांना आलिंगन देत. (तबरानी)

## ३१. रुग्नाची विचारपूस करण्याचे शिष्टाचार

१) आजारी माणसाची विचारपूस जरूर करा. याचे स्वरूप केवळ हेच नव्हे की ती सामूहिक जीवनाची एक गरज आहे किंवा परस्पर सहकार्य आणि सेवाभावना वाढीस लावण्याचे साधन आहे, किंबहुना हा एका मुस्लिमाचा दुसऱ्या मुस्लिम बांधवावर धार्मिक हक्क आहे आणि अल्लाहशी प्रेमाची एक आवश्यक निकड आहे. अल्लाहशी संबंध राखणारा, अल्लाहच्या दासांशी (लोकांशी) संबंध तोडून राहू शकत नाही. आजारी माणसाची विचारपूस करणे आणि त्याला उपयोगी पडण्यात गफलत करणे, खरे पाहता अल्लाहशी गफलत राखणे होय.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे की कयामतच्या दिवशी अल्लाह सांगेल,

"हे आदम-पुत्र! मी आजारी पडलो आणि तू माझी विचारपूस केली नाही. दास म्हणेल, हे पालनहार! तू तर साऱ्या जगाचा पालनकर्ता आहेस. मी तुझी विचारपूस कशी बरे केली असती? अल्लाह म्हणेल, माझा अमुक एक दास आजारी पडला तेव्हा तू त्याची विचारपूस केली नाही, जर तू त्याची विचारपूस करण्यास गेला असता तर तुला मी तिथे आढळलो असतो (अर्थात तू माझ्या प्रसन्नता व दया-कृपेस पात्र ठरला असता)"(हदीस : मुस्लिम)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

एका मुस्लिमाचे दुसऱ्या मुस्लिमावर सहा हक्क आहेत. ते याप्रमाणे,

* जेव्हा तुम्ही मुस्लिम बांधवाशी भेटाल, तेव्हा त्याला सलाम करा.
* जेव्हा तो तुम्हाला आमंत्रण देईल, तेव्हा त्यांचे आमंत्रण स्वीकार करा.
* जेव्हा तो तुमच्याकडून चांगला सल्ला मागेल, तेव्हा त्याचे हितचिंतक बनून चांगला सल्ला द्या.
* जेव्हा त्याला शिंक येईल आणि तो "अल-हम्दुलिल्लाह" म्हणेल तर प्रत्युत्तरात "यर्हमुकल्लाह" असे म्हणा.
* जेव्हा तो आजारी पडेल तर त्याची विचारपूस करा आणि
* जेव्हा तो मरण पावेल तेव्हा त्याच्या जनाजासोबत जा. (हदीस : मुस्लिम)

तसेच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले,

"ज्याने आपल्या मुस्लिम बांधवाची (त्याच्या आजारपणात) विचारपूस केली, तो जन्नतच्या वरच्या भागात असेल." (अल अदबुल मुफरद)

माननीय अबू हुरैरा (रजि.) द्वारे उल्लेखित आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जेव्हा एखादा मनुष्य आपल्या मुस्लिम बांधवाच्या आजारपणात विचारपूस करतो किंवा त्याच्या भेटीसाठी जातो, तेव्हा एक पुकारणारा आकाशातून पुकारतो, तुम्ही चांगले

राहिलात, तुमचे चालणे चांगले राहिले. तुम्ही स्वत:साठी जन्नतमध्ये ठिकाण तयार केले."
(हदीस : तिर्मिजी)

२) आजारी माणसाच्या डोक्याशी बसून त्याच्या डोक्यावर किंवा शरीरावर हात फिरवा आणि सांत्वनपूर्ण गोष्टी बोला. यासाठी की त्याचे विचार आखिरतच्या मोबदला व पुण्याकडे केंद्रित व्हावेत आणि अधीरतेची व तक्रारीची कोणतीही गोष्ट त्याच्या जीभेवर येऊ नये.

माननीय आएशा बिन्त साद (रजि.) कथन करतात की माझ्या पित्याने आपला किस्सा सांगितला, मी एकदा मक्का येथे फार आजारी पडलो. पैगंबर मुहम्मद (स.) माझी विचारपूस करण्यासाठी आले तेव्हा मी विचारले, हे अल्लाहचे पैगंबर! मी आपल्या मागे बराच माल (धन) सोडून जात आहे. मला फक्त एकच कन्या आहे. काय मी आपल्या सम्पत्तीतून दोन तृतियांशचे मृत्युपत्र करावे आणि एक तृतियांश मुलीसाठी सोडून जावे? सांगितले, नव्हे मी म्हणालो, अर्ध्या सम्पत्तीचे मृत्युपत्र करावे आणि अर्धी मुलींच्या नावे करावी ? सांगितले नाही, मी विनंती केली, "हे अल्लाहचे पैगंबर! मग एक तृतियांश सम्पत्तीचे मृत्युपत्र करावे? सांगितले, होय. एक तृतियांश सम्पत्तीचे मृत्युपत्र करा आणि एक तृतियांश फार आहे. त्यानंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपला हात माझ्या माथ्यावर ठेवला, मग माझ्या तोंडावर नंतर पोटावर फिरविला. मग ही दुआ केली.

"हे अल्लाह! सादला रोग मुक्ती दे आणि त्याच्या माननीय (स्थलांतरा) ला पूर्ण करा."

त्यानंतर आजपावेतो, जेव्हादेखील आठवण येते, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शुभहाताचासारखा मला आपल्या शरीरावर जाणवतो. (अल अदबुल मुफरद)

माननीय जैद बिन अरकम (रजि.) कथन करतात की एकदा माझे डोळे दुखायला लागले तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) माझी विचारपूस करण्यासाठी आले आणि म्हणाले, "जैद ! तुमच्या डोळ्यांना हा त्रास आहे तर तुम्ही काय करता? मी म्हणालो, धीर-संयम राखतो व सहन करतो. पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, तुम्ही डोळ्यांच्या या त्रासात संयम राखला, सहनशीलता राखली तेव्हा तुम्हाला याचा मोबदला म्हणून जन्नत लाभेल."

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) कथन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा एखाद्या आजारी माणसाची विचारपूस करण्यासाठी जात, तेव्हा त्याच्या डोक्याजवळ बसत. नंतर सात वेळा सांगत,

"अस-अलुल लाहल अज़ी-म रब-बल अरशिल अज़ीमि अय्यँशफ़ियक."

मी अतिमहान अल्लाहजवळ जो महान अर्श (सिंहासना) चा स्वामी आहे, याचना करतो की त्याने तुला रोगमुक्ति द्यावी.

आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की ही दुआ सात वेळा म्हटल्याने आजाऱ्याला निश्चित रोगमुक्ती मिळेल याखेरीज की त्याचा मृत्यु झाला असेल. (हदीस : मिश्कात)

माननीय जाबिर (रजि.) सांगितात,

''पैगंबर मुहम्मद (स.) उम्मुस्साइब (एक वृध्द स्त्री) ची विचारपूस करण्यास आले. उम्मुस्साइब भयंकर तापाने फणफणत होती. विचारले, ''काय अवस्था आहे? स्त्री म्हणाली, अल्लाह या तापाला निपटो, याने घेरून ठेवले आहे. हे ऐकून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, तापाला बरे-वाईट बोलू नका. तो तर ईमानधारकाच्या अपराधांना अशा प्रकारे साफ करतो, ज्या प्रकारे आगीची भट्टी लोखंडावरचा गंज बुरशी साफ करते.

(अल अदबुल मुफरद)

३) रोगीजवळ जाऊन आस्थेवाईकपणे त्याच्या प्रकृतीची चौकशी करा आणि त्याच्यासाठी रोगमुक्तीची प्रार्थना करा. पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा आजारी माणसाजवळ पोहोचत तेव्हा विचारत, बोला, कशी काय तब्येत? मग सांत्वना देत सांगत, घाबरण्यासारखं काही नाही. अल्लाहने इच्छिल्यास तुमचा आजार जात राहील आणि हा आजार अपराध धुतले जाण्याचे साधन ठरेल. आणि त्रास असलेल्या जागी उजवा हात फिरवित आणि ही दुआ सांगत.

''अल्लाहुम-म अज़्हिबिल बअ्-स रब्बन्नासि अश्फ़िही व अन्तश-शाफ़ी ला शिफ़ाअ इल्ला शिफ़ाउ-क शिफ़ाउल ला युग़ादिरू सुक़्मा.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

''हे अल्लाह! हा त्रास दूर कर. हे मानवांच्या पालनकर्त्या! याला रोग मुक्त कर. तूच रोग मुक्त करणारा आहे. तुझ्याखेरीज कोणाकडून ही रोगमुक्तीची अपेक्षा नाही. असे स्वास्थ्य प्रदान कर की आजाराचे नावनिशाणही बाकी राहू नये.''

४) आजारी माणसाजवळ जास्त बसू नका आणि गोंधळ माजवू नका. होय जर आजारी मनुष्य तुमचा एखादा घनिष्ठ मित्र असेल आणि तो स्वत: तुम्हाला उशिरापर्यंत बसून राहण्याचा आग्रह करील तर तुम्ही अवश्य त्याच्या आग्रहाला मान द्या.

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) उल्लेख करतात की आजारी इसमाजवळ जास्त वेळ बसू नये आणि गोंधळ ही माजवू नये ही पैगंबर आचरणशैली आहे.

५) आजाऱ्याच्या नातेवाईकांनाही आजारी इसमाविषयी विचारपूस करा आणि सहानुभूती दाखवा आणि शक्य ती सेवा अवश्य पार पाडा. उदाहरणार्थ, डॉक्टराना दाखविणे. अवस्था सांगणे, औषध वगैरे आणून देणे, आणि गरज भासल्यास आर्थिक मदतही करा.

''माननीय इब्राहीम बिन अबी हबला (रजि.) कथन करतात की एकदा माझी पत्नी आजारी पडली. मी त्या काळात माननीय उम्मुद्दर्दा (रजि.) यांच्याजवळ येत-जात असे. जेव्हा मी त्यांच्याजवळ पोहोचत असे तेव्हा त्या म्हणत, सांगा, तुमच्या पत्नीची तब्येत कशी काय आहे? मी उत्तर देत असे, अजून आजारी आहे. मग त्या जेवण मागवित आणि मी त्यांच्याकडे जेऊन परत येत असे. एके दिवशी जेव्हा मी पोहोचलो आणि त्यांनी विचारपूस केली तेव्हा मी सांगितले, अल्लाहच्या दया-कृपेने आता जवळजवळ बरी झाली आहे. त्या म्हणाल्या, जेव्हा तुम्ही सांगत की पत्नी आजारी आहे तेव्हा मी तुमच्या भोजनाची व्यवस्था करून देत असे. आता ती बरी झाली आहे तर ही व्यवस्था करण्याची काय गरज?''

६) मुस्लिमेतर रोग्याचीही विचारपूस करण्यासाठी जा आणि योग्य प्रसंग पाहून बुद्धी कौशल्यासह त्याला सत्य धर्माची ओळख करून द्या. आजारपणात मनुष्य ईश्वराचे जरा जास्त ध्यान देतो आणि भलाईची गोष्ट अंगीकारण्याची भावनादेखील सामान्यत: जास्त वाढलेली असते.

माननीय अनस (रजि.) द्वारे उल्लेखित आहे की एक यहूदी मुलगा पैगंबर मुहम्मद (स.) यांची सेवा करीत असे. एकदा तो आजारी पडला. पैगंबर मुहम्मद (स.) त्याची विचारपूस करण्यास गेले. पैगंबर मुहम्मद (स.) त्याच्या डोक्याजवळ बसले. त्याला इस्लाम कबूल करण्याचे आवाहन केले. मुलगा आपल्या पित्याकडे पाहू लागला. जो तिथेच उपस्थित होता (की पित्याचा काय विचार आहे?) पिता आपल्या पुत्राला म्हणाला, "(हे माझ्या मुला!) अबुल कासिम यांचे म्हणणे मान्य कर." यास्तव मुलाने इस्लामचा स्वीकार केला. आता पैगंबर मुहम्मद (स.) त्याच्या जवळून हे म्हणत निघाले, "आभार आहे त्या अल्लाहचे ज्याने या मुलाला जहन्नमपासून वाचविले."

७) आजाऱ्याची विचारपूस करण्यासाठी त्याच्या घरी पोहोचाल तेव्हा इकडे तिकडे न्याहळणे टाळा आणि सावधगिरी बाळगून अशा प्रकारे बसा की घरातल्या स्त्रियांवर नजर न पडावी.

माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) एकदा एका आजारी इसमाची विचार पूस करण्यासाठी गेले, त्यांच्यासोबत आणखी काही लोक होते. घरात एक स्त्रीदेखील होती. माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांच्या साथीदारांपैकी एक महाशय त्या स्त्रीकडे एकटक पाहू लागले. माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांना जेव्हा हे कळाले तेव्हा सांगितले, "जर तुम्ही आपले डोळे फोडून घेतले असते तर तुमच्यासाठी अधिक चांगले ठरले असते."

८) जे लोक उघडपणे व राजरोसपणे दुष्कृत्य व दुराचारात पडले असतील आणि मोठ्या निर्लज्जपणे व दु:साहसपूर्वक अल्लाहची अवज्ञा करीत असतील अशा लोकांची, त्यांच्या आजारपणात विचारपूस करण्यासाठी जाऊ नका.

माननीय अब्दुल्लाह बिन अम्र (रजि.) द्वारे उल्लेखित आहे की मद्यपान करणारे जेव्हा आजारी पडतील. तेव्हा त्यांच्या आजारपणात विचारपूस करण्यास जाऊ नका.

९) आजाऱ्याची विचारपूस करण्यासाठी जाल तेव्हा आजारी माणसाकडून स्वत:साठी ही दुआ करवून घ्या.

"इब्ने माजा" या हदीस-संकलनात उल्लेख आहे,

"जेव्हा तुम्ही एखाद्या आजारी माणसाची विचारपूस करण्यास जाल तर त्यांना तुमच्या स्वत:साठीही दुआ करण्याची विनंती करा. आजारी माणसाची दुआ अशी आहे. जणू फरिश्त्यांची दुआ. (अर्थात फरिश्ते अल्लाहची मर्जी संपादन करूनच दुआ करतात आणि त्यांची दुआ स्वीकृत असते.)

# ३२. भेटीचे शिष्टाचार

१) भेट घेतेवेळी हसतमुखाने स्वागत करा. आनंद व प्रेम व्यक्त करा आणि सलाम प्रथम स्वत: करा यात मोठे पुण्य आहे.

२) सलाम आणि दुआसाठी दुसऱ्या वेगळ्या शब्दांचा वापर करू नका. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितलेले शब्द "अस्सलामु अलैकुम" हेच प्रयोगात आणा, मग संधी असेल तर मुसाफा करा, क्षेमकुशल विचारा आणि योग्य वाटल्यास कुटुंबियांचेही क्षेम कुशल विचारा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितलेले शब्द "अस्सलामु अलैकुम" मोठे अर्थपूर्ण आहेत. यात धर्म आणि ऐहिकतेची समस्त शांती-सलामती आणि सर्व प्रकारचे क्षेमकुशल सामील आहे. हेही लक्षात ठेवा की पैगंबर मुहम्मद (स.) मुसाफा करताना आपला हात त्वरीत सोडविण्याचा प्रयत्न करीत नसत. किंबहुना वाट पाहात की समोरच्या माणसाने स्वत:च हात सोडावा.

३) जेव्हा एखाद्याच्या भेटीस जाल, तेव्हा स्वच्छ कपडे घालून जा. मळलेल्या व घाणेरड्या कपड्यांनी जाऊ नका आणि न या इराद्याने की आपल्या मौल्यवान कपड्यांनी दुसऱ्यावर रोब जमवावा.

४) जेव्हा एखाद्याच्या भेटीचा इरादा कराल, तेव्हा प्रथम त्याच्याकडून वेळ मागून घ्या. उगीच भलत्यासलत्या वेळी एखाद्याकडे जाणे उचित नाही. अशाने दुसऱ्यांचा वेळही वाया जातो आणि भेट घेणारा तुच्छ ठरतो.

५) जेव्हा कोणी तुमच्या भेटीस येईल, तेव्हा प्रेमपूर्ण स्मितहास्याने त्याचे स्वागत करा. सन्मानाने बसवा आणि प्रसंगानुरूप त्याचे यथायोग्य आदरातिथ्यही करा.

६) एखाद्याजवळ जाल तेव्हा कामाचे बोला. निरर्थक बोलणी करून त्याचा व तुमचा वेळ वाया घालवू नका अन्यथा तुमचे लोकांकडे जाणे व बसणे त्यांना अप्रिय वाटू लागेल.

७) एखाद्याकडे जाल तेव्हा दरवाजावर प्रथम अनुमती घ्या. अनुमती मिळाल्यावर "अस्सलामु अलैकुम" म्हणून प्रवेश करा आणि तीन वेळा "अस्सलामु अलैकुम" म्हटल्यावर काहीच उत्तर न मिळाल्यास आनंदाने परत या.

८) एखाद्याकडे जाताना कधीकधी योग्य भेटवस्तू सोबत न्या. अशाने प्रेम वाढीस लागते.

९) जेव्हा एखादा गरजवंत तुमच्या भेटीस येईल, तेव्हा शक्यतोवर त्याची गरज पूर्ण करा. शिफारसीची विनंती करेल तर शिफारस करून द्या आणि जर तसे शक्य नसेल तर प्रेमळ शैलीत इन्कार दर्शवा. उगाच त्याला आशेवर लोंबकळत ठेवू नका.

१०) तुम्ही एखाद्याकडे आपल्या गरजेपोटी जाल, तेव्हा सभ्यतापूर्वक आपली गरज सांगा. पूर्ण झाल्यास आभार माना आणि न झाल्यास सलाम करून आनंदाने परत या.

११) नेहमी ही इच्छा बाळगू नका की लोकांनी तुमच्या भेटीस यावे, स्वत:ही दुसऱ्यांच्या भेटीला जा. आपसात भेटीगाठी वाढविणे आणि एकमेकांच्या उपयोगी पडणे मोठी आवडती गोष्ट आहे. परंतु लक्षात ठेवा की ईमानधारकांच्या भेटी-गाठी नेहमी चांगल्या हेतुसाठी असतात.

१२) भेटीप्रसंगी जेव्हा तुम्हाला भेट घेणाऱ्याच्या चेहऱ्यावर दाढीवर किंवा कपड्यांवर काही काडी-कचरा आढळून आल्यास, तो दूर करा आणि जर दुसऱ्याने तुमच्याशी हाच व्यवहार केला तर त्याचे आभार माना आणि ही दुआ मागा,

"मस्स-हल्लाहु अन-क मा तक-रहु"

"अल्लाह तुमच्यापासून त्या चीजवस्तूंना दूर करो, ज्या तुम्हाला अप्रिय आहेत."

१३) रात्रीच्या वेळी एखाद्याकडे जाणे आवश्यक असेल तर त्याच्या आरामाचाही विचार राखा. जास्त वेळ बसू नका आणि तिथे पोहचल्यावर तो झोपी गेल्याचे कळाल्यास मनात काही एक न आणता परत जा.

१४) काहीजण मिळून एखाद्याच्या भेटीस जातील तेव्हा बोलणाऱ्याने सर्वांचे प्रतिनिधित्व केले पाहिजे. बोलताना आपली वेगळी शान दाखविण्यापासून आपली शेखी मिरविण्यापासून आपल्या सहकाऱ्यांना डावलण्यापासून आणि संबोधिताचे लक्ष केवळ स्वत:कडे वेधण्यापासून कटाक्षाने दूर राहा.

# ३३. संभाषणाचे शिष्टाचार

१) नेहमी सत्य बोला, सत्य बोलण्यात कधीही संकोच करू नका, मग अशाने तुमचे कितीही नुकसान होवो.

२) आवश्यकता असेल तेव्हा बोला आणि कामाचे ते बोला. सतत बडबड करणे आणि अनावश्यक बोलणे प्रतिष्ठा व गांभीर्याविरुद्ध आहे आणि अल्लाहजवळ प्रत्येक वक्तव्याचा जाब द्यायचा आहे. मनुष्य आपल्या मुखातून जे काही बोलतो, अल्लाहचे फरिश्ते त्वरीत त्यांची नोंद करतात.

"(आणि आमच्या या प्रत्यक्ष ज्ञानाशिवाय) दोन नोंदणारे त्याच्या उजव्या व डाव्या बाजूला बसून प्रत्येक गोष्टीची नोंद घेत आहेत." *(दिव्य कुरआन, ५०:१८)*

३) जेव्हा बोलाल, नरमीने बोला, स्मितहास्य करीत मधुर स्वरात आणि नेहमी मध्यम आवाजात बोला. न इतक्या हळू स्वरात बोला, की समोरच्या व्यक्तीला ऐकू न यावे आणि न इतके ओरडून बोला की संबोधितावर रोब बसविण्याचा धोका होऊ लागावा. कुरआनातील उल्लेख असा आहे,

"सर्व आवाजांपेक्षा अधिक वाईट आवाज गाढवाचा असतो." *(दिव्य कुरआन, ३१:१९)*

४) कधीही बरेवाईट बोलून आपली जीभ घाणेरडी करू नका. दुसऱ्यांविषयी वाईट बोलू नका, निंदा-नालस्ती करू नका. चहाडी करू नका, तक्रारी करू नका, इतरांची नक्कल करू नका, खोटा वायदा करू नका, कोणाचीही थट्टा-मस्करी करू नका. आपला मोठेपणा मिरवू नका आपल्या तोंडाने आपलीच स्तुती करू नका, हुज्जत घालू नका, तोंडापुरते बोलू नका. टोमणे मारू नका, उपरोधाने बोलू नका, कोणाला अपमानकारक नावाने हाक मारू नका आणि क्षुल्लक क्षुल्लक गोष्टीवर शपथ घेऊ नका.

५) नेहमी न्यायाचे बोला, मग अशाने तुमचे किंवा तुमच्या एखाद्या मित्राचे वा नातेवाईकाचे नुकसान का होईना.

"आणि जेव्हा जिभेने काही बोलाल, तेव्हा न्यायाचे बोला, मग तुमचा नातेवाईक का असेना."

६) मृदु, भलाईपूर्ण आणि मनाला प्रसन्न करणारी गोष्ट बोला. रूक्ष, निर्भीड आणि मनाला बोचेल अशी कठोर गोष्ट बोलू नका.

७) स्त्रियांना जर पुरुषांशी बोलण्याचा प्रसंग येईल, तेव्हा साफ, सरळ आणि रुक्ष स्वरात बोलले पाहिजे. स्वरात माधुर्य व मृदुता आणू नये की ऐकणाऱ्या पुरुषाच्या मनात वाईट विचार यावेत.

८) अशिक्षित मनुष्य आपल्या निरर्थक बोलण्यात अडकवून ठेवू इच्छिल तेव्हा उचित शैलीत सलाम करून तिथून निघा. निरर्थक बोलणी करणारे आणि वायफळ बडबडीत मग्न राहणारे लोक मुस्लिम जनसमूहातील सर्वात वाईट लोक आहेत.

९) समोरच्या व्यक्तीला तुमचे म्हणणे नीट समजाविण्याकरिता किंवा एखाद्या गोष्टीचे महत्त्व पटवून देण्याकरिता त्याच्या बुध्दी व विचारसरणीला समोर ठेवून उचित शैली पत्करा आणि जर समोरच्या व्यक्तीला समजले नाही किंवा तो ऐकू शकला नाही तर मग आपले म्हणणे दुसऱ्यांदा सांगा आणि त्रागा करू नका.

१०) नेहमी कमी आणि कामाचे बोला, बिनकामाच्या गोष्टींचे लांबलचक चऱ्हाट लावणे गैर आहे.

११) प्रसंगी एखादी धार्मिक बाब समजावून सांगायची असेल अथवा भाषणाच्या माध्यमाने काही धार्मिक आदेशांची माहिती द्यायची व त्या संदर्भातील समस्या मनात बिंबवायच्या असतील तर अगदी साध्या सरळ शैलीत तुमचे म्हणणे सादर करा.

भाषणाद्वारे प्रसिद्धी व ख्यातीची इच्छा बाळगणे, लोभस वक्तव्याने लोकांवर छाप पाडणे, त्यांना चाहते बनविणे, घमेंड करणे अथवा केवळ मनोरंजन आणि थट्टा विनोदाकरिता भाषणबाजी करणे, या मोठ्या वाईट सवयी आहेत. अशाने मने काळवंडतात.

१२) कधीही खुशामतीच्या आणि चापलूसीच्या गोष्टी करू नका. मानप्रतिष्ठेचा नेहमी विचार राखा आणि कधीही दर्जाला खालावणारी गोष्ट बोलू नका.

१३) दोन माणसे आपसात बोलत असतील तर त्यांची परवानगी घेतल्याविना मध्ये बोलू नका आणि बोलणे अत्यावश्यक असेल तर आधी अनुती घ्या.

१४) थोडे थांबून पध्दतशीरपणे, प्रतिष्ठापूर्वक बोलणी करा, घाईगर्दी करू नका, दरवेळी थट्टा-विनोद करू नका. अशाने माणसाची प्रतिष्ठा मातीस मिळते.

१५) कोणी काही विचारल्यास प्रथम त्याचे म्हणणे नीट, काळजीपूर्वक ऐका आणि नीट विचार करून उत्तर द्या. काहीएक विचार न करता, उपटसुंभासारखे उत्तर देणे नादानी आहे आणि जर कोणी दुसऱ्याला काही विचारत असेल तर स्वत: उत्तर देण्याचा पुढाकार घेऊ नका.

१६) कोणी काही सांगत असेल तर प्रथम हे म्हणू नका की आम्हाला माहीत आहे. संभवत: त्यांच्या सांगण्याने एखादी नवीन गोष्ट लक्षात यावी अथवा एखाद्या खास गोष्टीचा मनावर खास परिणाम व्हावा. यासाठी की वक्तव्यासोबत बोलणाऱ्याची निष्कपटता आणि सदाचरणही प्रभावित करते.

१७) ज्या कोणाशी संभाषण कराल त्याचे वय, दर्जा आणि त्याच्याशी असलेल्या संबंधाला ध्यानी घेता संभाषण करा. आई-वडील, शिक्षक आणि इतर वडिलधाऱ्या मंडळीशी मित्रासारखे बोलू नका. त्याचप्रमाणे लहानांशी बोलताना आपल्या दर्जाचा विचार राखून प्रेमाने व मोठेपणा राखून बोला.

१८) बोलताना एखाद्याकडे संकेत करू नका की ज्यामुळे दुसऱ्याचा गैरसमज व्हावा आणि उगाच त्याच्या मनात शंका यावी. दुसऱ्यांची बोलणी लपूनछपून ऐकण्याचे टाळा.

१९) इतरांचे म्हणणे जास्त ऐका आणि स्वत: कमीतकमी बोला आणि जी गोष्ट गोपनीय असेल. ती कोणालाही सांगू नका. आपले गुपित दुसऱ्याला सांगून ते सुरक्षित राहील अशी आशा बाळगणे, उघड मूर्खता आहे.

# ३४. पत्रलेखनाचे शिष्टाचार

१) पत्र लेखनाचा आरंभ "बिस्मिल्लाहिर्रहमानिर्रहीम" या शब्दाने करा. थोडक्यात लिहायचे झाल्यास "बिस्मिहितआला" असे लिहा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, ज्या कार्यांच्या सुरुवातीला बिस्मिल्लाह केली जात नाही ते अपूर्ण व समृद्धीहीन राहते. काही लोक शब्दांत लिहिण्याऐवजी ७८६ असे अंकात लिहितात, असे लिहिणे टाळा. कारण अल्लाहने शिकविलेल्या शब्दांमध्येच खरी बरकत आहे.

२) स्वत:चा पत्ता प्रत्येक (समृद्धी) पत्रात अवश्य लिहा. असा विचार करून पत्ता लिहिण्याचे टाळू नका की तुम्ही ज्याला पत्र लिहीत आहात, त्याला तुमचा पत्ता पूर्वीच्या पत्रावरून माहीत आहे किंवा त्याच्या आठवणीत आहे. याची खात्री नाही की तुम्ही पूर्वी लिहिलेला पत्ता त्याच्याजवळ सुरक्षित असेल आणि हेही आवश्यक नाही की त्याला तुमचा पत्ता तोंडपाठ असेल.

३) पत्ता उजव्या बाजूला थोडा समास सोडून लिहा. पत्ता नेहमी स्वच्छ व स्पष्ट लिहा आणि पत्ता अगदी अचूक लिहिला गेला आहे किंवा नाही याची नीट खात्री करून घ्या.

४) पत्याखाली डाव्या बाजूस वर तारीख लिहायला विसरू नका.

५) तारीख नमूद केल्यानंतर आदरार्थी शब्दांद्वारे ज्याला पत्र लिहित आहात त्याला संबोधन करा. आदरार्थी शब्द मोजके आणि साधे लिहा. ज्यावरून निष्कपट प्रेमाची अनुभूती व्हावी. बेगडी आदरार्थी शब्द वापरण्याचे टाळा आदरसूचक शब्दांच्या सोबत किंवा त्यांच्या खाली दुसऱ्या ओळीत "सलाम मस्नून" किंवा "अस्सलामु अलैकुम" असे लिहा. "आदाब", "तस्लीमान" सारखे शब्द लिहू नका.

६) मुस्लिमेतर व्यक्तीस पत्र लिहीत असाल तर "अस्सलामु अलैकुम" किंवा "सलाम मस्नून" लिहिण्याऐवजी "आदाब" किंवा "तस्लीमात"सारख्या शब्दांचा वापर करा.

७) आदरसूचक व शिष्टाचारयुक्त शब्दानंतर तो मूळ हेतु लिहा. त्याच्याशी आपला संबंध व्यक्त करणाऱ्या शब्दांसह आपले नाव लिहून पत्रलेखन संपवा. उदाहरणार्थ, आपला सेवक, प्रार्थनाभिलाषी, हितचिंतक वगैरे.

८) पत्र अगदी स्पष्ट, साधे आणि उत्तम लिहा की सहजपणे वाचले आणि समजले जाऊ शकेल आणि ज्याला पत्र लिहिले जात आहे, त्याच्या मनात तुमची कदर होईल.

९) पत्रात स्वच्छ, सोपी आणि उमजेल अशी भाषा वापरा.

१०) पत्र शक्यतो आटोपशीर लिहा आणि प्रत्येक गोष्ट स्पष्ट उमजेल अशी लिहा. केवळ सांकेतिक शब्दांनी काम भागवू नका.

११) संपूर्ण पत्रात संबोधनापासून शेवटपर्यंत, ज्याला पत्र लिहिले जात आहे, त्याच्या मान-मर्यादेचा विचार राखा.

१२) नवीन परिच्छेद सुरू करताना शब्दाची जागा सोडा.

१३) पत्रात नेहमी गंभीर शैलीचा अंगीकार करा. गांभीर्यशून्य गोष्टींना टाळा.

१४) पत्र कधीही रागात लिहू नका आणि न कठोरतापूर्वक लिहा. पत्र नेहमी सौम्य शब्दांत लिहा.

१५) सर्वसामान्य पत्रात एखादी गोपनीय बाब लिहू नका.

१६) वाक्य संपल्यावर पूर्ण विराम जरूर लावा.

१७) दुसऱ्याचे पत्र त्याची परवानगी न घेता मुळीच वाचू नका. हा फार जबरदस्त नैतिक अपहार आहे. तथापि घरच्या वडिलधाऱ्या मंडळींची जबाबदारी आहे की त्यांनी लहानांची पत्रे वाचून त्यांना चांगले संस्कार जडवावेत आणि त्यांना उचित सल्ला द्यावा. मुलींच्या पत्रांवर खास नजर ठेवावी.

१८) नातेवाईकांना आणि दोस्तांना खुशालीची पत्रे नियमित लिहा.

१९) कोणी आजारी पडल्यास, दुर्दैवाने एखादी दुर्घटना घडल्यास किंवा अन्य एखाद्या संकटात कोणी सापडल्यास त्याला सहानुभूतीचे पत्र अवश्य लिहा.

२०) एखाद्याकडे काही समारंभ असेल, एखादा नातेवाईक आला असेल अथवा अन्य एखादा आनंदाचा प्रसंग असेल तर अभिनंदनाचे पत्र जरूर लिहा.

२१) पत्र नेहमी निळ्या किंवा काळ्या शाईने लिहा. पेन्सिल किंवा लाल शाईने मुळीच लिहू नका.

२२) एखाद्याने पोस्टात पत्र टाकायला दिल्यास अगदी काळजीपूर्वक आणि वेळेवर ते पत्र पेटीत टाक, बेपर्वाई किंवा विलंब मुळीच करू नका.

२३) असंबंधित लोकांच्या पत्रोत्तरासाठी जवाबीकार्ड किंवा तिकीट पाठवा.

२४) लिहिलेले खोडायचे झाल्यास हलक्या हाताने त्यावर रेषा मारा.

२५) पत्रात केवळ आपली अभिरुची आणि आपल्याच कामापुरते लिहू नका. किंबहुना ज्याला पत्र लिहिले जात आहे. त्याच्या भावनांचा व अभिरुचीचाही विचार राखा. केवळ आपल्याशी संबंधित लोकांचे क्षेमकुशल सांगू नक, तर त्याच्याशी संबंधित लोकांची खुशालीही जाणून घ्या आणि लक्षात ठेवा. पत्रात कधीही कोणाजवळ जास्त मागण्या करू नका. जास्त मागण्या केल्याने माणसाची प्रतिष्ठा लयाला जाते.

# ३५. व्यवसायाचे शिष्टाचार

१) मन लावून परिश्रमपूर्वक व्यवसाय करा. स्वत:ची रोजी (आजीविका) स्वत:च्या हातांनी कमवा दुसऱ्या कोणावर ओझे बनू नका.

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत एक अन्सारी सहाबी आले. त्यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांना काही प्रश्न विचारले. पैगंबरांनी प्रश्न केला, "तुमच्या घरात काही सामुग्री तरी आहे? सहाबी (रजि.) म्हणाले, हे अल्लाहचे पैगंबर ! फक्त दोन वस्तू आहेत. एक गोणपाटाचे अंथरूण ज्याला आम्ही पांघरतो आणि अंथरतो आणि एक पाणी प्यायचा प्याला आहे. पैगंबरांनी सांगितले, त्या दोन्ही वस्तु माझ्याजवळ घेऊन या. सहाबी (रजि.) दोन्ही वस्तू घेऊन हजर झाले. पैगंबर मुहम्मद (स.) त्या दोन्ही वस्तू दोन दिरहम किंमतीवर लिलावात विकल्या आणि दोन्ही दिरहम त्यांच्या हवाली करतांना सांगितले, जा एक दिरहम मध्ये काही खाद्य सामुग्री खरेदी करून कुटूंबीयांना द्या आणि एक दिरहममध्ये कुऱ्हाडी खरेदी करून आणा. मग त्या कुऱ्हाडीला पैगंबरांनी स्वत: आपल्या हाताने दांडा लावला आणि सांगितले, जा जंगलात जाऊन लाकडे तोडून आणा आणि बाजारात विका. पंधरा दिवसांनी आमच्याकडे येऊन सगळा वृत्तान्त सांगा. पंधरा दिवसांनी जेव्हा ते सहाबी पुन्हा हजर झाले. तेव्हा त्यांनी दहा दिरहम शिल्लक जमवले होते. पैगंबर मुहम्मद (स.) फार खूश झाले आणि सांगितले,

"ही कष्टाची कमाई तुमच्यासाठी याहून खूप चांगली आहे की तुम्ही लोकांजवळ मागत फिरावे आणि कयामतीच्या दिवशी तुमच्या चेहऱ्यावर भीक मागण्याचा डाग असावा."

२) अगदी नेटाने धंदा-व्यवसाय करा आणि खूप कमवा यासाठी की तुम्ही लोकांचे मोताद राहू नये. पैगंबर मुहम्मद (स.) यांना लोकांना एकदा विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर ! सर्वात उत्तम कमाई कोणती आहे? सांगितले, आपल्या हाताची कमाई आणि असा तो प्रत्येक व्यवसाय ज्यात खोटारडेपणा व अपहार नसावा.

माननीय अबू कलाबा (रजि.) सांगत असत,

"बाजारात नेटाने व्यवसाय करा तुम्ही धर्मावर दृढपणे अटळ राहू शकाल आणि लोकांवर अवलंबून राहणार नाही."

३) व्यवसाय वाढविण्यासाठी नेहमी सत्याचा अवलंब करा. खोट्या शपथा घेण्यापासून सक्तीने दूर राहा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"कयामतच्या दिवशी सर्वश्रेष्ठ अल्लाह त्या माणसाशी न बोलेल न त्याच्याकडे ढुंकुन पाहील आणि न त्याला शुध्द करून जन्नतमध्ये दाखल करेल, जो खोटी शपथ घेऊन आपला व्यवसाय वाढविण्याचा प्रयत्न करतो." (हदीस : मुस्लिम)

पैगंबरांनी असे ही सांगितले,

"आपला माल विकण्यासाठी अत्याधिक खोट्या शपथा घेण्यापासून दूर राहा. ही गोष्ट काही काळापुरती तर लाभकारक वाटते, परंतु शेवटी व्यवसायातील बरकत नाहीशी करते." (हदीस : मुस्लिम)

४) व्यवसायात नेहमी सत्यता व विश्वस्तता राखवा आणि कधीही कोणाला खराब माल देऊन आणि जाणूनबुजून वाजवीपेक्षा भरमसाठ नफा घेऊन आपल्या हलाल (वैध) कमाईला हराम (अवैध) बनवू नका.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे.

"सच्चा आणि विश्वसनीय व्यापारी कयामतीत पैगंबरांच्या सत्यवचनी लोकांच्या आणि शहीद झालेल्यांच्या सोबत असेल." (हदीस : तिर्मिजी)

५) ग्राहकांना चांगल्यात चांगला माल देण्याचा प्रयत्न करा. ज्या मालाविषयी तुम्हाला समाधान नसेल तो ग्राहकाला मुळीच देऊ नका आणि जर एखादा ग्राहक तुमच्याकडून काही सल्ला मागेल तर त्याला योग्य सल्ला द्या.

६) ग्राहकांना विश्वासात घेण्याचा प्रयत्न करा की त्यांनी तुम्हाला आपला हितचिंतक समजावे, तुमच्यावर भरवसा ठेवावा आणि त्यांना पुरेपूर खात्री व्हावी की ते तुमच्याकडे कधीही धोका खाणार नाहीत. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे.

"ज्याने शुध्द कमाईवर निर्वाह केल, माझ्या आचरण शैलीला आचरणात आणले आणि लोकांना आपल्या खराबीपासून सुरक्षित ठेवले तर असा मनुष्य जन्नती आहे. तो जन्नतमध्ये दाखल होईल. लोक म्हणाले, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) ! या काळात तर असे लोक संख्येने विपूल आहेत.' पैगंबर म्हणाले, "माझ्यानंतरही असे लोक होतील."

(हदीस : तिर्मिजी)

७) वक्तशीरपणाचे पुरेपूर पालन करा. वेळेवर दुकानावर पोहोचा आणि स्थैर्याने व संयम राखून बसा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"रोजी (उपजीविके) चा शोध आणि हलाल कमाई प्राप्त करण्यासाठी अगदी सकाळीच निघा, कारण प्रात:कालीन कामांमध्ये बरकत व विस्तार असतो."

८) स्वत:ही मेहनत करा आणि नोकरांनाही मेहनत करण्याची सवय लावा. तथापि नोकरांचे हक्क उदारतेने व त्यागभावनेने अदा करा आणि नेहमी त्यांच्याशी नरमीचा व भलाईचा व्यवहार करा. एवढ्या-तेवढ्या कारणावरून रागात येण्यापासून आणि शंका-संशय करण्यापासून दूर राहा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाह त्या जनसमूहाला शुध्दता प्रदान करीत नाही, ज्याच्या वातावरणात दुर्बलांना त्यांचा हक्क मिळवून दिला जात नाही."

९) ग्राहकांशी नेहमी नरमीचा व्यवहार करा आणि कर्ज मागणाऱ्यांशी सक्तीने वागू नका आणि न वसूल करण्यात सक्ती करा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे.

"अल्लाह त्या माणसावर दया करील, जो खरेदी विक्रीत आणि वसूली करण्यात नरमी आणि सद्व्यवहाराने वागतो." (हदीस : बुखारी)

आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले, ज्या माणसाची ही इच्छा असेल की अल्लाहने त्याला कयामतच्या दिवसाच्या कोंडामारा व दु:खापासून वाचवावे तर त्याने अडचणीत असलेल्या कर्जदाराला सवड द्यावी किंवा कर्जाचे ओझे त्याच्यावरून उतरावे."

१०) विकल्या जाणाऱ्या वस्तूमधील दोष लपविण्याचा आणि ग्राहकाला फसविण्याचा कधीही प्रयत्न करू नका, किंबहुना जो दोष असेल तो ग्राहकाला साफ दाखवा.

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) धान्याच्या एका ढिगाऱ्या जवळून गेले. त्यांनी आपला हात त्या ढिगात घातला असता त्यांना काहीसा ओलावा जाणवला. त्यांनी धान्य विक्रेत्याला विचारले, "हे काय आहे?" विक्रेता म्हणाला "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! या ढिगाऱ्यांवर पाऊस पडला होता. पैगंबर म्हणाले, मग तुम्ही ओले झालेल्या धान्याला वर का नाही ठेवले की लोकांनी पाहून घेतले असते. जो मनुष्य धोका देईल, त्याचा माझ्याशी कसलाही संबंध नाही.

११) किंमती वाढण्याची वाट बघण्यात खाण्यापिण्याच्या वस्तूंचा साठा रोखून अल्लाहच्या निर्मितीस (प्राणीमात्रांना) त्रस्त करण्याचे पाप करू नका.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "साठेबाजी करणारा अपराधी आहे."

आणखी एका प्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"साठेबाजी करणारा वाईट मनुष्य आहे. जेव्हा अल्लाह वस्तूंना स्वस्त करतो, तेव्हा तो दु:खाने दुबळा होतो आणि जेव्हा किंमती वाढतात तेव्हा त्याचे मन फार आनंदीत होते." (हदीस : मिश्कात)

१२) ग्राहकाला त्याचा पुरेपूर हक्क द्या. मोजमाप करण्यात उणे-अधिक करू नका. देण्याघेण्याचे एकच परिमाण राखा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मोजमाप करणाऱ्या व्यापाऱ्यांना संबोधून सांगितले,

**"तुम्हा लोकांना दोन अशा कामांचे जबाबदार बनविले गेले आहे, ज्यांच्यामुळे तुमच्यापूर्वी होऊन गेलेले जनसमूह नष्ट झाले."**

**पवित्र कुरआनातील उल्लेख असा,**

"विनाश आहे दांडी मारणाऱ्यांसाठी, ज्याची स्थिती अशी आहे की जेव्हा लोकांकडून घेतात तेव्हा पुरेपूर घेतात आणि जेव्हा त्याला मापून किंवा तोलून देतात तेव्हा त्यांना कमी देतात.काय या लोकांना समजत नाही की एका मोठ्या दिवशी हे उठवून आणले जाणार आहेत? त्या दिवशी जेव्हा सर्व लोक जगांच्या पालनकर्त्यासमोर उभे असतील."

*(दिव्य कुरआन, ८३: १-६)*

**१३) व्यापारविषयक दोष-उणीवांचे प्रायश्चित्त अवश्य करीत राहा आणि अल्लाहच्या मार्गात मुक्त मनाने दान-पुण्य करीत राहा.**

**पैगंबर मुहम्मद (स.) यांनी व्यापाऱ्यांना ताकीद केली,**

**"हे व्यवसाय करणाऱ्यांनो! मालाची विक्री करतांना निरर्थक गोष्ट बोलण्याची आणि खोटी शपथ घेण्याची शक्यता फार असते, तेव्हा तुम्ही लोक आपल्या माल-सामग्रीतून दान जरूर करीत जा."** (हदीस : अबू दाऊद)

**१४) त्या व्यापाराला कधीही दृष्टीआड होऊ देऊ नका जो अल्लाहच्या दु:खदायक प्रकोपापासून व शिक्षा-यातनेपासून सुटका देणारा आहे आणि ज्याचा नफा क्षणभंगूर धनदौलत नाही तर चिरकालीन सफलता आणि निरंतर स्वरुपाचे जीवन आहे. कुरआनात सांगितले गेले,**

"हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, मी दाखवू तुम्हाला तो व्यापार जो तुम्हाला यातनादायक प्रकोपापासून वाचवील? श्रद्धा ठेवा अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर आणि प्रयत्नांची पराकाष्ठा (जिहाद) करा अल्लाहच्या मार्गात आपल्या धनसंपत्ती आणि आपल्या प्राणानिशी. हेच तुमच्यासाठी उत्तम आहे जर तुम्ही समजून घेतले."

*(दिव्य कुरआन, ६१ : १०-११)*

प्रकरण - ४

# धर्माचे आवाहन

## ३६. धर्म आवाहकांचे शिष्टाचार

१) **आपल्या अधिकारात खरे चैतन्य निर्माण करा. तुम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांचे उत्तराधिकारी आहात आणि धर्माचे आवाहन, सत्याची साक्ष आणि धर्मप्रसाराची तीच जबाबदारी तुम्हाला पार पाडायची आहे जी अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) पार पाडत राहिले. यास्तव धर्माचे आवाहन करणाऱ्या माणसासारखी तळमळ निर्माण करण्याचा प्रयत्न करा, जी पैगंबर मुहम्मद (स.) यांची विशेष आणि प्रकट दिसून येणारी खूबी आहे. पवित्र कुरआनातील उल्लेख असा,**

"त्याने तुम्हाला आपल्या कार्यासाठी निवडले आहे आणि धर्मामध्ये तुमच्यावर कोणतीही अडचण ठेवली नाही. दृढ व्हा आपल्या पिता इब्राहीम (अ.) च्या परंपरे (मिल्लत) वर. अल्लाहने पूर्वीसुद्धा तुमचे नाव मुस्लिम ठेवले होते आणि या (कुरआन) मध्येसुद्धा (तुमचे असेच नाव आहे) जेणेकरून पैगंबराने तुमच्यावर साक्षी राहावे आणि तुम्ही लोकांवर साक्षीदार." *(दिव्य कुरआन, २२ :७८)*

**अर्थात समस्त मुस्लिम समुदाय पैगंबर मुहम्मद (स.) यांचा उत्तराधिकारी आहे आणि त्याला तेच कार्य पार पाडायचे आहे जे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पार पाडले, ज्याप्रमाणे अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या कथन-कृति आणि रात्र-दिवसांच्या परिश्रमाने अल्लाहच्या धर्माला स्पष्ट करण्याचा हक्क अदा केला अगदी त्याचप्रमाणे मुस्लिम समुदायाला जगातील सर्व मानवजातीसमोर अल्लाहच्या धर्मास प्रस्तुत करावयाचे आहे आणि जबाबदारीच्या त्याच जाणीव आणि आवाहन करणाऱ्यासमान तळमळपूर्वक सत्यधर्माची साक्ष बनून जिवंत राहायचे आहे.**

२) **आपला मूळ उद्देश स्वरूपास सदैव स्मरणात राखा आणि त्याला शोभून दिसेल असे आपले जीवन घडविण्याचा व ते कायम राखण्याचा प्रयत्न करा. तुम्ही जगातल्या सर्वसाधारण समुदायाप्रमाणे एक साधारण समुदाय नाहीत. किंबहुना अल्लाहने तुम्हाला विशेष शान (उच्च दर्जा) प्रदान केली आहे. तुम्हाला जगातल्या समस्त जनसमूहांमध्ये सरदार (समूहप्रमुखा) प्रमाणे मार्गदर्शकाचे स्थान प्राप्त आहे. तुम्ही सर्व प्रकारच्या अंतिम टोकापासून दूर राहून अल्लाहच्या सरळमार्गावर समतोल राखून कायम राहा.**

**कुरआनतील उल्लेख असा,**

"आणि अशाच प्रकारे तर आम्ही तुम्हाला उत्तम समाज बनविले आहे. जेणेकरून जगांतील लोकांवर तुम्ही साक्ष व्हा." *(दिव्य कुरआन, २ : १४३)*

३) **आपल्या ध्येय-धोरणाची खरी माहिती प्राप्त करा. आणि मोकळ्या मनाने आणि पूर्णत: संतुष्ट होऊन ती आत्मसात करण्याचा प्रयत्न करा. अल्लाहच्या दृष्टीने मुस्लिमांचे ध्येय-उद्दिष्ट अगदी असे आहे की त्याने संपूर्ण एकाग्रता व निखालसपणे त्या संपूर्ण धर्माला कायम व जारी राखावे, ज्यास आदरणीय मुहम्मद (स.) घेऊन आले. ती श्रध्दातत्त्वे, उपासनापध्दती, चारित्र्य आणि राहणीमान, खाणे-पिणे, व राजकारण, अर्थकारण, तात्पर्य जीवनाशी संबंधित समस्त ईशमार्गदर्शनात सामील आहेत. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या शुभकाळात या जीवनधर्माला आपल्या समस्त विवरणात्मक कथनांसह कायम केले. पैगंबरांनी श्रध्दा आणि नीतीविषयक शिकवण दिली, उपासनेच्या पध्दतीही शिकविल्या, धर्माच्या आधारावर समाजरचनाही केली आणि मानवसमाजाला सुसंघटित करणारे आणि भलाई व बरकतीने समृध्दीने ओतप्रोते एक समृध्दशाली राज्यही निर्माण केले.**

**पवित्र कुरआनात सांगितले आहे,**

"त्याने तुमच्यासाठी धर्माची तीच पद्धत निश्चित केली आहे जिची आज्ञा त्याने नूह (अ.) ला दिली होती आणि जिला (हे मुहम्मद (स.)) आता तुमच्याकडे आम्ही दिव्यबोधाद्वारे पाठविले आहे, आणि जिचा आदेश आम्ही इब्राहीम (अ.) आणि मूसा (अ.) व ईसा (अ.) यांना दिलेला आहे, या ताकीदसह की प्रस्थापित करा या धर्माला आणि यात फाटाफूट होऊ देऊ नका." *(दिव्य कुरआन, ४२:१३)*

४) **दुराचाराला मिटविण्यासाठी आणि सदाचार व भलाईपूर्ण नीतीला कायम करण्यासाठी सदैव तत्पर राहा. हीच आपल्या ईमानची निकड आहे आणि हाच तुमच्या सामुदायिक अस्तित्वाचा उद्देश आहे. याच उद्देशाकरिता जिवंत राहा आणि याच्याचकरिता प्राणार्पण करा. याच कार्याला पार पाडण्याकरिता अल्लाहने तुम्हाला खैरे उम्मत (सर्वोत्तम समुदाय) च्या महान उपाधीने आभूषित केले आहे.**

"आता जगात तो सर्वोत्तम जनसमुदाय तुम्ही आहात ज्याला अखिल मानवजाती(च्या कल्याणा)साठी अस्तित्वात आणले गेले आहे. तुम्ही सदाचाराचा आदेश देता व दुराचारापासून प्रतिबंध करता आणि अल्लाहवर श्रद्धा बाळगता."

*(दिव्य कुरआन, ३:११०)*

**पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,**

**"त्या अस्तित्वाची शपथ, ज्याच्या ताब्यात माझा प्राण आहे. तुम्ही लोक अनिवार्यपणे सत्कर्मांचा आदेश देत रहा आणि दुष्कर्मांपासून रोखत रहा. अन्यथा लवकरच अल्लाह तुमच्यावर असा प्रकोप अवतरीत करील की मग तुम्ही पुकारीत रहाल आणि काहीच सुनवाई होणार नाही."** (हदीस : तिर्मिजी)

५) अल्लाहचा संदेश पोहचविण्याकरिता व अल्लाहच्या दासांना जहन्नमच्या भयंकर शिक्षा-यातनेपासून वाचविण्याकरिता आवाहकासारखी तळमळ आणि उदाहरण देण्यायोग्य वेदना निर्माण करा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांची अनुपमेय तळमळ आणि वेदना कुरआनने पुढील शब्दांत वर्णिली आहे.

"हे पैगंबर (स.)! तुम्ही यांच्या मागे दु:खापायी आपले प्राण गमावणार आहात, जर यांनी या शिकवणुकीवर श्रद्धा ठेवली नाही?" *(दिव्य कुरआन, १८:६)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या या अवस्थेचे पुढील शब्दांत वर्णन केले आहे.

"माझे उदाहरण त्या माणसासारखे आहे, ज्याने आग पेटवली आणि जेव्हा जवळपासचा परिसर आगीच्या प्रकाशात उजळला, तेव्हा हे किडे-पतंगे त्यावर पडू लागले आणि तो मनुष्य पूर्ण ताकतीसह त्या किडे-पतंग्यांना रोखत आहे,परंतु पतंगे मात्र त्याच्या प्रयत्नांना असफल बनवित आहे आणि आगीत झेप घेत आहेत. (अशा प्रकारे) मी तुम्हाला कमरेला धरून आगीपासून रोखत आहे आणि तुम्ही मात्र आगीत झेप घेत आहात."

(हदीस : मिश्कात)

एकदा माननीय आएशा (रजि.) यांनी पैगंबरांना विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर (स.)! उहूदपेक्षाही कठीण दिवस कधी आपणावर आला आहे?" सांगितले, "होय. आएशा! माझ्या जीवनात सर्वात जास्त कठीण दिवस उक्बाचा दिवस होता."

हा तो दिवस होता जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) मक्कावासींबाबत निराश होऊन तायफवासींना अल्लाहचा संदेश पोहचविण्याकरिता गेले. तिथले सरदार अब्द किंवा लैलने गुंडांना त्यांच्या मागे लावले आणि त्या लोकांनी दयापूर्ण संदेशाच्या उत्तरादाखल पैगंबरांवर दगडांचा वर्षाव केला. येथपावेतो की पैगंबर मुहम्मद (स.) रक्ताने ओलेचिंब झाले आणि बेशुध्द होऊन कोसळले. मग अतिशय त्रस्त व दु:खी होऊन पैगंबर तेथून निघाले आणि जेव्हा कर्नुस्सआलिब येथे पोहोचले, तेव्हा थोडे दु:ख हलके झाले. अल्लाहने प्रकोपाच्या फरिश्त्याला त्यांच्या सेवेस पाठविले.

अजाब (प्रकोपा)चा फरिश्ता पैगंबरांना म्हणाला, "हे अल्लाहचे पैगंबर (स.)! जर आपण आदेश देत असाल तर मी अबू कुबैस आणि जबले अहमद (दोन डोंगर) यांची आपसात टक्कर घडवून या दोन पर्वतांच्या दरम्यान हे दुराचारी भरडले जाऊन त्यांना दुष्परिणतिस पोहचवितो."

सर्व विश्वांचे दयानिधी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "नाही! नाही! मला सोडून द्या की मी आपल्या जनसमूहाला अल्लाहच्या प्रकोपाचे भय दाखवितो. कदाचित अल्लाह यांच्या हृदयांना मार्गदर्शनासाठी उघड करील किंवा मग त्यांच्या संततीमधून असे लोक

निर्माण होतील जे मार्गदर्शन कबूल करतील." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

पैगंबर मुहम्मद (स.) मक्केत आहेत आणि मक्कावासी लोकांमध्ये त्यांच्याविरुध्द कट-कारस्थाने रचली जात आहेत. कोणी म्हणतो यांना शहरातून हद्दपार करा कोणी म्हणतो, यांना जीवे ठार करा. त्याच काळात मक्कावर अचानक दुष्काळाचे संकट कोसळले. असा भयंकर दुष्काळ की कुरेश लोकांना झाडाची पाने आणि साल वगैरे खाऊन उदरनिर्वाह करण्याची पाळी आली. लहान मुले भुकेने तळमळत आणि मोठ्यांना त्यांची ही अवस्था पाहून काळीज तोंडाशी येत असे.

सर्व विश्वांचे कृपानिधी पैगंबर मुहम्मद (स.) लोकांची ही अवस्था पाहून विमनस्क झाले. त्यांच्या निष्ठावान सहकाऱ्यांचेही त्यांची अवस्था पाहून हृदय द्रवले. त्यांनी आपल्या जीवावर उठलेल्या शत्रूंना ज्यांनी दिलेले घाव अजून अगदी ताजे होते, आपल्या मन:पूर्वक सहानुभतींचा संदेश पाठविला आणि अबू सूफियान व सफवान यांच्याजवळ पाचशे दीनार पाठवून सांगून पाठविले की ही रक्कम दुष्काळपीडित गरिबांमध्ये वाटून द्यावी.

वास्तविक मार्गभ्रष्ट लोकांच्या दु:खात सामील होणे, त्यांच्या मार्गभ्रष्टतेवर आणि संकटाबद्दल मनात कुढणे, त्यांना अल्लाहच्या प्रकोपापासून वाचविण्यासाठी तळमळणे, त्यांचा त्रास व क्लेश-यातना पाहून विमनस्क व बेचैन होणे, त्यांच्या मार्गदर्शनासाठी असाधारण धडपड करणे, सत्याच्या आवाहकाचे हेच उत्तम गुण आहेत, ज्यांच्याद्वारे त्याचे जीवन मोठे मनमोहक आणि असाधारण प्रभाव टाकणारे बनते.

६) आपल्या समाजाची जनसमूहाची निस्पृह सेवा करा आणि आपल्या सेवेचा मोबदला लोकांकडून मागू नका. जे काही कराल फक्त अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी करा आणि त्याच्याकडूनच मोबदला व पुण्प्राप्तीची आशा बाळगा. अल्लाहची मर्जी आणि त्याच्याचकडून मोबदला व पुण्य प्राप्तीची आशा अशी गोष्ट आहे जी माणसाच्या कृतित प्रभाव निर्माण करते आणि माणसाला सतत कार्यरत राखते. अल्लाह अनादिअनंत आहे. त्याला न झोप येते, न गुंगी, त्याच्या नजरेपासून कोणाचे कोणतेही कृत्य लपलेले नाही. तो आपल्या सच्चा दासांचा मोबदला वाया जाऊ देत नाही. तो मेहनतीच्या कितीतरी पटींनी जास्त देतो आणि कोणाला वंचित ठेवत नाही.

पैगंबर मुहम्मद (स.) वारंवार आपल्या जनसमूहाला सांगितले,

"मी तुमच्याकडून कसल्याही मोबदल्याची मागणी करीत नाही. माझा मोबदला तर समस्त विश्वांच्या पालनकर्त्यांच्या जिम्मे आहे."

७) इस्लामचा सखोल विवेक प्राप्त करा आणि हा विश्वास बाळगा की अल्लाहच्या दृष्टीने जीवनधर्म केवळ इस्लाम आहे. या सत्यधर्माला सोडून उपासना व आज्ञापालनाचा दुसरा कोणताही मार्ग पत्करला जाईल तर अल्लाहच्या जवळ त्याचे कोणतेही मूल्य व कदर केली

**जाणार नाही. अल्लाहच्या जवळ तर हाच एक मान्यताप्राप्त जीवनधर्म आहे जो कुरआनात आहे आणि ज्यांचे कृतिशील चित्र पैगंबर माननीय मुहम्मद (स.) यांनी आपल्या आदर्श जीवनाद्वारे सादर केले. पवित्र कुरआनात पैगंबर मुहम्मद (स.) यांना सांगितले गेले आहे की "लोकांना अगदी स्पष्टपणे सांगा की मी जो मार्ग पत्करला आहे, नीट विचारपूर्वक, पूर्ण विवेकासह पत्करला आहे."**

**कुरआनात उल्लेख आहे,**

"तुम्ही यांना स्पष्ट सांगून टाका की, "माझा मार्ग तर हा आहे, मी अल्लाहकडे बोलावितो, मी स्वत:देखील पूर्ण प्रकाशात आपला रस्ता पहात आहे आणि माझे सोबतीदेखील, आणि अल्लाह पवित्र आहे व अनेकेश्वरवाद्यांशी माझा काहीही संबंध नाही"

*(दिव्य कुरआन, १२ : १०८)*

**आणि अल्लाहचे स्पष्ट सांगितले आहे,**

"या आज्ञाधारकते (इस्लाम) शिवाय जो कोणी अन्य एखादा धर्म (जीवनपद्धत) अंगिकारत असेल, त्याची ती जीवनपद्धत कदापि स्वीकारली जाणार नाही व मरणोत्तर जीवनामध्ये तो अयशस्वी व विफल होईल." *(दिव्य कुरआन, ३:८५)*

**"अल्लाहच्या जवळ जीवनधर्म तर केवळ इस्लाम आहे."**

८) **आपल्या ध्येयाची महानता व महत्त्व सतत दृष्टीपथात राखा आणि लक्षात ठेवा की हे फार उच्च दर्जाचे काम आहे. ज्यासाठी अल्लाहतर्फे पैगंबरांना पाठविले जात राहिले आणि ही खात्री बाळगा की अल्लाहने तुम्हाला धर्माचे जे अमूल्य धन देऊन ठेवले आह, हीच दोन्ही जगाच्या मोठेपणाची व श्रेष्ठतेची पुंजी आहे. त्याच्या तुलनेत या जगाची धन-दौलत आणि थाटमाट अगदी कस्पटासमान आहे, जी केवळ काही दिवसांची बहार आहे.**

**कुरआनात उल्लेख आहे,**

"आम्ही तुम्हाला सात वचने अशी दिली आहेत जी पुनरोक्ती करण्यास योग्य आहेत, आणि तुम्हाला महान कुरआन प्रदान केला आहे." *(दिव्य कुरआन, १५:८७)*

**तसेच ग्रंथधारकांना संबोधून सांगितले,**

"हे ग्रंथधारकांनो, तुम्ही कदापि कोणत्याच मुलाधारावर नाही जोपर्यंत तौरात व इंजील आणि त्या इतर ग्रंथांवर तुम्ही दृढ रहात नाही जे तुमच्याकडे तुमच्या पालनकर्त्याकडून अवतरित केले गेले आहेत." *(दिव्य कुरआन, ५:६८)*

९) **धर्माची योग्य समज प्राप्त करून घेण्याचा आणि धर्मातील बुद्धि कौशल्ययुक्त गोष्टी समजून घेण्याचा नियमित प्रयत्न करीत राहा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,**

“अल्लाहत्या माणसाला भलाईने उपकृत करू इच्छितो ज्याला आपल्या जीवनधर्माची योग्य समज आणि सुज्ञता प्रदान करतो.” (हदीस : बुखारी, मुस्लिम)

वास्तविक जीवनधर्माची योग्य समज आणि धर्माची हिकमत हाच समस्त सत्कर्मे आणि सदाचरणाचा मूल स्त्रोत आहे आणि जो मनुष्य या भलाईपासून वंचित आहे, तो दोन्ही जगांच्या सद्‌भाग्यांपासून वंचित आहे. न त्याच्या जीवनात समतोल आणि एकरंगी निर्माण होऊ शकते आणि न तो जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात धर्माचे यथायोग्य प्रतिनिधित्व करू शकतो.

१०) जे काही जगापुढे सादर कराल, ते सर्वप्रथम आपल्या स्वत:समोर सादर करा. इतरांना सांगण्याआधी ते स्वत:ला सांगा आणि ज्याची दुसऱ्यांकडून अपेक्षा धराल, प्रथम ते स्वत: करून दाखवा.

सत्यधर्माच्या आवाहकाचे वैशिष्ट्य हे असते की तो आपल्या आवाहनाचा सच्चा नमुना असतो. तो जे काही सांगतो आपल्या आचरणाला त्यावर साक्षी बनवितो. ज्या वस्तुस्थितींना मान्य करण्यात तो जगाचे भले पाहतो, स्वत: त्याचा सर्वाधिक लोभी असतो. पैगंबरगण जेव्हा जेव्हा आपल्या समुदायासमोर आवाहन करण्यास उठले, तेव्हा त्यांनी उदघोषित केले, “अना अब्वुलुल मुस्लिमीन” अर्थात- “मी स्वत: सर्वात प्रथम मुस्लिम (आज्ञाधारक) आहे.”

तुम्ही मुखाने व लेखणीने ही साक्ष द्या की सत्य तेच आहे जे तुम्ही सांगत आहात आणि आपल्या व्यक्तिगत आचरण, घरगुती संबंध, सामाजिक व्यवहार आणि राजकीय व देशव्यापी तन्मयतेद्वारे हे सिध्द करा की सत्यजीवन धर्माचा स्वीकार करूनच शुध्द चारित्र्य अस्तित्वात येते, मजबूत व सुखी कुटुंब उदयास येते, चांगला समाज निर्माण होतो आणि सभ्यता व संस्कृतीची अशी व्यवस्था बनते की जिचा आधार न्यायावर असतो. जे लोक आपल्यात सुधारणा करण्यापासून गाफील होऊन इतरांच्या सुधारणेच्या व संस्काराच्या गोष्टी करतात ते फारच नादान आहेत. स्वत:चे जळत असलेले घर पाहून त्यांना काळजी वाटत नाही, मात्र पाण्याने भरलेल्या बादल्या घेऊन याचा शोध घेत फिरत आहेत की एखाद्याचे घर जळताना दिसल्यास त्याला विझवावे. असे लोक या जगातही असफल आहेत आणि पारलौकिक जीवनामध्येही असफल राहतील. इथे तर त्यांचा नाकर्तेपणा त्यांच्या बोध-उपदेशाला भारहीन व प्रभावहीन करत राहील आणि पारलौकिक जीवनामध्ये त्यांना मोठी दु:खदायक शिक्षा भोगावी लागेल.

“अल्लाहच्या जवळ हे अत्यंत अप्रिय कृत्य आहे की तुम्ही सांगावी ती गोष्ट जी करीत नाही.” *(दिव्य कुरआन, ६१:३)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अशा कर्महीन आवाहकांना अतिशय भयंकर अशा ईशकोपचे

भय दाखविले आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

कयामतच्या दिवशी एक मनुष्य आणला जाईल आणि आगीत फेकला जाईल. त्याच्या आतड्या त्या आगीत बाहेर पडतील. मग तो मनुष्य त्या आतडींना अशा प्रकारे सोबत घेऊन फिरेल ज्याप्रमाणे गाढव आपल्या चक्कीत फिरतो. हे पाहून दुसरे जहन्नमी लोक त्याच्याजवळ जमा होतील आणि विचारतील, "हे अमक्या माणसा! ही तुमची काय अवस्था आहे? काय तुम्ही जगात आम्हाला सत्कर्म करण्यास प्रवृत्त करीत नव्हते आणि दुष्कर्मांपासून रोखत नव्हते? (असे नेकीचे काम केल्यानंतरही तुम्ही या ठिकाणी कसे आलात?)" तो मनुष्य म्हणेल, "मी तुम्हाला सत्कर्मांचा पाठ देत होतो परंतु स्वत: सत्कर्माच्या जवळही जात नव्हतो तुम्हाला दुष्कर्मापासून रोखत होतो परंतु स्वत: दुष्कर्म करीत होतो."
(हदीस : मुस्लिम, बुखारी)

मेराजच्या रात्री पाहिलेल्या घटना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी लोकांसमोर ठेवल्या आहेत. त्यांचा एक महत्त्वपूर्ण उद्देश हाही आहे की सुस्ती-गफलत करणाऱ्यांना ताकीद व्हावी आणि त्यांनी आपल्यात सुधारणा करून घेण्याची काळजी घ्यावी. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"मी मेराजच्या रात्री काही लोकांना पाहिले की त्यांचे ओठ आगीच्या कात्रींनी कापले जात आहेत. मी जिब्रिल (अ.) यांना विचारले, हे लोक कोण आहेत? जिब्रील (अ.) म्हणाले, हे तुमच्या समुदायातील भाषण करणारे (वक्ते) आहेत, जे लोकांना सत्कर्म आणि अल्लाहचे भय दाखवून वागण्यास प्रवृत्त करीत आणि स्वत:ला याबाबत विसरले होते."
(हदीस : मिश्कात)

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे निकटतम सहकारीदेखील अशा प्रकारची गफलत करणाऱ्यांना व कर्महीन व कृतीशून्य लोकांना सक्त ताकीद करीत.

एकदा माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) एका माणसाला म्हणाले, "महोदय! मी इच्छितो की लोकांना सत्कर्माचा आदेश द्यावा आणि दुष्कर्म व दुराचारापासून रोखावे आणि धर्माच्या आवाहनाचे व प्रसाराचे कार्य करावे!" माननीय अब्दुल्लाह (रजि.) म्हणाले, "काय तुम्ही या दर्जास पोहोचलात की धर्मप्रसार करणारे प्रचारक बनावे?" तो म्हणाला, "होय, आशा वाटते." माननीय इब्ने अब्बास (रजि.) यांनी सांगितले, "जर तुम्हाला हे भय नसेल की पवित्र कुरआनच्या तीन आयती तुम्हाला अपमानित करतील तर मोठ्या आवडीने धर्मप्रसाराचे कार्य करा." तो मनुष्य म्हणाला, "माननीय, त्या कोणत्या तीन आयती आहेत?" माननीय इब्ने अब्बास (रजि.) यांनी सांगितले, "पहिली आयत ही आहे,

"तुम्ही तर इतरांना सन्मार्गाचा अंगिकार करण्यास सांगता परंतु स्वतःला मात्र विसरता?"
*(दिव्य कुरआन, २:४४)*

**इब्ने अब्बास (रजि.) म्हणाले, काय या आयतीवर तुम्ही चांगल्या प्रकारे आचरण केले आहे? तो म्हणाला, नाही, दुसरी आयत ही आहे,**

**"तुम्ही ती गोष्ट का सांगता, जी स्वत: करीत नाही?"** *(दिव्य कुरआन, ६१:२)*

**तर काय तुम्ही ही आयत चांगल्या प्रकारे आचरणात आणली आहे? तो म्हणाला, नाही तिसरी आयत ही आहे की,**

"शुऐब (अ.) ने सांगितले, "बंधूंनो, तुम्ही स्वत:च विचार करा की जर मी आपल्या पालनकर्त्याकडून एका स्पष्ट साक्षीवर होतो आणि मग त्याने मला आपल्याकडून चांगली उपजीविका देखील दिली. (तर त्यानंतर तुमच्या पथभ्रष्टतेत आणि हरामखोरीत तुमचा सहभागी कसा होऊ शकेन?) आणि मी हे मुळीच इच्छित नाही की ज्या गोष्टींपासून मी तुम्हाला रोखतो त्या गोष्टी मी स्वत: कराव्यात." *(दिव्य कुरआन, ११:८८)*

**"तर सांगा, तुम्ही या आयतीवर चांगल्या प्रकारे आचरण केले आहे?" तो मनुष्य म्हणाला, "नाही." तेव्हा माननीय म्हणाले, "जा प्रथम स्वत:ला सत्कर्माचा आदेश द्या आणि दुष्कर्मापासून रोखा."**

**११) नमाजला तिच्या पूर्ण शिष्टाचार व अटीसह आवडीने अदा करा. नफ्ल नमाजांचाही इतमाम राखा. अल्लाहशी अगदी जवळचा संबंध जोडल्याविना त्याच्या धर्माचे आवाहन व प्रसारकार्य शक्य नाही आणि अल्लाहशी संबंध प्रस्थापित करण्याचे खात्रीचे माध्यम नमाज आहे, जे स्वत:अल्लाहने आपल्या दासांना सांगितले आहे.**

**पैगंबर मुहम्मद (स.) यांना संबोधून अल्लाहने सांगितले,**

"हे पांघरूण ओढून झोपणाऱ्या, रात्री नमाजीसाठी उभे राहात जा, परंतु थोडे, अर्धी रात्र किंवा त्यापेक्षा कमी करा अथवा त्यापेक्षा काही अधिक वाढवा, आणि कुरआनचे खूप थांबून थांबून पठण करा, आम्ही तुमच्यावर एक भारदस्त वाणी अवतरणार आहोत."
*(दिव्य कुरआन, ७३:१-५)*

**एक भारदस्त वाणी अवतरणार आहे ते अभिप्रेत सत्यधर्माचा प्रचार व प्रसार होय. ही एक वस्तुस्थिती आहे की ही जबाबदारी जगातील समस्त जबाबदाऱ्यांपेक्षा जास्त भारदस्त आहे. या मोठ्या जबाबदारीचा हक्क अदा करण्याकरिता आवश्यक आहे की तुम्ही नमाजद्वारे शक्ती प्राप्त करावी आणि अल्लाहशी असलेला संबंध मजबूत करावा.**

**१२) पवित्र कुरआनशी ओढ निर्माण करा आणि नित्यनेमाने त्याचे पठण-अध्ययन करा. नमाज पढताना अगदी लक्षपूर्वक पठण करा आणि नमाजच्या व्यतिरिक्त कुरआन मोठ्या**

आवडीने थोडे-थोडे थांबून पठण करा, मन लावून व एकाग्रचित्ताने जे पठण केले जाते त्याने कुरआन समजण्यात आणि मनन-विचार चिंतन करण्यात मदद मिळते आणि आवड वाढते. पवित्र कुरआन मार्गदर्शन व बोध-उपदेशाचा एकमेव स्रोत आहे. तो अशासाठीच अवतरित झाला आहे की त्यातल्या वचनांवर विचार चिंतन केले जावे आणि त्याच्या मार्गदर्शन व उपदेशापासून लाभ घेतला जावा यास्तव स्वत: विचार चिंतन करण्याची सवय लावली जावी आणि या इराद्याने त्याची तिलावत (पठण) करा की त्याच्या मार्गदर्शनानुसार आपले जीवन घडवायचे आहे आणि त्याच्याच मार्गदर्शनानुसार समाजाला परिवर्तीत करायचे आहे. अल्लाहच्या धर्मास तेच लोक कायम करू शकतात जे मनन-चिंतनाचे केंद्र आणि आवडी निवडींचा पाया पवित्र कुरआनास बनवतील. याची उपेक्षा करुन न तर स्वत: धर्मावर कायम राहणे शक्य आहे आणि न धर्म प्रस्थापनेच्या प्रयत्नात भाग घेणे शक्य आहे. कुरआन पठण करणाऱ्यांना मार्गदर्शन केले गेले आहे.

"ग्रंथ जो आम्ही तुमच्याकडे पाठविला आहे, सुरूवातीपासून शेवटपर्यंत बरकत (समृध्दी) आहे यासाठी की लोकांनी त्याच्या आयतींवर मनन-चिंतन करावे आणि उचित बुद्धी राखणाऱ्यांनी त्यापासून बोध प्राप्त करावा." *(दिव्य कुरआन, ३८:२९)*

आणि ताकीद केली गेली,

"कुरआनस थांबून थांबून वाचा" *(दिव्य कुरआन, ७३:४)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे, "हृदयांवर गंज लागतो, ज्याप्रमाणे लोखंडावर गंज लागतो, जेव्हा त्याच्यावर पाणी पडते." विचारले गेले, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! मग हृदयांना लागलेला गंज दूर करणारी वस्तू कोणती?" सांगितले, हृदयाचा गंज अशा प्रकारे दूर होतो, की माणसाने मृत्यूची जास्तीतजास्त आठवण करावी आणि दुसरे हे की कुरआनाचे पठण करावे." (हदीस : मिश्कात)

१३) कोणत्याही स्थितीत अल्लाहशी कृतज्ञता व्यक्त करा आणि कृतज्ञतेची भावना निर्माण करण्याकरिता त्या लोकांवर नजर टाका जे ऐहिक थाटमाट आणि धन-सम्पत्तिबाबत तुमच्यापेक्षा कमी दर्जाचे आहेत.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे, "त्या लोकांकडे पाहा जे तुमच्यापेक्षा धन सम्पत्ती आणि ऐहिक दर्ज्यात कमी आहेत (अशाने तुमच्या अंगी कृतज्ञतेची भावना निर्माण होईल.) आणि त्या लोकांकडे पाहू नका जे तुमच्यापेक्षा धन-सम्पत्तीत आणि ऐहिक साधनसामुग्रीत वरचढ आहेत, यासाठी की ज्या ईश-देणग्या तुम्हाला या वेळी लाभलेल्या आहेत, त्या तुमच्या दृष्टीने तुच्छ ठरू नयेत. (अन्यथा, अल्लाहशी कृतघ्नतेची भावना निर्माण होईल.)

१४) ऐशआराम करण्यापासून दूर राहा आणि सत्याचे असे वीर सैनिक बना जो सदैव

**कर्तव्यतत्पर असावा आणि कोणत्याही वेळी नि:शस्त्र होऊ नका.**

**पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे, "मी ऐशआरामाचे जीवन कसे घालवू, जेव्हा इसराफील सूर (शंख) तोंडाशी लावून, कान लावून आणि नतमस्तक होऊन प्रतिक्षा करीत आहेत की केव्हा सूर फुंकण्याचा आदेश होतो."**

**आणि पवित्र कुरआनात ईमानधारकांना संबोधून अल्लाहने सांगितले,**

"आणि तुम्ही लोक, यथाशक्ती जास्तीतजास्त सामर्थ्य आणि तयार बांधून ठेवले जाणारे घोडे त्याचा सामना करण्यासाठी सज्ज ठेवा जेणेकरून त्यायोगे अल्लाहच्या व आपल्या शत्रूंना आणि त्या इतर वैऱ्यांना भयभीत करावे, ज्यांना तुम्ही जाणत नाही, परंतु अल्लाह जाणतो. अल्लाहच्या मार्गात जे काही तुम्ही खर्च कराल त्याची पुरेपूर तुम्हाला परतफेड केली जाईल व तुमच्यावर कदापि अन्याय होणार नाही.." *(दिव्य कुरआन, ८:६०)*

१५) **धर्मासाठी सर्वस्व अर्पण करण्यासाठी आणि गरज पडल्यास आपल्या प्रिय देशाचा त्याग करण्यासाठी तत्पर राहा. आणि सातत्याने आत्मपरीक्षण करीत राहा की कोणत्या मर्यादेपावेतो तुमच्या अंगी हा शक्तीजोर धरत आहे. कुरआनात आदरणीय इब्राहीम (अ.) यांच्या देशत्यागाच्या घटनेचा उल्लेख करतांना हिजरत (देशत्यागा) वर प्रवृत्त करण्यास आणि सर्वथा बलीदानास्तव तत्पर असण्याकरिता अशा प्रकारे सांगितले गेले आहे,**

"आणि या ग्रंथात इब्राहीम (अ.) ची गोष्ट वर्णन करा. नि:संशय तो एक सत्यवादी मनुष्य आणि नबी होता. (यांना जरा त्या प्रसंगाची आठवण करून द्या.) जेव्हा त्याने आपल्या पित्याला सांगितले की, "हे पित्या, आपण का त्या वस्तूंची उपासना करता ज्या ऐकतही नाहीत आणि पहातही नाहीत आणि आपले कोणतेही काम पार पाडू शकत नाहीत? बाबा, माझ्याजवळ एक असे ज्ञान आले आहे जे आपल्याजवळ आले नाही. आपण माझे अनुकरण करावे. मी आपल्याला सरळमार्ग दाखवीन. बाबा, शैतानची भक्ती करू नये. शैतान तर 'परम दयाळू'ची अवज्ञा करणारा आहे. बाबा, मला भीती आहे की एखादेवेळी तुम्ही 'परम दयाळू'च्या प्रकोपात अडकू नये आणि शैतानचे सोबती बनून रहावे."

पित्याने सांगितले, "इब्राहीम (स.), काय तू माझ्या उपास्यापासून पराङ्मुख झाला आहेस? जर तू परावृत्त झाला नाहीस तर मी तुला दगडांचा वर्षाव करून ठार करीन. बस्स, तू माझ्यापासून कायमचा वेगळा हो." इब्राहीम (अ.) ने सांगितले, "सलाम आहे तुम्हाला, मी आपल्या पालनकर्त्याजवळ प्रार्थना करीन की त्याने आपल्याला क्षमा करावी. माझा पालनकर्ता माझ्यावर फारच कृपावंत आहे. मी तुम्हा सर्वांनासुद्धा सोडतो आणि त्यांनादेखील ज्यांचा तुम्ही अल्लाहला सोडून धावा करता. मी तर माझ्या पालनकर्त्यालाच पुकारीन, आशा आहे की मी माझ्या पालनकर्त्याला पुकारून विफल ठरणार नाही."

*(दिव्य कुरआन, १९:४१-४८)*

१६) अल्लाहच्या मार्गात निघण्याची तळमळ, तन मन धन अर्पण करून जिहाद करण्याची भावना आणि त्याच्या मार्गात हौतात्म्य प्राप्त करण्याची पवित्र इच्छा निर्माण करा. वस्तुस्थिती ही आहे की जिहाद ईमानाचा उच्चतम दर्जा आहे आणि ज्या हृदयात याची इच्छा नसेल ती ईमान व मार्गदर्शनापासून वंचित असलेली एक निस्तेज आणि भग्न वास्तु आहे. जिहादच्या मैदानात पोहोचण्याची सुबुद्धी आणि अल्लाहच्या मार्गात प्राण आणि धन अर्पण करण्याची संधी लाभणे फार मोठे सद्‌भाग्य आहे. परंतु जर अशी परिस्थिती नसेल की तुम्ही तशी संधी मिळवू शकाल अथवा साधन नसेल की तुम्ही जिहादच्या मैदानात पोहोचून ईमानाचे तेज दाखवू शकाल, तरीही तुमची गणना अल्लाहच्या ठायी त्या शूर धर्मयोध्दयांत होऊ शकते, जे अल्लाहच्या मार्गात शहीद झाले किंवा गाजी (पराक्रमी) होऊन परतले. या अटीवर की तुमच्या मनात अल्लाहच्या मार्गात निघण्याची तळमळ असावी. धर्माच्या मार्गात बलिदान देण्याची भावना असावी, हौतात्म्य पत्करण्याची आकांक्षा असावी, यासाठी की अल्लाहची दृष्टी मनातल्या त्या भावनांवर असते, ज्या अशा प्रकारच्या शौर्याकरिता माणसाला बेचैन करतात. तबूकच्या युध्दातून पैगंबर मुहम्मद (स.) परत येत होते. तेव्हा परतीच्या मार्गावर आपल्या सहकाऱ्यांना संबोधून त्यांनी सांगितले, "मदीनेत काही लोक असे आहेत की तुम्ही जे काही केले आणि जी घाटीदेखील निर्धारीत केली, ती सतत तुमच्यासोबत राहील." पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सहकाऱ्यांनी आश्चर्याने विचारले, "काय मदीनेत राहात असताना?" सांगितले, "होय, मदीनेत राहात असताना कारण त्यांना विवशतेने रोखले होते, ते स्वत: थांबून राहणारे नव्हते."

पवित्र कुरआनातही अल्लाहने अशा लोकांची स्तुती केली आहे, जे प्रखर भावना मनात असतानाही जिहादमध्ये सहभाग घेण्यापासून वंचित राहिले आणि आपल्या या वंचिततेबदल त्यांच्या डोळ्यांतून आसवे निघत राहिले.

"अशाच प्रकारे त्या लोकांवरदेखील आक्षेपास कोणतेही स्थान नाही ज्यांनी स्वत: येऊन तुम्हाला विनंती केली होती की आम्हाला स्वारी उपलब्ध करून दिली जावी आणि जेव्हा तुम्ही सांगितले की मी तुमच्यासाठी स्वारीची व्यवस्था करू शकत नाही तेव्हा ते निरुपाय होऊन परत गेले आणि स्थिती अशी होती की त्यांच्या डोळ्यातून अश्रू वाहात होते व त्यांना या गोष्टीचे अतोनात दु:ख होते की तेस्वखर्चाने युद्ध प्रवेशाची ऐपत बाळगत नव्हते."

*(दिव्य कुरआन, ९:९२)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "जो मनुष्य अल्लाहच्या मार्गात जिहाद केल्याविना मरण पावला आणि त्याच्या मनात तशी आकांक्षाही नव्हती तर तो दांभिकतेच्या एका स्थितीत मरण पावला." (हदीस : मुस्लिम)

वस्तुस्थिती अशी की अल्लाहच्या मार्गात लढण्याच्या व प्राण-वित्त अर्पण भावनेपासून जे हृदय रिक्त आहे, ते ईमानधारकांचे हृदय असू शकत नाही.

# ३७. आवाहन व प्रसारकार्यांचे शिष्टाचार

१) जीवनधर्माविषयीचे आवाहन व प्रसारकार्याची हिकमत (बुध्दीकौशल्य) आणि सुयोग्य पध्दतीची पुरेपूर काळजी घ्या आणि अशा पध्दतीचा अवलंब करा जी सर्वथा योग्य, प्रतिष्ठित हेतुला अनुसरून आणि समोरच्या व्यक्तीत आवड व प्रेरणा निर्माण करणारी असेल.

**या संदर्भात पवित्र कुरआनात सांगितले आहे,**

"हे पैगंबर (स.), आपल्या पालनकर्त्याच्या मार्गाकडे आमंत्रित करा मुत्सद्देगिरीने व उत्तम उपदेशासहित, आणि लोकांशी विवाद करा अशा पद्धतीने जी उत्तम असेल.."

*(दिव्य कुरआन, १६:१२५)*

कुरआनच्या या आयतींपासून तीन तात्त्विक मार्गदर्शनांचा लाभ घडतो.

(१) आवाहन बुध्दीकौशल्याने केले जावे.

(२) उपदेश आणि समजावून देण्याचे काम उत्तम शैलीत केले जावे आणि

(३) चर्चा-विवाद भल्या पध्दतीने केला जावा (सुसंवाद).

हिकमतीने आवाहन करण्याचा अर्थ असा की स्वत: तुम्हाला तुमच्या आवाहनाच्या पावित्र्याची व थोरवीची जाणीव असावी आणि तुम्ही या मौल्यवान संपत्तीला नादानपणाने उगाच अनुचित जागी उधळू नये. किंबहुना प्रसंगावधान राखा आणि त्या व्यक्तीचेही भान राखा, जिला आवाहन केले जात आहे. प्रत्येक वर्ग, प्रत्येक गट आणि प्रत्येक माणसाशी त्याची वैचारिक पातळी, योग्यता, पात्रता आणि सामाजिक दर्जाला अनुसरून वार्तालाप करा आणि त्या अढळ मूल्यांना परस्पर विचारविमर्श आणि आवाहनाचा आधार बनवा, ज्यात आपसात एकमत असावे आणि जे एकमेकांना जोडण्याचे व चांगली गोष्ट आत्मसात करण्याचे साधन ठरावे.

उत्तम उपदेश करण्याचा अर्थ असा की तुम्ही अगदा मनापासून व गाभीर्याने सद्‌भावनांना वाढीस लावा, यासाठी की ज्याला संबोधले जात आहे, त्याच्या अंगी आवड निर्माण व्हावी आणि धर्माशी त्याचा संबंध केवळ बौध्दीक समाधानापर्यंत मर्यादित राहू नये तर तुमचे हे आवाहन त्याचा हृदयस्वर, आत्म्याचे खाद्य आणि भावनांचे समाधान ठरावे.

चर्चा-विवादात भल्या पध्दतीचा अवलंब करण्याचा अर्थ असा की तुमचे कथन सत्य असावे, उचित असावे, अगदी मनापासून असावे आणि प्रामाणिक व सचोटी पूर्ण असावे. तसेच शैली अशी मनमोहक व साधी असावी की संबोधिताच्या मनात जिद्द, तिरस्कार, पक्षपात आणि अज्ञानतेच्या भावना उद्‌भवू नयेत. किंबहुना त्याने खरोखर काही समजून घेण्यास प्रवृत्त व्हावे. त्याच्या मनात सत्य जाणून घेण्याची तीव्र इच्छा निर्माण व्हावी. जिथे

**या गोष्टी दिसून येत नसतील तिथे तोंड बंद करून घ्या आणि निमूटपणे अशा ठिकाणाहून निघून जावे.**

२) **कोणत्याही परिस्थितीत संपूर्ण जीवनधर्माचे आवाहन करा आणि स्वत:च्या बुध्दीने उणे-अधिक करू नका. इस्लामच्या आवाहकाला हा हक्क मुळीच नाही की त्यात स्वत:च्या मर्जीने त्यातला काही भाग सादर करावा आणि काही लपवून ठेवावा.**

**अल्लाहचे सांगणे आहे,**

"जेव्हा आमच्या स्पष्ट गोष्टी त्यांना ऐकविल्या जातात तेव्हा ते लोक जे आम्हाला भेटण्याची अपेक्षा करीत नाहीत, म्हणतात, "याच्याऐवजी एखादा अन्य कुरआन आणा अथवा याच्यात काही बदल करा." हे पैगंबर (स.) त्यांना सांगा, "माझे हे काम नव्हे की मी आपल्याकडून याच्यात काही फेरबदल करावा. मी तर केवळ त्या दिव्य प्रकटनाचे अनुसरण करणारा आहे, जे माझ्याकडे पाठविले जाते. जर मी आपल्या पालनकर्त्याची अवज्ञा केली तर मला एका मोठ्या भयंकर अशा दिवसाच्या यातनेची भीती आहे." आणि सांगा, "जर अल्लाहची अशीच इच्छा असती तर मी हा कुरआन तुम्हाला कधीच ऐकविला नसता आणि अल्लाहने तुम्हाला याची खबरसुद्धा दिली नसती. तसे पाहिले तर मी यापूर्वी तुमच्यातच आयुष्य व्यतीत केले आहे, तुम्ही बुद्धीचा उपयोग करीत नाही काय? मग त्याच्यापेक्षा मोठा अत्याचारी अन्य कोण असेल जो एक असत्य गोष्ट रचून अल्लाहशी तिचा संबंध जोडील अथवा अल्लाहच्या आयतींना खोटे ठरवील नि:संशय गुन्हेगार कधीच सफल होऊ शकत नाहीत." *(दिव्य कुरआन, १०:१५-१७)*

**परिस्थिती कितीही प्रतिकूल असो, आवाहकाचे कार्य कोणत्याही स्थितीत हेच आहे की त्याने अल्लाहच्या धर्माला आपल्या मूळ व पूर्ण अवस्थेत सादर करावे. तसेच अल्लाहच्या धर्मात कमी -जास्त आणि परिस्थितीच्या निकडीनुसार स्वत:च्या बुध्दिने त्यात फेरबदल करणे फार मोठा अत्याचार आहे आणि अशा लोकांची ऐहिकताही नष्ट होते आणि पारलौकिक जीवनदेखील. इस्लाम त्या अल्लाहने पाठविलेला जीवनधर्म आहे, ज्याच्या ज्ञानाने संपूर्ण सृष्टीला व्यापून ठेवले आहे, जो आरंभापासून अंतापर्यंत सत्य ज्ञान बाळगतो आणि ज्याची वैचारिकता व्यंग-दोषविरहीत आहे. जो मनुष्य जीवनाच्या आरंभासही जाणतो आणि त्याच्या परिणतीसही आणि ज्याच्या उद्दिष्टानुसार मानवाच्या माहितीत दररोज आश्चर्यचकीत करणारा विस्तार निर्माण होत आहे आणि मनुष्य जीवनात असामान्य प्रगती होत चालली आहे. दुसऱ्या कोणाकडून उणे अधिक करण्याची गोष्ट फार लांबची, उलट सर्वात प्रथम आवाहन करणाऱ्याचा हा दर्जा सांगितला गेला आहे की त्याने एक आदर्श आज्ञाधारकाप्रमाणे धर्माचे अनुसरण करावे आणि अवज्ञा करण्याच्या विचारानेही भयकंपित व्हावे.**

३) **जीवनधर्माला अशा हिकमतीने स्वाभाविक शैलीत सादर करा की ते अस्वाभाविक ओझे**

वाटू नये आणि लोकांनी भयभीत व त्रस्त होण्याऐवजी त्याला मान्य करण्यात सुख-शान्ती अनुभवावी आणि तुमच्या मृदु, मधुर आणि आवाहनाच्या हिकमतपूर्ण पध्दतीने लोकांना धर्माबाबत असामान्य आकर्षण वाटावे.

माननीय मुआविया बिन हकम (रजि.) सांगतात की एकदा मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासोबत नमाज पढत होतो की तेवढ्यात एका माणसाला शिंक आली. मी नमाज पढत असतांनाच ''यर्हमुकल्लाह'' असे म्हणून शिंकेचे उत्तर दिले. लोक मला डोळे विस्फारून पाहू लागले. मी म्हणालो, ''अल्लाह तुमचे भले करो, मला असे का पाहता? तेव्हा लोकांनी इशाऱ्याने मला गप्प राहण्यास सांगितले. मी गप्प राहिलो. जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांची नमाज अदा करून झाली, माझे माता पिता त्यांच्यावर अर्पण. मी असा उत्कृष्ट शिकवण व संस्कार घडविणारा न त्यांच्या पूर्वी कधी पाहिला आणि न त्यांच्या नंतर. पैगंबरांनी न मला दरडाविले, न मारले आणि न ते काही बरे-वाईट बोलले. फक्त एवढेच म्हणाले,

''हे बघा, ही नमाज आहे, नमाजच्या स्थितीत बोलणे उचित नाही. नमाज तर नाव आहे अल्लाहची पवित्रता आणि श्रेष्ठता वर्णन करण्याचे, त्याची महानता दर्शविण्याचे आणि कुरआन पठण करण्याचे.

४) आपल्या लेखांमध्ये, भाषणांमध्ये आणि आवाहनात्मक कथनांमध्ये नेहमी ही गोष्ट विचाराधीन राखा की श्रोत्यांवर आशेची अवस्था दिसून यावी आणि भयाचीही, न अल्लाहच्या भयावर इतका जोर द्या की त्यांनी अल्लाहच्या दया कृपेपासून निराश व्हावे आणि आपली सुधारणा व मुक्ती त्यांना कठीणच नव्हे तर अशक्यप्राय वाटावी. तसेच अल्लाहच्या दया कृपेचा व क्षमादानाचा विचार अशा प्रकारे मांडू नका की त्यांनी अगदीच निर्भय व बेपर्वा व्हावे आणि अल्लाहची अमर्याद दया-कृपा व क्षमादानाचा आधार घेऊन अवज्ञाकारी वर्तनात अग्रेसर व्हावे.

माननीय अली (रजि.) सांगतात,

''सर्वोत्तम आलीम (धर्मज्ञाता) तो आहे, जो लोकांना (अशा शैलीत अल्लाहकडे बोलावितो की) अल्लाहशी निराश करत नाही आणि न अल्लाहच्या अवज्ञेकरिता त्यांना सूट देतो आणि न अल्लाहच्या कोपपासून त्यांना भयमुक्त करतो.''

५) आवाहनात्मक प्रयत्नांना सदैव सातत्याने जारी राखा आणि जो उपक्रम हाती घ्याल तो नियमित व जबाबदारीने राबविण्याचा प्रयत्न करा. एक उपक्रम अर्धवट सोडून नव-नवीन उपक्रम हाती घेण्याची सवय सोडा. काम थोडे का असेना, पण सतत करीत राहा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

''उत्कृष्ट आचरण ते होय जे सातत्याने केले जाते, मग ते कितीही लाहन असो.''

६) **आवाहन आणि धर्मप्रसाराच्या मार्गात येणारी संकटे, अडथळे, दु:ख, त्रास आणि कसोट्यांचे मोकळ्या मनाने स्वागत करा आणि धैर्य व संयम दाखवा.**

कुरआनात उल्लेख आहे,

"बेटा, नमाज कायम कर, सत्कृत्यांचा आदेश दे, दुष्कृत्यांची मनाई कर, आणि जी काही आपत्ती येईल त्यावर संयम राख. या त्या गोष्टी आहेत ज्यांची ताकीद दिली गेली आहे,"

*(दिव्य कुरआन, ३१:१७)*

**सत्य मार्गात संकटे येणे स्वाभाविक आहे. कसोटीच्या माध्यमातून पार पडूनच ईमान सशक्त होते आणि चरित्र मजबूत होते. याच कारणाने अल्लाह आपल्या त्या दासांची अवश्य परीक्षा घेतो, जे ईमानाचा दावा करतात आणि जो आपल्या धर्मानुसार व ईमानच्या बाबतीत जेवढा जास्त पक्का असतो, त्याची कसोटीही त्याच हिशोबाने घेतली जाते.**

**अल्लाहचे सांगणे आहे,**

"आणि आम्ही खचितच तुम्हाला भय-भूख, जीवित व वित्त हानी आणि तुमच्या प्राप्तीमध्ये घट करून तुमची परिक्षा घेऊ. ह्या परिस्थितींत जे लोक संयमपूर्वक आचरण करतील आणि जेव्हा जेव्हा आपत्ती येईल तेव्हा म्हणतील कि, "आम्ही अल्लाहचेच आहोत, आणि अल्लाहकडेच आम्हाला परत जायचे आहे." त्यांना शुभसंदेश द्या. त्यांच्यावर त्यांच्या पालनकर्त्याकडून मोठी कृपा होईल. आणि त्यांच्यावर दयेचे छत्र असेल आणि असेच लोक सन्मार्गी असतील." *(दिव्य कुरआन, २ : १५५-१५७)*

**माननीय सअद (रजि.) यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले, "सर्वाधिक जास्त सक्त कसोटी कोणत्या माणसाची होते?" पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,**

**"पैगंबरांची, मग जो धर्म व ईमानाबाबत त्यांच्या अधिक निकट असेल आणि मग जो त्यांच्या निकट असेल. माणसाची कसोटी त्याच्या धर्मानुसरणाच्या हिशोबाने होते. यास्तव, जो मनुष्य धर्माच्या बाबतीत जेवढा पक्का असतो, तेवढी सक्त कसोटी घेतली जाते आणि धर्माच्या बाबतीत जो कमजोर असतो. तेवढी हलकी कसोटी घेतली जाते आणि ही कसोटी नियमित घेतली जाते. येथपावेतो की तो जमिनीवर अशा अवस्थेत चालतो की त्याच्यावर अपराधाचा कसलाही प्रभाव राहात नाही."** (हदीस : मिश्कात)

**पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपली अवस्था सांगताना सांगितले,**

**"मला अल्लाहच्या मार्गात इतका त्रास दिला गेला इतका त्रास दिला गेला की कधीही कोणता माणूस एवढा सताविला गेला नाही आणि मला अल्लाहच्या मार्गात एवढे जास्त भयभीत केले गेले की कधीही कोणाला असे भयभीत केले गेले नाही आणि आमच्या तीस दिवस आणि रात्री अशा पार पडल्या की माझ्या व बिलालच्या खाण्यासाठी कसलीही**

अशी (खाद्य) वस्तू नव्हती, जिला एखाद्या सजीव खाऊ शकेल, त्या थोड्या सामुग्रीशिवाय, जी बिलालच्या बगलेत होती.'' (हदीस : तिर्मिजी)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''जो मनुष्य संयम राखण्याचा प्रयत्न करील, अल्लाह त्याला सबुरी प्रदान करील आणि सबुरीहून जास्त उत्तम आणि अनेक भलाईपूर्ण गोष्टींना समेटून घेणारे बक्षीस अन्य कोणतेही नाही.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

वास्तविक कसोट्या, आंदोलनांना सामर्थ्य पोहचविण्याचे व नेटाने पुढे नेण्याचे आवश्यक साधन आहे. कसोटीच्या दिव्यातून पार पडल्याविना कोणतेही आंदोलन कधी यशस्वी होऊ शकत नाही. विशेषत: ते आंदोलन जे मानवविश्वात प्रत्येक पैलूवर आच्छादित होणाऱ्या क्रांतीचे निमंत्रण देत असेल आणि समस्त मनुष्य जीवनाची नव्या आधारशीलेवर उभारणी करण्याचा संकल्प बाळगत असेल.

ज्या काळात मक्का येथे पाषाणहृदयी लोक पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांच्या सहकाऱ्यांवर अतोनात अत्याचार करीत होते, त्याच काळातील एक घटना माननीय खब्बाब बिन अस्त (रजि.) उल्लेखितात,

''पैगंबर मुहम्मद (स.) काबागृहाच्या सावलीत चादर डोक्याखाली ठेवून आराम करीत होते. आम्ही त्यांच्याजवळ तक्रार नेली. हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) ! आपण आमच्याकरिता अल्लाहजवळ मदत मागत नाही, आपण या अत्याचाराच्या समाप्तीची दुआ करीत नाही. (शेवटी हा अत्याचार कोठवर चालत राहील आणि केव्हा या संकटाचे सत्र संपेल?) पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हे ऐकून सांगितले, ''तुमच्या पूर्वी असे लोक होऊन गेलेत की त्यांच्यापैकी काहीजणांकरिता खड्डा खणला जात असे मग त्याना त्य खड्ड्यात उभे केले जात असे, मग करवत आणले जाई आणि त्यांच्या शरीराला उभे कापले जाई, येथपावेतो की त्यांच्या शरीराचे दोन तुकडे केले जात, तरीही ते आपल्या धर्मापासून माघार घेत नसे आणि त्यांच्या शरीरात लोखंडी (अणकुचीदार) कंगवे धसविले जात, जे मांसातून जाऊन हाडापर्यंत पोहचत, तरीही अल्लाहचा बंदा सत्यापासून परावृत्त होत नसे. अल्लाहची शपथ ! हा धर्म वर्चस्व प्रस्थापित केल्याविना राहणार नाही. येथपावेतो की प्रवासी, सनआ (यमनची राजधानी) पासून हजरेमौतपर्यंतचा प्रवास करील आणि या संपूर्ण रस्त्यात अल्लाहखेरीज त्याला कोणाचेही भय नसेल, तथापि मेंढपाळांना फक्त लांडग्याची भीती राहील की कदाचित बकरी उचलून नेईल, परंतु खेद आहे की तुम्ही घाई माजवित आहात!' (हदीस : बुखारी)

माननीय मुआविया (रजि.) सांगतात,

''मी पैगंबर मुहम्मद (स.) यांना हे सांगताना ऐकले आहे की माझ्या संप्रदायात नेहमी एक

समूह असा राहील जो अल्लाहच्या धर्माचे रक्षण करीत राहील. जे लोक त्यांना साथ देणार नाहीत आणि जे त्यांचा विरोध करतील ते त्यांना नष्ट करू शकणार नाहीत. येथपावेतो की अल्लाहचा निर्णय येईल आणि हे धर्माचे रक्षण करणारे लोक आपल्या त्याच अवस्थेत कायम राहतील.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

७) अनुचित सहिष्णुता, ढीलता आणि तत्त्वांना तिलांजली देण्यापासून कटाक्षाने दूर राहा. पवित्र कुरआनात ईमानधारकांच्या प्रशंसेदाखल म्हटले गेले आहे,

''ते काफिरां (इन्कार करणाऱ्यां)करिता सक्त असतात.'' *(दिव्य कुरआन, ४८:२९)*

ते धर्म आणि ईमानाबाबतीत फार कठोर असतात. कोणत्याही परिस्थितीत ते तत्त्वांच्या संदर्भात कसलाही समझोता करीत नाही. न सैलपणा दाखवितात ते सर्वकाही सहन करू शकतात, परंतु धर्म आणि तत्त्वांचे बलिदान देऊ शकत नाही. समस्त ईमानधारकांना अल्लाहने पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या माध्यमाने ताकीद केली आहे.

''हे मुहम्मद (स.), आता तुम्ही त्याच धर्माकडे आमंत्रित करा आणि जशी तुम्हाला आज्ञा दिली गेली आहे त्यावर भक्कमपणे कायम राहा आणि या लोकांच्या इच्छेचे अनुसरण करू नका.'' *(दिव्य कुरआन, ४२:१५)*

धर्माच्या बाबतीत सैलपणा, अनुचित सहिष्णुता आणि असत्याशी समझोता अतिशय धोकादायक वैगुण्य आहे. जे धर्म आणि ईमाननष्ट करून टाकते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''जेव्हा बनी इस्राईल (वंशाचे लोक) अल्लाहच्या अवज्ञेची कामे करू लागले, तेव्हा त्यांच्यातल्या धर्मज्ञानी लोकांनी त्यांना रोखले, परंतु त्यांनी जुमानले नाही. (तेव्हा त्यांचे धर्मज्ञानी, त्यांचा धिक्कार करण्याऐवजी) त्यांच्या सभा-संमेलनात जाऊन बसू लागले आणि त्यांच्यासोबत खाऊ पिऊ लागले. जेव्हा असे झाले तेव्हा अल्लाहने त्या सर्वांची हृदये एकसमान केली आणि मग माननीय दाऊद (अ.) व माननीय ईसा बिन मरीयम (अ.) च्या जिभेव्दारे अल्लाहने त्यांचा धिक्कार केला. हे अशासाठी की त्यांनी अवज्ञाकारीतेचा मार्ग पत्करला आणि त्याच मार्गावर पुढे चालत गेले.''

या हदीसवचनाचा उल्लेख करणारे माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) आहेत, ते सांगतात,

''पैगंबर मुहम्मद (स.) टेका लावून बसले होते, मग सरळ बसले आणि सांगितले, नव्हे त्या अस्तित्वाची शपथ ज्याच्या ताब्यात माझा प्राण आहे. तुम्ही अवश्य लोकांना सत्कर्म करण्याचा आदेश देत राहाल आणि दुष्कर्मापासून रोखत राहाल आणि अत्याचारीचा हात धराल आणि अत्याचारीला सत्यापुढे झुकवाल. जर तुम्ही लोक असे करणार नाही तर तुम्हा

सर्वांची हृदयेदेखील एकसमान होतील, मग अल्लाह तुम्हाला आपल्या दया व मार्गदर्शनापासून दूर फेकून देईल, ज्याप्रमाणे बनी इस्राईल वंशाच्या लोकांना त्याने वंचित केले.''

८) आपल्या मुलांना सुधार व सुसंस्कार आणि त्यांना धर्म प्रस्थापित करण्याची जबाबदारी पार पाडण्यास तयार करणे आपले आद्य कर्तव्य आहे आणि तुमच्या कार्यमग्नतेचे स्वाभाविक मैदानही. या मैदानास सोडून आपल्या प्रसारविषयक आणि सुधारणाविषयक प्रयत्नांसाठी केवळ बाह्य क्षेत्राचा शोध घेणे हिकमतीच्या विरुध्दही आहे आणि अस्वाभाविक कृत्य देखील. ही फार मोठी सुस्ती आणि आपल्या जबाबदारींपासून पलायनही आहे. याचे उदाहरण असे आहे की तुम्ही दुष्काळाप्रसंगी आपल्या कुटुंबियांना भूक-तहाने ने व्याकूळ आणि मरणासन्न अवस्थेत सोडून बाहेरच्या गरजवान लोकांचा शोध घेऊन धान्य वाटण्यात औदार्य दाखववावे. तात्पर्य, तुम्हाला न भूक-तहान आणि जवळीक व प्रेमाची जाणीव आहे आणि न धान्य वितरणाच्या हिकमतीलाच तुमचे मन जाणते. पवित्र कुरआनात ईमानधारकांना ताकीद केली गेली आहे,

''हे लोकहो! ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, वाचवा स्वत:ला आणि आपल्या कुटुंबियांना त्या अग्नीपासून जिचे इंधन मनुष्य आणि दगड असतील,'' *(दिव्य कुरआन, ६६:६)*

आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी याचे या शब्दांत वर्णन केले,

''तुमच्यापैकी प्रत्येकजण निरीक्षक आणि जबाबदार आहे आणि तुमच्यापैकी प्रत्येकाला त्या लोकांबाबत विचारपूस केली जाईल, जे तुमच्या देखरेखीत असतील. शासक निरीक्षक आहे आणि त्याला त्याच्या जनतेबाबत विचारले जाईल आणि पती आपल्या कुटुंबाचा निरीक्षक आहे आणि स्त्री आपल्या पतीचे घर व त्याच्या मुलाबांळांची देखरेख करणारी आहे. तेव्हा तुमच्यापैकी प्रत्येकजण एक देखरेखकर्ता व जबाबदार आहे आणि तुमच्यापैकी प्रत्येकाला त्या लोकांसबंधी विचारणा होईल, जे त्याच्या देखरेखीत दिले गेले आहेत.''

(हदीस : बुखारी, मुसिलम)

९) आपल्या शेजारी व गल्लीतल्या लोकांची सुधारणा व त्यांना सुसंस्कृत करण्याचीही काळजी घ्या आणि तिलाही आपली जबाबदारी समजा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एक दिवस प्रवचन दिले आणि त्यात काही ईमानधारकांचा प्रशंसा केली.

''असे का म्हणून आहे की काही लोक आपल्या शेजाऱ्यामध्ये धर्माचे सामंजस्य निर्माण करीत नाही आणि त्यांना धर्माचे ज्ञान देत नाही आणि त्यांना धर्म न जाणण्याचे बोधदायक परिणाम सांगत नाही, त्यांना दुष्कर्म व दुराचारापासून रोखत नाही? आणि असे का म्हणून आहे की काही लोक आपल्या शेजाऱ्याकडून धर्माचे ज्ञान प्राप्त करीत नाही आणि धर्माचे

सामंजस्य निर्माण करीत नाही आणि धर्माचे अज्ञान राखल्याचे बोधदायक परिणाम माहीत करून घेत नाहीत? अल्लाहची शपथ लोकांनी आपल्या शेजाऱ्यांना धर्माचे ज्ञान अवश्य द्यावे त्यांच्यात धर्माचे सामंजस्य निर्माण करावे, त्यांना बोध-उपदेश करावा. त्यांना चांगल्या गोष्टी सांगाव्या आणि वाईट गोष्टींपासून रोखावे. त्याच बरोबर लोकांनी त्यांच्या चांगल्या शेजाऱ्यांकडून धर्म शिकून घ्यावा, त्यांच्यात धर्माचे सामंजस्य निर्माण करावे आणि त्यांच्या उपदेशास मान्य करावे. अन्यथा मी त्यांना लवकरच शिक्षा देईन" (नंतर पैगंबर मुहम्मद (स.) मिंबरवरून खाली उतरले आणि प्रवचन समाप्त केले.)

श्रोत्यांपैकी काही लोकांनी दुसऱ्यांना विचारले, हे कोणते लोक होते, ज्यांच्याविरुद्ध पैगंबर मुहम्मद (स.) यांनी प्रवचन दिले? दुसऱ्या लोकांनी सांगितले की पैगंबर मुहम्मद (स.) यांचा रोख अशअर कबिल्याच्या लोकांकडे होता. हे लोक धर्माचे ज्ञान राखणारे लोक आहेत आणि त्यांच्या शेजारी झऱ्यांच्या काठी राहणारे ग्रामीण असभ्य लोक आहेत. जेव्हा या प्रवचनाची वार्ता अशअरी लोकांना कळाली, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झाले, आणि म्हणाले, हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! आपण आपल्या प्रवचनात काही लोकांची प्रशंसा केली आणि आमच्यावर मात्र राग काढला, तेव्हा आपणच सांगा, आम्ही अशी काय चूक केली? पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, लोकांचे हे कर्तव्य ठरते की त्यांनी शेजाऱ्यांना धर्माची शिकवण द्यावी, त्यांना बोध-उपदेश करावा, भल्या गोष्टी सांगाव्यात आणि वाईट गोष्टीपासून रोखावे. तसेच लोकांचे हेही कर्तव्य आहे की आपल्या शेजाऱ्यांकडून धर्माचे ज्ञान प्राप्त करावे, त्यांच्या उपदेशाचा स्वीकार करावा, आणि आपल्या अंगी धर्माचे सामंजस्य निर्माण करावे, अन्यथा मी त्यांना लवकरच शिक्षा करेन." हे ऐकून अशअर कबिल्याचे लोक म्हणाले, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! काय आम्ही इतर लोकांत समज निर्माण करावी?" पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, होय! ही तुमची जबाबदारी आहे. त्यावर ते लोक म्हणाले, हुजूर ! आम्हाला वर्षभराची सवड द्यावी. यास्तव पैगंबर मुहम्मद (स.) त्यांना एक वर्षाची सवड दिली. त्या अवधित त्यांनी त्यांच्या शेजाऱ्यांना धार्मिक शिक्षण द्यावे व त्यांच्यात धर्माचे सामंजस्य निर्माण करावे. त्यानंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी या आयतींचे पठण केले,

"बनीइस्राईलपैकी ज्या लोकांनी अश्रद्धेचा मार्ग अवलंबिला ते दाऊद (अ.) आणि मरयमपुत्र येशू यांच्या वाणीद्वारे धिक्कारले गेले कारण ते दुराचारी झाले होते व मर्यादा-भंग करू लागले होते, त्यांनी एकमेकाला अपकृत्यापासून परावृत्त करण्याचे सोडून दिले होते, वाईट आचरण होते त्यांचे, जे त्यांनी अंगिकारले."**(दिव्य कुरआन, ५:७८-७९)**

१०) ज्या लोकांच्या दरम्यान तुम्ही आवाहन व धर्माच्या प्रसाराची भारदस्त जबाबदारी पार पाडत आहात त्यांच्या धार्मिक श्रध्दा भावनांचा आदर राखा. न त्यांच्या थोर महात्म्यांना आणि धर्मप्रमुखांना वाईट नावाने स्मरा, न त्यांच्या विचारांवर हल्ला चढवा आणि न त्यांच्या

धार्मिक दुष्टिकोनांना तुच्छ लेखा. साध्या-सरळ पध्दतीने बध्दीकौशल्यासह आपले आवाहन प्रस्तुत करा, आणि टीका करतांना समोरच्यांना भडकविण्याऐवजी सखोलपणे त्यांच्या मनावर आपले म्हणणे बिंबविण्याचा प्रयत्न करा अशासाठी की भावनात्मक टीका आणि अपमानजनक वक्तव्याने समोरच्या व्यक्तीत कोणत्याही चांगल्या परिवर्तनाची आशा नसते, तथापि हे भय राहते की अनुचित पक्षपात आणि संकुचित दृष्टीमुळे तो अल्लाह आणि धर्माच्या प्रतिष्ठेला गालबोट लावण्याचा प्रयत्न करू लागेल आणि धर्माच्या निकट येण्याऐवजी, धर्मापासून आणखी ज..स्त दूर होईल. कुरआनाची ताकीद आहे,

"हे लोक अल्लाहशिवाय ज्याचा धावा करतात त्यांचा उपहास करू नका, एखादे वेळेस असे होऊ नये की ते अनेकेश्वरवादाच्या पुढे जाऊन अज्ञानामुळे अल्लाहचा उपहास करू लागतील."

*(दिव्य कुरआन, ६:१०८)*

११) अल्लाहकडे बोलाविणारा बनून आपल्या आवाहनाची जबाबदारी पूर्ण करा. अर्थात केवळ अल्लाहकडे येण्याचे आवाहन करणारे बना. अल्लाहच्या दासांना अल्लाहखेरीज दुसऱ्या कोणाच्याहीकडे मुळीच बोलावू नका. न देशाकडे बोलवा, न सम्प्रदाय आणि वंशाकडे, न एखाद्या भाषेकडे आणि न एखाद्या जमातीकडे. ईमानधारकाचे ध्येय केवळ अल्लाहची मर्जी संपादन करणे होय. याच ध्येयाकडे आवाहन करा आणि हा विश्वास निर्माण करण्याचा प्रयत्न करा की दासाचे काम एवढेच त्याने आपल्या निर्माणकर्त्या स्वामीची उपासना व आज्ञापालनास आपल्या व्यक्तिगत जीवनातही आणि कुटुंबिक जीवनातही, सामाजिक जीवनातही आणि राष्ट्रीय व्यवहारातही तात्पर्य जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात आपल्या स्वामी व पालनकर्त्या अल्लाहच्या नुसार चालावे आणि त्याच्या विधि-नियमांचे सचोटी पूर्वक अनुसरण करावे. त्याच्याखेरीज अन्य कोणतीही गोष्ट नाही जिला ईमानधारकाने आपले उद्दिष्ट ठरवावे आणि लोकांना तिच्याकडे येण्याचे आवाहन करावे. ईमानधारक जेव्हादेखील अल्लाहच्या मार्गदर्शनाकडे पाठ फिरवून अल्लाहच्या प्रसन्नतेखेरीज अन्य एखाद्या गोष्टीस आपले ध्येय ठरवील तर तो दोन्ही जगात असफल व निराश राहील.

"आणि त्या माणसाच्या वचनापेक्षा चांगले वचन अन्य कोणाचे असेल ज्याने अल्लाहकडे बोलाविले आणि सत्कर्म केले आणि म्हटले की मी 'मुस्लिम' (आज्ञाधारी) आहे.ढ."

*(दिव्य कुरआन, ४१:३३)*

# ३८. जमाअत (संघटना) बनविण्याचे शिष्टाचार

१) जीवनधर्मविषयक आवाहन आणि प्रसाराची जबाबदारी पार पाडण्याकरिता मजबूत संघटना तयार करा आणि धर्म कायम करण्यास्तव संयुक्तपणे प्रयत्न करा.

"तसेच दुराचाराचा प्रतिबंध करणारा एक गट तुमच्यात अवश्य असला पाहिजे, अशा लोकांना साफल्य लाभेल." *(दिव्य कुरआन, ३:१०४)*

**भलाईशी अभिप्रेत ते शुभ मांगल्य ज्यास सदैव मनुष्यस्वभावाने चांगुलपणाच्या अर्थाने गृहीत धरले आहे आणि ज्याच्या चांगुलपणाबद्दल ईशग्रंथांनी साक्ष दिली आहे, त्या समस्त भल्या गोष्टींचे सर्वोत्तम रूप म्हणजे अल्लाहचा तो धर्म होय ज्यास प्रत्येक युगात अल्लाहचे पैगंबर आणत राहिले. ज्याचे अंतिम, परिपूर्ण, विश्वसनीय आणि सुरक्षित स्वरूप तो ग्रंथ आणि पैगंबर आचरण आहे. जे पैगंबर मुहम्मद (स.) आपल्या सम्प्रदायाला देऊन गेले आहेत. त्या शुभ-मांगल्याने व सत्प्रवृत्तींनी, भल्या गोष्टींनी जगाला समृध्द व संपन्न करण्यासाठी आवश्यक आहे की ईमानधारकांनी एक सुसंघटित जमातीच्या स्वरूपात हे कार्य पार पाडावे आणि जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात असत्यावर वर्चस्व मिळविण्याकरिता मजबूत समूह अस्तित्वात आणावा आणि सुसंघटित होऊन प्रयत्न करावे. अल्लाहने ईमानधारकांचा या मजबूत समूह आणि संघटन बनून प्रयत्न करण्याचे चित्र रेखाटतांना आणि त्यांच्या आदर्श समूहाची स्तुती केली आहे आणि त्यांना आपले आवडते सांगितले आहे.**

"अल्लाहला तर प्रिय ते लोक आहेत जे त्याच्या मार्गात अशाप्रकारे फळी बांधून एक दिलाने लढतात जणूकाय ते शिसे पाजलेली भिंत असावेत." *(दिव्य कुरआन, ६१ :४)*

**पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सामूहीक जीवनाचे महत्त्व आणि संघटना बनवून जीवन व्यतीत करण्याची ताकीद करताना सांगितले,**

**"तीन माणसे जे एखाद्या जंगलात राहात असावेत त्यांच्यासाठी उचित नव्हे, परंतु हे की त्यांनी आपल्या मधुन एखाद्याला आपला अमीर (प्रमुख) निवडावे."** (मुन्तका)

**तसेच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे ही सांगितले,**

**"जो मनुष्य जन्नतच्या मध्यभागी आपले घर बनवू इच्छित असेल, त्याने संघटनाशी सलंगन राहिले पाहिजे. यासाठी की सैतान एका माणसाच्या सोबत असतो आणि जेव्हा ते दोन होतात, तेव्हा तो दूर पळतो."**

**मूळ शब्द 'अल जमाअत' यास अभिप्रेत ईमानधारकांचा असा संघटित समूह होय. जेव्हा सत्ता इस्लामच्या हाती असेल आणि मुस्लिम शासक इस्लामचे आदेश व कायदे लागू करीत असेल, आणि इस्लामचे समस्त अनुयायी त्या नेतृत्वावर आणि त्याच्या मार्गदर्शनावर**

सहमत असतील, तर अशा स्थितीत कोणत्याही मुस्लिम व्यक्तीस, संघटनाला सोडून एकाकी जीवन जगण्याची किंचित मात्र मुभा नाही आणि जेव्हा अल संघटना अस्तित्वात नसेल, तेव्हा मुस्लिम संप्रदायाचे हे कर्तव्य ठरते की त्याने सुसंघटित होऊन, संयुक्तपणे केलेल्या प्रयत्नांद्वारे अशा प्रकारच्या जमातीला अस्तित्वात आणण्याचा प्रयत्न करावा.

२) आपसातील स्नेह-सलोखा आणि संघटित होण्याचा आधार केवळ धर्म आहे. इस्लामी संघटन तेच खरे ज्याची आधारशिला अल्लाहचा धर्म असेल. अल्लाहच्या धर्मास सोडून दुसऱ्या एखाद्या आधारावर ईमानधारकांचा परस्पर स्नेह-संबंध हा तो स्नेह-सलोखा नव्हे, ज्याचा आदेश इस्लामने दिला आहे आणि अशा प्रकारचे संघटन वास्तविक इस्लामी संघटन नाही. ईमानधारकांमध्ये बंधुप्रेम आणि स्नेह-सलोख्याचे खरे नाते केवळ धर्मावर आधारित आहे. धर्माला सोडून दुसऱ्या कोणत्याही गोष्टीला ते सलोख्याचा आधार बनवतील तर एकी ऐवजी विभक्त होतील आणि एक अखंड सर्वव्यापी जमाअत बनविण्याऐवजी गट-समूह आणि पंथ बनतील.

जमात बनवा पण याच उद्देशाने की अल्लाहचा धर्म प्रस्थापित करणे आपले ध्येय असावे आणि आपले सर्व प्रयत्न त्याचसाठी असावेत,

पवित्र कुरआनात उल्लेख आहे.

"सर्वजण मिळून अल्लाहच्या दोरीस घट्ट धरून असा आणि आपसांत फाटाफूट होऊ देऊ नका. अलाहच्या त्या उपकाराची आठवण ठेवा, जो त्याने तुम्हावर केला आहे. तुम्ही एक दुसऱ्याचे शत्रू होता, त्याने तुमची मने जोडला आणि त्याच्या मेहेरबानी व कृपेने तुम्ही बंधू-जन झालात." *(दिव्य कुरआन, ३:१०३)*

अल्लाहचा दोरा म्हणजे अल्लाहचा धर्म अर्थात इस्लाम होय. कुरआनाच्या दृष्टीने ईमानधारकांचा एकत्र समुदाय बनण्याचा आधार हाच आहे. याखेरीज दुसरा कोणताही आधार मुस्लिमांना एकमेकांशी जोडणारा नाही, किंबहुना त्यांना विभागून टाकणारा आहे.

३) सत्याकडे बोलाविणाऱ्या आवाहकांशी मनापासून प्रेमभाव राखा. या नात्यास इतर सर्व नात्यांपेक्षा जास्त महत्त्वपूर्ण आणि सन्मान देण्यायोग्य समजा. पवित्र कुरआनात ईमानधारकांची प्रशंसा करतांना सांगितले गेले आहे,

"तुम्हाला असे कधीही आढळणार नाही की जे लोक अल्लाह आणि मरणोत्तर जीवनावर श्रद्धा ठेवणारे आहेत ते त्या लोकांवर प्रेम करीत असतील ज्यांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोध केला आहे, मग ते त्यांचे वडील असोत अथवा त्यांचे पुत्र, किंवा त्यांचे भाऊ अथवा त्यांची कुटुंबीय मंडळी," *(दिव्य कुरआन, ५८:२२)*

४) संघटनातील साथीदारांचे हितचिंतक बनून राहा आणि संघटित जीवनात आपसात एकमेकांच्या भावनेला जागृत ठेवा. यासाठी की हीच यशाची हमी आहे.

अल्लाहचे सांगणे आहे,

"काळाची शपथ, मानव वस्तुतः तोट्यात आहे, त्या लोकांखेरीज ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि सत्कर्मे करीत राहिले. आणि एकमेकांना सत्याचा उपदेश आणि संयमाचा आदेश देत राहिले." *(दिव्य कुरआन, १०३:१-३)*

५) सामुदायिक अर्थात संघटनात्मक शिस्तीचे पुरेपूर पालन करा आणि त्याला केवळ संघीय मजबुतीचे साधन समजू नका, किंबहुना धार्मिक जबाबदारीही समजा अल्लाहचे सांगणे आहे,

"श्रद्धावंत तर वस्तुतः तेच लोक आहेत ज्यांनी अल्लाह व त्याच्या पैगंबराला मनापासून मानले आणि जेव्हा एखाद्या सामूहिक कार्याप्रसंगी पैगंबर (स.) समवेत ते असतील तेव्हा त्यांची परवानगी घेतल्याखेरीज त्यांनी जाऊ नये. हे पैगंबर (स.), जे लोक तुमच्यापासून परवानगी मागतात, तेच अल्लाह व पैगंबराला मानणारे आहेत."

*(दिव्य कुरआन, २४:६२)*

संघटनाच्या शिस्तीचे पालन आणि आपल्या नेत्याचे आज्ञापालन केवळ एक कायद्याच्या मामला नाही. किंबहुना एक महत्त्वपूर्ण शरीयतविषयक मामला आहे आणि पवित्र कुरआनात त्या लोकांच्या ईमानाच्या सचोटीची साक्ष दिली, जे संघटनाच्या शिस्तीचे पालन करणारे आहेत आणि संघटनाच्या कर्तृत्वापासून तेव्हाच हटतील जेव्हा आपल्या प्रमुखाकडून अनुमती प्राप्त करून घेतील.

६) संघटनेच्या जीवनात जी काही नेकीची, भलाईची कामे होत असतील, अगदी मनापासून त्यांना सहकार्य करा व जे काही करू शकता त्यात कमतरता करू नका. स्वार्थ आणि अहंकार यासारख्या घाणेरड्या भावनांपासून आपल्या चारित्र्याला कलंकीत होऊ देऊ नका.

या संदर्भात कुरआनाची ताकीद आहे,

"जे कार्य पुण्याईचे व ईशपरायणतेचे आहे, त्यामध्ये सर्वांशी सहकार्य करा"

*(दिव्य कुरआन, ५:२)*

७) सहकाऱ्यांशी चांगले संबंध राखा आणि प्रसंगी कोणाशी मतभेद झाल्यास त्वरीत समझोता करून घ्या आणि मने साफ करा.

"यास्तव अल्लाहचे भय बाळगा आणि आपसातील संबंध चांगले राखा."

*(दिव्य कुरआन, ८:१)*

८) इस्लामी जमातीच्या प्रमुखाचे आनंदी मनाने आज्ञापालन करा आणि त्याचे हितचिंतक व निष्ठावान राहा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे की,

"ईमानधारकांनी आपल्या प्रमुखाचे म्हणणे ऐकणे व मानणे आवश्यक आहे. मग त्याचा आदेश स्वत:ला पसंत असो किंवा नसो. या अटीवर की ती अल्लाहची अवज्ञा करणारी गोष्ट नसेल. होय जेव्हा अल्लाहच्या अवज्ञेचा आदेश दिला जाईल, तेव्हा ती गोष्ट न ऐकली जावी आणि न मानली जावी." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

माननीय तमीम दारी सांगतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "धर्म, मनाच्या सचोटीसह हितचिंतनाचे आणि एकनिष्ठ राहण्याचे नाव आहे."

पैगंबर मुहम्मद (स.) नी तीन वेळा हे सांगितले.

लोकांनी विचारले, "कोणाचे भले इच्छिणे व एकनिष्ठ राहणे?"

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "अल्लाहचे, पैगंबराचे, त्याच्या ग्रंथाचे, ईमानधारकांच्या प्रमुखाचे आणि सर्वसामान्य मुस्लिमांचे." (हदीस : मुस्लिम)

९) संघटनेत पक्षपात, संकुचित वृत्ती आणि गटबाजीपासून दूर राहा. मोकळ्या मनाने आणि सदाचरणाने प्रत्येकाची मदत करा आणि जे लोक धर्मकार्यास लागले आहेत, त्यांची कदर जाणा. त्यांचे हिंतचिंतन करा आणि त्यांना आपल्या कार्यात मदतनीस समजा वास्तविक धर्माचे कार्य करणारे सर्वच एकमेकांचे सहाय्यक आणि समर्थन करणारे आहेत. सर्वजण धर्माची अभिलाषा बाळगणारे आहेत आणि सर्व आपापल्या कुवतीनुसार धर्माची सेवा पार पाडू इच्छितात. प्रामाणिक मनाने व सद्भावनेने समज देऊन एकमेकांच्या चुका दाखविणे आणि विचार चिंतनाच्या उचित मार्गाकडे बोट दाखविणे तर अतिशय शुभ कार्य आहे आणि ते व्हायलाच हवे. परंतु एकमेकांशी द्वेष, तिरस्कार, अलगाव, वैरभाव तसेच एकमेकांना तुच्छ लेखणे, एकमेकांविरुद्ध अपप्रचार करणे ही अगदी खालच्या पातळीची वृत्ती आहे, जी कोणत्याही प्रकारे धर्माच्या आवाहकाला साजेलशी नाही आणि त्या लोकांचे चारित्र्य अशा प्रकारच्या कलंकापासून स्वच्छ असले पाहिजे, जे खरोखर मनापासून हे इच्छितात की स्वत:चे सामर्थ्य व पात्रतेला अल्लाहच्या मार्गात खर्च करावे आणि जीवनात धर्माची थोडी फार सेवा पार पाडून जावे.

## ३९. मार्गदर्शनाचे शिष्टाचार

१) इस्लामी संघटनांच्या मार्गदर्शनासाठी अशा माणसाची निवड करा जो अल्लाहचे भय राखून आचरण करण्यात व दुराचारापासून दूर राहण्यात इतरांपेक्षा जास्त श्रेष्ठ असेल. (कारण) धर्मात थोरवी आणि श्रेष्ठत्वाचे स्तर न धनसंपत्ती आहे आणि न खानदान किंबहुना धर्मात तोच मनुष्य सर्वाधिक श्रेष्ठ आहे, जो सर्वात जास्त अल्लाहचे भय राखणारा आहे.

पवित्र कुरआनात सांगितले गेले आहे,

"लोकहो, आम्ही तुम्हाला एका पुरुष व एका स्त्रीपासून निर्माण केले आणि मग तुमची राष्ट्रे आणि वंश बनविले जेणेकरून तुम्ही एकमेकांना ओळखावे. वास्तविकत: अल्लाहजवळ तुमच्यापैकी सर्वात जास्त प्रतिष्ठित तो आहे जो तुमच्यापैकी सर्वात जास्त ईशपरायण आहे. निश्चितच अल्लाह सर्वकाही जाणणारा आणि खबर राखणारा आहे."

*(दिव्य कुरआन, ४९:१३)*

२) मार्गदर्शकाच्या निवडीला एक निखालस धार्मिक कर्तव्य समजा आणि आपल्या मतास अल्लाहची अनामत समजून फक्त त्याच माणसासाठी त्याचा वापर करा, ज्याला तुम्ही खरोखर या भारदस्त जबाबदारीचे ओझे उचलण्यास व त्याचा हक्क अदा करण्यास योग्य समजत असाल.

अल्लाहचे सांगणे आहे,

"मुस्लिमांनो! अल्लाह तुम्हाला आज्ञा देतो की ठेवी ठेवीदारांच्या स्वाधीन करा, आणि जेव्हा लोकांदरम्यान न्यायनिवाडा कराल तेव्हा न्यायाने निवाडा करा"

*(दिव्य कुरआन, ४:५८)*

एक तात्त्विक मार्गदर्शन आहे, जे सर्व प्रकारच्या ठेवींवर प्रभुत्वशाली आहे आणि इथे ठेवींशी अभिप्रेत इस्लामी संघटनाच्या जबाबदाऱ्या आहेत. अर्थात इस्लामी संघटनांच्या मार्गदर्शनासाठी आपले मत व आवडीची ठेव, त्याच सर्वात योग्य माणसाच्या हवाली करा, जो खरोखर या अनामतीचे ओझे उचलण्याची क्षमता व पात्रता बाळगत असेल. या संदर्भात पक्षपात किंवा अनुचित सहिष्णुता आणि अशा प्रकारच्या इतर तत्त्वांनी प्रभावित होऊन मत देणे अपहार आहे, ज्यापासून ईमानधारकाने दूर राहणे अगत्याचे आहे.

३) जर तुम्ही ईमानधारकांच्या संघटनाची जबाबदारी सांभाळाल तर आपल्या जबाबदारीची पुरेपूर जाणीव राखा आणि संपूर्ण सचोटी, मेहनत, जबाबदारीची जाणीव आणि आत्मसमर्पणासह आपले कर्तव्य पार पाडा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"जो मनुष्य मुस्लिमांच्या सामूहिक व्यवहारांचा जबाबदार असेल आणि तो त्याबाबत अपहार करील तर अल्लाह त्याच्यावर जन्नत हराम (अवैध) करील."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

तसेच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले,

"ज्या माणसाने मुस्लिमांच्या सामूहिक व्यवहारांची जबाबदारी कबूल केली, मग नंतर त्याने त्यांचे हित इच्छिले नाही आणि त्यांचे कार्य पार पाडण्यात स्वत:ला अशा प्रकारे थकविले नाही, ज्या प्रकारे तो स्वत:च्या गरजपूर्तीकरिता स्वत:ला थकवितो तर अल्लाह अशा माणसाला तोंडघशी पाडून जहन्नममध्ये फेकून देईल." (तबरानी)

४) आपले अनुसरण करणाऱ्यांशी मृदुतापूर्ण, न्यायाचे आणि समंजसपणाचे वर्तन करा, अशासाठी की त्यांनी मोकळ्या मनाने तुम्हाला साथ द्यावी आणि अल्लाह तुमच्या जमातला आपल्या धर्माची सेवा करण्याची सुबुध्दी प्रदान करो. पवित्र कुरआनात पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या प्रशंसेत म्हटले गेले आहे,

"हे पैगंबर (स.), ही अल्लाहची मोठी कृपा आहे की तुम्ही या लोकांसाठी फार कोमल स्वभावी ठरला आहात. एरवी जर तुम्ही एखादे वेळी शीघ्रकोपी स्वभावी व निष्ठूर असता तर हे सर्वजण तुमच्यापासून विभक्त झाले असते. यांचे अपराध माफ करा, यांच्यासाठी क्षमेची प्रार्थना करा, आणि धर्म-कार्यात यानासुद्धा सल्लामसलतीत सहभागी ठेवा."

*(दिव्य कुरआन, ३:१५९)*

आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांना ही ताकीद केली गेली आहे.

"आणि श्रद्धावंतांपैकी जे लोक तुमचे अनुकरण करतील, त्यांच्याशी आदरभावाने वागा."

*(दिव्य कुरआन, २६:२१५)*

माननीय उमर बिन खत्ताब (रजि.) यांनी एकदा भाषण करताना सांगितले,

"लोकांनो! आमचा तुमच्यावर हक्क आहे की आमच्या पश्चात आमचे प्रामाणिकपणे हितचिंतन करा आणि नेकीच्या (सत्कर्मा) या मामल्यात आमची मदत करा."

नंतर सांगितले,

"हे शासनाच्या जबाबदार व्यक्तींनो ! जबाबदार व्यक्तीच्या कोमलतेपेक्षा जास्त लाभदायक आणि अल्लाहच्या दृष्टीने जास्त आवडती अन्य कोणतीही कोमलता नाही. अशा प्रकारे जबाबदार व्यक्तीची नादानी, भावनाविवश होऊन असमंजसपणे काम करण्यापेक्षा जास्त हानिकारक आणि अप्रिय अशी दुसरी नादानी नाही."

५) आपल्या सहकाऱ्यांचे महत्त्व ओळखा, त्याची जाणीव राखा, त्यांच्या भावनांचा आदर राखा, त्यांच्या गरजांना विचाराधीन राखा आणि त्यांच्याशी अशा बंधुभावाने वागा की त्यांनी तुम्हाला आपला सर्वात मोठा हितचिंतक समजावे.

माननीय मालिक बिन हुवैरिस (रजि.) कथन करतात की एकदा आम्ही काही समवयस्क तरूण पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत राहण्याकरिता त्याच्याजवळ पोहोचलो आणि आम्ही त्यांच्या सेवेत वीस रात्रीपर्यंत राहीलो. खरोखर अल्लाहचे रसूल (पैगंबर) अतिशय कोमलहृदयी आणि दया करणारे होते. जेव्हा त्यांना असे जाणवले की आता आम्हाला

घरच्या लोकांची आठवण बेचैन करीत आहे, तेव्हा आपल्यात विचारू लागले की तुम्ही आपल्या मागे घरात कोणाकोणाला सोडून आलात? आम्ही तपशील सांगितला तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ठीक, तर आता तुम्ही आपापल्या घरी परत जा आणि त्यांच्याच सोबत राहा आणि जे काही तुम्ही शिकलात, ते त्यांना शिकवा आणि त्यांना नेक, भल्या गोष्टी सांगा आणि अमुक नमाज अमक्या वेळी पढा आणि जेव्हा नमाजची वेळ येईल तेव्हा तुमच्यापैकी एकाने अजान द्यावी आणि तुमच्यात जो ज्ञान व चारित्र्याच्या दृष्टीने सर्वात उत्तम असेल, त्याने नमाजचे नेतृत्व करावे.

६) आपल्या सहकाऱ्यांची कदर जाणा आणि यांनाच आपली खरी पूंजी समजून पूर्ण लक्ष देऊन त्यांचा योग्य प्रशिक्षण द्या. त्यांना गरीब व कमकुवत जाणून अशा लोकांकडे लोभस नजरेने पाहू नका, ज्यांना अल्लाहने ऐहिक धनसम्पत्ती, ऐश्वर्य व साधनसामुग्रीची विपुलता देऊन सैल सोडले आहे.

"आणि आपल्या मनाला त्या लोकांच्या सहचर्यात संतुष्ट करा जे आपल्या पालनकर्त्याच्या प्रसन्नतेचे इच्छुक बनून सकाळ व संध्याकाळी त्याचा धावा करतात आणि त्यांच्याकडून कदापि दृष्टी वळवू नका." *(दिव्य कुरआन, १८:२८)*

वास्तविक धार्मिक संघटनाची खरी पुंजी तेच लोक आहेत जे तन मन धन अर्पण करून जीवनधर्माच्या प्रचार व प्रसार कार्यास लागले आहेत. तेव्हा संघटनाच्या प्रमुखाचे हे कर्तव्य आहे की त्याने त्यांच्या महत्वपूर्णतेची जाणीव ठेवावी आणि आपले सर्व लक्ष त्यांच्याच प्रशिक्षण व तयारीवर ठेवावे.

७) संघटनाची सर्व महत्वाची कामे सहकाऱ्यांच्या सल्लामसलतीने ठरवा आणि पार पाडा. तसेच सहकाऱ्यांच्या प्रामाणिक सल्लामसलतीचा लाभ घेऊन संघटनाच्या कामांशी त्यांची आत्मियता आणखी वाढवावी. ईमानधारकांचे वैशिष्ट्य अल्लाहने हेदेखील सांगितले आहे की त्यांचे व्यवहार आपसातील विचारविमर्शाद्वारे ठरतात.

"आणि त्यांचे व्यवहार आपसातील सल्लामसलतीने ठरतात." *(दिव्य कुरआन, ४२:३८)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांना ही ताकीद केली गेली आहे की खास खास मामल्यात आपल्या सहकाऱ्यांचा सल्ला घेत जावे.

"आणि धर्म-कार्यात यांनासुद्धा सल्लामसलतीत सहभागी ठेवा,"

*(दिव्य कुरआन, ३:१५९)*

८) संघटनाच्या व्यवहारासंदर्भात नेहमी मोकळ्या मनाने व त्यागी भावनेने वागा. स्वत:ला व स्वत:च्या कुटुंबियांना कोणत्याही मामल्यात प्राधान्य देऊ नका उलट, नेहमी त्याग आणि उदारतेचे वर्तन राखा, यासाठी की इतर सहकाऱ्यांनीही आनंदी मनाने प्रत्येक प्रकारचे बलिदान देण्यास अग्रेसर राहावे तसेच संघटनाविषयी त्यांच्या मनात दुराग्रह व उद्विग्नता

निर्माण न व्हावी, न अप्पलपोटेपणा व स्वार्थाची भावना वाढीस लागावी. माननीय अबू बकर (रजि.) यांनी एकदा माननीय उमर (रजि.) यांना म्हटले,

"हे खत्ताबपुत्र! मी मुस्लिमांवर तुमची निवड अशासाठी केली आहे की तुम्ही त्यांच्याशी प्रेमाने वागावे. तुम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सहचर्याचा लाभ घेतला आहे. तुम्ही पाहिले आहे की पैगंबर मुहम्मद (स.) कशा प्रकारे आम्हाला, आपल्या स्वत:वर आणि आमच्या कुटुंबियांना, स्वत:च्या कुटुंबियांवर प्राधान्य देत असत. येथपावेतो की आम्हाला जे काही त्यांच्याकडून मिळत असे, त्यातून काही शिल्लक राहत असे तर ते आम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या कुटुंबियांना भेटवस्तू म्हणून पाठवत असू." (किताबुल खिराज)

९) पक्षपात आणि आप्तस्वकीयांना प्राधान्य देण्यापासून नेहमी अलिप्त राहा. तसेच अनुचित स्नेह प्रेम आणि सहिष्णुतापासूनही दूर राहा. माननीय यजीद बिन सुफियान (रजि.) उल्लेख करतात की जेव्हा माननीय अबू बकर (रजि.) यांनी मला सेनापती बनवून शाम (सीरिया) देशाकडे रवाना केले, त्यावेळी हा उपदेश केला.

"हे यजीद! तुमचे काही दोस्त आणि नातेवाईक आहेत संभवत: तुम्ही त्यांना काही जबाबदाऱ्या देण्याबाबत प्राधान्य द्याल. तुमच्याविषयी माझ्या दृष्टीने सर्वात जास्त भयाची हीच गोष्ट आहे."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, जो मनुष्य ईमानधारकांच्या सामाजिक व्यवहारांचा जबाबदार असेल आणि तो मुस्लिमांवर एखाद्याला केवळ नातेसंबंधामुळे किंवा दोस्तीमुळे शासक बनवील, तर अल्लाह त्याच्याकडून कोणताही फिदया (मुक्तीसाठी दिले जाणारे धन) स्वीकारणार नाही, येथपावेतो की जहन्नममध्ये टाकून देईल." (किताबुल खिराज)

१०) संघटनाच्या संघटनेस जास्तीतजास्त मजबूत राखण्याचा प्रयत्न करा आणि या संदर्भात अनुचित सूट देण्याची वृत्ती बाळगू नका.

अल्लाहचे सांगणे आहे,

"मग जेव्हा ते आपल्या एखाद्या कामानिमित्त परवानगी मागतील तर तुम्ही त्याला परवानगी देत जा, आणि अशा लोकांसाठी अल्लाहजवळ क्षमा-याचना करीत जा. अल्लाह निश्चितच क्षमाशील व कृपाळू आहे." *(दिव्य कुरआन, २४:६२)*

अर्थात संघटनेचे सहकारी जेव्हा एखाद्या सामाजिक गरजेपोटी एकत्र आले असतील मग काही लोक आपल्या व्यक्तिगत गरज आणि विवशतेपायी जाण्याची अनुमती मागतील. तर अशा वेळी संघटनेच्या प्रमुखाचे हे कर्तव्य आहे की त्याने संघटनेचे संघटनात्मक महत्त्व ध्यानी घेऊन फक्त त्याच लोकांना परवानगी द्यावी, ज्यांची गरज, खरोखर या सामूहिक धार्मिक कामाच्या तुलनेत प्राधान्य देण्यास जास्त योग्य असेल किंवा ज्यांची विवशता खऱ्या अर्थाने विवशता असेल, जी मान्य करणे आवश्यक आहे.

## प्रकरण - ५

# दास्यत्वाची जाणीव

## ४०. अल्लाहजवळ क्षमायाचना

१) **तौबा (क्षमायाचना) कबूल होण्याविषयी कधीही निराश होऊ नका. कितीही मोठ- मोठे अपराध हातून घडले असोत, क्षमायाचनेद्वारे आपला आत्मा शुध्द करून घ्या आणि अल्लाहशी आशा बाळगा, निराशा तर ईमान नसलेल्या लोकांची पध्दती आहे. ईमानधारकांचे खास वैशिष्टय हे आहे की ते खूप जास्त तौबा (क्षमायाचना) करणारे असतात, आणि कोणत्याही स्थितीत अल्लाहशी निराश होत नाही. अपराधांच्या अत्याधिकतेने घाबरून जाऊन नैराश्यभावनेत पडून राहणे, क्षमायाचनेच्या स्वीकृतीबाबत नाउमेद होणे बुद्धी व वैचारिकतेस नष्ट करून टाकणारी पथभ्रष्टता आहे. अल्लाहने आपल्या प्रिय दासांबद्दल हे नाही सांगितले की त्यांच्याकडून अपराध होत नाही, उलट हे सांगितले आहे की त्यांच्याकडून अपराध होतात, परंतु आपल्या अपराधांवर ते धीटपणा दाखवित नाही. मोकळ्या मनाने मान्य करतात आणि स्वत:ला पवित्र करून घेण्यासाठी बेचैन असतात.**

"आणि ज्यांची स्थिती अशी आहे की जर त्यांच्याकडून एखादे अश्लील कृत्य घडल्यास किंवा एखादा गुन्हा करून त्यांनी स्वत:वर अत्याचार केल्यास त्यांना लगेच अल्लाहचे स्मरण होते आणि ते त्याच्याकडे आपल्या अपराधांची क्षमा-याचना करतात – कारण अल्लाहशिवाय इतर कोण आहे जो अपराध माफ करू शकतो– आणि ते समजूनउमजून आपल्या कर्मावर अडून बसत नाहीत." *(दिव्य कुरआन, ३ : १३५)*

**अन्य एका ठिकाणी सांगितले,**

"वास्तविक पाहता जे लोक ईशभीरू आहेत त्यांची स्थिती तर अशी असते की एखाद्या वेळी शैतानाच्या प्रभावाने एखादा वाईट विचार त्यांना स्पर्श जरी करून जात असेल तरी ते ताबडतोब सावध होतात आणि मग त्यांना स्पष्ट दिसू लागते की त्यांच्यासाठी योग्य कार्यपद्धती कोणती आहे." *(दिव्य कुरआन, ७:२०१)*

**तसेच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले, "सर्वच्या सर्व मनुष्य अपराधी आहेत आणि सर्वोत्तम अपराधी ते आहेत, जे फार जास्त तौबा (क्षमायाचना) करणारे आहेत." (हदीस : तिर्मिजी)**

**पवित्र कुरआनात अल्लाहने आपल्या प्रिय दासांचे हे वैशिष्टय सांगितले आहे की प्रात: काळी अल्लाहच्या समोर रूदन स्वराने, गयावया करीत आपल्या दुष्कर्माची माफी मागतात आणि ईमानवाल्यांना ताकीद केली गेली आहे की त्यांनी तौबा (क्षमा याचना) करीत रहावे**

आणि हा विश्वास राखावा की अल्लाह त्यांच्या अपराधांवर माफीचे पांघरूण घालील, कारण तो मोठा माफ करणारा आणि आपल्या दासांशी अत्याधिक प्रेम राखणारा आहे.

"पहा, आपल्या पालनकर्त्याची क्षमा मागा आणि त्याच्याकडे परतून या, नि:संशय माझा पालनकर्ता फार दयाळू आहे आणि प्रेम करणारा आहे." *(दिव्य कुरआन, ११:९०)*

२) अल्लाहच्या दयाकृपेची सदैव आशा बाळगून राहा आणि हा विश्वास ठेवा की अपराध कितीही जास्त प्रमाणात असोत, अल्लाहची दया-कृपा याहून फार मोठी आणि विस्तृत आहे. समुद्राच्या फेसापेक्षा जास्त अपराध करणाराही जेव्हा आपल्या दुष्कृत्यांवर लज्जित होऊन अल्लाहसमोर गयावया करतो, तेव्हा अल्लाह त्याचे आर्जव ऐकतो आणि त्याला आपल्या कृपाछत्राखाली आश्रय देतो.

"(हे पैगंबर (स.)) सांगून टाका की हे माझ्या दासांनो, ज्यांनी आपल्या स्वत:शीच आगळीक केली आहे, अल्लाहच्या कृपेकडून निराश होऊ नका, निश्चितच अल्लाह सर्व गुन्हे माफ करून टाकतो, तो तर क्षमाशील परमकृपाळू आहे, परतून या आपल्या पालनकर्त्याकडे आणि आज्ञाधीन बनून जा त्याचे, यापूर्वी की तुमच्यावर प्रकोप येईल आणि मग कुठूनही तुम्हाला मदत मिळणार नाही." *(दिव्य कुरआन, ३९:५३-५४)*

३) जीवनात कधी काळी आपल्या दुष्कृत्यांवर लज्जा आणि पश्चात्तापाची जाणीव झाल्यास, तिला अल्लाहने प्रदान केलेली सुबुध्दी समजा आणि क्षमायाचनेचा दरवाजा उघडा असल्याचे जाणा. अल्लाह आपल्या दासांची क्षमायाचना त्या वेळेपावेतो कबूल करतो, जोपर्यंत त्याचा अंतिम श्वास आहे. तथापि प्राणोत्क्रमण झाल्यानंतर मनुष्य जेव्हा दुसऱ्या जगात पदार्पण करतो, तेव्हा क्षमायाचनेची संधी समाप्त होते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे, "अल्लाह आपल्या दासांची क्षमायाचना कबूल करतो, परंतु श्वास उखडण्याच्या आधी." (हदीस : तिर्मिजी)

आदरणीय यूसुफ (अ.) यांना त्यांच्या भावांनी कोरडया (ओसाड) विहिरीत ढकलून त्यांच्या मतानुसार त्यांना ठार केले. जणू त्यांनी पैगंबरहत्त्येचे महापाप केले आणि त्यांचा अंगरखा रक्तात भिजवून आपले पिता याकूब (अ.) यांची खात्री पटविण्याचा प्रयत्न करू लागले की यूसुफ मरण पावले आणि त्यांना लांडग्याने खाल्ले. परंतु हे पाप केल्यानंतर काही वर्षांनी जेव्हा त्यांना आपल्या दुष्कर्माची जाणीव बोचू लागते, तेव्हा लज्जित मनाने आपल्या पित्यास विनंती करतात की हे पिता! आमच्यासाठी अल्लाहजवळ दुआ करा की अल्लाहने आमच्या अपराधांना माफ करावे. त्या वेळी अल्लाहचे पैगंबर आदरणीय याकूब (अ.) असे सांगून त्यांना निराश करीत नाहीत की, तुमचे पाप फार मोठे आहे आणि यास (महापापास) आता अनेक वर्षे लोटली तेव्हा आता माफी मागून काय उपयोग? किंबहुना ते त्यांना वचन देतात की मी अवश्य तुमच्यासाठी पालनकर्त्या अल्लाहजवळ माफीची

**प्रार्थना करेन आणि त्यांची खात्री पटवितात की अल्लाह अवश्य तुम्हाला माफ करील. यासाठी की तो अतिशय माफ करणारा आणि अत्यंत दया करणारा आहे.**

"सर्वजण उद्गारले, "हे पिता, आपण आमच्या अपराधांच्या क्षमेसाठी प्रार्थना करा. खरोखरच आम्ही अपराध करणारे होतो." *(दिव्य कुरआन, १२:९७)*

**आदरणीय याकूब (अ.) म्हणाले,**

"त्याने सांगितले, "मी आपल्या पालनकर्त्याशी तुमच्यासाठी माफीची याचना करीन, तो मोठा माफ करणारा आणि दया दाखविणारा आहे." *(दिव्य कुरआन, १२:९८)*

**पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या समस्त संप्रदायाला विनाशापासून वाचविण्याकरिता आपल्या सहवासातील निष्ठावान सहकाऱ्यां (सहाबा (र)) न एक नवलपूर्ण कीस्सा सांगितला, ज्याद्वारे हा बोध मिळतो की ईमानधारक वयाच्या कोणत्याही भागात आपल्या दुष्कृत्यांबद्दल लज्जित होऊन मनापासून अल्लाह समोर गयावया करील तर अल्लाह त्याला आपल्या क्षमाशीलतेच्या आवतरणाने झाकून घेईल आणि कधीही धुतकारणार नाही.**

**पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की पूर्वीच्या जनसमूहात एक मनुष्य होता ज्याने नव्यान्नव खून केले होते. त्याने लोकांना विचारले, जगात सर्वात मोठा विद्वान (धर्मज्ञानी) कोण आहे? लोकांनी त्याला, अल्लाहचे सान्निध्य लाभलेल्या एका संन्यासीचा ठावठिकाणा सांगितला. तो त्या संन्याशाजवळ गेला आणि म्हणाला, माननीय! मी नव्यान्नव खून केलेत, काय अल्लाह माझी क्षमायाचना कबूल करील? संन्याशी म्हणाला, "नाही. तुझी तौबा कबूल होण्याचा आता काही उपाय नाही. "है ऐकताच त्या माणसाने निराशेच्या भरात त्या संन्याशालाही ठार केले. आता तो पूर्ण शंभर माणसांचा मारेकरी होता. आता त्याने पुन्हा लोकांना विचारायला सुरूवात केली. की या जगात सर्वात मोठा धर्मज्ञानी कोण आहे? लोकांनी त्याला आणखी एका संन्याशाचा पत्ता सांगितला आता तो क्षमायाचनेच्या हेतुने त्या संन्याशाच्या सेवेत पोहोचला आणि त्याला आपली अवस्था सांगताना विनंती केली माननीय मी शंभरजणांची हत्या केली. आता हे सांगा, काय माझी क्षमायाचना कबूल होऊ शकते? आणि जहन्नमच्या भयंकर शिक्षा यातनेपासून मुक्ती देईल असा एखादा उपाय आहे? संन्याशी म्हणाला, "का नाही? तुमच्या व क्षमायाचनेच्या दरम्यान कोणती गोष्ट अडसर बनू शकते? तुम्ही अमक्या देशात जा, तिथे अल्लाहचे काही निवडक दास अल्लाहाच्या उपासनेत मग्न आहेत, तुम्हीही त्यांच्यासोबत अल्लाहच्या उपासनेत मग्न व्हा आणि पुन्हा कधी आपल्या देशाकडे परतू नका. कारण आता ही जागा, धार्मिक दृष्टीने तुमच्यासाठी योग्य नाही (इथे तुमच्यासाठी तौबावर कायम राहणे आणि आपल्यात सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न करणे फार कठीण आहे!) तो मनुष्य तिथून निघाला तो अर्ध्या रस्त्यापर्यंत पोहचत नाही, तोच मृत्युचा संदेश आला. आता फरिश्ते आपसात भांडण करू लागले. रहमत (दया-कृपे) च्या फरिश्त्यांनी म्हटले, हा**

अपराधांबाबत पश्चात्तापदग्ध होऊन, क्षमायाचनेसाठी अल्लाहकडे रूजू झाला आहे. अल्लाहच्या प्रकोपाचे फरिश्ते म्हणाले नाही, अजूनही त्याने एकही सत्कर्म केलेले नाही."

हे संभाषण होत असतांनाच एक फरिश्ता मनुष्यरूपात आला. या फरिश्त्यांनी त्याला आपला पंच नेमले की त्याने या दोघांच्या दरम्यान फैसला करावा. तो म्हणाला, दोन्ही बाजूंच्या जमिनीचे मोजमाप करा आणि हे पाहा की ती जागा इथून जवळ आहे जिथून तो मनुष्य आला आहे, किंवा ती जागा इथून जवळ आहे जिथे त्या माणसाला जायचे होते. "फरिश्त्यांनी जमिनीचे मोजमाप केले तेव्हा ती जागा जवळची निघाली जिथे त्या माणसाला जायचे होते आणि तिथे पोहचत असताना फरिश्त्यांनी त्याचा आत्मा ताब्यात घेतला आणि अल्लाहने त्याला क्षमा केली." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

४) केवळ अल्लाहसमोर आपले अपराध मान्य करा. त्याच्याच समोर करूणा भाका, गयावया करा आणि त्याच्याच समोर आपली नम्रता, विवशता आणि आतला अपराधीपणा जाहीर करा. नम्रता व विवशता माणसाची ती पुंजी आहे, जी केवळ अल्लाहच्याच समोर सादर केली जाऊ शकते. आणि जो दुर्दैवी आपल्या मान व नम्रतेची ही पूंजी आपल्यासारख्याच विवश व अगतिक माणसासमोर सादर करतो, तर मग त्या दिवाळखोर माणसाजवळ अल्लाहसमोर सादर करण्यासाठी काहीच उरत नाही आणि मग तो अपमानित होऊन नेहमीकरिता दारोदारी ठोकराखांत फिरतो आणि कुठेही सन्मान प्राप्त करीत नाही.

अल्लाहचे सांगणे आहे,

"तुझा पालनकर्ता क्षमाशील व दयाळू आहे, त्याने यांच्या कृतीवर यांना पकडू इच्छिले असते तर लवकरच प्रकोप पाठविला असता परंतु यांच्यासाठी निर्णयाची एक वेळ ठरलेली आहे, आणि त्यांच्यापासून वाचून पळ काढण्याचा यांना कोणताच मार्ग सापडणार नाही."

*(दिव्य कुरआन, १८:५८)*

आणि सूरह शूरा मध्ये उल्लेख आहे,

"आणि तोच तर आहे जो आपल्या दासांची क्षमायाचना कबूल करतो आणि त्यांचे अपराध माफ करतो आणि ते सर्वकाही जाणतो, जे तुम्ही करता." *(दिव्य कुरआन, ४२:२५)*

वास्तविक माणसाने हा विश्वास ठेवला पाहिजे की सफलतेचा एकच मार्ग आहे. यशाचे एकच द्वार आहे. त्या दरवाजापासून जो धुत्कारला गेला, मग तो नेहमीकरिता अपमानित व वंचित झाला. ईमानधारकांची हीच विचारसरणी आहे की दासाकडून वाटेल तेवढे अपराध घडोत, त्याचे काम हेच की त्याने अल्लाहसमोर करूणा भाकावी आणि त्यांच्याच पुढ्यात पश्चात्तापाचे अश्रू गाळावेत. दासाकरिता अल्लाहखेरीज दुसरा कोणताही दरवाजा नाही, जिथे त्याला क्षमादान लाभेल. एवढेच काय जर मनुष्य अल्लाहला सोडून पैगंबर मुहम्मद (स.) यांना खूश करण्याचही प्रयत्न करील, तरीही अल्लाहच्या दरबारात त्याच्या

या प्रयत्नाची काहीही कदर होणार नाही. परिणामी त्याला धुत्कारले जाईल. वस्तुत: पैगंबरदेखील अल्लाहचा दास आहे, त्याच्या दयाकृपेचा याचक आहे. त्याला जे महान पद लाभले आहे, तेही त्याच्याच महत्कृपेने आणि त्याच्या श्रेष्ठत्वाचे रहस्यदेखील हेच आहे की तो अल्लाहचा सर्वात जास्त विनम्र व आज्ञाधारक दास असतो आणि सर्वसामान्य माणसांच्या तुलनेत अगणित पटींनी जास्त अल्लाहसमोर करूणा भाकणारा, गयावया करतो.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"लोकांनो! अल्लाहजवळ आपल्या अपराधांची क्षमा मागा आणि त्याच्याचकडे परत या. मला पाहा, मी दिवसातून शंभर-शंभर वेळा अल्लाहजवळ क्षमायाचनेची दुआ (प्रार्थना) करतो." (हदीस : मुस्लिम)

ढोंगी मुस्लिमांचा उल्लेख करताना अल्लाहने सांगितले,

"ते तुमच्यासमोर शपथा वाहतील जेणेकरून तुम्ही यांच्याशी प्रसन्न व्हावे. वास्तविकतः तुम्ही यांच्याशी प्रसन्न झाला तरी अल्लाह कदापि अशा अवज्ञाकारी लोकांशी प्रसन्न होणार नाही."

*(दिव्य कुरआन, ९:९६)*

पवित्र कुरआनात माननीय काब बिन मालिक (रजि.) यांची घटना नेहमीकरिता बोध आहे की दासाने सर्वकाही सहन करावे, प्रत्येक कसोटी सहन करावी, परंतु अल्लाहच्या दरवाज्यातून उठण्याचा विचारसुध्दा त्याच्या मनात येऊ नये. धर्माच्या मार्गात माणसावर कसा ही प्रसंग येवो आणि अल्लाहकडून त्याची कितीही कसोटी घेतली जाव, तो त्याच्या जीवनास तेजस्वी बनविण्याचे व त्याचा दर्जा उंचाविण्याचे साधन आहे. हा अपमान चिरस्थायी मान सन्मानाचा खात्रीशीर मार्ग आहे आणि जो अल्लाहचे द्वार सोडून इतरत्र सन्मान शोधतो त्याला कुठेही मान सन्मान लाभत नाही. तो सर्व ठिकाणी अपमानित होईल आणि जमीन व आकाशातील कोणताही नेत्र त्याला सन्मानपूर्ण नजरेने पाहू शकत नाही.

"आणि त्या तिघांनादेखील त्याने माफ केले ज्यांचे प्रकरण पुढे ढकलले गेले होते - जेव्हा जमीन सर्वथैव विस्तीर्ण असूनदेखील त्यांच्यावर तंग झाली आणि त्यांच्या स्वतःचे जीवदेखील त्यांना भारी वाटू लागले आणि त्यांनी जाणून घेतले की अल्लाहपासून वाचण्यासाठी कोणतेही आश्रयस्थान खुद्द अल्लाहच्या कृपाछत्राशिवाय नाही; तेव्हा अल्लाह आपल्या कृपेने त्यांच्याकडे वळला जेणेकरून त्यांनी त्याच्याकडे परत यावे. निःसंशय अल्लाह अत्यंत क्षमाशील व परम दयाळू आहे." *(दिव्य कुरआन, ९:११८)*

या तिघांशी अभिप्रेत माननीय काब बिन मालिक (रजि.), माननीय मुरारा बिन रबिया (रजि.) आणि हिलाल बिन उमैया (रजि.) होत आणि या तिघांची आदर्श क्षमायाचना, ईमानधारकांकरिता मार्गदिप आहे. माननीय काब बिन मालिक (रजि.) जे वृध्दावस्थेत आंधळे झाले होते आणि आपल्या मुलाचा आधार घेऊन चालत असत. त्यांनी स्वत:

आपल्या आदर्श क्षमायाचनेची बोधप्रद घटना आपल्या मुलाला सांगितली होती. ती हदीसच्या ग्रंथात समाविष्ट आहे. तबूक युध्दाच्या तयारीसाठी जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) ईमानधारकांना युद्धात सहभागी होण्यास प्रवृत्त करीत होते, मीदेखील त्या साहचर्यात सहभागी होतो. मी जेव्हा जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांचे म्हणणे ऐकत असे मनात विचार करीत असे की मी अवश्य जाईन, परंतु घरी परतल्यावर सुस्ती करीत असे आणि विचार करीत असे की अजून फार वेळ आहे. माझ्याजवळ प्रवासाची सामुग्री आहे. मी तन्दुरूस्त आहे. वाहन चांगल्यात चांगले उपलब्ध आहे. मग निघण्यात काय उशीर लागणार अशा विचाराने निघणे टाळत राहीले, येथपावेतो की धर्मयोध्दे रणांगणावर जाऊन पोहोचले. मी मात्र मदीनेत बसून जाण्याचा बेतच रचत राहिलो.

आता बातम्या येऊ लागल्या की पैगंबर मुहम्मद (स.) परतीच्या मार्गावर आहेत आणि एके दिवशी कळाले की पैगंबर मुहम्मद (स.) परत आलेत आणि नेहमीप्रमाणे मशिदीत थांबले आहेत. मीदेखील मशिदीत पोहोचलो. तिथे कपटी लोक पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेस पोहोचत होते आणि मोठमोठ्या शपथा घेऊन आपले बहाणे सादर करीत होते. पैगंबर मुहम्मद (स.) त्यांच्या बनावट गोष्टी ऐकून त्यांचे वरकरणी बहाणे कबूल करत होते आणि सांगत, अल्लाह तुम्हाला क्षमा करो. जेव्हा माझी पाळी आली तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) मला म्हणाले, "सांगा तुम्हाला कोणत्या गोष्टीने रोखले होते. मी पाहिले की पैगंबरांच्या स्मितहास्यात रागाची चिन्हे आहेत आणि मी स्पष्ट काय ते सांगून टाकले. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) ! वस्तुस्थिती ही आहे की माझी कोणतीही सबब नव्हती. मी प्रकृतीने धडधाकट होतो. चांगल्या स्थितीत होतो. माझ्याकडे वाहनही होते. केवळ माझ्या सुस्ती आणि गफलतीने मला या सद्‌भाग्यापासून वंचित ठेवले.

माझी स्पष्टोक्ती ऐकल्यावर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, ठीक आहे, जा आणि प्रतिक्षा करा की अल्लाहने तुमच्या मामल्यात एखादा फैसला करावा. "मी उठलो आणि आपल्या कबिल्याच्या लोकांमध्ये येऊन बसलो. कबिल्याचे लोक मला बरे-वाईट बोलू लागले तुम्ही एखादी सबब का नाही सांगितली. तुम्ही तर नेहमी धर्माच्या कार्यात अग्रेसर राहिले. परंतु जेव्हा मला असे कळाले की माझ्या दोन साथीदारांनीही अशाच प्रकारे खरे काय ते सांगितले तेव्हा माझ्या मनाला समाधान वाटले आणि मी ठरवले की मी आपल्या सत्यतेवर अटळ राहीन. त्यानंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी खुले आम ऐलान केले आम्हा तिघांशी कोणीही बोलू नये. हे जाहीर होताच माझ्यासाठी मदीनेची भूमी अगदी बदलून गेली आणि मी आपल्याच लोकांत कोणीही मित्र व सहायक नसलेला अगदी अनोळखी बनून राहिलो. कोणीही समाजात मला सलाम करीत नसे. एक दिवस जेव्हा मी फार वैतागलो आणि तब्येत फार घाबरली तेव्हा आपला एक लहानपणीचा मित्र आणि चुलत भाऊ अबू कतादा (रजि.) जवळ गेलो. मी जवळ जाऊन सलाम केला, परंतु त्या भल्या माणसाने सलामचे उत्तरसुध्दा दिले नाही. मी विचारले, "अबु कतादा ! मी तुम्हाला

अल्लाहची शपथ देऊन विचारतो, काय मला अल्लाह आणि त्याच्या पैगंबरविषयी प्रेम नाही? ते गप्प राहिले. मी पुन्हा विचारले, तरीही त्यांनी काही उत्तर दिले नाही. तिसऱ्यांदा जेव्हा मी शपथ देऊन विचारले तेव्हा ते म्हणाले, अल्लाह आणि अल्लाहचे पैगंबरच अधिक चांगले जाणतात. माझे मन भरून आले आणि माझ्या डोळ्यांतून अश्रूधारा वाहू लागल्या आणि मी आपल्या दु:खासह परतलो. त्याच काळात बाजारात शाम (सीरीया) देशाच्या एका व्यापाऱ्याने मला "शाह गस्सान" चे एक पत्र दिले. ख्रिश्चनांच्या या बादशहाने लिहिले होते, आम्ही असे ऐकले आहे की तुमचे हुजूर तुमच्यावर फार जुलूम करीत आहेत. तुम्ही एखादे अपमानित मनुष्य तर नाहीत. तुमची कदर आम्ही जाणतो. तुम्ही आमच्याकडे या, आम्ही तुमच्या दर्जाला साजेलसा व्यवहार करू. पत्र पाहताच माझ्या तोंडून निघाले, हे आणखी एक संकट येऊन ठेपले. त्याच क्षणी मी ते पत्र चुलीत फेकले.

चाळीस दिवस याच स्थितीत निघून गेले आणि तेवढ्यात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पाठविलेला एक मनुष्य हा आदेश घेऊन आला, आपल्या पत्नी पासून ही वेगळे व्हा. मी विचारले, "तलाक देऊ का?" उत्तर मिळाले नाही, फक्त वेगळे राहा. मी आपल्या पत्नीला माहेरी पाठवून दिले आणि तिला सांगितले, आता तुम्हीही अल्लाहच्या फैसल्याची प्रतिक्षा करा. पन्नासाव्या दिवशी मी फज्रच्या नमाजनंतर आपल्या जीवाशी उद्विग्न, अतिशय निराश आणि दु:खी आपल्या घराच्या छतावर बसलो होतो की अचानक कोणीतरी हाक मारली, "काब ! अभिनंदन असो !" हे ऐकताच मी समजलो आणि आपल्या अल्लाहसमोर सजद्यात पडलो (माथा टेकला). मग लोकांची गर्दी जमली. जत्थ्यामागून जत्थे माझ्या अभिनंदनासाठी येऊ लागले. मी उठलो आणि सरळ पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ मशिदीत पोहोचलो. मी पुढे होऊन सलाम केला तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "काब! अभिनंदन असो, हा तुमच्या जीवनातील सर्वात उत्तम दिवस आहे. मी म्हणालो, हुजूर ! ही माफी आपल्यातर्फे आहे की अल्लाहतर्फे? सांगितले, अल्लाहच्यातर्फे आणि सूरह तौबाच्या काही आयतींचे पठण ऐकविले.

५) तौबा (क्षमायाचना व पुन्हा अपराध न करण्याचा दृढ संकल्प) करण्यात कधीही उशीर लाऊ नका. जीवनाची शाश्वती नाही. आचरणाची संधी केव्हा समाप्त होईल याची खबर नाही. पुढचा क्षण नेमका जीवनाचा आहे की मृत्युचा हे कोणाला माहीत? नेहमी परिणतीकडे लक्ष द्या आणि क्षमयाचनाद्वारे हृदय व आत्मा बुद्धी व जीभेला दुष्कर्मापासून स्वच्छ करीत राहा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे, "अल्लाह रात्री आपला हात पसरवितो, यासाठी की ज्या माणसाने दिवसा एखादा अपराध केला आहे, त्याने रात्री अल्लाहकडे परत यावे आणि अल्लाह दिवसा आपला हात पसरवितो, यासाठी की रात्री जर कोणी अपराध केला आहे तर त्याने दिवसा आपल्या पालनकर्त्याकडे परत यावे आणि आपल्या अपराधांची

क्षमा मागावी. इथपावेतो की सूर्य पश्चिमेकडून निघावा.'' (हदीस : मुस्लिम)

अल्लाहच्या हात पसरविण्याशी अभिप्रेत तो आपल्या गुन्हेगार दासांना आपल्याकडे बोलवितो आणि आपल्या दया कृपेने त्यांच्या अपराधांना झाकू इच्छितो. जर दासाने एखाद्या प्रासंगिक भावनेला बळी पडून एखादा गुन्हा केला आहे तर त्याने आपल्या दयाळू व क्षमाशील अल्लाहकडे त्वरीत धाव घ्यावी. किंचितही उशीर लावू नये कारण एक अपराध, दुसऱ्या अपराधाला जन्म देतो आणि सैतान सदैव माणसाच्या विनाशास टपून बसला आहे. आणि तो माणसाला मार्गभ्रष्ट करण्याच्या काळजीपासून कधीही निश्चिंत नाही.

६) अतिशय सच्चा मनाने व निष्कपट भावनेने अल्लाहजवळ क्षमायाचना करा, जी तुमच्या जीवनात आमूलाग्र बदल घडवून आणील आणि क्षमायाचनेनंतर तुम्ही एक वेगळेच मनुष्य दिसू लागाल.

अल्लाहचे सांगणे आहे,

''हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, अल्लाहपुढे पश्चात्ताप करा. विशुद्ध पश्चात्ताप. दूर नव्हे की अल्लाहने तुमचे दोष दूर करावेत आणि तुम्हाला अशा स्वर्गामध्ये दाखल करावे ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील.'' *(दिव्य कुरआन, ६६:८)*

अशी क्षमायाचना करा की पुन्हा मन-मस्तिष्काच्या कानाकोपऱ्यातही अपराधाकडे वळण्याची वृत्ती तिळमात्र बाकी न राहावी. अशा प्रकारच्या क्षमायाचनेचे तीन किंवा चार पैलू आहेत. जर अपराधाचा संबंध अल्लाहच्या हक्काशी आहे. तर क्षमायाचनेचे तीन भाग आहेत.

(अ) माणसाने खरोखर आपल्या अपराधांच्या जाणीवेने लज्जित व्हावे.

(ब) यापुढे अपराध न करण्याचा दृढ संकल्प करावा.

(क) आपले जीवन सुधारण्यासाठी मन:पूर्वक आणि खूप काळजीपूर्वक सक्रिय व्हावे आणि जर त्याने एखाद्या दासाचा हक्क मारला आहे, तर क्षमायाचनेचा हिस्सा हादेखील आहे की

(ड) दासाचा हक्क अदा करावा किवा त्याच्याकडून माफ करून घ्यावा.

हीच ती सच्ची तौबा, अगदी मनापासून केलेली क्षमायाचना की जिच्याद्वारे मनुष्य खरोखर अपराधांपासून मुक्त होतो. त्याचा प्रत्येक गुन्हा त्याच्या आत्म्यापासून गळून पडतो आणि तो सत्कर्मांनी सुशोभित होऊन, सुन्दर जीवनासह अल्लाहसमोर पोहोचतो मग अल्लाह त्याला आपल्या जन्नमध्ये स्थानापन्न करतो.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे, ''दास जेव्हा एखादा अपराध करतो, तेव्हा त्याच्या हृदयावर एक काळा डाग पडतो.''

जर तो, अपराध करण्यापासून परावृत्त होईल. आपल्या दुष्कर्मांपासून जाणीवेने लज्जित होऊन माफीचा इच्छुक होईल आणि अल्लाहकडे वळून अपराध न करण्याचा दृढ निश्चय करील तर अल्लाह त्याच्या अंत:करणाला उज्वल करतो आणि जर त्याने पुन्हा अपराध केला तर तो काळा डाग वाढविला जातो. येथपावेतो तो संपूर्ण हृदयावर पसरतो. हाच तो गंज, ज्याचा उल्लेख अल्लाहने आपल्या ग्रंथात (पवित्र कुरआनात) सांगितलेला आहे,

"मुळीच नाही, किंबहुना खरी गोष्ट ही की त्यांच्या हृदयांवर त्यांच्या दुष्कर्मांचा गंज चढला आहे." *(दिव्य कुरआन, ८३:१४)*

७) तुम्ही क्षमायाचना व पुन्हा अपराध न करण्याच्या दृढ निश्चयावर कायम राहा आणि अहोरात्र या गोष्टीची काळजी घ्या की अल्लाहशी केलेल्या वचनाविरुध्द कोणतेही कृत्य कदापि होऊ नये आणि दररोज वाढत्या पावित्र्य आणि सुधाराने तुमच्या निश्चयाचे अनुमान लावत राहा, आणि सर्व प्रयत्न करूनही जर तुम्ही एखादा अपराध करून बसाल, तरी निराश होऊ नका. तर पुन्हा अल्लाहच्या माफीचा आश्रय शोधा आणि अल्लाहसमोर करूणा मागा की हे पालनकर्त्या ! मी अतिशय कमजोर दुर्बल आहे. तू मला आपल्या दारातून अपमानित अवस्थेत घालवू नकोस. यासाठी की माझ्यासाठी तुझ्या दाराशिवाय दुसरे कोणतेही दार नाही, जिथे जाऊन मी आश्रय घ्यावा.

माननीय शेख सादी (रजि.) यांनी सांगितले आहे,

इलाही बजिल्लत मरा अज दरम की जुज़ तू नदारम दरे दीगरम्

आणि माननीय अबू सईद अबुल खैर (रजि.) यांच्या या चारओळी ही उल्लेखनीय आहेत.

बाज आ बाज आ हर आन चे हस्ती बाज आ गर काफिर व गिब्र व बुतपरस्ती बाज आ

ई दर गहे मादर गहे नौमीदी नीस्त, सद बार अगर तौबा शिकस्ती बाज आ

परत ये अल्लाहकडे, पुन्हा परत ये तू जो कोणी आणि जसा काही आहे, अल्लाहकडे परत ये जर तू काफिर (इन्कार करणारा) अग्निपूजक आणि मूर्तिपूजक आहे, तरीही अल्लाहकडे परत ये. आमचा हा दरबार निराशा आणि नाउमेदीचा दरबार नाही. जर तू शंभर वेळाही क्षमायाचना करून पुन्हा गुन्हा केला आहे तरीही परत ये.

अल्लाहला सर्वात जास्त आनंद ज्या गोष्टीने होतो ती म्हणजे दासाची क्षमायाचना होय. तौबाचा अर्थ परतणे, रूजू होणे! मनुष्य जेव्हा विचार व भावनांच्या पथभ्रष्टतेत सापडून अपराधांच्या दलदलीत फसतो तेव्हा तो अल्लाहपासून दुरावतो आणि दूर जाऊन पडतो जणू तो अल्लाहपासून हरवला आहे आणि मग जेव्हा तो परततो, लज्जित होऊन अल्लाहच्याकडे वळतो तेव्हा असे समजा की जणू अल्लाहला आपला हरवलेला दास पुन्हा मिळाला. या अवस्थेला पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अतिशय प्रभावी उदाहरणाद्वारे असे सांगितले आहे.

"जर तुमच्यापैकी एखाद्या माणसाचा उंट एका सपाट मैदानात हरवला आणि त्या माणसाचे खाण्यापिण्याची सामुग्रीही त्याच हरवलेल्या उंटावर लादलेली असावी आणि तो मनुष्य चोहीकडे त्या सपाट मैदानात आपला उंट शोधून शोधून निराश झाला असावा, मग तो जीवनाशी निराश होऊन एखाद्या झाडाखाली मृत्युची वाट बघत पहुडला असावा आणि त्याच स्थितीत त्याने आपला तो उंट सर्व सामुग्रीसह आपल्यासमोर उभा असलेला पाहावा. तेव्हा विचार करा. त्याला केवढा मोठा आनंद होईल ! तुमचा पालनकर्ता त्या माणसापेक्षाही जास्त त्या वेळी आनंदीत होईल, जेव्हा तुमच्यापैकी एखादा भटकलेला दास त्यांच्याकडे परततो आणि पथभ्रष्टतेनंतर पुन्हा तो आज्ञाधारकतेचे वर्तन अंगीकारतो."

(हदीस : तिर्मिजी)

एका प्रसंगी काही युध्दकैदी बंदीवान होऊन आले त्यांच्यात एक स्त्री होती, जिचे दुग्धपान करणारे बाळ दुरावले होते. ती वात्सल्यातिरेकाने इतकी बेचैन होती की जो कोणी लहान बाळ आढळताच त्याला छातीशी लावून दूध पाजू लागत असे. त्या स्त्रीची ही अवस्था पाहून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या सहकाऱ्यांना विचारले, काय तुम्ही, ही अपेक्षा करू शकता की ही माता आपल्या बाळाला स्वत:च्या हातांनी आगीत झोकून देईल? सहाबा (रजि.) म्हणाले, हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) ! स्वत: झोकून देणे तर दूरची गोष्ट आहे, पण जर तो पडत असेल तरीही ती प्राण पणाला लावून त्याला वाचवील."

त्यावर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाह आपल्या दासांवर याहून जास्त दयावान आणि मेहरबान आहे, जेवढी ही आई आपल्या बाळावर मेहेरबान आहे.

८) क्षमायाचना सातत्याने करीत राहावे सकाळपासून संध्याकाळपर्यंत, माणसाकडून न जाणो किती चुका, किती अपराध घडतात आणि प्रसंगी त्याला याचे भानही राहात नाही. असे समजू नका की एखादा फार मोठा अपराध घडल्यावरच तौबा (क्षमायाचना) करण्याची आवश्यकता आहे. खरे तर माणसाला सदैव क्षमा करण्याची गरज आहे. आणि पावला-पावलावर त्याच्याकडून काही न काही गुन्हा होतच राहतो. स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) सारखे चारित्र्यशिरोमणी दिवसातून शंभर वेळा अल्लाहजवळ क्षमायाचना करीत"

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

९) जो अपराधी तौबा करून आपले जीवन सुधारून घेईल त्याला कधीही तुच्छ लेखू नका. माननीय इमरान बिन हुसैन (रजि.) पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या काळातील एक घटना सांगतात की कबिला जुहैनाची एक स्त्री पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेस हजर झाली. जी व्यभिचाराच्या परिणामी गर्भवती झाली होती. ती म्हणाली, 'हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! मी व्यभिचाराच्या शिक्षेस पात्र आहे. माझ्यावर शरीअतचा नियम लागू करा आणि मला शिक्षा द्या.'' पैगंबर मुहम्मद (स.) यांनी तिच्या पालकास बोलविले व त्याला

म्हणाले, "तुम्ही तिच्याशी सद्व्यवहार करीत रहा आणि जेव्हा ती बाळाला जन्म देईल तेव्हा तिला घेऊन माझ्याजवळ या. प्रसूतीनंतर जेव्हा ती स्त्री आली, तेव्हा पैगंबरांनी आदेश दिला की तिचे कपडे तिच्या शरीराशी बांधले जावेत (यासाठी की दगडांचा वर्षाव करते वेळी शरीर उघडे पडून निर्वस्त्र होऊ नये) मग तिला दगडांनी वर्षाव करून मारण्याचा आदेश दिला आणि तिला पाषाण वर्षावाद्वारे मारले गेले. मग पैगंबर मुहम्मद (स.) यांनी तिच्या जनाजाची नमाज अदा केली. तेव्हा माननीय उमर (रजि.) पैगंबर मुहम्मद (स.) यांना म्हणाले, हे अल्लाहचे रसूल! तुम्ही तिच्या जनाजाची नमाज अदा करीत आहात, तिने तर व्यभिचार केला आहे. त्यावर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, तिने तौबा (पश्चात्तापमुक्त क्षमायाचना) केली आणि अशी तौबा केली की जर तिची तौबा मदीनेच्या सत्तर लोकांमध्ये वाटून दिली गेली तर सर्वांच्या मुक्तीसाठी पुरेशी ठरेल. तुम्ही तिच्याहून श्रेष्ठ कोणाला पाहिले आहे, ज्याने आपला प्राण अल्लाहच्या समोर प्रस्तुत केला.

१०) सय्यिदुल इस्तिगफार (सर्वात प्रमुख क्षमायाचना) चा इतमाम राखा. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माननीय शद्दाद बिन औस (रजि.) यांना सांगितले की सय्यिदुल इस्तिगफार म्हणजे सर्वात उत्तम दुआ आहे.

"अल्लाहुम-म अन-त रब्बि ला इला-ह इल्ला अन-त खलक़्-तनी व अना अब्दु-क व अना अला अहदि-क व वअदि-क मस-त-तअतु अऊज़ुबि-क मिन शर्रि मा स-नअतु अबू-उ-ल-क बिनिअ-मति-क अलय-य व अबू-उ बिज़म्बी फग़फ़िरली फ़इन-नहू ला यग़फ़िरुज़्ज़ुनू-ब इल्ला अन-त."

हे अल्लाह ! तू माझा पालनकर्ता आहेस. तुझ्याखेरीज कोणीही उपास्य नाही. तू मला निर्माण केलेस आणि मी तुझा दास आहे आणि मी तुला उपासना व आज्ञापालनाचे जे वचन दिले आहे. त्यावर आपल्या सामर्थ्याप्रत कायम राहीन आणि जे गुनाहदेखील माझ्या हातून घडतील, त्यांच्या दुष्परिणापासून सुरक्षित राहण्यासाठी मी तुझ्या आश्रयाचा अभिलाषी आहे. तू मला ज्या ज्या देणग्यांनी उपकृत केले आहे त्या सर्व मी कबूल करतो आणि हे मान्य करतो की मी अपराधी आहे. यास्तव हे माझ्या पालनकर्त्या! माझ्या अपराधांना क्षमा कर. तुझ्याखेरीज माझ्या अपराधांना आणखी कोण माफ करणारा आहे?"

(हदीस : बुखारी, तिर्मिजी)

# ४१. दुआचे (प्रार्थना) शिष्टाचार

१) दुआ (प्रार्थना) फक्त अल्लाहजवळ मागा. त्याच्याखेरीज दुसऱ्या कोणालाही गरजपूर्तीकरिता पुकारू नका. दुआ उपासनेचे सत्व आहे आणि उपासनेचा हक्कदार एकटा अल्लाह आहे. दुसरा कोणीही नाही. पवित्र कुरआनात उल्लेख आहे,

"त्याचाच धावा करणे सत्याधिष्ठित आहे. उरले ते ज्यांचा धावा हे लोक त्याला सोडून करतात, ते त्यांच्या प्रार्थनेला काहीच प्रतिसाद देऊ शकत नाहीत. त्यांचा धावा करणे तर असे आहे जसे एखाद्या मनुष्याने पाण्याकडे हात पसरून त्याला विनंती करावी की तू माझ्या तोंडापर्यंत पोहोच. वस्तुतः पाणी त्याच्यापर्यंत पोहचणार नाही, बस्स अशाच प्रकारे अईमानधारकांच्या प्रार्थनादेखील काहीच नाही परंतु एक लक्षहीन बाण."

*(दिव्य कुरआन, १३:१४)*

अर्थात गरजा पूर्ण करणारा आणि सर्वांचा कर्ता-करविता केवळ अल्लाह आहे. त्याच्याच हाती समस्त अधिकार आहेत. त्याच्याखेरीज कोणाच्याही हाती कसलाही अधिकार नाही. सर्वजण त्याचेच गरजवंत आहेत. त्याच्याखेरीज असा कोणी नाही जो दासांची पुकार ऐकेल आणि त्यांच्या प्रार्थनांना प्रत्युत्तर देईल.

"लोकहो! तुम्हीच अल्लाहचे गरजवंत आहात आणि अल्लाह तर संपन्न आणि स्तुत्य आहे." *(दिव्य कुरआन, ३५:१५)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे, अल्लाहने सांगितले, "माझ्या दासांनो! मी स्वत: वर अत्याचार करणे हराम (अवैध) करून घेतले आहे. तुम्हीदेखील एकमेकांवर अत्याचार करण्यास हराम समजा. माझ्या दासांनो! तुमच्यापैकी प्रत्येकजण मार्गभ्रष्ट आहे. फक्त त्याच्याखेरीज, ज्याला मी मार्ग दाखवीतो, तेव्हा तुम्ही माझ्याकडेच मार्गदर्शनप्राप्तीची इच्छा धरा, की मी तुम्हाला मार्गदर्शन करावे. माझ्या दासांनो! तुमच्यापैकी प्रत्येकजण उपाशी आहे, त्या माणसाला सोडून ज्याला मी खाऊ घालीन, तेव्हा तुम्ही माझ्याजवळच आजीविका मागा की मी तुम्हाला अन्नसामुग्री द्यावी. माझ्या दासांनो, तुमच्यापैकी प्रत्येकजण विवस्त्र आहे, त्या माणसाखेरीज ज्याला मी नेसवीन, तेव्हा माझ्याजवळच वस्त्रे मागा म्हणजे मी तुम्हाला नेसवावे. माझ्या दासांनो! तुम्ही रात्रीही अपराध करता आणि दिवसाही आणि मी समस्त अपराध माफ करीन." (हदीस : मुस्लिम)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे ही सांगितले की माणसाने आपल्या सर्व गरजांच्या पूर्ततेसाठी अल्लाहकडेच याचना करावी, येथपावेतो की जर जोड्याचा बंधही तुटल्यास अल्लाहजवळच मागावे आणि जर मिठासारख्या क्षुल्लक वस्तूचीही गरज असेल तर तीही त्याच्याजवळच मागावी. (हदीस : तिर्मिजी)

माणसाने आपल्या अगदी क्षुल्लक गरजेसाठीही अल्लाहकडेच याचना करावी.

त्याच्याखेरीज न कोणी दुआ-प्रार्थनांना ऐकणारा आहे आणि न कोणी मनोकांक्षा पूर्ण करणारा आहे.

२) अल्लाहच्या जवळ तेच मागा जे वैध आणि पवित्र असेल. अनुचित हेतु आणि अपराधाच्या कामांसाठी अल्लाहजवळ याचना करणे अतिशय घोर अनादर, निर्लज्जपणा आणि अवमान आहे. निषिद्ध आणि अनुचित इच्छा आकांक्षापूर्तिकरिता अल्लाहजवळ दुआ करणे आणि नवस मागणे धर्माशी केलेली फार खालच्या दर्जाची मस्करी आहे. अशा प्रकारे त्या गोष्टीसाठीही दुआ मागू नका ज्या अल्लाहने नेहमीकरिता ठरवून दिल्या आहेत. आणि ज्यात बदल होऊ शकत नाही. उदा. एखाद्या ठेंगण्या माणसाने उंच होण्याची दुआ करावी किंवा खूप उंच माणसाने ठेंगणे होण्याची दुआ करावी अथवा एखाद्याने दुआ करावी की मी चिरतरूण राहावे. मला म्हातारपण येऊ नये. पवित्र कुरआनात सांगितले गेले,

"प्रत्येक उपासनेत आपली दिशा नीट ठेवा आणि त्याचे सच्चे भक्त होऊन त्यालाच पुकारा, ज्याप्रमाणे त्याने आता तुम्हाला निर्माण केले आहे तसेच तुम्ही पुन्हा निर्माण केले जाल." *(दिव्य कुरआन, ७:२९)*

अल्लाहसमोर आपल्या गरजा मांडणाऱ्याने अवज्ञाच्या मार्गावर चालून अनुचित कामनांच्या पूर्तीची दुआ मागू नये, किंबहुना चांगले चरित्र आणि पवित्र भावना सादर करीत सदिच्छापूर्तीसाठी अल्लाहजवळ याचना करावी.

३) दुआ अगदी मनापासून आणि पवित्र इराद्याने मागा आणि अशा विश्वासाने मागा की ज्या अल्लाहजवळ तुम्ही मागत आहात, तो तुमच्या स्थितीशी पूर्णत: अवगत आहे. तुमच्यावर अतिशय मेहेरबानही आहे आणि तोच होय जो आपल्या दासांची पुकार ऐकतो आणि त्यांच्या दुआ-प्रार्थना स्वीकारतो. वरकरणी देखावा, प्रदर्शन, धोकेबाजी आणि अनेकेश्वरत्वाच्या प्रत्येक पैलूपासून आपल्या दुआ-प्रार्थनांना दूर राखा. कुरआनात उल्लेख आहे,

"(म्हणून हे रुजू होणाऱ्यांनो!) अल्लाहचाच धावा करा, आपला धर्म त्याच्याकरिता विशुद्ध राखून. मग तुमचे हे कृत्य अश्रद्धावंतांना कितीही अप्रिय वाटो." *(दिव्य कुरआन, ४०:१४)*

आणि सूरह बकरामध्ये उल्लेख आहे,

"आणि जेव्हा माझे भक्त तुम्हाला माझ्याबद्दल विचारतील तर (त्यांना सांगा की) मी तर सदैव निकट आहे. धांवा करणारा जेव्हा माझा धांवा करतो तेव्हा मी त्याच्या हांकेला प्रतिसाद देतो. तेव्हा त्याने माझ्या प्रतिसादाचा शोध घ्यावा माझ्यावर श्रद्धा ठेवावी जेणेकरून ते सन्मार्गावर येतील."

(दिव्य कुरआन, २:१८६)

४) दुआ पूर्ण लक्ष देऊन, एकाग्रचित्त होऊन मागा आणि अल्लाहकडून चांगली अपेक्षा राखा. स्वत:च्या अपराधांच्या ढिगावर नजर राखण्याऐवजी अल्लाहच्या असीम क्षमाशीलता, मेहरबानी आणि अमर्याद उदारतेवर नजर राखा. त्या माणसाची दुआ खऱ्या अर्थाने दुआच नव्हे जो गाफील, बेपर्वा असावा आणि भावशून्यतेसह केवळ जिभेव्दारे काही शब्दोच्चार करीत असेल आणि अल्लाहशी चांगली भावना बाळगून नसेल.

हदीसमध्ये उल्लेख आहे, "आपल्या दुआ-प्रार्थना कबूल होण्याचा विश्वास राखत (अगदी मनापासून) दुआ करा. अल्लाह अशी दुआ कबूल करत नाही जी गाफील आणि बेपर्वा मनातून निघाली असेल." (हदीस : तिर्मिजी)

५) दुआ अतिशय नम्रतेने व गयावया करीत मागा. इथे गयावया करण्याशी अभिप्रेत तुमचे मन अल्लाहचा रोब दबदबा, त्याची महानता व प्रतापाने भयकंपित असेल आणि शरीराच्या बाह्यवस्थेवरही अल्लाहचे भय पूर्णत: दिसून यावे. डोके व दृष्टी खाली झुकलेली असावी, आवाज खालचा असावा. डोळे सजल असावेत आणि समस्त हावभावांनी तुमची गरजवानता व विवशता दिसून यावी.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एका माणसाला पाहिले की तो नमाजच्या स्थितीत आपल्या दाढीच्या केसांशी खेळत आहे. तेव्हा त्यांनी सांगितले, जर त्याच्या मनात करूणा गयावया असती तर त्याच्या शरीरावरही कंप दिसून आला असता.

वास्तविक दुआ मागते वेळी माणसाने या विचाराने भयकंपित झाले पाहिजे की मी तर एक गरजू फकीर, निराधार गरीब दुबळा आहे. आज अल्लाह करो जर या दरवाजा वरून धुतकारलो गेलो तर मग माझ्यासाठी कोणतेही ठिकाण नाही. माझ्याजवळ स्वत:चे असे काहीच नाही जे काही लाभले आहे ते दयाळू अल्लाहकडूनच मिळाले आहे आणि जर अल्लाहने न दिल्यास जगात असा कोणी नाही जो मला काही देऊ शकेल, अल्लाहच प्रत्येक चीवस्तूचा उत्तराधिकारी आहे. त्याच्याचजवळ प्रत्येक वस्तूचा खजिना आहे. मनुष्य तर केवळ फकीर आणि विवश व अगतिक दास आहे. पवित्र कुरआनात ताकीद आहे,

"आपल्या पालनकर्त्याला हाक मारा विनवणी करून आणि मौनपणे. खचितच तो मर्यादांचे उल्लंघन करणाऱ्याला पसंत करीत नसतो."

*(दिव्य कुरआन, ७:५५)*

दास्यत्वाची हीच विशेषता की दासाने आपल्या पालनकर्त्याला मोठ्या नम्रतेने व गयावया करीत पुकारावे आणि त्याचे मन-मस्तिष्क, चिंतन, मनन, सर्वकाही अल्लाहसमोर नतमस्तक असावे आणि त्याच्या संपूर्ण अंतबाह्य स्थितीद्वारे गरज व आर्जव प्रकट होत असावे.

६) दुआ हळूहळू धीम्या आवाजात मागा. अल्लाहसमोर गयावया करा, परंतु या रूदनावस्थेचे

प्रदर्शन मुळीच करू नका. दासांची विनम्रता, विवशता व आर्जव केवळ अल्लाहसमोर व्हायला हवे.

नि:संशय कधी कधी दुआ मोठमोठ्यानेही करू शकता पण एकतर एकांतात असे करा किंवा मग जेव्हा सामूहिक दुआ केली जात असेल त्या वेळी उंच स्वरात दुआ करा. यासाठी की इतरांनी "आमीन" म्हणावे. सर्वसाधारण परिस्थितीत हळू स्वरात दुआ मागा आणि या गोष्टीची पुरेपूर काळजी घ्या की तुमची रूदन स्वराने केलेली याचना लोकांना दाखविण्यासाठी कदापि नसावी.

"हे पैगंबर (स.), आपल्या पालनकर्त्याचे सकाळी व संध्याकाळी स्मरण करीत जा, मनातल्या मनात, अनुनय विनय आणि भय बाळगून आणि तोंडाने देखील हलक्या आवाजात. तुम्ही त्या लोकांपैकी बनू नका जे गाफील बनले आहेत." *(दिव्य कुरआन, ७:२०५)*

आदरणीय जकरिया (अ.) यांच्या उच्च दर्जाच्या दास्यत्वाची प्रशंसा करतांना कुरआनात सांगितले गेले आहे.

"जेव्हा त्याने आपल्या पालनकर्त्याला गुपचूपपणे पुकारले." *(दिव्य कुरआन, १९:३)*

७) दुआ करण्यापूर्वी एखादे सत्कर्म करा. उदा. काही दान-पुण्य करा एखाद्या भुकेल्या व्यक्तीला पोटभर जेऊ घाला किंवा नफील नमाज आणि रोजा राखा आणि जर दुर्दैवाने एखाद्या संकटात सापडाल तर आपल्या सत्कर्माच्या वशिल्याने दुआ करा. जे तुम्ही मनापासून फक्त अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी केले असावे. पवित्र कुरआनात उल्लेख आहे,

"त्याच्याचकडे पवित्र वचने वर जातात आणि सत्कर्मे त्यांचे उच्च दर्जे ठरवितात."
*(दिव्य कुरआन, ३५:१०)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एकदा तीन अशा लोकांची घटना सांगितली जे एका अंधारमय रात्री एका गुहेत फसले होते. त्या लोकांनी आपल्या प्रामाणिक व मनापासून केलेल्या सत्कर्माचा वास्ता देऊन अल्लाहजवळ दुआ केली आणि अल्लाहने त्यांच्यावरील संकट दूर केले.

घटना अशी घडली की तीन साथीदारांनी एक रात्र गुहेत आश्रय घेतला, अल्लाहची करणी, पर्वतावरून एक मोठी शीला ढसळून गुहेच्या तोंडावर येऊन पडली आणि गुहा बंद झाली. ती शीला म्हणजे मोठा भारदस्त आणि विशालकाय दगड होता. त्याला हटवून गुहेचा बंद मार्ग खुला करणे त्यांच्या अवाक्याचे नव्हते. तेव्हा असे ठरले की आपापल्या जीवनातील मनापासून केलेल्या सत्कर्माचा वास्ता देऊन अल्लाहजवळ दुआ केली जावी, नवल नव्हे की अल्लाहने दुआ कबूल करावी आणि या संकटापासून मुक्ती मिळावी. यास्तव एकजण म्हणाला, मी जंगलात शेळ्या चारत असे आणि माझ्या उदरभरणाचे तेच एक साधन होते.

जेव्हा मी जंगलातून परत येत असे तेव्हा सर्वात प्रथम आपल्या वृध्द माता-पित्यास दूध पाजत असे मग आपल्या मुलाबाळांना. एके दिवशी मी उशिरा आलो वृध्द माता-पिता झोपी गेले होते. मुले मात्र जागी होती आणि भुकेली होती. परंतु मला हे उचित वाटले नाही की माता-पित्याच्या आधी मुलांना पाजावे आणि हेही उचित वाटले नाही की त्यांना जागे करून त्रास पोहचवावा. यास्तव रात्रभर दुधाचा प्याला हाती घेऊन त्यांच्या डोक्याशी उभा राहीलो. मुले माझ्या पायांशी बिलगून रडत राहिले, परंतु मी सकाळपर्यंत तसाच उभा राहिलो. "हे अल्लाह! मी हे सत्कर्म फक्त तुझ्या प्रसन्नतेसाठी केले. तू या सत्कर्माच्या प्रभावाने गुफेच्या तोंडावर बसलेला हा दगड हटवून दे" आणि ती शिला इतकी हटली की आकाश दिसू लागले.

दुसरा साथीदार म्हणाला, मी काही मजूरांकडून काम घेतले आणि सर्वांनी मजुरी दिली. परंतु एक मनुष्य आपली मजुरी सोडून गेला. काही दिवसांनी जेव्हा तो मजुरी घेण्यास आला तेव्हा मी त्याला म्हणालो, या गायी, या शेळ्या आणि हे नोकर चाकर सर्व तुमचे आहेत. घेऊन जा, तो म्हणाला, अल्लाहकरिता मस्करी करू नका. मी म्हणतो, थट्टा नाही, खरंच हे सर्व काही तुमचेच आहे. तुम्ही जी रक्कम सोडून गेले होते. मी ती व्यवसायात लावली. अल्लाहने त्यात समृद्धी दिली आणि हे जे काही तुम्ही पाहत आहात. सर्व त्याद्वारेच प्राप्त झाले आहे. तुम्ही हे सर्व नि:संकोचपणे घेऊन जा. कारण सर्व तुमचेच आहे. तो मनुष्य सर्वकाही घेऊन गेला. "हे अल्लाह! हे सर्व फक्त तुझ्या प्रसन्नतेसाठी केले. हे अल्लाह, तू या सत्कर्माच्या अनुरोधाने गुहेच्या तोंडावर असलेली विशाल काय शिला दूर कर." अल्लाहच्या कृपेने तो अवाढव्य दगड आणखी थोडा सरकला.

तिसरा म्हणाला, माझी एक चुलत बहीण होती जिच्याशी मी अतोनात प्रेम करू लागलो. अडचणीच्या प्रसंगी तिने काही रक्कम मागितली. मी या अटीवर तिला रक्कम देऊ केली की तिने माझी इच्छा पूर्ण करावी. परंतु जेव्हा मी आपली इच्छा पूर्ण करण्याचा प्रयत्न केला तेव्हा ती म्हणाली, अल्लाहचे भय बाळगा आणि या दुष्कर्मापासून परावृत्त व्हा. मी त्वरीत थांबलो आणि ती रक्कमही तिला बक्षीस म्हणून देऊन टाकली. "हे अल्लाह! तू चांगल्या प्रकारे जाणतो की मी हे सर्व केवळ तुझी प्रसन्नता प्राप्त करण्याच्या इराद्याने केले. हे अल्लाह! तू या सत्कर्माच्या मोबदल्यात गुहेचे बंद झालेले तोंड खुले कर. अल्लाहने गुहेच्या तोंडावर बसलेली ती प्रचंड शीला हटविली आणि त्या तिघांना ही अल्लाहने संकटमुक्त केले."

८) चांगल्या नेक उद्देशांकरिता दुआ करण्यासोबत आपल्या जीवनाला अल्लाहच्या मार्गदर्शनानुसार सुधारण्याचाही प्रयत्न करा. अपराध कृत्य आणि अवैध गोष्टीपासून पूर्णपणे अलिप्त राहा. प्रत्येक कृतीत अल्लाहच्या मार्गदर्शनाला विचाराधीन राखा आणि दुराचारापासून दूर राहून जीवन व्यतीत करा. हरामाचे खाऊन, पिऊन आणि हरामाचे कपडे नेसून आणि निडरपणे हरामाच्या मालाने आपले शरीर पोसून दुआ करणाराही इच्छा बाळगेल की माझी दुआ कबूल व्हावी. तर ही फार मोठी नादानी व धीट वृत्ती आहे. दुआ

कबूल केली जाण्यायोग्य बनण्याकरिता आवश्यक आहे की माणसाचे वचन-कर्मदेखील धर्माच्या मार्गदर्शनानुसारच असावे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "अल्लाह पवित्रतम आहे आणि तो फक्त शुध्द चीज वस्तू कबूल करतो आणि अल्लाहने ईमानधारकांना त्याच गोष्टींचा आदेश दिला आहे, ज्याविषयी त्याने आपल्या पैगंबरांना आदेश दिला आहे. यास्तव त्याने सांगितले आहे.

"हे पैगंबरांनो ! शुध्द रोजी (अन्न सामग्री) खा आणि सत्कर्म करा."

*(दिव्य कुरआन, २३:५१)*

आणि ईमानधारकांना संबोधून अल्लाहने सांगितले, "हे ईमानधारकांनो! ज्या वैध आणि शुध्द वस्तू आम्ही तुम्हाला प्रदान केल्या आहेत, त्या खा."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एका अशा माणसाचा उल्लेख केला. जो खूप लांबचा प्रवास करून पवित्र स्थळी हजर होतो. धुळीने माखलेला आणि आपले दोन्ही हात आकाशाकडे उंचावून म्हणतो, हे माझ्या पालनकर्त्या! हे माझ्या पालनकर्त्या! वास्तविक त्याचे खाणे निषिध्द आहे, त्याचे पिणे निषिध्द आहे, त्याचा पोषाख निषिध्द आहे आणि निषिध्द मार्गानेच त्याचे शरीराचे पोषण झाले आहे, तेव्हा अशा विद्रोही आणि अवज्ञाकारी माणसाची दुआ का म्हणून कबूल होऊ शकते? (हदीस : मुस्लिम)

९) सातत्याने दुआ करीत राहा. अल्लाहसमोर आपली विनम्रता, शालीनता, विवशता आणि दास्यत्व प्रकट करणे ही उपासना आहे. अल्लाहने स्वत: दुआ करण्याचा आदेश दिला आहे आणि सांगितले आहे, दास जेव्हा मला पुकारतो, तेव्हा मी त्याची पुकार ऐकतो. दुआ करण्याबाबत कंटाळा येऊ देऊ नका आणि या विचारात गुरफटून जाऊ नका की दुआ केल्याने नशीब पालटेल किंवा नाही. भाग्य बदलणे किंवा न बदलणे, दुआ कबूल करणे किंवा न करणे अल्लाहचे काम आहे जो जाणणारा आणि हिकमत बाळगणारा आहे. दासाचे काम एवढेच की त्याने एक लाचार व गरजू याचकाप्रमाणे सतत त्याच्याजवळ याचना करत राहावी आणि क्षणभरसुध्दा स्वत:ला नि:स्पृह समजू नये.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले, "सर्वात मोठा अगतिक व विवश तो आहे, जो दुआ करण्यात अगतिक आहे." तसेच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असेही सांगितले, "अल्लाहच्या दृष्टीने दुआपेक्षा जास्त प्रतिष्ठा व सन्मानपूर्ण गोष्ट दुसरी कोणतीही नाही."

(हदीस : तिर्मिजी)

ईमानधारकांचे वैशिष्टय हे की तो सुख-दु:खात आराम व क्लेश-यातनेत, अडचणीत व समृद्ध अवस्थेत संकटात व सुस्थितीत. तात्पर्य प्रत्येक अवस्थेत अल्लाहलाच पुकारतो. त्याच्याच समोर आपल्या गरजा मांडतो आणि सतत त्याच्याजवळ दुआ मागत राहतो.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे, "जो मनुष्य अल्लाहजवळ दुआ करीत नाही,

अल्लाह त्याच्यावर क्रोधित होतो." (हदीस : तिर्मिजी)

१०) दुसऱ्या कबूल होण्याच्या संदर्भात अल्लाहवर पुरेपूर विश्वास राखा आणि जर दुआ कबूल होण्याची चिन्हे लवकर दिसून येत नसतील तर निराश होऊन दुआ करणे सोडून देण्याची चूक कधीही करू नका. दुआ कबूल होण्याच्या काळजीत त्रस्त होण्याऐवजी फक्त दुआ मागत राहण्याची चिंता करा.

माननीय उमर (रजि.) सांगतात, "मला दुआ कबूल होण्याची चिंता नाही, मला फक्त दुआ मागण्याची चिंता आहे. जेव्हा मला दुआ मागण्याची सुबुद्धी लाभेल तर दुआ कबूल होणेही त्यासोबत होईल."

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे, जेव्हा एखादा ईमानधारक अल्लाहजवळ काही मागण्याकरिता अल्लाहकडे (याचना भावनेने) तोंड वर करतो तेव्हा अल्लाह त्यांची याचना अवश्य पूर्ण करतो. एकतर त्याचे मनोवांछित साध्य होते, अन्यथा अल्लाह, त्याच्यासाठी मागितलेली वस्तू पारलौकिक जीवनाकरिता संग्रहित करतो. कयामतच्या दिवशी, अल्लाह अशा ईमानधारक दासाला आपल्यासमोर बोलावील आणि त्याला आपल्या समक्ष उभा करून विचारेल, "हे माझ्या दासा! मी तुला दुआ करण्याचा आदेश दिला होता आणि वायदा केला होता की मी तुझी दुआ अवश्य कबूल करेन. तर काय तू दुआ मागितली होती? तो म्हणेल, "हे पालनकर्त्या! मागितली होती." मग अल्लाह सांगितले, "तू माझ्याजवळ जी दुआ मागितली होती ती मी कबूल केली. काय तू अमुक एका दिवशी ही दुआ मागितली नव्हती की मी तुझे ते दु:ख दूर करावे, ज्यात तू ग्रस्त होतास आणि मी तुला दु:खातून मुक्त केले होते?" दास म्हणेल, "अगदी खरे आहे पालनकर्त्या!" मग अल्लाहने सांगितले, "ही दुआ तर मी कबूल करून जगातच तुझी इच्छा पूर्ण केली होती, मग अमुक एका दिवशी तू दुसऱ्या दु:खात सापडल्यावर दुआ केली की 'हे पालनकर्त्या! या संकटातून मला सोडव.' परंतु तू या दु:खातून मुक्त झाला नाहीस आणि सतत त्यात ग्रस्त राहिला." तो म्हणेल, "मी या दुआच्या मोबदल्यात जन्नतमध्ये तुझ्यासाठी वेगवेगळ्या प्रकारच्या देणग्या जमा करून ठेवल्या आहेत आणि अशाच प्रकारे इतर गरजांसंबंधीही जाणून घेऊन असेच सांगितले."

मग पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "ईमानधारक दासाची कोणतीही दुआ अशी नसेल जिच्याविषयी अल्लाह हे न सांगेल की मी ही दुआ जगात कबूल केली आणि अमुक दुआ आखिरतसाठी जमा करून ठेवली. त्या वेळी ईमानधारक दास विचार करेल कदाचित, माझी कोणतीही दुआ कबूल झाली नसती. यास्तव दासाने प्रत्येक स्थितीत दुआ मागत राहिले पाहिजे." (हाकीम)

११) दुआ मागतेवेळी बाह्य शिष्टाचार, शुचिर्भूतता आणि साफ-सफाईचे पुरेपूर ध्यान राखा आणि मनालाही दूषित भावनांपासून, घाणेरड्या विचारांपासून आणि वाह्यात गोष्टींपासून दूर ठेवा.

कुरआनात उल्लेख आहे,

"नि:संशय अल्लाहला पश्चाताप करणारे आवडतात. आणि पावित्र्य राखणारेही त्याला आवडतात." *(दिव्य कुरआन, २ :२२२)*

**आणि कुरआनच्या सूरह मुद्दस्सिर मध्ये आहे.**

"उठा आणि खबरदार करा.आणि आपल्या पालनकर्त्याच्या महानतेची घोषणा करा." (दिव्य कुरआन, ७४:२-३)

**१२) इतरांसाठीही दुआ करा, परंतु नेहमी स्वत:पासून सुरूवात करा. प्रथम आपल्या स्वत:साठी मागा, नंतर दुसऱ्याकरिता. पवित्र कुरआनात माननीय इब्राहीम आणि माननीय नूह (अ.) यांच्या ज्या दुआ उल्लेखिल्या ज्याद्वारे हाच बोध घडतो.**

**रब्बिज अलनी मुक़ीमस्सलाति व मिन ज़ुर्रीयती, रब्बना व तक़ब्बल दुआ।**
**रब्बनग़फिरली व लि-वालिदय-य व लिल मुअ्मिनी-न यौ-म यक़ूमुल हिसाब।**

"हे पालनकर्त्या! मला नमाज कायम करणारा बनव व माझ्या संततीपासूनदेखील (असे लोक उभे कर जे हे काम करतील) पालनकर्त्या! माझी प्रार्थना स्वीकार कर, हे पालनकर्त्या! मला आणि माझ्या आई-वडिलांना आणि सर्व ईमानधारकांना त्या दिवशी माफ कर जेव्हा हिशेब प्रस्थापित होईल." *(दिव्य कुरआन, १४:४०-४१)*

**रब्बिग़ फ़िरली व लिवालि-दय-य व लिमन द-ख़-ल बैति-य मुअ्मिनवँ व लिल मुअ्मिनी-न वल मुअ्मिनात.**

माझ्या पालनकर्त्या मला व माझ्या आईवडिलांना आणि त्या प्रत्येक माणसाला जो माझ्या घरात श्रद्धावंत म्हणून शिरला आहे आणि सर्व श्रद्धावंत पुरुषांना आणि स्त्रियांना क्षमा कर, आणि अत्याचाऱ्यांसाठी विनाशाशिवाय अन्य कोणत्याही गोष्टीत वाढ करू नकोस."

*(दिव्य कुरआन, ७१:२८)*

**माननीय उबई बिन काब (रजि.) सांगितले की "पैगंबर मुहम्मद (स.) जेव्हा एखाद्या माणसाचा उल्लेख करीत तेव्हा त्याच्यासाठी दुआ करीत आणि प्रथम आपल्या स्वत:साठी दुआ मागत."** (हदीस : तिर्मिजी)

**१३) जर तुम्ही इमामत (नमाजचे नेतृत्व) करीत असाल तर नेहमी सर्वकष दुआ मागा आणि अनेक वचनाचा वापर करीत जा. पवित्र कुरआनात ज्या दुआंचा उल्लेख केला गेला आहे. त्यात सर्वसाधारणपणे अनेक वचनाचा वापर केला गेला आहे. इमाम, खरे पाहता सर्व नमाजी लोकांचा प्रतिनिधी आहे. जेव्हा तो अनेकवचनाचा दुआ मागेल तेव्हा सर्व नमाजी लोकांनी "आमीन" म्हणत जावे.**

१४) दुआ करण्यात संकुचित दृष्टी आणि स्वार्थीपणापासून दूर राहा आणि अल्लाहच्या दया-कृपेला मर्यादित समजण्याची चूक करून त्याच्या मेहरबानीला केवळ स्वत:साठी खास करून घेणारी दुआ करू नका.

माननीय अबू हुरैरा (रजि.) सांगतात की मशिदे नबवीमध्ये एक ग्रामीण अरब आला. त्याने नमाज अदा केली, मग दुआ मागितली व म्हणाला, हे अल्लाह! माझ्यावर आणि मुहम्मद (स.) यांच्यावर दया कर आणि आमच्यासोबत आणखी कोणावर दया करू नकोस. तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"तू अल्लाहच्या विस्तृत दया-कृपेला संकुचित केले." (हदीस : बुखारी)

१५) दुआ साध्या-सरळ शैलीत गयावया करीत मागा. गायनाच्या सूरात दुआ मागू नका. तथापि नि:संकोचपणे कधी जिभेने उंच स्वरात काही शब्द निघाले किंवा चुकीने काही शब्द सुटल्यास काही हरकत नाही. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याद्वारेही काही दुआ अशा उल्लेखित केल्या गेल्या आहेत, ज्यांत उच्च शब्दाचा वापर केला गेला आहे. उदाहरणार्थ, त्यांची एक फारच सर्वकष दुआ माननीय जैद बिन अकरम (रजि.) द्वारे उल्लेखित केली गेली आहे.

"अल्लाहुम-म इन-नी अ-ऊजुबि-क मिन क़लबिल ला यख-शउ व नफ़सिल ला तश-बउ व इलमिल ला यन-फ़उ, व दअ्वतिल ला युस्तजाबु लहा."

हे अल्लाह! मी तुझ्या आश्रयास येतो त्या मनाने ज्यात मृदुता नसावी, त्या आत्म्याने ज्यात संयम नसावा त्या ज्ञानाने जे लाभदायक नसावे आणि त्या दुआ सहजी कबूल नसावी."

१६) अल्लाहच्या दरबारात आपली गरज मांडण्यापूर्वी त्याची प्रशंसा करा मग दोन रकअत नफ्ल नमाज अदा करा आणि दुआच्या सुरूवातीस आणि शेवटी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर दरूद पाठविण्याचाही इतमाम राखा.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"जेव्हा एखाद्या माणसाला अल्लाह किंवा एखाद्या माणसाकडून गरज पूर्ण करण्याचा मामला समोर असेल तर त्याने प्रथम वुज़ू करून दोन रकअत नमाज पढावी, नंतर अल्लाहच्या प्रशंसा करावी आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर दरूद व सलाम पाठवावा (त्यानंतर अल्लाहच्या दरबारात आपली गरज मांडावी)." (हदीस : तिर्मिजी)

पैगंबर मुहम्मद (स.) यांची साक्ष आहे की दासाची जी दुआ अल्लाहची प्रशंसा आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर दरूद व सलामसह पोहोचते, ती कबूल होते. माननीय फुजाला (रजि.) सांगतात की पैगंबर मुहम्मद (स.) मशिदीत स्थानापन्न होते, तेवढ्यात एक मनुष्य आला, त्याने नमाज अदा केली आणि नमाजनंतर म्हणाला, हे अल्लाह! माझी जहन्नमपासून सुटका कर."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हे ऐकून त्याला म्हटले, "तुम्ही दुआ मागण्यात घाई केली. जेव्हा नमाज संपवून बसाल तेव्हा प्रथम अल्लाहची प्रशंसा करा, मग दरूद शरीफचे पठण करा, त्यानंतर दुआ मागा." पैगंबर मुहम्मद (स.) हे सांगत असतानाच एक दुसरा मनुष्य आला आणि त्याने नमाज अदा करून अल्लाहची व प्रशंसा केली, दरूद शरीफचे पठण केले. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "आता दुआ मागा अवश्य कबूल होईल."

(हदीस : तिर्मिजी)

१७) अल्लाहजवळ सदासर्वदा दुआ मागत राहा, यासाठी की तो आपल्या दासांचे गाऱ्हाणे ऐकण्यास कंटाळा करीत नाही. परंतु हदीसद्वारे हे कळून येते की काही विशिष्ट समय आणि अवस्था अशा आहेत, ज्यात विशेषत्वाने दुआ लवकर कबूल होतात. म्हणून या विशिष्ट वेळी आणि अवस्थांमध्ये दुआ करण्याचा खास इतमाम राखा.

(अ) रात्रीच्या उत्तरार्धात अगदी शांत वातावरणात, जेव्हा सर्वसामान्यत: लोक गाढ निद्रेच्या अधीन असतात. जो मनुष्य झोपेतून उठून आपल्या पालनकर्त्याशी रहस्यभेदाच्या गोष्टी करतो आणि अगदी लीन व गरजवंत बनून आपल्या गरजा त्याच्यासमोर ठेवतो तेव्हा अल्लाह विशेष कृपा करतो.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाह प्रत्येक रात्री या जगावरच्या आकाशावर संपूर्ण प्रतापासह प्रकट होतो, येथपावेतो की रात्रीचा अंतिम हिस्सा बाकी राहतो तेव्हा तो सांगतो की कोण मला पुकारतो की मी त्याची दुआ कबुल करावी? कोण माझ्याजवळ याचना करतो की मी त्याला प्रदान करावे आणि कोण माझ्याजवळ जहन्नमपासून मुक्तीची अभिलाषा करतो की मी त्याला माफ करावे." (हदीस : तिर्मिजी)

(आ) शबे कद्रच्या प्रसंगी जास्तीतजास्त दुआ करा की ही रात्र अल्लाहच्या ठायी एक हजार महिन्यांपेक्षा अधिक श्रेष्ठ आहे. तेव्हा ही दुआ खासरित्या पढत जा.

"अल्लाहुम-म इन्न-क अफुव्वुन तुहिब्बुल अफ़-व फ़अफु अन्नी."

हे अल्लाह ! तू अतिशय जास्त माफ करणारा आहेस माफ करण्यास पसंत करतो. तेव्हा तू मला माफ कर." (हदीस : तिर्मिजी)

(इ) अरफातच्या मैदानात जेव्हा जिलहिज्जा महिन्याच्या ९ तारखेला अल्लाहचे अतिथी (हजयात्री) जमा होतात. (हदीस : तिर्मिजी)

(ई) जुमाच्या (शुक्रवार) दिवशी खास घटीकेत, जी जुमाचा खुतबा (प्रवचन) सुरू होण्यापासून नमाज संपण्यापर्यंत आहे किंवा अस्त्रच्या नमाजनंतर पासून मगरीबच्या नमाजपर्यंत आहे.

(उ) अजानच्या वेळी आणि जिहादच्या मैदानात जेव्हा योद्धयांच्या रांगा सरळ केल्या जात असतील.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"दोन गोष्टी अल्लाहच्या दरबारात रद्द केल्या जात नाही, एक अजानच्या वेळी केलेली दुआ, दुसरी जिहाद प्रसंगी (पंक्तीबद्ध होताना) केलेली दुआ." (हदीस : अबू दाऊद)

(ऊ) अजान आणि तक्बीरच्या दरम्यान.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभकथन आहे,

"अजान आणि इकामत (जमातची नमाज सुरू होण्याची वेळ) या दरम्यानची दुआ रद्द केली जात नाही पैगंबर मुहम्मद (स.) यांचे सहकारी म्हणाले, हे अल्लाहचे पैगंबर! यादरम्यान कोणती दुआ मागावी ? सांगितले, ही दुआ मागत जा,

अल्लाहुम-म इन्नी अस-अलुकल अफ़-व वल आफ़ि-य-त फिद्दुनिया वल आखिरह.

हे अल्लाह! मी तुझ्याकडून माफी, मेहेरबानी क्षेम-कुशल आणि सलामतीची याचना करतो. या जगातही आणि मरणोत्तर जीवनातही."

(ए) रमजानच्या शुभ महिन्यात, विशेषत: रोजा-व्रत सोडते वेळी. (बज्जार)

(ऐ) फर्ज नमाजांच्या नंतर, मग तुम्ही एकट्याने दुआ करीत असा किंवा इमामसह. (हदीस : तिर्मिजी)

(ओ) सजदाच्या अवस्थेत पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"सजद्याच्या स्थितीत दास आपल्या पालनकर्त्यांशी अगदी निकट होतो, तेव्हा तुम्ही या अवस्थेत जास्तीतजास्त दुआ मागा."

(औ) जेव्हा तुम्ही फार मोठ्या संकटात किंवा अत्याधिक दु:खात असाल. (हाकीम)

(अं) जेव्हा अल्लाहच्या स्मरणाची व त्याविषयी विचार-चिंतनाची एखादी धार्मिक बैठक असेल. (हदीस : बुखारी, मुस्लिम)

(अ:) जेव्हा कुरआनाचे संपूर्ण पठण केले जावे. (तबरानी)

१८) खालील स्थानांवर दुआ मागण्याचा खास इतमाम राखा. माननीय हसन बसरी जेव्हा मक्केहून बसरा येथे जाऊ लागले. तेव्हा त्यांनी मक्कावासींच्या नावे एक पत्र लिहिले, ज्यात मक्का येथे वास्तव्य करण्याचे महत्व आणि श्रेष्ठता सांगितली आणि हेही सांगितले की या ठिकाणांवर विशेषत्वाने दुआ कबूल होते.

(क) मुल्तजमच्या जवळ, (ख) मीजाबच्या खाली, (ग) काबागृहाच्या आंत, (घ) जमजमच्या विहीरीजवळ. (च) सफा आणि मरवा पहाडांवर जिथे 'सई' केली जाते, (छ) मकामे इब्राहीमच्याजवळ (ज) अरफातच्या मैदानात (झ) मुजदल्फामध्ये (ट) मिनामध्ये (ठ) तिन्ही जमरातजवळ. (हिस्ने हसीन)

१९) सतत हा प्रयत्न करा की तुम्हाला, दुआ मागण्याकरिता, दुआचे तेच शब्द स्मरणात असावेत जे पवित्र कुरआनात आणि हदीसच्या ग्रंथात उल्लेखित आहेत. अल्लाहने आपल्या नेक व सदाचारी दासांना प्रामुख्याने पैगंबरांच्या दुआ मागण्याची जी शैली आणि शब्द सांगितले आहेत, त्याहून अधिक चांगली शैली आणि चांगले शब्द कोठून आणणार ? मग अल्लाहने सांगितलेले आणि पैगंबरांनी अंगीकारलेल्या शब्दांमध्ये जो प्रभाव, गोडी, समृद्धी, स्वीकृतीची भव्यता आणि व्यापकता असू शकते, ती दुसऱ्या शब्दांत कशी असू शकते. त्याचप्रमाणे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी दिवस-रात्र ज्या दुआ प्रार्थना मागितल्या आहेत. त्यात जी तळमळ, गोडी, व्यापकता आणि दास्यत्व भांवनेची अशी शान आढळून येते की त्याहून अधिक चांगल्या दुआ आणि याचनांसंबंधी कल्पनाही केली जाऊ शकत नाही.

कुरआन व हदीसवचनात उल्लेखिलेल्या दुआंचे वारंवार पठण करा. त्यातल्या शब्दांवर आणि त्यांच्या अर्थावर लक्ष दिल्याने मनन-चिंतनाचे हे प्रशिक्षणही घडते की ईमानधारकांच्या इच्छा, अभिलाषा व विनवण्या कशा असाव्यात कोणत्या कामांसाठी त्याने आपले शक्ती सामर्थ्य लावले पाहिजे आणि कोणकोणत्या गोष्टींना त्याने आपले उद्दिष्ट ठरविले पाहिजे? नि:संशय दुआकरिता कोणत्याही भाषा, शैली किंवा ठराविक शब्दांचे बंधन नाही. दास आपल्या पालनकर्त्याजवळ वाटेल त्या भाषेत आणि शब्दांत दुआ मागू शकतो आणि ही अल्लाहची फार मोठी मेहेरबानी होय की त्यानेही सांगितले की माझ्याजवळ हे मागा आणि अशा प्रकारे मागा आणि दुआंचे शब्द निश्चित करुन दर्शविले की ईमानधारकाला दीन (धर्म) आणि पारलौकिक जीवनाच्या सफलतेकरिता कशा प्रकारे चिंतन केले पाहीजे आणि कोणत्या इच्छा- अभिलाषा बाळगल्या पाहिजेत आणि मग धर्म आणि ऐहिकतेची कोणतीही गरज आणि भलाईचा कोणताही पैलू असा नाही ज्यासाठी दुआ शिकवली गेली नाही. यास्तव श्रेयस्कर हेच की तुम्ही अल्लाहजवळ कुरआन व सुन्नत (पैगंबर आचरणशैली) ने सांगितलेल्या शब्दांत दुआ मागावी आणि त्याच दुआ-प्रार्थनांचे वारंवार पठण करावे. ज्यांचा कुरआनात उल्लेख केला गेला आहे. किंवा विविध प्रसंगी स्वत: पैगंबरांनी मागितल्या आहेत.

तथापि जोपर्यंत तुम्हाला कुरआन व हदीसच्या दुआ-प्रार्थना तोंडपाठ होत नाहीत, तोपर्यंत तुम्ही निदान आपल्या दुआ-प्रार्थनांमध्ये कुरआन व सुन्नत (पैगंबर आचरणा) ने सांगितलेल्या दुआंचा अर्थ व आशय डोळ्यांसमोर ठेवावा.

पुढे पवित्र कुरआन आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या काही सर्वंकष दुआ उल्लेखिल्या जात आहेत. या शुभ आणि लाभप्रद दुआ प्रार्थनांना तोंडी पाठ करून घ्या आणि यांनाच वारंवार प्रयोगात आणा.

# ४२. कुरआनातील दुआ-प्रार्थना

## दया कृपा व मोक्ष प्राप्तीची दुआ :

رَبَّنَا ظَلَمْنَآ اَنْفُسَنَا وَاِنْ لَّمْ تَغْفِرْ لَنَا وَتَرْحَمْنَا لَنَكُوْنَنَّ مِنَ

الْخَاسِرِيْنَ ٥ (الاعراف)

रब्बना ज़-लम्ना अनफु-स-ना व इल्लम तग़फिर लना व तर्हम्ना ल-न कूनन-न मिनल ख़ासिरिन.

"हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही स्वत:वर फार मोठा अत्याचार केला. जर तू आम्हाला माफ केले नाही आणि आमच्यावर दया केली नाही तर आम्ही खात्रीने नष्ट होऊन जाऊ."

*(दिव्य कुरआन, ७:२३)*

नि:संशय जर अल्लाहने माणसाचे अपराध माफ केले नाही आणि त्याला आपल्या कृपाछत्राखाली घेतले नाही तर तो निश्चितच बरबाद होईल.

## दोन्ही जगांच्या सफलतेची दुआ:

رَبَّنَآ اٰتِنَا فِى الدُّنْيَا حَسَنَةً وَّفِى الْاٰخِرَةِ حَسَنَةً وَّقِنَا عَذَابَ النَّارِ

रब्बना आतिना फ़िद-दुन्या ह-स-न-तवँ व फ़िल-आखिरति ह-स-न-तवँ व किना अज़ाबन्नार.

"हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला या जगातही भलाई प्रदान कर आणि मरणोत्तर जीवनातही भलाई प्रदान कर आणि (नरकाच्या) आगीच्या शिक्षा-यातनेपासून आमचा बचाव कर."

*(दिव्य कुरआन, २ : २०१)*

## संयम आणि स्थैर्याची दुआ :

رَبَّنَآ اَفْرِغْ عَلَيْنَا صَبْرًا وَّثَبِّتْ اَقْدَامَنَا وَانْصُرْنَا عَلَى الْقَوْمِ

الْكَافِرِيْنَ ٥ (البقرہ ٢٥٠)

रब्बना अफ़रिग़ अलैना सब-रवँ व साब्बित अक़्दा-मना वनसुरना अलल क़ौमिल क़ाफ़िरीन.

"हे पालनकर्त्या, आमच्यावर सहनशीलतेचा वर्षाव कर, आमचे पाय स्थिर कर आणि त्या अश्रद्धावंत समुदायावर आम्हाला विजयी कर"

*(दिव्य कुरआन, २:२५०)*

## सैतानाच्या उपद्रवापासून सुरक्षित राहण्याची दुआ :

رَبِّ اَعُوْذُ بِكَ مِنْ هَمَزَاتِ الشَّيَاطِيْنِ ٥ وَاَعُوْذُ بِكَ رَبِّ

اَنْ يَّحْضُرُوْنِ ٥ (المومنون ٩٧، ٩٨)

रब्बि अऊज़ु बि-क मिन ह-म ज़ातिश-शयातीन व अऊज़ु बि-क रब्बि अय्यँहजुरून.

"हे पालनकर्त्या! मी सैतानाद्वारे दुष्कर्मास प्रवृत्त करण्यापासून तुझा आश्रय घेतो, किंबहुना हे माझ्या पालनकर्त्या! मी या गोष्टीपासूनही तुझा आश्रय मागतो की त्याने माझ्याजवळ यावे." *(दिव्य कुरआन, २३:९७-९८)*

## जहन्नमच्या शिक्षा यातनेपासून सुरक्षित राहण्याची दुआ :

رَبَّنَا اصْرِفْ عَنَّا عَذَابَ جَهَنَّمَ إِنَّ عَذَابَهَا كَانَ غَرَامًا

إِنَّهَا سَاءَتْ مُسْتَقَرًّا وَمُقَامًا (الفرقان ٦٥، ٦٦)

रब्ब-नसरिफ अन्ना अज़ा-ब जहन्न-म, इन-न अज़ाबहा का-न ग़रामा। इन्नहा साअत मुस्तक़र्रँ व मुक़ामा.

"हे आमच्या पालनकर्त्या! जहन्नमची शिक्षा-यातना आमच्यापासून फिरव नि:संशय त्याची शिक्षा-यातना तर जीवघेणी आहे. ते अतिशय वाईट ठिकाण आणि अतिशय वाईट अशी जागा आहे." *(दिव्य कुरआन, २५:६५-६६)*

## हृदयाला सुधारण्याची दुआ :

رَبَّنَا لَا تُزِغْ قُلُوبَنَا بَعْدَ إِذْ هَدَيْتَنَا وَهَبْ لَنَا مِنْ لَدُنْكَ

رَحْمَةً إِنَّكَ أَنْتَ الْوَهَّابُ (آل عمران - ٨)

रब्बना ला तुज़िग कुलू-बना बअ-द इज़ हदैतना व हब लना मिल्लदुनु-क रह-म-तन इन्न-क अन्तल वह्हाब.

"हे पालनकर्त्या! जेव्हा तू आम्हाला सरळ मार्गास लावले आहे तर पुन्हा कदाचित आमच्या हृदयांना वक्रतेत अडकवू नको. आम्हाला आपल्यातर्फे दया-कृपा प्रदान कर की तूच खरोखर दाता आहेस." *(दिव्य कुरआन, ३:८)*

## हृदयाच्या शुध्दतेची दुआ :

رَبَّنَا اغْفِرْ لَنَا وَلِإِخْوَانِنَا الَّذِينَ سَبَقُونَا بِالْإِيمَانِ وَلَا تَجْعَلْ

فِي قُلُوبِنَا غِلًّا لِلَّذِينَ آمَنُوا رَبَّنَا إِنَّكَ رَءُوفٌ رَحِيمٌ ٥ (الحشر)

रब्बनग़फ़िर लना व लि इख्वानिनल्लज़ी-न स-ब कूना बिल ईमानि व ला तज-अल फ़ी कुलूबिना ग़िल्लल लिल्लज़ी-न आमनू रब्बना इन्न-क रउफुर्रहीम.

हे आमच्या पालनकर्त्या आम्हाला आणि आमच्या त्या सर्व बांधवांना क्षमा प्रदान कर ज्यांनी आमच्यापूर्वी श्रद्धा ठेवलेली आहे. आणि आमच्या मनामध्ये

श्रद्धावंतांविषयी कोणताही द्वेष ठेवू नकोस, हे आमच्या पालनकर्त्या, तू मोठा मेहरबान आणि दयावान आहेस." *(दिव्य कुरआन, ५९:१०)*

**परिस्थितीत सुधार घडवून आणण्याची दुआ :**

رَبَّنَآ اٰتِنَا مِنْ لَّدُنْكَ رَحْمَةً وَّهَيِّئْ لَنَا مِنْ اَمْرِنَا رَشَدًا (الكهف)

रब्बना आतिना मिल्लदुन-क रह-म-तवँ व हय्यि लना मिन अमरिना र-श-दा.

"हे पालनकर्त्या! आमच्यावर आपल्या येथून दया कृपा अवतरित कर आणि आमच्या मामल्यात सुधारणा कर." *(दिव्य कुरआन, १८:१०)*

**क्षमा याचना :**

رَبَّنَآ اٰمَنَّا فَاغْفِرْ لَنَا وَارْحَمْنَا وَاَنْتَ خَيْرُ الرّٰحِمِيْنَ ۝ (المؤمنون ۱۰۹)

**रब्बना आमन्ना फग़फिर लना वर्हमना व अन-त खैरूराहिमीन.**

**"हे पालनकर्त्या! आम्ही ईमान राखले, यास्तव तू आम्हाला क्षमा कर आणि आमच्यावर दया-कृपा कर, तू मोठा दया करणारा आहे."** *(दिव्य कुरआन, २३:१०९)*

**कुटुंबियांकडून शांती समाधान लाभावे त्यासाठी दुआ :**

رَبَّنَا هَبْ لَنَا مِنْ اَزْوَاجِنَا وَذُرِّيّٰتِنَا قُرَّةَ اَعْيُنٍ وَّاجْعَلْنَا لِلْمُتَّقِيْنَ

اِمَامًا (الفرقان ۷۴)

**रब्बना हबलना मिन अज़-वाजिना व जुर्रीयतिना कुर्र-त अअ-युनिवँ वज-अलना लिल मत्तक़ी-न इमामा.**

"हे आमच्या पालनकर्त्या, आम्हाला आमच्या पत्नीं व संततीपासून नेत्रसुख प्रदान कर आणि आम्हाला पापभीरूंचा नेता (मार्गदर्शक) बनव." *(दिव्य कुरआन, २५:७४)*

**अर्थात आम्हाला असे सदाचारी शुध्द जीवन प्रदान कर की अल्लाहचे भय राखून आचरण करणारे लोकांनी आम्हाला आपल्याकरिता आदर्श जाणावे.**

**माता-पिताकरिता दुआ :**

رَبَّنَا اغْفِرْلِيْ وَلِوَالِدَيَّ وَلِلْمُؤْمِنِيْنَ يَوْمَ يَقُوْمُ الْحِسَابُ (ابراہیم)

**रब्बनग़ाफिर ली व लिवालिदय-य व लिल मुअ्मिनी-न यौ-म यक़ूमुल हिसाब.**

**"हे पालनकर्त्या! मला व माझ्या माता पित्यास आणि समस्त ईमानधारकांना त्या दिवशी क्षमा कर, ज्या दिवशी हिशेब प्रस्थापित होईल."** *(दिव्य कुरआन, १४:४१)*

**कसोटीपासून सुरक्षित राहण्याची दुआ :**

رَبَّنَا لَا تُؤَاخِذْنَا إِنْ نَسِينَا أَوْ أَخْطَأْنَا رَبَّنَا وَلَا تَحْمِلْ عَلَيْنَا إِصْرًا كَمَا حَمَلْتَهُ عَلَى الَّذِينَ مِنْ قَبْلِنَا رَبَّنَا وَلَا تُحَمِّلْنَا مَا لَا طَاقَةَ لَنَا بِهِ وَاعْفُ عَنَّا وَاغْفِرْ لَنَا وَارْحَمْنَا أَنْتَ مَوْلَانَا فَانْصُرْنَا عَلَى الْقَوْمِ الْكَافِرِينَ ۝

"रब्बाना ला तुआख़िज़ना इन नसीना अव अख़-तअ् ना रब्बना व ला तहमिल अलैना इसरन कमा ह-मल-तहू अल्लज़ी-न मिन क़ब्लिना, रब्बना व ला तुहम्मिलना मा ला ता-क़-त-लना बिही, वअ-फु अन्ना वग़फ़िर लना, वर-हम-ना, अन-त मौलाना फ़न-सुरना अलल क़ौमिल काफ़िरीन."

"हे आमच्या पालनकर्त्या! आमच्या कडून नजर चूकीने जो अपराध घडेल, त्यासाठी पकडीत घेऊ नको. हे पालनकर्त्या! आमच्यावर ते ओझे टाकू नकोस, जे तू आमच्या पूर्वीच्या लोकांवर टाकले होते. पालनकर्त्या! जे ओझे उचलण्याची शक्ति आमच्या अंगी नाही, ते आमच्यावर ठेवू नकोस. आमच्याशी मृदुतापूर्ण (सौम्म) व्यवहार कर. आम्हाला क्षमा कर. आमच्यावर दया कर तूच आमचा मित्र व सखा आहेस. इन्कार करणाऱ्यांच्या विरोधात तू आमची मदत कर."

*(दिव्य कुरआन, २:२८६)*

**इन्कारी लोकांपासून मुक्तिची दुआ :**

عَلَى اللَّهِ تَوَكَّلْنَا رَبَّنَا لَا تَجْعَلْنَا فِتْنَةً لِلْقَوْمِ الظَّالِمِينَ ۝ وَنَجِّنَا بِرَحْمَتِكَ مِنَ الْقَوْمِ الْكَافِرِينَ ۝

अलल्लाहि त-वक्कलना रब्बना ला तज-अलना फ़ित-न-तल लिल क़ौमिज़्ज़ालिमीन व नज्जिना बिरहमतिक मिनल क़ौमिल काफ़िरीन.

"आम्ही अल्लाहवरच भरवसा केला. हे आमच्या पालनकर्त्या ! आम्हाला अत्याचारी लोकांसाठी उपद्रव बनवू नकोस आणि आपल्या दया कृपेने इन्कारी लोकांपासून मुक्ती दे."

*(दिव्य कुरआन, १०:८५-८६)*

**भलाईवर जीवन समाप्तीची दुआ :**

فَاطِرَ السَّمٰوٰتِ وَالْأَرْضِ أَنْتَ وَلِيّٖ فِي الدُّنْيَا وَالْآخِرَةِ تَوَفَّنِي مُسْلِمًا وَّأَلْحِقْنِي بِالصّٰلِحِينَ ۝ (يوسف ١٠١)

फ़ातिरस्समावाति वल अर-ज़ि अन-त वलीयी फ़िद् दुनिया वल आख़िरति त-वफ़्फ़नी मुस्लिमँव-व अल-हिक़्नी बिस्सालिहीन.

"आकाशांना आणि जमिनींना बनविणारा तूच इहलोकात व परलोकात माझा वाली आहेस, माझा शेवट इस्लामवर कर आणि परिणामांती मला सदाचारी लोकांबरोबर मिळव." *(दिव्य कुरआन, १२:१०१)*

त्याचप्रमाणे आणखी एक दुआ जिचा अर्थ असा,

رَبَّنَآ إِنَّنَا سَمِعْنَا مُنَادِيًا يُّنَادِيْ لِلْإِيْمَانِ اَنْ اٰمِنُوْا بِرَبِّكُمْ
فَاٰمَنَّا رَبَّنَا فَاغْفِرْ لَنَا ذُنُوْبَنَا وَكَفِّرْ عَنَّا سَيِّاٰتِنَا وَتَوَفَّنَا مَعَ
الْاَبْرَارِ ۝ رَبَّنَا وَاٰتِنَا مَا وَعَدْتَّنَا عَلٰى رُسُلِكَ وَلَا تُخْزِنَا
يَوْمَ الْقِيٰمَةِ ۝ اِنَّكَ لَا تُخْلِفُ الْمِيْعَادَ (آل عمران ١٩٣، ١٩٤)

**"रब्बना इन्नना समिअ-ना मुनादियय्युँनादी लिल ईमानी अन् आमिनू बिरब्बिकुम फ़आमन्ना, रब्बना फ़ग़फ़िर लना ज़ुनूबना व कफ़्फ़िर अन्ना सय्यिआतिना व त-वफ़्फ़ना म-अल-अबरार। रब्बना व आतिना मा व-अत्तना अला रुसुलि-क व ला तुख़्ज़िना यौमल क़ियामति इन्न-क ला तुख़्लिफ़ुल मीआद."**

"हे पालनकर्त्या स्वामी, आम्ही एका हांक देणाऱ्याला ऐकले जो श्रद्धेकडे बोलवीत होता आणि सांगत होता की आपल्या पालनकर्त्याला माना, आम्ही त्याचे निमंत्रण स्वीकारले, तर हे आमच्या स्वामी, जे अपराध आमच्याकडून झाले आहेत त्याबद्दल क्षमा कर, ज्या वाईट गोष्टी आमच्यात आहेत त्यांना काढून टाक आणि आमचा अंत सदाचारी लोकांसमवेत कर. हे प्रभू जी वचने तू आपल्या प्रेषितांद्वारे केलेली आहेस ती आम्हासाठी पूर्ण कर आणि पुनरुत्थानाच्या दिवशी आम्हाला नामुष्की देऊ नकोस, निःसंशय तू वचनभंग करणारा नाहीस." *(दिव्य कुरआन, ३:१९३-१९४)*

# ४३. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या दुआ (प्रार्थना)

पैगंबर मुहम्मद (स.) रात्रंदिवस, मग प्रवासात असो किंवा घरी, दुआ प्रार्थना मागत असत. हदीसच्या विद्वानांनी अत्याधिक परिश्रम घेऊन सर्व हदीसच्या ग्रंथांमध्ये त्या एकत्रित केल्या आहेत. पवित्र कुरआनातील दुआ प्रार्थनांच्या सोबत, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या या दुआही पढण्याचा इतमाम राखा. या दुआ प्रार्थना अतिशय सर्वकष, प्रभावी आणि समृध्दशाली आहेत. आणि यांच्याद्वारे हे मार्गदर्शनही लाभते की एका ईमानधारकांची विचारसरणी, त्याच्या इच्छा आकांक्षाचे उचित केंद्र, आणि त्याच्या अभिलाषा कोणत्या असाव्यात. खरे तर माणसाचे खरे रूप त्याच्या इच्छा अभिलाषामध्येच पाहीले जाऊ शकते. विशेष करून अशा वेळी जेव्हा माणसाला हे ही समाधान असावे की तो लोकांच्या नजरे पासून अदृश्य आहे. आणि त्याच्या कान गोष्टी ऐकणारा केवळ त्याचा पालनकर्ता आहे. पैगंबर मुहम्मद (स.) रात्रीच्या अंधारात एकांतात लोकांपासून वेगळे होऊन आणि लोकांच्या उपस्थितीत ज्या दुआ मागत असत. त्यांच्या प्रत्येक शब्दातून मनाची सचोटी, तळमळ आवड आणि एक आगळेच तेज टपकते आणि असे वाटते की कोणी महान दास आहे, ज्याला आपल्या दास होण्याची पूरेपूर जाणीव आहे आणि नखशिखान्त गरज बनून सदा सर्वदा आपल्या पालनकर्त्या जवळ याचना करीत राहतो. आणि त्याची आवड व ओढ सतत वाढत जाते. तो जे काही मागतो त्याचा सारांश हा की, हे अल्लाह ! मला आपले सान्निध्य प्रदान कर. आपल्या प्रकोपापासून सुरक्षित ठेव, आपल्या प्रसन्नतेने उपकृत कर आणि मरणोत्तर जीवनाची सफलता लाभू दे."

## सकाळ संध्याकाळच्या दुआ प्रार्थना :

माननीय उस्मान बिन अफ्फान (रजि.) उल्लेखितात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,

"अल्लाहचा जो कोणी दास रोज सकाळी व संध्याकाळी या दुआचे पठण करील, त्याला कोणतीही गोष्ट हानी पोहचविणार नाही."

بِسْمِ اللّٰهِ الَّذِي لَا يَضُرُّ مَعَ اسْمِهِ شَيْءٌ فِي الْأَرْضِ وَلَا فِي

السَّمَاءِ وَهُوَ السَّمِيعُ الْعَلِيمُ (مسند احمد)

बिस्मिल्लाहिल्लज़ी ला यजुर्रु म-अस-मिही शैउन फ़िल अर्ज़ि व ला फ़िस्समाइ व हुवस्समीउल अलीम.

"अल्लाहच्या नावाने (प्रत्येक कार्याचा) आरंभ आहे, ज्याच्या नावासह जमीन व आकाशाची कोणतीही चीज वस्तू नुकसान पोहचवू शकत नही. तो ऐकणारा व सर्वकाही जाणणारा आहे." (हदीस : मुसनद अहमद)

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) उल्लेखितात की पैगंबर मुहम्मद (स.) नित्य नेमाने सकाळ संध्याकाळ या दुआचे पठण करीत असत आणि कधीही सोडत नसत.

اَللّٰهُمَّ اِنِّیْ اَسْئَلُكَ الْعَافِيَةَ فِی الدُّنْيَا وَالْاٰخِرَةِ اَللّٰهُمَّ اِنِّیْ

اَسْئَلُكَ الْعَفْوَ وَالْعَافِيَةَ فِیْ دِيْنِیْ وَدُنْيَایَ وَاَهْلِیْ وَمَالِیْ

اَللّٰهُمَّ اسْتُرْ عَوْرَاتِیْ وَاٰمِنْ رَوْعَاتِیْ اَللّٰهُمَّ احْفَظْنِیْ مِنْ بَيْنِ

يَدَیَّ وَمِنْ خَلْفِیْ وَعَنْ يَمِيْنِیْ وَعَنْ شِمَالِیْ وَمِنْ فَوْقِیْ ، وَاَعُوْذُ

بِعَظْمَتِكَ اَنْ اُغْتَالَ مِنْ تَحْتِیْ (ترمذی)

अल्लाहुम-म इन्नी अस-अलुकल आफ़ि-य-त फ़िद-दुनया वल आख़िरति अल्लाहुम-म इन्नी अस अलुकल अफ़-व वल आफ़ि-य-त फ़ी दीनी व दुनया-य व अहली व माली अल्लाहुम्मस्तुर औराती व आमिन रौआती अल्लाहुम्मह-फ़ज़्नी मिम बैनी यदय-य व मिन ख़ल्फ़ी व अय्यँमीनी व अन शिमाली व मिन फ़ौक़ी, व अऊज़ु बिअज़्मति-क अन उग़ता-ल मिन तहती।

"हे अल्लाह! मी तुझ्याकडून लोक परलोक दोन्ही ठिकाणी क्षेम कुशल इच्छितो. हे अल्लाह! मी तुझ्याजवळ क्षमा, शांती सुरक्षितता आणि क्षेम कुशल मागतो धर्मासंबंधीच्या व जगाविषयीच्या मामल्यांमध्ये, आपल्या कुटूंबीयांच्या बाबतीत आणि आपल्या धन संपत्ती संदर्भात हे अल्लाह तू माझ्या व्यंग दोषांना झाकून ठेव आणि माझ्या विमनस्कतेस, शांती समाधानात परिवर्तित कर.

हे अल्लाह! मागे पुढे, उजव्या डाव्या बाजूला, आणि वरच्या बाजूने माझे रक्षण कर आणि मी तुझ्या महानतेचा आश्रय इच्छितो, या गोष्टी पासून की अचानक आपल्या खालच्या बाजूने नष्ट केले जावे (अर्थात हे अल्लाह, मला जमीनीत धसून जाण्याच्या शिक्षेपासून वाचव)."

(हदीस : तिर्मिजी)

## सुस्ती आणि भित्रेपणा पासून सुरक्षित राहण्याची दुआ :

माननीय अनस बिन मालिक (रजि.) यांचे कथन आहे की मी पैगंबर मुहम्मद (स.) यांची सेवा करण्यात मग्न रहात असे आणि मी जास्तीत जास्त त्यांना या दुआचे पठण करतांना ऐकत होता.

اَللّٰهُمَّ اِنِّیْ اَعُوْذُبِكَ مِنَ الْهَمِّ وَالْحُزْنِ وَالْعِجْزِ وَالْكَسَلِ،

وَالْبُخْلِ وَالْجُبْنِ وَضَلْعِ الدَّيْنِ وَغَلَبَةِ الرِّجَالِ - (بخاری مسلم)

अल्लाहम-म इन्नी अऊज़ुबि-क मिनल हम्मि वल हुज़्नि वल इजज़ि वल क-स-लि, वल बुख़लि वल जुबनि व जलइद्दैनि व ग़-ल-बतिर्रिजाल.

"हे अल्लाह! मी तुझे आश्रय मागतो, शोक व दु:खापासून विवशता व सुस्ती पासून, कृपणता व भित्रेपणा पासून, कर्जाच्या ओझ्या पासून आणि लोकांच्या दबावापासून."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

**ईशभीरूता आणि सत्शीलतेची दुआ :**

اَللّٰهُمَّ اِنِّیْ اَسْئَلُكَ الْهُدٰی وَالتُّقٰی وَالْعَفَافَ وَالْغِنٰی

अल्लाहुम्मा इन्नी अस अलुकल हुदा वत्तुका वल अफ़ा-फ़ वल ग़िना.

"हे अल्लाह! मी तुझ्या जवळ मार्गदर्शन, ईशभय, सत्शीलता आणि (लोकांपासून) नि:स्पृहतेची याचना करतो."

ही दुआ फार सर्वकष आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी या चार शब्दात वास्तविक ते सर्व मागून घेतले आहे. ज्याची ईमानधारक दासाला आवश्यकता आहे.

**लोक परलोकाच्या अपमानापासून सुरक्षित राहण्याची दुआ :**

اَللّٰهُمَّ اَحْسِنْ عَاقِبَتَنَا فِی الْاُمُوْرِ كُلِّهَا وَاَجِرْنَا مِنْ خِزْیِ الدُّنْیَا

وَعَذَابِ الْاٰخِرَةِ - (طبرانی) -

अल्लाहुम-म अहसिन आक़ि- ब-त-ना फ़िल उमूरि कुल्लिहा व अजिरना मिन खिज़यिद दुनिया व अज़ाबिल आखिरति.

"हे अल्लाह! समस्त कामांमध्ये आमचा शेवट मांगल्यपूर्ण कर आणि आम्हाला या जगाच्या अपमानापासून व आखिरतच्या शिक्षा यातनेपासून वाचव."

**नमाज नंतरची दुआ :**

माननीय मआज (रजि.) उल्लेखितता की एके दिवशी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माझा हात धरला आणि सांगितले,

"हे मआज! मला तुमच्याशी प्रेम आहे. मग सांगितले, "हे मआज! मी तुम्हाला वसीयत करतो की तुम्ही कोणत्याही नमाज नंतर या वचनांना सोडू नका. प्रत्येक नमाज नंतर या वचनांचे पठण अवश्य करा."

اَللّٰهُمَّ اَعِنِّیْ عَلٰی ذِكْرِكَ وَشُكْرِكَ وَحُسْنِ عِبَادَتِكَ

अल्लाहुम-म अइन्नी अला ज़िक्रि-क व शुक्रि-क व हुसानि इबादतिक.

"हे अल्लाह! तू आमची मदत कर, तुझे स्मरण व तुझ्याशी कृतज्ञतेकरिता आणि तुझी चांगली उपासना करण्याकरिता."

## पैगंबर मुहम्मद (स.) यांची वसीयत :

माननीय शहाद बिन औस (रजि.) कथन करतात की मला पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ही ताकीद सांगितली,

"शहाद! जेव्हा तुम्ही असे पहाल की जगातले लोक सोने चांदी संग्रहीत करण्या मागे लागले आहेत, तेव्हा तुम्ही या वचनांचे भांडार करा."

اَللّٰهُمَّ اِنِّىْ اَسْئَلُكَ الثَّبَاتَ فِى الْاَمْرِ وَالْعَزِيْمَةَ عَلَى الرُّشْدِ،
وَاَسْئَلُكَ شُكْرَ نِعْمَتِكَ وَحُسْنَ عِبَادَتِكَ وَاَسْئَلُكَ قَلْبًا
سَلِيْمًا وَّلِسَانًا صَادِقًا وَّاَسْئَلُكَ مِنْ خَيْرِ مَا تَعْلَمُ وَاَعُوْذُبِكَ
مِنْ شَرِّ مَا تَعْلَمُ وَاَسْتَغْفِرُكَ لِمَا تَعْلَمُ اِنَّكَ اَنْتَ عَلَّامُ الْغُيُوْبِ۔

(مسند احمد)

अल्लाहुम-म इन्नी अस्अलुकस्सबा-त फ़िल अमरि वल अज़ीम-त अलर-रुशदि, व अस्अलु-क शुक-र निअमति-क व हुस-न इबादति-क व अस् - अलु-क क़ल्बन सलीमवँ-व लिसानन सादिक़वँ-व अस्अलु-क मिन ख़ैरि मा तअ्लमु व अऊज़ु बि-क मिन शर्रि मा तअ्लमु व अस्तग़फ़िरु-क लिमा तअ्लमु इन्न-क अन-त अल्लामुल गुयूब।

"हे अल्लाह! मी धैर्यशीलतेत आणि सरळमार्गी चालण्यात अढळतेची याचना करतो आणि तुझ्या देणग्यांबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्याची आणि तुझी उत्तम उपासना पार पाडण्याची सुबुध्दि मागतो आणि हे अल्लाह ! मी तुझ्याजवळ स्वच्छ मन आणि सच्ची वाचा मागतो आणि अशी प्रत्येक भलाई तुझ्या कडून मागतो, ज्याचे ज्ञान तुला आहे आणि त्या प्रत्येक दुष्कर्म व दुराचारा पासून तुझे शरण मागतो जे तुला माहीत आहे आणि मी आपल्या समस्त अपराधांची क्षमा मागतो, जे तुला माहीत आहेत. नि:संशय तू अपरोक्षाच्या गोष्टींना पूर्णपणे जाणतो."

## मोक्षप्राप्ती आणि अल्लाहच्या प्रसन्नतेकरिता दुआ :

माननीय अबू हुरैरा (रजि.) उल्लेखितात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सलमान फारसी (रजि.) यांना वसीयत करतांना सांगितले,

"मी तुम्हाला काही वचने देऊ इच्छितो, त्याद्वारे रहमान जवळ याचना करा, रहमानकडे धाव घ्या आणि रात्रंदिवस याच शब्दात अल्लाहजवळ दुआ मागत जा."

اَللّٰهُمَّ اِنِّیۡ اَسْئَلُكَ صِحَّةً فِیۡ اِیۡمَانٍ وَّ اِیۡمَانًا فِیۡ حُسْنِ خُلُقٍ وَّ
نَجَاحًا یَّتْبَعُهٗ فَلَاحٌ وَّرَحْمَةً مِّنْكَ وَعَافِیَةً وَّمَغْفِرَةً مِّنْكَ وَ
رِضْوَانًا۔ (طبرانی، حاکم)

अल्लाहुम-म इन्नी अस-अलु-क सिह्-ह-तन फ़ी ईमानिवँ-व ईमानन फ़ी हुस्नि खुलुक़ीवं-व नजाहँय्यत-बउहू फ़लाहुँव-व रहमतम-मिन-क व आफ़िय-तवँ-व मग़ाफ़ि-र तम मिन-क व रिज़वाना।

"हे अल्लाह ! मी तुझ्या जवळ आपल्या ईमानात स्वास्थ्य आणि सामर्थ्याची अभिलाषा करतो. चांगल्या चारित्र्यात ईमानाचा प्रभाव इच्छितो आणि अशी सफलता इच्छितो की ज्याद्वारे मरणोत्तर जीवनाची सफलता प्राप्त व्हावी आणि तुझ्या जवळ दया कृपा, क्षेम कुशल, अपराधांची माफी आणि तुझी प्रसन्नता इच्छितो." (तबरानी, हाकीम)

## अपराधांपासून शुध्द होण्याची दुआ :

माननीय उम्मे सलमा (रजि.) द्वारे उल्लेखित आहे की पैगंबर मुहम्मद (स.) ही दुआ मागत असत.

اَللّٰهُمَّ نَقِّ قَلْبِیۡ مِنَ الْخَطَایَا كَمَا نَقَّیْتَ الثَّوْبَ الْاَبْیَضَ مِنَ
الدَّنَسِ اَللّٰهُمَّ بَعِّدْ بَیْنِیۡ وَبَیْنَ خَطِیْئَتِیۡ كَمَا بَعَّدْتَّ بَیْنَ
الْمَشْرِقِ وَالْمَغْرِبِ (معجم کبیر)

अल्लाहुम-म नक़्क़ि क़ल्बी मिनल ख़ताया कमा नक़्क़ैतस्सौ-बल-अब-य-ज़ मिनद-द-नसि अल्लाहुम-म बअ-इद बैनी व बै-न ख़तिअति कमा बअ-अत-त बैनल मशरिक़ि वल मग़रिब।

"हे अल्लाह! तू माझ्या हृदयाला अपराधांच्या घाणीपासून असे शुध्द कर. ज्याप्रमाणे तू पांढऱ्या शुभ्र कपड्यास मळ घाणी पासून साफ स्वच्छ करतो. हे अल्लाह! तू मला अपराधांपासून इतके दूर कर की जेवढे तू पूर्व आणि पश्चिमेत अंतर ठेवले आहेस." (मोअजमे कबीर)

## जगाच्या दृष्टीत सन्मानाची दुआ :

अल्लाहुम्मज-अलनी सबूरवँ-वज-अलनी शकूरवँ-वज-अलनी फ़ी ऐनी सग़ीरवँ- व फ़ी अअ्-युनिन्नासि कबीरा।

اَللّٰهُمَّ اجْعَلْنِیۡ صَبُوْرًا وَّاجْعَلْنِیۡ شَكُوْرًا وَّاجْعَلْنِیۡ فِیۡ عَیْنِیۡ صَغِیْرًا
وَّفِیۡ اَعْیُنِ النَّاسِ كَبِیْرًا۔

"हे अल्लाह! तू मला खूप धीर संयम राखणारा बनव आणि खूप जास्त कृतज्ञशील बनव आणि मला आपल्या नजरेत तुच्छ व लोकांच्या नजरेत मोठा बनव."

**सर्वंकष दुआ :**

माननीय आएशा (रजि.) उल्लेखितात की एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांचे माझ्याकडे शुभागमन झाले. मी नमाज पढत होते. पैगंबर मुहम्मद (स.) यांना माझ्याकडून काही आवश्यकता होती आणि मला उशीर झाला. तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, आएशा ! लहान आणि सर्वकष दुआ मागत जा. मग मी जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जवळ आले तेव्हा विचारले की हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! लहान आणि सर्वकष दुआ कोणती? त्यावर पैगंबर म्हणाले, "हे पढत जा."

اَللّٰهُمَّ اِنِّیْٓ اَسْئَالُكَ مِنَ الْخَيْرِ كُلِّهٖ عَاجِلِهٖ وَاٰجِلِهٖ مَاعَلِمْتُ
مِنْهُ وَمَالَمْ اَعْلَمْ وَاَعُوْذُ بِكَ مِنَ الشَّرِّ كُلِّهٖ عَاجِلِهٖ وَاٰجِلِهٖ
مَاعَلِمْتُ مِنْهُ وَمَالَمْ اَعْلَمْ وَاَسْئَالُكَ الْجَنَّةَ وَمَاقَرَّبَ اِلَيْهَا
مِنْ قَوْلٍ اَوْعَمَلٍ وَاَعُوْذُبِكَ مِنَ النَّارِ وَمَاقَرَّبَ اِلَيْهَا
مِنْ قَوْلٍ اَوْعَمَلٍ وَاَسْئَالُكَ مِمَّا سَاَلَكَ بِهٖ مُحَمَّدٌ وَاَعُوْذُ
بِكَ مِمَّا تَعَوَّذَ مِنْهُ مُحَمَّدٌ وَمَاقَضَيْتَ لِیْ مِنْ قَضَآءٍ
فَاجْعَلْ عَاقِبَتَهٗ رُشْدًا۔ (حاکم)

अल्लाहुम-म इन्नी अस-अलु-क मिनल खैरि कुल्लिही आजिलिही व आजिलिही मा अलिम्तु मिन्हु व मालम अअलम व अऊज़ु बि-क मिनश शर्रि कुल्लिही आजिलिही मा अलिम्तु मिन्हु व मालम अअलम व अस्अलु-कल जन-न-त व मा क़र्र-ब इलैहा मिन क़ौलिन अव अ-म लिन व अऊज़ु बि-क मिनन्नारि व मा क़र्र-ब इलैहा मिन क़ौलिन अव अ-म-लिन व अस्अलु-क मिम्मा स-अ-क बिही मुहम्मदुन व अऊज़ुबि-क मिम्मा त अव्व-ज़ मिन्हु मुहम्मदुन व मा क़ज़ै-त ली मिन क़ज़ाइन फ़ज-अल आक़ि-ब-त-हू रुशदा।

"हे अल्लाह! मी तुझ्याकडे सर्वच्या सर्व भलाईची याचना करतो. लवकर होणाऱ्या भलाईची ही आणि उशीरा होणाऱ्याचीही, माहीत असलेल्याचीही आणि माहित नसलेल्याचीही आणि मी सर्वच्या सर्व वाईटापासून तुझे आश्रय मागतो, लवकर होणाऱ्या वाईटापासूनही आणि उशीरा होणाऱ्या वाईटा पासूनही ज्ञात असलेल्या पासूनही आणि अज्ञात असलेल्या पासून ही आणि मी तुझ्याजवळ जन्नत मागतो आणि अशा वचन कर्माची जे जन्नतच्या निकट करणारे असावे आणि जहन्नम पासून तुझे शरण मागतो आणि त्या वचन कर्मापासूनही तुझे शरण मागतो जे जहन्नमच्या निकट करणारे असावे आणि मी तुझ्या जवळ त्या भल्या गोष्टींची याचना करतो, ज्यांची याचना तुझ्या जवळ मुहम्मद (स.) यांनी केली आहे. आणि तुझे शरण मागतो त्या सर्व गोष्टी पासून, ज्यांच्या पासून मुहम्मद (स.) यांनी शरण मागितले आहे. आणि असे इच्छितो की तू

माझ्यासाठी जो काही फैसला करशील त्याचा शेवट उत्तम कर." (हाकीम)

**इस्लामवर कायम राहण्याची दुआ :**

اَللّٰهُمَّ احْفَظْنِيْ بِالْإِسْلَامِ قَائِمًا وَاحْفَظْنِيْ بِالْإِسْلَامِ قَاعِدًا وَّاحْفَظْنِيْ بِالْإِسْلَامِ رَاقِدًا وَّلَا تُشْمِتْ بِيْ عَدُوًّا حَاسِدًا۔

अल्लाहुम्मह-फ़ज़्नी बिल इस्लामि काइमन वह्फ़ज़्नी बिल इस्लामि काइदवँ-वह्फ़ज़्नी बिल इस्लामि राक़िदवँ-व ला तुशमित बी अद्वन हासिदा।

"हे अल्लाह! मला उठता बसता, झोपतांना (जागतांना प्रत्येक अवस्थेत) इस्लाम वर कायम ठेव आणि कोणा शत्रूला व मत्सर करणाऱ्याला माझ्यावर हसण्याची संधी देऊ नको."

**नव मुस्लिमची दुआ :**

माननीय अबू मालिक अशजई (रजि.) उल्लेखितात की माझ्या पित्याचे कथन आहे की जेव्हा कोणी मनुष्य इस्लाम धर्मात प्रवेश करीत असे, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) त्याला नमाज शिकवित मग त्याला सांगत की अशा प्रकारे दुआ मागत जा.

اَللّٰهُمَّ اغْفِرْلِيْ، وَارْحَمْنِيْ وَاهْدِنِيْ، وَعَافِنِيْ وَارْزُقْنِيْ

अल्लाहुम्मग़फ़िरली, वर्हम्नी वहदिनी, व आफ़िनी वर्ज़ुक़्नी।

हे अल्लाह ! तू माझ्या अपराधांना क्षमा कर माझ्यावर दया कर. मला सरळ मार्गावर चालव मला क्षेम कुशल प्रदान कर आणि मला आजीविका (अन्न-सामुग्री) प्रदान कर.

**दम्भ आणि वाईट चारित्र्यापासून सुरक्षित राहण्याची दुआ :**

اَللّٰهُمَّ اِنِّيْٓ اَعُوْذُبِكَ مِنْ مُّنْكَرَاتِ الْاَخْلَاقِ وَالْاَعْمَالِ وَالْاَهْوَاءِ، اَللّٰهُمَّ اِنِّيْٓ اَعُوْذُبِكَ مِنَ الشِّقَاقِ وَالنِّفَاقِ وَ سُوْٓءِ الْاَخْلَاقِ۔

अल्लाहुम-म इन्नी अऊज़ुबि-क मिम-मुनकरातिल अख़्लाक़ि वल अआमालि वल अहवाइ, अल्लाहुम-म इन्नी अऊज़ुबि-क मिनशशिक़ाक़ि वननिफ़ाक़ि व सूइल अख़्लाक़।

"हे अल्लाह! मी तुझे शरण मागतो वाईट चारित्र्यापासून वाईट कामांपासून आणि मनाच्या इच्छा अभिलाषापासून. हे अल्लाह ! मी तुझे शरण मागतो भांडण, दांभिकता, आणि वाईट चारित्र्यापासून."

**कर्ज फेडण्याची दुआ :**

माननीय अबू वाइल यांचे कथन आहे की माननीय अली (रजि.) यांच्या सेवेत एक गुलाम हजर झाला आणि म्हणाला, "माननीय ! मला मदत करा. मी हे अदा करून शकत नाही.

माननीय अली (रजि.) यांनी सांगितले, मी तुला ती दुआ का शिकवू नये, जी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मला सांगितली आहे. जर तुमच्या वर उहुद पर्वता एवढेही कर्ज असेल तर अल्लाह ते अदा करील. तो गुलाम म्हणाला, ती दुआ मला जरुर शिकवा. यास्तव त्यांनी ती दुआ सांगितली.

اَللّٰهُمَّ اكْفِنِيْ بِحَلَالِكَ عَنْ حَرَامِكَ وَاغْنِنِيْ بِفَضْلِكَ عَمَّنْ سِوَاكَ.

अल्लाहुम-मक-फ़िनी बि-हलालि-क अन हरामि-क वग़निनी बिफ़ज़्लिक अम्मन सिवाक।

"हे अल्लाह! मला हलाल (वैध) रोजी देऊन हराम (अवैध) रोजी पासून निरपेक्ष बेपर्वा कर आणि आपल्या मेहेरबानीने मला आपल्या खेरीज, प्रत्येकापासून निस्पृह कर."

# ४४. दरूद आणि सलाम

आपल्यावर अत्याधिक उपकार करणाऱ्या, सर्व विश्वांचे दयानिधी असणाऱ्या आदरणीय मुहम्मद (स.) यांच्यावर जास्तीत जास्त दरूद आणि सलाम पाठवा. हे खरे आहे की त्यांच्या अगणित उपकारांची व अमर्याद स्नेह दयेची आम्ही किंचितही परतफेड करू शकत नाही. आम्ही जर काही करू शकतो तर ते एवढेच की श्रध्दा, प्रेम, समर्पणाच्या सखोल भावनांसह त्यांच्या समोर दरूद व सलामचा नजराणा सादर करावा. आणि अल्लाहजवळही दुआ करावी की हे पालनकर्त्या ! तुझ्या पैगंबराने आमच्यासाठी रात्रंदिवस हृदयद्रावक दु:ख यातना सहन करून आमच्या पावेतो सत्य धर्माचा प्रकाश पोहचविला आणि आमच्या मार्गदर्शनासाठी तळमळत राहून ज्या प्रकारे आपला जीव कासावीस केला. पालनकर्त्या ! आम्ही या अनुपम उपकारांची काहीच फेड करू शकत नाही. तुझ्याचकडे आमची विनंती आहे की पालनहार तू त्यांच्यावर आपल्या असीम व अमर्याद दया कृपेचा वर्षाव कर. त्यांचे दर्जे उंच कर. त्यांच्या सत्य धर्माला असत्याच्या हल्ल्यांपासून सुरक्षित राख आणि त्याला प्रगतिपथावर ने. आणि मरणोत्तर जीवनात त्यांना समस्त जवळच्या लोकांपेक्षा जास्त आपले सान्निध्य प्रदान कर. पवित्र कुरआनात मुस्लिमांना ताकीद केली गेली आहे.

"अल्लाह आणि त्याचे फरिश्ते (दूत) पैगंबरा वर सतत दरूद पाठवितात. हे ईमानधारकांनो! तुम्हीही त्यांच्यावर दरूद व सलाम पाठवा." *(दिव्य कुरआन, ३३: ५६)*

माननीय उबई बिन काब (रजि.) यांना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"उबई ! जर तुम्ही आपल्या सर्व वेळ दरूद व सलाम मध्ये लावाल तर अल्लाह या जगात व मरणोत्तर जीवनात तुमची जबाबदारी आपल्या वर घेईल." (हदीस : मुस्नद अहमद)

माननीय अनस बिन मालिक (रजि.) यांचे कथन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जो मनुष्य माझ्यावर एक वेळा दरूद पाठवितो अल्लाह त्याच्यावर दहा वेळा दया कृपा अवतरीत करतो. त्याच्यासाठी दहा सत्कर्मे लिहीतो. दहा अपराध मिटवितो. आणि दहा दर्जे उंचावितो." (हदीस : नसई)

आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे ही सांगितले,

"जो मनुष्य माझ्यावर दरूद पाठवितो, फरिश्ते त्याच्यावर दरूद पाठवित राहतात, जो पर्यंत तो माझ्यावर दरूद पाठवित राहील." (हदीस : अहमद व इब्ने माजा)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्या माणसाला कंजूस ठरविले आहे, "ज्याने त्यांचा उल्लेख ऐकावा आणि त्यांच्यावर दरूद पाठवू नये."

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे,

"तो मनुष्य कंजूस आहे. ज्याच्या समोर माझा उल्लेख केला जावा आणि त्याने माझ्यावर

दरूद पाठवू नये. आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्या माणसाला आखिरत मध्ये आपल्या सोबत राहण्यास व संगत प्राप्त करण्यास सर्वात जास्त हक्कदार ठरविले आहे जो सर्वात जास्त पैगंबर मुहम्मद (स.) वर दरूद व सलाम पाठवितो.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे,

"कयामतीच्या दिवशी माझ्या सोबत राहण्यास आणि संगतीचा लाभ घेण्यास सर्वात जास्त हक्कदार तो मनुष्य असेल, जो माझ्यावर सर्वात जास्त दरूद पाठविल."(हदीस : तिर्मिजी)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या सहकाऱ्यांना (सहाबा (रजि.) यांना) अनेकविध प्रसंगी दरूद व सलामचे जे शब्द शिकविले आहेत, त्यात थोडा फार शाब्दिक फरक आहे. तुम्ही त्यापैकी वाटेल त्या दरूदचे पठण करू शकतात. सर्व सामान्य पणे ज्या दरूद चे नमाज मध्ये पठण केले जाते आणि ज्याला माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) यांनी श्रेष्ठतम ठरविले आहे, ते हे आहे.

अल्लाहुम-म सललि अला मुहम्मदिंव व अला आलि मुहम्मदिन कमा सल्लै-त अला इब्राही-म व अला आलि इब्राही-म इन्न-क हमीदुम मजीद.

अल्लाहुम-म बारिक अला मुहम्मदिंव व अला आलि मुहम्मदिन कमा बारक-त अला इब्राहीम व अला आलि इब्राही-म इन्न-क हमीदुम मजीद.

"हे अल्लाह! तू दया कर आदरणीय मुहम्मद (स.) यांच्या वर आणि आदरणीय मुहम्मद यांच्या वंशजांवर ज्या प्रमाणे तू दया केलीस आदरणीय इब्राहीम वर आणि आदरणीय इब्राहीम यांच्या वंशजांवर नि:संशय तू अतिशय पावित्र्यपूर्ण गुणवैशिष्ट्ये बाळगणारा आणि प्रतिष्ठासम्पन्न आहेस."

"हे अल्लाह! तू बरकत (सुख समृद्धी) प्रदान कर माननीय मुहम्मद यांना आणि माननीय मुहम्मद (स.) यांच्या वंशजांना, ज्या प्रमाणे तू बरकत प्रदान केली, आदरणीय इब्राहीम यांना आणि आदरणीय इब्राहीम यांच्या वंशजाना. नि:संशय तू अतिशय पावित्र्यपूर्ण गुणवैशिष्ट्ये बाळगणारा आणि प्रतिष्ठासम्पन्न आहे." (सिहाहि सित्ता, मुस्नद अहमद)

माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) यांनी लोकांना सांगितले, की जेव्हा तुम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या वर दरूद पाठवाल तेव्हा चांगल्या प्रकारे पाठवा. तुम्हाला काय माहीत की हा दरूद पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या दरबारात सादर केला जात असेल. लोकांनी त्यांना विनंती केली की मग आपण आम्हाला दरूद शिकवा तेव्हा त्यांनी सांगितले की अशा प्रकारे दरूद पठण करा.

अल्लाहुम्मज-अल सला-त-क व रह-म-त-क व ब-र-काति-क अला सय्यिदिल मुर्सली-न व इमामिल मुत्तक़ी-न व ख़ात-मन्नबीयी-न मुहम्मदिन अब्दि-क व रसूली-क इमामिल ख़ैरी व क़ाइदिल ख़ैरि व रसूलिर्रहमति, अल्लाहुम-मब-असहु मक़ामय्यँग़बितुहू बिहील अव्वलून। अल्लाहुम-म सल्लि अला मुहम्मदिंव-व अला आलि मुहम्मदिन कमा सल्लै-त अला इब्राही-म व अला आलि इब्राही-म इन-न-क हमीदुम मजीद। अल्लाहुम-म बारिक अला

मुहम्मदिंव-व अला आलि मुहम्मदिन कमा बारक-त अला इब्राही-म व अला आलि इब्राहीम-म इन्न-क हमीदुम मजीद।

"हे अल्लाह! तू आपली बरकत, दया कृपा आणि अनुग्रह अवतरीत कर पैगंबरांचे सरदार, ईश भीरू लोकांचे प्रमुख आणि अंतिम पैगंबर आदरणीय मुहम्मद (स.) यांच्यावर जे तुझे दास, तुझे पैगंबर, भलाईचे उदाहरण, मांगल्याचे मार्गदर्शक आणि दयावान पैगंबर आहेत. हे अल्लाह! त्यांना त्या श्रेष्ठतेच्या पदावर बसव. जे भावीकाळात येणाऱ्यांकरिता ईर्ष्याकिरण्या योग्य असावे.

हे अल्लाह! तू दया पाठव आदरणीय मुहम्मद यांच्यावर आणि आदरणीय मुहम्मद यांच्या वंशजावर ज्या प्रमाणे तू दया केलीस आदरणीय इब्राहीम यांच्यावर आणि आदरणीय इब्राहीम यांच्या संततीवर नि:संशय, तू पावित्र्य पूर्ण गुण वैशिष्टये बाळगणारा, प्रतिष्ठा सम्पन्न आहेस.

हे अल्लाह! तू बरकत (सुख समृध्दि) अवतरीत कर आदरणीय मुहम्मद यांच्यावर आणि आदरणीय मुहम्मद यांच्या संततीवर, ज्या प्रमाणे तू बरकत अवतरीत केलीस आदरणीय इब्राहीम वर आणि आदरणीय इब्राहीम यांच्या संतती वर नि:संशय, तू पावित्र्यपूर्ण गुणवैशिष्टये बाळगणारा, आणि प्रतिष्ठा सम्पन्न आहेस."

माननीय अबू मसऊद अन्सारी (रजि.) कथन करतात की एकदा बशीर बिन साद (रजि.) यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले, हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.)! आम्ही आपल्यावर कशा प्रकारे दरूद व सलाम पाठवावा?" पैगंबर मुहम्मद (स.) काही क्षण गप्प राहीले, मग त्यांनी सांगितले, असे म्हणत जा,

اَللّٰهُمَّ صَلِّ عَلٰى مُحَمَّدٍ وَّعَلٰٓى اٰلِ مُحَمَّدٍ كَمَا صَلَّيْتَ عَلٰٓى اٰلِ اِبْرَاهِيْمَ

وَبَارِكْ عَلٰى مُحَمَّدٍ وَّعَلٰٓى اٰلِ مُحَمَّدٍ كَمَا بَارَكْتَ عَلٰٓى اِبْرَاهِيْمَ

فِى الْعَالَمِيْنَ اِنَّكَ حَمِيْدٌ مَّجِيْدٌ۔ (مسلم)

अल्लाहुम-म सललि अला मुहम्मदिंव-व अला आलि मुहम्मदिन कमा सल्लै-त अला इब्राहीम-म व बारिक अला मुहम्मदिंव-व अला आलि मुहम्मदिन व अला आलि मुहम्मदिन कमा बारक-त अला इब्राहीम-म फ़िल-आलमी-न इन्न-क हमीदुम मजीद.

"हे अल्लाह! दया कृपा कर आदरणीय मुहम्मद यांच्यावर आणि आदरणीय मुहम्मद यांच्या संततीवर ज्या प्रमाणे तू दया कृपा केलीस आदरणीय इब्राहीम यांच्यावर आणि बरकत अवतरीत कर आदरणीय मुहम्मद यांच्यावर आणि आदरणीय मुहम्मद यांच्या संततीवर ज्या प्रमाणे तू समस्त सृष्टीत बरकत अवतरीत केलीस आदरणीय इब्राहीम यांच्यावर नि:संशय तू अतिशय पावित्र्य पूर्ण गुणवैशिष्टये बाळगणारा आणि प्रतिष्ठा सम्पन्न आहेस." (हदीस : मुस्लिम)

# ४५. कुर्बानीची दुआ

जनावराला काबागृहाच्या दिशेने झोपवून प्रथम ही दुआ करा.

إِنِّي وَجَّهْتُ وَجْهِيَ لِلَّذِي فَطَرَ السَّمٰوٰتِ وَالْأَرْضَ حَنِيفًا وَّمَآ

أَنَا مِنَ الْمُشْرِكِينَ ، إِنَّ صَلَاتِي وَنُسُكِي وَمَحْيَايَ وَمَمَاتِي لِلّٰهِ

رَبِّ الْعٰلَمِينَ لَا شَرِيكَ لَهُ وَبِذٰلِكَ أُمِرْتُ وَأَنَا مِنَ الْمُسْلِمِينَ

اَللّٰهُمَّ لَكَ وَمِنْكَ.

इन्नी वज्जहतु वजहि-य लिल्लज़ी फ़-त-रस्समावाति वल अर-ज़ हनीफ़वँ-व मा अना मिनल मुशरिकीन, इन-न सलाती व नुसुकी व मह्या-य व ममाती लिल्लाहि रब्बिल आ-लमीन ला शरी-क लहू व बिज़ालि-क उमिर्तु व अना मिनल मुस्लिमी-न, अल्लाहुम-म ल-क व मिन-क।

"मी संपूर्ण एकाग्र चित्ताने आपले तोंड ठीक त्या अल्लाहकडे करून घेतले ज्याने आकाशांची व जमिनीची निर्मिती केली आणि मी अल्लाहच्या सोबत इतरांना सहभागी करणारा नाही. नि:संशय, माझी नमाज, माझी कुर्बानी, माझे जीवन आणि माझे मरण सर्वच अल्लाहकरिता आहे जो सर्व विश्वांचा पालनकर्ता आहे. त्याचा कोणी ही सहभागी नाही. त्याचाच आदेश मला दिला गेला आहे आणि मी मुस्लिम व आज्ञाधारक आहे. हे अल्लाह! हे तुझ्याच पुढे सादर आहे आणि तूच प्रदान केलेले आहे."

मग "बिस्मिल्लाहि अल्लाहु अकबर" असे उच्चारून धारदार सूरी जनावराच्या गळ्यावर फिरवा आणि जिबह केल्यानंतर ही दुआ करा.

اَللّٰهُمَّ تَقَبَّلْهُ مِنِّيْ كَمَا تَقَبَّلْتَ مِنْ خَلِيلِكَ إِبْرَاهِيمَ وَحَبِيبِكَ

مُحَمَّدٍ عَلَيْهِمَا الصَّلٰوةُ وَالسَّلَامُ.

अल्लाहुम-म त-क़ब्बलहु मिन्नी कमा त-क़ब्बल-त मिन खलीलि-क इबराही-म व हबीबि-क मुहम्मदिन अलैहिमस्सलातु वस्सलाम।

"हे अल्लाह! तू या बलिदानास (कुर्बानीला) आमच्यातर्फे कबूल कर, ज्या प्रमाणे तू आपला दोस्त आदरणीय इब्राहीम आणि आपले सर्वाधिक प्रिय माननीय मुहम्मद यांची कुर्बानी कबूल केली. दोघांवर ही दरूद व सलाम असो."

कुर्बानीच्या पशूला दुसऱ्या कोणाकडून जिबह करणे उचित असले तरी तुम्ही स्वत:च जिबह केलेले अधिक चांगले आणि जिबह करते वेळी त्या भावनांना मुद्दाम आपल्या मन मस्तिष्कावर बिंबवून घ्या, ज्या तुम्ही आपल्या दुआ प्रार्थनेच्या शब्दातून व्यक्त करता. अर्थात हे की

आमचे सर्वकाही अल्लाहचेच आहे. तेव्हा त्याच्याच मार्गात हे सर्व काही अर्पण झाले पाहिजे. त्याचा संकेत प्राप्त करून आज आम्ही त्याच्या मार्गात पशूचा बळी देत आहोत. उद्या जर त्याचा संकेत असेल तर आम्ही त्याच भावनांसह आपला प्रिय प्राण देखील त्याच्याच मार्गात अर्पण करून टाकणार आणि त्याचा आभार मानणार की त्याने आपल्या मार्गात रक्त वाहविण्याची सुबुध्दि देऊन हौतात्म्याचे सद्भाग्य आम्हाला प्रदान केले.

# ४६. अकीकाची दुआ

अकीका म्हणजे असा बोकड किंवा शेळी जे नवजात शिशुच्या तर्फे जन्माच्या सातव्या दिवशी दान म्हणून जिबह केली जाते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे.

"सातव्या दिवशी बाळाचे नाव ठेवले जावे आणि त्याचे केस वगैरे, घाण दूर केली जावी आणि त्याच्या तर्फे अकीका केला जावा."

पशूचा बळी देते वेळी काबागृहाच्या दिशेने झोपवा आणि प्रथम ती दुआ करा जी कुर्बानीचा पशू जिबह करण्याआधी पढतात. अर्थात इन्नी वज्जहतु पासून लक व मिनक पर्यंत मग बिस्मिल्लाहि अल्लाहु अकबर म्हणत धारदार सूरी पशूच्या गळ्यावरून फिरवा, आणि ही दुआ पठण करा.

اَللّٰھُمَّ ھٰذِہٖ عَقِیْقَۃُ ........ تَقَبَّلْہُ کَمَا تَقَبَّلْتَ مِنْ حَبِیْبِكَ

مُحَمَّدٍ وَّخَلِیْلِكَ اِبْرَاھِیْمَ عَلَیْھِمَا الصَّلٰوۃُ وَالسَّلَامُ دَمُھَا بِدَمِہٖ

لَحْمُھَا بِلَحْمِہٖ شَعْرُھَا بِشَعْرِہٖ عَظْمُھَا بِعَظْمِہٖ۔

अल्लाहुम-म हाज़िही अक़ी-क़तु......, त-क़ब्बलहु कमा त-क़ब्बल-त मिन हबीबि-क मुहम्मदिवँ -व ख़लीलि-क इब्राही-म अलैहिमस्सलातु वस्सलामु दमुहा बि-द-मिही लह्मुहा बि-लहमिही शअ्रुहा बिशअरिही अज़्मुहा बिअज़्मिही।

"हे अल्लाह! हा अकीका आहे. अमक्या बाळाचा याला कबूल कर, ज्या प्रमाणे तू आपले प्रिय पैगंबर मुहम्मद (स.) आणि आपले दोस्त माननीय इब्राहीम (अ.) यांच्यातर्फे कबूल केले. याचे रक्त बाळाच्या रक्ताचा फिदया (भरपाई म्हणून दिले जाणारे धन) आहे.याचे मांस बाळाच्या मांसाचा फिदया (भरपाई) आहे. याचे केस बाळाच्या केसाचा फिदया (भरपाई) आहे आणि याची हाडे बाळाच्या हाडांचा फिदया (भरपाई) आहे. (हे अल्लाह ! तू याला कबूल कर.)"

धनवान लोकांनी आपल्या संतती तर्फे अवश्य दान पुण्य करावे. अकीका एक पुण्यदायक व पसंत केले गेलेले दान आहे. मुलाच्या तर्फे दोन बोकड किंवा दोन शेळ्या आणि मुलीच्या तर्फे एक बोकड किंवा एक शेळी आणि हे ही उचित आहे की मुलाच्या तर्फे ही एकच शेळी दिली जावी. तथापि जे हे सामर्थ्य बाळगत नाहीत, त्यांच्यासाठी हे कदापि योग्य नव्हे की अडचणीत असून ही अकीका करणे आवश्यक समजावे आणि कर्जाचे ओझे शिरावर लादून हे कर्तव्य पार पाडावे.

अकीकाचे मांस कच्चे ही वाटले जाऊ शकते, मात्र अधिक चांगले हे की शिजवून व स्वयंपाक करून गरीब दुबळ्यांना व शेजाऱ्यांना वाटावे. आपल्या नातेवाईकांना व दोस्तांना ही खाऊ घालू शकता. माननीय हसन (रजि.) यांच्या अकीका प्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ताकीद केली की जनावराचा एक पाय बाळंतपण करणाऱ्या बाईकडे पाठवा आणि बाकी तुम्ही स्वत: खा व इतरांना द्या.

# ४७. तरावीहची दुआ

'तरावीह' हा मूळ अरबी शब्द 'तरवीहा'चे अनेकवचन आहे. तरावीह मध्ये दर चार रकअत नंतर बसण्याला व थोडा आराम घेण्यास तरवीहा म्हणतात आणि याच कारणास्तव रमजानच्या या नफील नमाजला तरावीह असे म्हणतात. तरावीह म्हणजे प्रत्येक चार रकअत नंतर बसणे व आराम घेणे, पैगंबर आचरणानुसार आहे. तरावीह मध्ये खालील दुआ उच्चारली जाते.

"सुबहा-न ज़िल मुल्की वल म-ल-कूति सुबहा-न ज़िलइज़्ज़ति वल अज़्मति वल है-बति वल कुदरति वल किबरियाइ वल ज-ब-रूत। सुबहातल मलिकिल हय्यिलज़ी ला यनामु वला यमूतु सुब्बूहुन कुद्दूसुन, रब्बुना व रब्बुल मलाइकति वर्रुहि. अल्लाहुम-म अजिरना मि-नन-नारि या मुजीरू या मुजीरू या मुजीर"

سُبْحَانَ ذِی الْمُلْكِ وَ الْمَلَكُوْتِ سُبْحَانَ ذِی الْعِزَّةِ وَالْعَظْمَةِ وَالْهَيْبَةِ وَالْقُدْرَةِ وَالْكِبْرِيَاءِ وَالْجَبَرُوْتِ. سُبْحَانَ الْمَلِكِ الْحَيِّ الَّذِیْ لَا يَنَامُ وَلَا يَمُوْتُ سُبُّوْحٌ قُدُّوْسٌ، رَبُّنَا وَرَبُّ الْمَلٰٓئِكَةِ وَالرُّوْحِ اَللّٰهُمَّ اَجِرْنَا مِنَ النَّارِ يَا مُجِيْرُ يَا مُجِيْرُ يَا مُجِيْرُ.

पवित्रतम आहे सत्ता व अधिकार बाळगणारा पवित्रतम आहे प्रतिष्ठा व श्रेष्ठता, दबदबा व सामर्थ्य आणि महानता व प्रताप बाळगणारा.

पवित्रतम आहे तो चिरसजीव सम्राट, जो कधीही झोपत नाही आणि कधी ही त्याच्यासाठी विनाश नाही. अतिशय पवित्र आणि श्रेष्ठतम. दोष वैगुण्यापासून विरहीत आमचा पालनकर्ता आणि फरिश्त्यांचा पालनकर्ता आणि माननीय जिब्रिल (अ.) यांचा पालनकर्ता.

"हे अल्लाह! आम्हाला जहन्नमच्या आगीपासून वाचव हे शरण दाता, हे शरण दाता, हे शरण दाता!"

तरावीहची नमाज जमातीसह पढा आणि शक्यतोवर संपूर्ण कुरआन नमाज मध्ये ऐकण्याचा प्रयत्न करा. तरावीह ची नमाज एखाद्या अशा हाफिज (कुरआन तोंडीपाठ असलेल्या) च्या मागे पढा जो संपूर्ण इतमामाने, मन लावून आणि मोठ्या आवडीने अशा प्रकारे कुरआनचे थोडे थांबून समतोल राखून पठण करील की जास्त वेळ लावल्याने, इमामच्या मागे नमाज पढणारे कंटाळून जाऊ नयेत आणि पवित्र कुरआनाचे अशा प्रकारे स्पष्टत: पठण व्हावे की त्याचा पठणाचा हक्क अदा केला जावा. पवित्र कुरआनास अतिशीघ्र गतीने अशा प्रकारे रटणे की जणू डोक्यावरून फार मोठे ओझे उतरविले जात आहे. वास्तविक कुरआनावर फार मोठा अत्याचार आहे. अल्लाहच्या ग्रंथाचा अर्थात पवित्र कुरआनाचा हा हक्क आहे की त्याचे मन:पूर्वक एकाग्र चित्ताने व

पूर्ण रूचि राखून पठण केले जावे आणि त्याला नीट समजून घेण्याची व त्यावर विचार चिंतन करण्याची सवय लावून घ्यावी.

अशा प्रकारे तरावीहची नमाज देखील शांतीपूर्वक व समतोल राखून अदा केली जावी. बेपर्वाईने घाई घाईत रूकूअ व सजदा करणे नमाजच्या हेतुपासून गाफील राहणे ही आहे आणि नमाजच्या गोडी पासून वंचित राहणेही होय.

## ४८. कुनूते नाजिला

१. अल्लाह न करो, ईमानधारक अतिशय सक्त परिस्थितीत घेरले जावोत आणि शत्रूचे भय व दहशत पसरलेली असावी, तेव्हा अशा प्रसंगी नमाजच्या अवस्थेत कुनूते नाजिला ही दुआ पढण्याचा इतमाम राखा. विशेषत: फज्र (प्रात:कीलन) च्या नमाज मध्ये. फज्रच्या नमाजच्या दुसऱ्या रकअतीत रुकूअतून सरळ उभे राहील्यानंतर उभ्यानेच ही दुआ उच्चारा मग सजद्यात जा. हदीस वचनांवरून दिसून येते की पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी अगदी सक्त व बिकट परिस्थितीत, नमाज मध्ये या दुआचे पठण केले आहे आणि विशेषत: फज्रच्या नमाज मध्ये ह्या दुआचा इतमाम केला आहे. या दुआचा अर्थ असा.

اَللّٰهُمَّ اهْدِنَا فِيْمَنْ هَدَيْتَ وَعَافِنَا فِيْمَنْ عَافَيْتَ وَتَوَلَّنَا
فِيْمَنْ تَوَلَّيْتَ وَبَارِكْ لَنَا فِيْمَا اَعْطَيْتَ وَقِنَا شَرَّ مَا قَضَيْتَ فَاِنَّكَ
تَقْضِيْ وَلَا يُقْضٰى عَلَيْكَ اِنَّهٗ لَا يَذِلُّ مَنْ وَّالَيْتَ وَلَا يَعِزُّ مَنْ
عَادَيْتَ تَبَارَكْتَ رَبَّنَا وَتَعَالَيْتَ نَسْتَغْفِرُكَ وَنَتُوْبُ اِلَيْكَ ٥
اَللّٰهُمَّ عَذِّبِ الْكَفَرَةَ الَّذِيْنَ يَصُدُّوْنَ عَنْ سَبِيْلِكَ وَ
يُكَذِّبُوْنَ رُسُلَكَ وَيُقَاتِلُوْنَ اَوْلِيَآءَكَ ۔ اَللّٰهُمَّ اغْفِرْ لِلْمُؤْمِنِيْنَ
وَالْمُؤْمِنَاتِ وَالْمُسْلِمِيْنَ وَالْمُسْلِمَاتِ وَاَصْلِحْ ذَاتَ بَيْنِهِمْ وَاَلِّفْ
بَيْنَ قُلُوْبِهِمْ وَاجْعَلْ فِيْ قُلُوْبِهِمُ الْاِيْمَانَ وَالْحِكْمَةَ وَثَبِّتْهُمْ
عَلٰى مِلَّةِ رَسُوْلِكَ صَلَّى اللّٰهُ عَلَيْهِ وَسَلَّمَ وَاَوْزِعْهُمْ اَنْ يُّوْفُوْا
بِعَهْدِكَ الَّذِيْ عَاهَدْتَّهُمْ عَلَيْهِ وَانْصُرْهُمْ عَلٰى عَدُوِّكَ وَ
عَدُوِّهِمْ اِلٰهَ الْحَقِّ وَاجْعَلْنَا مِنْهُمْ ۔

अल्लाहुम्मह-दिना फ़ीमन हदै-त व आफ़िना फ़ीमन आफ़ै- त व त- वल्लना फ़ीमन त-वल्लै-त व बारिक लना फ़ीमा अअ तै-त व क़िना शर-र मा क़ज़ै-त फ़-इन्न-क तक़्जी व ला युक़्जा अलै-क इन्नहु ला यज़िल्लु मव्वॉलै-त व ला यइज़्ज़ु मन आदै-त तबा-रक-त रब्बना व तआलै-त नस्तग़फ़िरु-क व नतूबु इलैक। अल्लाहुम-म अज़्ज़िबिल क-फ़-र-तल्लज़ी-न यसुद्दू-न अन सबीलि-क व युकज़्ज़िबू-न रुसु-ल-क व युक़ातिलू-न औलि-या-अक। अल्लाहुम्मग़फ़िर लिल मुअ्मिनी-न वल मुअ्मिनाति वल मुस्लिमी-न वल मुस्लिमाति व असलिह ज़ा-त बैनिहिम व अल्लिफ़ बै-न क़ुलूबिहिम वज-अल फ़ी क़ुलूबिहिमिल ईमा-न वल हिक-म-त व सब्बितहुम

अला मिल्लति रसूलि-क सल्लल्लाहु अलैहि व सल्लम व औज़िअहुम अय्युफू बिअहदिकल्लज़ी आहत्तहुम अलैहि वन्सुरहुम अला अदूवि-क व अदूविहिम इलाहल हक्कि वज-अलना मिन्हुम।

"हे अल्लाह! तू आम्हाला मार्गदर्शनाने उपकृत करून मार्गदर्शन लाभलेल्या लोकांमध्ये सामील कर आणि आम्हाला क्षेम-कुशल प्रदान करून क्षेम कुशल लाभलेल्या लोकांमध्ये सामील कर आणि आमची देखरेख करून आम्हाला अशा लोकांमध्ये सामील कर, ज्यांची देखरेख तू केली आहे आणि आम्हाला त्या चीज वस्तू मध्ये समृध्दी दे ज्या तू आम्हाला प्रदान केल्या आहेत आणि आम्हाला त्यांच्या उपद्रवांपासून वाचव, ज्याचा तू फैसला केला आहे. कारण तूच फैसला करतो आणि तुझ्यावर दुसऱ्या कोणाचा ही फैसला लागू होत नाही. तो कदापि अपमानित होऊ शकत नाही ज्याची देखरेख तू करावी आणि तो कधीही सन्मान प्राप्त करू शकत नाही. ज्याला तू आपला शत्रू ठरवून घ्यावे. तू अतिशय समृध्दशाली आहे."

हे आमच्या पालनकर्त्या! आणि अतिशय उच्च व श्रेष्ठतम ! आम्ही तुझ्या जवळ क्षमा याचना करतो आणि तुझ्या समोर तौबा (पुन्हा अपराध न करण्याचा दृढ संकल्प) करतो. हे अल्लाह ! इन्कारी लोकांना शिक्षा यातना दे. जे तुझ्या मार्गापासून रोखतात आणि तुझ्या पैगंबरांना खोटे ठरवितात आणि तुझ्या अवलियां (मित्रां) शी लढतात. हे अल्लाह ! ईमानधारक पुरूष आणि ईमानधारक स्त्रिया, मुस्लिम पुरुष व मुस्लिम स्त्रियांना क्षमा दान कर आणि त्यांच्या परस्पर संबंधात सुधारणा कर, त्यांच्या मनात एकमेकांविषयी प्रेम निर्माण कर. त्यांच्या मनात ईमान व हिकमत निर्माण कर आणि त्यांना आपले पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सम्प्रदायावर निश्चल कर आणि त्यांना ही सुबुध्दी प्रदान कर की यांनी तुला दिलेले वचन पूर्ण करावे. जे तू त्यांच्याकडून घेतले आहेस आणि त्यांची मदत कर आपल्या शत्रूंच्या विरोधात आणि त्यांच्या शत्रूंच्या मुकाबल्यात. हे वास्तव उपास्य ! आमच्या प्रार्थना ऐक आणि आम्हालाही त्याच लोकांमध्ये सामील कर.

# ४९. गरजपूर्तिची नमाज

जेव्हा जेव्हा तुम्हाला एखादी लहान किंवा मोठी गरज पडेल अल्लाह समोर उभे राहून दोन रकअत नफील नमाज अदा करा. या नमाजला सलातुल हाजत असे म्हणतात. अर्थात गरजपूर्तिसाठी पढली जाणारी नमाज. नंतर अल्लाहची स्तुति प्रशंसा आणि दरुद वगैरेचे पठण करून ही दुआ मागा. अल्लाहशी आशा आहे तो तुमची दुआ जरूर कबूल करेल. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ-कथन आहे की जेव्हा एखाद्या माणसाला अल्लाहशी अथवा दुसऱ्या कोणा माणसाशी एखादी गरज असेल तर त्याने खूप चांगल्या प्रकारे वुज़ू करावा, मग दोन रकअत नमाज पढून अल्लाहची स्तुति प्रशंसा करावी आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर दरूद पठण करावे आणि मग अल्लाह जवळ अशा प्रकारे दुआ करावी.

لَآ اِلٰهَ اِلَّا اللّٰهُ الْحَلِيْمُ الْكَرِيْمُ سُبْحَانَ اللّٰهِ رَبِّ الْعَرْشِ
الْعَظِيْمِ وَالْحَمْدُ لِلّٰهِ رَبِّ الْعَالَمِيْنَ اَسْئَلُكَ مُوْجِبَاتِ رَحْمَتِكَ
وَعَزَائِمَ مَغْفِرَتِكَ وَالْغَنِيْمَةَ مِنْ كُلِّ بِرٍّ وَّالسَّلَامَةَ مِنْ
كُلِّ اِثْمٍ لَا تَدَعْ لِيْ ذَنْبًا اِلَّا غَفَرْتَهٗ وَلَا هَمًّا اِلَّا فَرَّجْتَهٗ وَلَا
حَاجَةً هِيَ لَكَ رِضًا اِلَّا قَضَيْتَهَا يَا اَرْحَمَ الرَّاحِمِيْنَ - (ترمذی

ला इला-ह इल्लल्लाहुल हलीमुल करीमु सुबहानल्लाहि रब्बिल अर्शिल अज़ीम वल-हम्दु लिल्लाहि रब्बिल आलमी-न अस-अलु-क मूजिबाति रहमति-क व अज़ाइ-म मग़फ़ि-र-ति-क वल ग़नी-म-त मिन कुल्लि बिर्रिंव-वस्सला-म-त मिन कुल्लि इस्मिन ला त-दअ्ली ज़ंबन इल्ला ग़फ़र-तहू व ला हम्मन इल्ला फ़र्रज-तहू व ला हाजतन हि-य ल-क रिज़न इल्ला क़ज़ै-तहा या अर्हमर्राहिमीन. (हदीस : तिर्मिजी, इब्ने माजा)

"अल्लाहच्या खेरीज कोणी ही उपास्य नाही. तो मोठा सहनशील आणि अतिशय कृपावान आहे. पवित्र आणि श्रेष्ठतम आहे, उच्च व महान ईश सिंहासनाचा स्वामी कृतज्ञता व प्रशंसा केवल अल्लाहकरिताच आहे. जो समस्त विश्वांचा पालनकर्ता आहे. (हे अल्लाह!) मी तुझ्याजवळ त्या चीज वस्तूंची भिक्षा मागतो. ज्या तुझ्या दयाकृपेला बंधनकराक करणाऱ्या आणि तुझ्या क्षमेला आवश्यक करणाऱ्या आहेत. प्रत्येक भलाईत हिस्सा आणि प्रत्येक अपराधापासून सुरक्षितता मागतो (हे अल्लाह !) तू माझा कोणताही गुन्हा माफ केल्याविना आणि कोणतेही दु:ख दूर केल्या विना सोडू नकोस. आणि माझी कोणतीही गरज जी तुझ्या दृष्टीने पसंत असेल, पूर्ण केल्या विना राहू देऊ नको. हे दया करणाऱ्यांमध्ये सर्वाधिक दया करणाऱ्या. (अल्लाह!)"

## ५०. कुरआन तोंडपाठ करण्याची दुआ

पवित्र कुरआनला मुखोदगत करण्यासाठी या दुआचे पठण करत जा. जी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माननीय अली (रजि.) यांना शिकविली गेली.

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) कथन करतात की एकदा आम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या बैठकीत बसलो होतो. तेवढ्यात माननीय अली (रजि.) आले आणि आपल्या स्मरण शक्ति बद्दल तक्रार करू लागले. म्हणाले "हे अल्लाहचे पैगंबर ! कुरआनच्या आयती माझ्या बुध्दीत सुरक्षित राहात नाही. जे काही शिकतो, ते लक्षात राहात नाही. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माननीय अली (रजि.) यांची ही तक्रार ऐकून सांगितले,

'हे अबुल हसन ! मी तुम्हाला अशी दुआ का शिकवू नये. जिचे पठण करून तुम्हीही लाभ घ्या आणि त्यानेही लाभ घ्यावा ज्याला तुम्ही ही दुआ शिकवाल. मग तुम्ही जे काही शिकाल, ते तुमच्या मनात बसेल आणि तुमच्या स्मरणात राहील. माननीय अली (रजि.) म्हणाले, हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) ! अशी दुआ तर जरूर शिकवा." तेव्हा पैगंबरांनी या दुआ संबंधी सांगितले, "जुमा (शुक्रवार) च्या रात्री अर्थात गुरूवारचा दिवस लोटल्यावर आलेल्या रात्री या दुआचे पठण करा. तीन किंवा पाच किंवा सात गुरुवार पर्यंत सातत्याने पठण करा. अल्लाहच्या आदेशाने ही दुआ बाणा प्रमाणे योग्य निशाणावर बसेल. त्या अल्लाहची शपथ, ज्याने मला सत्य धर्म देऊन पाठविले आहे, ईमान धारकांची ही दुआ कधीही वाया जात नाही."

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) कथन करतात की पाच किंवा सात गुरूवार लोटले असतील की अशाच प्रकारे पुन्हा एक दिवस माननीय अली (रजि.) पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या बैठकीत आले आणि म्हणाले, हे अल्लाह चे पैगंबर ! प्रथम मी चार आयती तोंडपाठ करत असे. परंतु पुनरावृत्ती करतांना विसर पडे, आता मात्र अशी अवस्था आहे की मी चाळीस चाळीस आयती तोंडपाठ करतो आणि जेव्हा पुनरावृत्ती करतो तेव्हा असे वाटते की जणू माझ्या समोर अल्लाहचा ग्रंथ उघडून ठेवला आहे. अशा प्रकारे मी पूर्वी एक हदीस ऐकत असे आणि जेव्हा पुनरावृत्ती करण्याचा प्रयत्न करीत असे तेव्हा विसर पडे. आता मात्र ही स्थिती आहे की मी कीतीही हदीस वचने ऐकली आणि जेव्हा त्यांची पुनरावृत्ती करतो, तेव्हा एका अक्षराची ही चूक होत नाही."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हे ऐकून सांगितले, "काबागृहाच्या स्वामी (अर्थात अल्लाह) ची शपथ ! अबुल हसन खरोखर ईमानधारक आहेत."

दुआ पठणाची पध्दत तपशीलवार सांगत पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ही ताकीद सांगितली की जुमाच्या रात्री ही दुआ पढावी. माझे बंधू याकूब (अ.) यांच्या मुलांनी जेव्हा त्यांच्या जवळ क्षमा याचनेच्या दुआकरिता विनंती केली तेव्हा त्यांनी सांगितले, मी लवकरच तुमच्यासाठी क्षमा याचना करेन. याकूब (अ.) चा हेतु होता की जुमाची रात्र आल्यावर मी तुमच्यासाठी क्षमा याचना करने. तेव्हा हे अली ! तुम्ही जुमाच्या रात्री तहज्जुदच्या वेळी उठा. यासाठी की ही वेळ दुआ कबूल

होण्याची वेळ आहे. त्यावेळी मनात दुसरे विचार नसतात आणि अल्लाहकडे एकाग्र चित्त असते. आणि जर रात्रीच्या अंतिम प्रहरी उठणे शक्य नसेल तर अर्ध्या रात्री उठा आणि अर्ध्या रात्री ही उठणे शक्य नसेल तर रात्रीच्या सुरूवातीस चार रकअत नफ्ल नमाज अशा प्रकारे अदा करा की पहिल्या रकातीत सूरह फातिहा नंतर सूरह यासीन आणि दुसऱ्या रकअतीत सूरह फातिहा नंतर सूरह दुखान आणि तिसऱ्या रकअतीत सूरह फातिहा नंतर अलिफ लाम मीम अस्सजदा आणि चौथ्या रकअतीत सूरह फातिहा नंतर सूरह मुल्क चे पठण करा. मग जेव्हा अत्तहियात चे पठण करून सलाम फिरवून घ्या. त्या नंतर चांगल्या शैलीत अल्लाहची स्तुति प्रशंसा करा आणि अतिशय उत्तम प्रकारे पैगंबर मुहम्मद (स.) आणि इतर सर्व पैगंबरांवर दरूद व सलाम पाठवा आणि समस्त ईमानधारक पुरूष व ईमानधारक स्त्रियांसाठी क्षमा याचना करा आणि आपल्या त्या बांधवांसाठी क्षमा याचना करा. ज्यांनी ईमान राखण्याबाबत तुमच्यावर बाजी मारली आहे. शेवटी या दुआचे पठण करा.

اَللّٰهُمَّ ارْحَمْنِيْ بِتَرْكِ الْمَعَاصِيْ اَبَدًا مَّا اَبْقَيْتَنِيْ وَارْحَمْنِيْ

اَنْ اَتَكَلَّفَ مَالَا يَعْنِيْنِيْ وَارْزُقْنِيْ حُسْنَ النَّظَرِ فِيْمَا يُرْضِيْكَ عَنِّيْ

اَللّٰهُمَّ بَدِيْعَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ذَا الْجَلَالِ وَالْاِكْرَامِ وَالْعِزَّةِ

الَّتِيْ لَا تُرَامُ اَسْئَالُكَ يَا اَللّٰهُ يَا رَحْمٰنُ بِجَلَالِكَ وَنُوْرِ

وَجْهِكَ اَنْ تُلْزِمَ قَلْبِيْ حِفْظَ كِتَابِكَ كَمَا عَلَّمْتَنِيْ وَارْزُقْنِيْ

اَنْ اَتْلُوَهٗ عَلَى النَّحْوِ الَّذِيْ يُرْضِيْكَ عَنِّيْ اَللّٰهُمَّ بَدِيْعَ السَّمٰوٰتِ

وَالْاَرْضِ ذَا الْجَلَالِ وَالْاِكْرَامِ وَالْعِزَّةِ الَّتِيْ لَا تُرَامُ اَسْئَالُكَ

يَا اَللّٰهُ يَا رَحْمٰنُ بِجَلَالِكَ وَنُوْرِ وَجْهِكَ اَنْ تُنَوِّرَ بِكِتَابِكَ

بَصَرِيْ وَاَنْ تُطْلِقَ بِهٖ لِسَانِيْ وَاَنْ تُفَرِّجَ بِهٖ عَنْ قَلْبِيْ وَاَنْ

تَشْرَحَ بِهٖ صَدْرِيْ وَاَنْ تَغْسِلَ بِهٖ بَدَنِيْ فَاِنَّهٗ لَا يُعِيْنُنِيْ

عَلَى الْحَقِّ غَيْرُكَ وَلَا يُؤْتِيْهِ اِلَّا اَنْتَ وَلَا حَوْلَ وَلَا قُوَّةَ اِلَّا بِاللّٰهِ

الْعَلِيِّ الْعَظِيْمِ۔ (ترمذی)

अल्लाहुम्मर्हम्नी बितर्किल मआसी अब-दम मा अब्कैतनी वर्हम्नी अन अ-त-कल्ल-फ़ मा ला यअनीनी वर्ज़ुक़्नी हुस्नन ज़रि फ़ीमा युर्ज़ी-क अन्नी अल्लाहुम-म बदीअस्समावाति वल अर्ज़ि ज़लजलालि वल-इक्रामि वल-इज़्ज़तिल्लती ला तुरामु अस-अलु-क या अल्लाहु या रहमानु बि जलालि-क व नूरि वज्हि-क अन तुल-ज़ि-म क़ल्बी हिफ़-ज़ किताबि-क क-मा अल्लम-त-नी वर्ज़ुक़्नी अन् अत-लूहु अल्लन्नह्विल्लज़ी युर्ज़ी-क अन्नी अल्लाहुम-म बदी अस्समावाति वल -

अर-ज़ि-ज़ल-जलालि वल-इकरामि वल इज़्ज़तिल्लती ला तुरामु अस-अलु-क या अल्लाहु या रहमानु बि जलालि-क व नूरि वज्हि-क अन् तुनव्वि-र बिकिताबि-क ब-स-री व अन तुत-लि-क़ बिही लिसानी व अन तुफ़र्रि-ज बिही अन क़ल्बी व अन तश-र-ह बिही सदरी व अन तग़सि-ल-बिही सदरी व अन तग़सि-ल बिही ब-द-नी फ़इन्नहू ला युईनुनी अलल हक़्क़ि ग़ैरु-क व ला युअ्तीहि इल्ला अन-त व ला हौ-ल व ला-क़ूव्व-त इल्ला बिल्लाहिल अलीयिल अज़ीम।

"हे अल्लाह! तू मला जोपर्यंत जिवंत ठेवशील, आपल्या दया कृपेने नेहमी अपराधांपासून अलिप्त राहण्याची सुबुध्दी दे आणि आपल्या दया कृपेने मला निरुद्देश व निरर्थक गोष्टी पासून दूर राहण्याची शक्ति प्रदान कर आणि मला त्या कामांमध्ये चांगली दृष्टी आणि सुज्ञता दे ज्यांच्याद्वारे तुझी प्रसन्नता प्राप्त व्हावी. हे अल्लाह ! आकाशांना व जमीनीला उदाहरणा (नमुन्या) शिवाय बनविणाऱ्या, श्रेष्ठता व प्रतिष्ठा बाळगणाऱ्या आणि अशी सत्ता राखणाऱ्या, ज्याच्या विरोधात येण्याची कल्पनाही केली जाऊ शकत नाही. हे अल्लाह ! हे दयावान ! मी तुझ्या जवळ तुझ्या श्रेष्ठतेचा व तुझ्या दिव्य तेजाचा वास्ता देऊन याचना करतो की ज्या प्रमाणे तू मला आपला ग्रंथ शिकविला, त्याच प्रमाणे मला तो तोंडी पाठ करण्याची शक्ती दे. आणि मला हा ग्रंथ वाचण्याची अशी सुबुध्दी दे की ज्यामुळे तुझी प्रसन्नता प्राप्त व्हावी. हे आकाशांची व जमिनीची निर्मिती करणाऱ्या ! श्रेष्ठता व प्रतिष्ठा बाळगणाऱ्या आणि असा सत्ताधिकार राखणाऱ्या ज्याच्या विरोधात जाण्याची कल्पनाही केली जाऊ शकत नाही. हे अल्लाह ! अपार दयावान ! मी तुझी महानता व तुझ्या दिव्य तेजाच्या वशिल्याने तुझ्या जवळ याचना करतो की तू आपल्या ग्रंथाच्या समृध्दीने माझ्या दृष्टीला उज्वल (प्रकाशमान) कर आणि माझ्या जीभेवर याचे शब्द जारीकर आणि माझ्या मनातून दु:ख आणि कोंडमारा दूर कर आणि याच्या समृध्दीने याच्या साठी माझे अंत:कारण उघड कर आणि याच्या समृध्दीने माझ्या शरीराला धुवून चांगले साफ स्वच्छ कर. तुझ्या खेरीज कोणी नाही. जो सत्याच्या बाबतीत माझी मदत व समर्थन करू शकेल. सत्याने उपकृत करणारा केवळ तूच आहेस. अपराधांपासून परावृत्त राहण्याची शक्ति आणि सदाचारावर अटळ राहण्याचे सामर्थ्य अल्लाह कडूनच लाभू शकते. जो अतिशय उच्च आणि फार फार श्रेष्ठता राखणारा आहे."

(हदीस : तिर्मिजी)

# ५१. कुरआन समजण्याकरिता दुआ

पवित्र कुरआनचे पठण आणि त्याच्या आशयावर चिंतन करणे ईमानधारकांची प्रिय उपासना आहे. कुरआनची ओढ, अल्लाहशी निकट सम्बन्धाचे प्रमाण आहे, आणि अल्लाहशी नाते जोडण्याचे साधन ही. कुरआन संदर्भात विचार चिंतन केल्याने ईमानधारकाला आत्मिक आनंदाची अनुभूति होते आणि त्याद्वारेच त्याच्यावर बुध्दि कौशल्याचे दरवाजे खुले होतात.

नि:संशय पवित्र कुरआन मोठा सहज सुलभ व समजण्यास सोपा ग्रंथ आहे. जेथ पावेतो, त्यात मार्गदर्शन प्राप्त करण्याचा व त्याच्या आदेशांचे अनुसरण करण्याचा संबंध आहे. त्याची शिकवण मोठी साधी, स्पष्ट आणि गुंतागुंत विरहीत आहे. तथापि त्याच्या रहस्य भेदांना व तथ्यांना समजून घेण्याकरिता हे आवश्यक ठरते की तुम्ही कुरआनचे सामंजस्य निर्माण करण्याचे समस्त शिष्टाचार व सर्व अटींचे पालन करून त्याचे पठण करावे. खऱ्या अभिलाषेसह त्यावर चिंतन करावे आणि कोणत्याही वेळी त्याबाबत गफलत आणि नि:स्पृहता दाखवू नये, सातत्याने पठण करावे आणि आयुष्यभर नित्यनेमाने पठण करत रहावे.

ही अगदी स्वाभाविक गोष्ट आहे की पठण करतांना काही अवघड ठिकाणे येतील, जिथे सखोल विचार चिंतन करूनही एखाद्या अर्थावर तुमच्या बुध्दिला समाधान होणार नाही आणि तुम्हाला मोठी उद्विग्नता जाणवेल. परंतु जर खरोखर तुम्ही कुरआनचे विद्यार्थी आहात तेव्हा मुळीच निराश होऊ नका, मनाला लावून घेवू नका आणि कुरआनच्या बाबतीत एखादा चुकीचा विचार मनात आणू नका. आणि न कंटाळून कुरआनवर विचार चिंतन करण्याचे सोडू नका. किंबहुना अगदी एकाग्रचित्त होऊन अल्लाहकडे लक्ष केंद्रित करा आणि सर्वतोपरि अल्लाहच्या जवळ या समस्येचे समाधानासाठी मदतीची याचना करा. कुरआनच्या आयतीमध्ये आपल्या इच्छेने व स्वत:च्या मताने अर्थ लावण्याची किंवा स्वत:च्या आवडी नुसार अर्थ लावण्याची मूर्खतापूर्ण हिंमत करू नका. किंबहुना सत्याभिलाषी प्रमाणे त्यावर अटळ रहावे जे कुरआनच्या शब्दांवरून लक्षात येत आहे. मग अगदी विनम्र भावाने अल्लाहजवळ दुआ करा की हे अल्लाह ! माझ्या मनातला हा गोंधळ दूर कर, मला खरा अर्थ माहीत करून दे आणि माझ्या मनाला त्या अर्थाविषयी समाधान दे जो खरोखर योग्य आहे. या उद्देशाकरिता रात्री अदा केल्या जाणाऱ्या नफील नमाजामध्ये थोड्याशा उंच स्वरात, थोडे थोडे थांबून पठण ही करा आणि खाली दिलेली दुआ प्रार्थनाही करा. अल्लाहशी आशा आहे की ही दुआ जरूर लभदायक ठरेल.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शुभ कथन आहे की जो मनुष्य देखील आपल्या एखाद्या दु:खा प्रसंगी या दुआचे पठण करील, अल्लाह त्याचे दु:ख दूर सारून त्याला आनंद प्रदान करील.

اَللّٰھُمَّ اِنِّیْ عَبْدُکَ، اِبْنُ عَبْدِكَ، اِبْنُ اَمَتِکَ نَاصِیَتِیْ

بِیَدِكَ، مَاضٍ فِیْ حُکْمِكَ، عَدْلٌ فِیْ قَضَآءِكَ اَسْئَالُكَ بِکُلِّ

اسْمٍ ھُوَلَكَ، سَمَّیْتَ بِهٖ نَفْسَکَ اَوْ اَنْزَلْتَهٗ فِیْ کِتَابِکَ

اَوْعَلَّمْتَهٗ اَحَدًا مِّنْ خَلْقِکَ اَوِاسْتَاْثَرْتَ بِهٖ فِیْ عِلْمِ الْغَیْبِ

عِنْدَكَ، اَنْ تَجْعَلَ الْقُرْاٰنَ رَبِیْعَ قَلْبِیْ، وَنُوْرَصَدْرِیْ وَجِلَآءَ

حُزْنِیْ وَذِھَابَ ھَمِّیْ وَغَمِّیْ۔ (مسنداحمد، ابن حبّان)

अल्लाहुम-म इन्नी अब्दु-क, इब्नु अब्दि-क, इब्नु अ-म-ति-क नासि-यती बियदि-क, माज़िन फ़ी हुक्मि-क, अदलुन फ़ी क़ज़ाई-क अस-अलु-क बिकुल्लिस्मिन हु-व-ल-क, सम्मै-त बिही-नफ़-स-क अव अन्ज़ल-तहू फ़ी किताबि-अव अल्लम्तहू अ-ह-दम मिन ख़ल्कि-क अविस्तासर-त बिही फ़ी इल्मिल ग़ैबि इन-द-क, अन् तज-अ-लल क़ुरआ-न रबी-अ क़ल्बी, व नू-र सदरी व जिला-अ हुज़्नी व ज़िहा-ब हम्मी व ग़म्मी।

"हे अल्लाह! मी तुझा दास आहे, तुझ्या दासाचा पुत्र आहे. तुझ्या दासींना पुत्र आहे. माझे कपाळ तुझ्या मुठीत आहे, माझ्यावर तुझाच आदेश चालतो, माझ्या बाबतीत तुझा फैसलाच खरा न्याय आहे. मी तुझ्या जवळ तुझ्या त्या प्रत्येक नावाच्या वशिल्याने जे तुझ्या शान वैभवाला अनुसरून आहे, जे तू स्वत:साठी ठेवले आहे अथवा तू आपल्या ग्रंथात अवतरीत केले आहे किंवा आपल्या सृष्ट निर्मिती मधून कोणाला सांगितले आहे अथवा तू आपल्या जवळ अपरोक्षाच्या खजीन्यात त्याला अध्यावृरूत ठेवले आहे, मी प्रार्थना करतो की कुरआनला माझ्या मनाचा बहर, माझ्या हृदयाचे दिव्य तेज, माझ्या दु:खावर औषध आणि माझ्या काळजी व क्लेश यातनांवर उपाय बनव." (हदीस : मुसनद अहमद, इब्ने हिब्बान)

हदीसचे कथनकर्ता माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) निवेदन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विचारले गेले. काय आम्ही ही दुआ शिकून घ्यावी? तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "जो मनुष्य देखील ही दुआ ऐकेल, त्याने अवश्य शिकून घ्यावी आणि ती जरूर तोंडपाठ करावी."

# ५२. जुमा (शुक्रवार) चे प्रवचन

इस्लामी भावनांना जागृत करण्याची, ईमानाला ताजे टवटवीत राखण्याची व स्मरण करून देण्याच्या जबाबदारीला क्रमशः सातत्याने पार पाडण्यासाठी जुमाचा खुतबा (प्रवचन) अतिशय प्रभावी साधन आहे. स्वाभाविक शैलीत दर आठवड्याला मुसिलमांना त्यांच्या जबाबदारीची आठवण करून देण्यासाठी, धर्माची निकड समजविण्यासाठी आणि इस्लामकरिता काही योगदान देण्यासाठी ही अशी एक धार्मिक व्यवस्था आहे, जिचे उदाहरण दिले जाऊ शकत नाही. परंतु याचा पूरेपूर लाभ तेव्हाच प्राप्त होऊ शकतो, जेव्हा तुम्ही श्रोत्यांना त्यांच्या भाषेत संबोधित कराल.

जेथपावेतो द्वितीय खुतब्या (प्रवचना) चा संबंध आहे तर तो अरबी भाषेतच असला पाहिजे. प्रथम खुतबा श्रोत्यांना येत असलेल्या भाषेत दिला जाऊ शकतो. अधिक चांगले हे ठरेल की तुम्ही सद्य परिस्थितीला समोर ठेवून धार्मिक निकडीसंबंधी लहान परंतु सर्वकष भाषण स्वतः तयार करावे आणि दर आठवडयाला सातत्याने व क्रमबध्दतेने विचारसरणी घडविण्याचा व कृतीशील बनविण्याचा प्रयत्न करावा. परंतु काही कारणास्तव हे शक्य नसेल तर निदान एवढे तरी करा की कोणताही अरबी खुतबा वाचून त्याचा अर्थ श्रोत्यांच्या भाषेत सादर करावा. अरबी प्रवचनाची निवड करण्यातही जास्त योग्य हे की तुम्ही स्वतः पैगंबर मुहम्मद (स.) अथवा चार खलीफांचा एखादा खुतबा निवडून घ्यावा. खाली आम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शुभ मुखातून निघालेली काही वचने प्रस्तुत करतो, ज्यात तिळमात्र शंका नाही. यापैकी एक प्रसिध्द खुतबा आहे जो हिजरत (स्थलांतर) नंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मदीनेत पहिल्या जुमा (शुक्रवार) च्या प्रसंगी दिला होता आणि दुसरा तो होय, ज्यात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मुस्लिमांना मोठ्या प्रभावपूर्ण व जोरदार शैलीत प्रवृत्त केले की त्यांनी कुरआनशी घनिष्ठ संबंध निर्माण करावा आणि सातत्याने त्यावर विचार चिंतन करीत रहावे. अशासाठी की याच्याशी संबंध जोडल्या विना धर्माशी संबंध कायम राखणे शक्य नाही.

## मदीनेत पहिला खुतबा :

अल-हुम्द लिल्लाहि अह्मदुहू व अस्तईनुहू व अस्तग़फ़िरुहू व अस्तहदीहि व ऊमिनु बिही व ला अक़्फ़ुरुहू, व उआदी मय्यँकफ़ुरुहू। व अश्हदु अल्ला इला-ह इल्लल्लाहु वहदहु ला शरी-क लहू व अश्हदु अन-न मुहम्मदन अब्दुहू व रसूलुहू। अर-स-ल-हू बिलहुदा वन्नुरि वल-मौईज़ति अला फ़त-रतिम मिनर्रुसुलि व क़िल्लतिम मिनल इल्मि व ज़लालतिम मिन्नासि वन क़िताइम मिनज़्ज़मानि व दुनूविम-मिनस्साअति व कुर्बिम मिनल अजल। व मयुँति-इल्ला-ह व रसूलहू फ़-क़द र-श-द व मय्यँअसिहिमा फ़-क़द ग़वा व फ़र्र-त व ज़ल्ला ज़लालम बईदा। ऊसीकुम बितक़्क़ल्लाहि फ़इन्नहू ख़ैर मा औसा बिहिल मुसलिमुल मुसलि-म अय्यँहुज़-ज़ुहू अलल आख़िरति व अय्यँअ्मुरहू बितक़्क़ल्लाहि फ़हज़रु मा हज़-ज़-र कुमुल्लाहु मिन नफ़सिही व ला अफ़-ज़-ल मिन ज़ालि-क नसीहतवँ-व ला अफ़-ज़-ल मिन ज़ालि-क ज़िक्रवँ इन-न तक़्क़ल्लाहि लिमन अमि-ल बिही अला व-ज लिवँ-व मख़ाफ़तिम मिर-रब्बिहि औ-नु सिदक़िन अला म तब्ग़ू-न मिन अमरिल आख़िरति व मय्युँसलिहिल्लज़ी बैनहू व बैनल्लिाहि मिन अमरिहि फ़िस्सिर्रि वल

अलानियति ला यन्वी बिज़ालि-क इल्ला वज्हल्लाहि यकुल्लहु ज़िक-रन-फी आजिलि अमरिही व ज़ुखरन फ़ीमा बअ-दल मौति-ही-न-यफ़्तक़िरुल मरउ इला मा क़द्द-म व मा का-न सिवा ज़ालि-क य वद्दु लौ अन-न बै-न हा व बैनहू अ-म-दम बईदवँ-व युहज़्ज़िरु कुमुल्लाहु नफ़्सहू वल्लाहु रऊफ़ुम बिल ईबादि वल्लज़ी स-द-क़ क़ौलहू, व अन-ज-ज़ वअ-दहू ला-खुलि-फ़ लिज़ालि-क फ़-इन्नहू यक़ूलु अज़-ज़ व जल - ल मा युबद्दलुल क़ौलु ल - दय-य व मा अना बिज़ल्लामिल लिल अबीदि फत्तुकुल्ला-ह फ़ी आजिलि अमरिकुम व आजिलि-ही फ़िस्सिर्रि वल अलानियति फ़-इन्नहू मय्यँत्तक़िल्ला-ह युकफ़्फ़िर अन्हु सय्यिआतिही व युअज़िम लहू अजरा। व मय्यँत्तक़िल्ला-ह फ़-क़द फ़ा-ज़ फ़ौज़न अज़ीमा। व इन-न तक़ल्लाहि युवक़्क़ी मकतहू व युवक़्क़ी उकू-ब-त-हू व युवक़्क़ी सुख्तहु, व इन-न तक़ल्लाहि युबय्यिज़ुल वुजू-ह। व युर्ज़िर रब-ब व यर-फ़उद-द-र-जह।

खुज़ू बिहज़्ज़िकुम व ला तुफ़र्रितू फ़ी जम्बिल्लाहि व क़द अल-ल-म कुमुल्लाहु किताबह। व न-ह-ज लकुम सबी-लहु लियअ-ल-मल्लज़ी-न स-द-क़ू व यअ-ल-मलकाज़िबीन। फ़-अहसिनू कमा अह-स-नल्लाहु इलैकुम व आदू अअ-दाअह। व जाहिदू फ़िल्लाहि हक़्-क जिहादिही। हुवज्तबाकुम व सम्माकुमुल मुसलिमी-न लियहलि-क मन ह-ल-क अम-बय्यिनतिंव-व यह्या मन हय-य अमबय्यिनतिन वला क़ुव्व-त इल्ला बिल्लाह।

फ़-अक्सिरु ज़िकरल्लाहि वअ-मलू लिमा बअ-दल यौमि फ़-इन्नहू मँय्यस्लिहु मा बैनहू व बैनल्लाहि यक्फ़िहिल्लाहु मा बैनहू व बैनन्नास।

ज़ालि-क बि-अन्नल्ला-ह यक़्ज़ी अलन्नासि वला यक़्ज़ू-न अलैहि व यमलिकु मिनन्नासि व ला यमलिकू-न मिन्हु अल्लाहु अक्बरु व ला क़ूव्व-त इल्ला बिल्लाहिल अज़ीम।

कृतज्ञता व प्रशंसा अल्लाह करिता, मी त्याचे आभार मानतो, त्याच्याजवळ मदत मागतो, त्याच्याकडे क्षमा याचना करतो, त्याच्याकडून मार्गदर्शन इच्छितो आणि त्याच्यावर ईमानधारणकरतो आणि त्याच्या सोबत दुसऱ्या कुणाला अल्लाहचा सहभागी ठरवित नाही, आणि अशा माणसाला आपला शत्रु लेखतो, जो अल्लाहचा सहभागी ठरवितो. मी साक्ष देतो की अल्लाहच्या खेरज कोणी उपास्य नाही. तो एकटा आहे, त्याचा कोणीही सहभागी नाही आणि मी साक्ष देतो की मुहम्मद (स.) अल्लाहचे दास आणि त्याचे पैगंबर आहेत. ज्यांना अल्लाहने मार्गदर्शन, दिव्य तेज, आणि बोध उपदेश देऊन अशा युगात पैगंबर बनविले जेव्हा दीर्घकाळा पासून पैगंबरांच्या आगमनाचा क्रम बंद होता ! सत्य ज्ञानाचा प्रकाश मध्यम झाला होता. मार्गभ्रष्टतेचा सुळसुळाट होता. जीवन व्यवस्था बिघडली होती. कयामत डोक्यावर आली होती. आणि प्रत्येक माणसाचा मृत्यु त्याच्या शिरावर घोंघावत होता.

यास्तव ज्याने (पैगंबरास मान्य करून) अल्लाह आणि पैगंबरांचे अनुसरण केले, त्याने खऱ्या अर्थाने मार्गदर्शन प्राप्त केले आणि ज्याने (प्रेषित्वाचा इन्कार करून) अल्लाह आणि त्याच्या पैगंबराची अवज्ञा केली, तो पथभ्रष्ट झाला आणि अविचाराच्या भोवऱ्यात सापडला आणि सत्य मार्गापासून विचलीत होऊन मार्गभ्रष्टतेत खूप दूर जाऊन पडला.

मी तुम्हाला वसीयत करतो की अल्लाहचे भय बाळगून रहा. एकाद्या ईमानधारकाला जो उत्तम उपदेश करू शकतो तो हाच की त्याने त्याला मरणोत्तर जीवनाचे भंडार जमा करण्यावर प्रवृत्त करावे आणि अल्लाहशी भय बाळगून राहण्यास सांगावे. यास्तव अल्लाहचे भय बाळगा, जसा त्याने आपले भय बाळगण्याचा आदेश दिला आहे. त्याहून अधिक चांगली न दुसरी एखादी वसीयत आहे आणि न त्याहून अधिक चांगली एखादे स्मरण असू शकते.

आणि खरी गोष्ट अशी की अल्लाहचे भय दासाकरिता जो अल्लाहशी भयकंपित राहून जीवन व्यतीत करील, आखिरत (मरणोत्तर जीवना) च्या उत्तम परिणतीचा सच्चा सहायक आहे, ज्याची तुम्ही अभिलाषा बाळगता आणि जो मनुष्य सच्चा इराद्याने केवळ अल्लाहच्या प्रसन्नतेसठी अल्लाहकडून आपल्या मामल्यास खुल्या छुप्या प्रत्येक स्थितीत ठीक करून घेईल तर त्याचा त्वरीत मोबदला या जगात असा की तो सत्शील व सदाचारी गणला जाईल आणि मृत्यू नंतर च्या जीवनात तो मोठा समृद्ध व सम्पन्न होईल, ज्या वेळी प्रत्येक मनुष्य आपल्या त्या सत्कर्माचा फार गरजू असेल. जे त्याने त्यावेळी केले असतील आणि त्याखेरीज जी दुष्कृत्ये असतील, त्यांच्या विषयी तो ही इच्छा धरेल की, कदाचित, ही वाईट कृत्ये माझ्या पासून दूर झाली असती आणि अल्लाह तुम्हाला आपले भय दाखवितो आणि अल्लाह आपल्या दासांवर अतिशय मेहेरबान आहे.

शपथ आहे त्या अस्तित्वाची (अल्लाहची) ज्याचे कथन अगदी सच्चे आहे, आणि वायदा खरा ठरल्याविना राहात नाही की ही गोष्ट झाल्या शिवाय राहणार नाही कारण स्वत: तो सर्वश्रेष्ठ व सर्वोच्च अल्लाहने सांगितले,

"माझ्या समोर कथन बदलले जात नाही आणि मी आपल्या दासांवर किंचित ही अत्याचार करणारा नाही."

यास्तव अल्लाहचे भय बाळगत राहा. या जगाच्या व पारलौकिक जीवनाच्या समस्त खुल्या व छुप्या मामल्यांमध्ये. खरी गोष्ट अशी की जो अल्लाहच्या प्रकोपाचे भय राखतो. अल्लाह त्याच्या अपराधांना त्याच्या पासून झाडून टाकतो आणि त्याच्या मोबदल्यास जास्तीत जास्त वाढवितो. आणि जो त्याचे भय बाळगत राहीला, त्याने फार मोठी सफलता प्राप्त केली आणि चांगल्या प्रकारे हे जाणून घ्या की अल्लाहचे भय दासाला त्याच्या क्रोधापासून दूर राखतो. त्याच्या शिक्षा यातनेपासून सुरक्षित राखतो आणि त्यांच्या नाराजी पासून वाचवितो आणि या सत्यालाही चांगले समजून घ्या की अल्लाहचे भय राखून केलेला सदाचार, चेहऱ्यांना तेजस्वी आणि प्रकाशमान बनवितो. स्वामीला आपल्या दासाशी प्रसन्न राखतो आणि दासाचे दर्जे उंचावितो.

पहा, आपापल्या नशीबाची सत्कर्मे गोळा करून घ्या आणि अल्लाहच्या समोर (आज्ञापालन व उपासनेत) सुस्ती मुळीच करू नका. वास्तविक त्याने तुम्हाला आपल्या ग्रंथाचे ज्ञान देऊन आपला सरळ मार्ग तुमच्यासाठी खुला केला आहे, यासाठी की त्याने जाणून घ्यावे अशा लोकांना जे आपल्या ईमान विषयक दाव्यात सच्चे आहेत. आणि त्यांना जे खोटारडे आहेत. यास्तव तुम्ही सुध्दा त्या लोकांशी सद्व्यवहार करा. जसा त्याने तुमच्याशी सद्व्यवहार केला आहे आणि त्यांच्या शत्रूंना आपला शत्रू समजा आणि त्याच्या मार्गात अशा प्रकारे जिहाद करा की जिहादचा हक्क अदा व्हावा. त्याने तुम्हाला आपल्या धर्मासाठी निवडले आहे आणि तुमचे नाव

मुस्लिम ठेवले आहे. यासाठी की ज्याला नष्ट व्हायचे आहे तो स्पष्ट प्रमाणासह नष्ट व्हावा आणि ज्याला जिवंत रहायचे आहे, त्याने स्पष्ट प्रमाणासह जिवंत रहावे आणि शक्ति व सामर्थ्याचा स्त्रोत केवळ अल्लाहचे अस्तित्व आहे.

यास्तव अल्लाहचे स्मरण जास्तीत जास्त करा आणि आज नंतर उद्या येणाऱ्या भविष्याकरिता सत्कर्म करीत रहा. कारण जो दास त्याच्या व आपल्या अल्लाहच्या दरम्यानचा मामला ठिक करतो, अल्लाह त्याच्याकरिता या समस्त मामल्यात पर्याप्त ठरतो. जे त्याच्या व दासाच्या दरम्यान असतात. यासाठी की अल्लाहच दासांचे फैसले करतो. दास त्याचा फैसला करीत नाही तो माणसांच्या प्रत्येक चीज वस्तूचा स्वामी आहे आणि माणसाच्या ताब्यात त्याची कोणतीही चीज वस्तू नाही तो सर्वात महान आहे आणि शक्ति व सामर्थ्य केवळ त्याच्याच जवळ आहे."

## कुरआनची ओढ राखण्याची ताकीद :

इन्नल हम-द लिल्लाहि अहमदुहू व अस्तईनुहू व नऊज़ुबिल्लाहि मिन शुरुरि अनफुसिना व मिन सय्यिआति अअ्- मालिना मय्यँहदिहिल्लाहु फला मुज़िल-ल लहू व मय्युँज-लिल्हु फला हादि-य लहू व अश्हदु अल्लाइला-ह इल्लल्लाहु वह्दहू ला शरी-क लह।

इन-न अह्सनलहदीसि किताबुल्लाहि क़द अफ़-ल-ह मन ज़य्य-न-हुल्लाहु फी क़लबिही व अद-ख-लहू फ़िल इस्लामि बअ-दल-कुफ़रि, वख़्तारहू अला मा सिवाहू मिन अहादीसिन्नासि। इन्नहू अस्दकुल हदीसि व अब्लग़ुह। अहिब्बू मन अ-हब्बल्ला-ह व अहिब्बुल्ला-ह मिन कुल्लि कुलूबिकुम व ला तमल्लू कलामल्लाहि व ज़िक-रहू, व ला तक़्सू अलैहि कुलूबकुम।

उअ-बुदुल्ला-ह व ला तुशरिकू बिही शैअन, इत्तकुल्ला-ह हक़-क़ तुक़ातिही व सद्दिकू सालि-ह मा तअ-मलू-न बिअफ़्वाहिकुम व तहाब्बू बिरुहिल्लाहि बैनकुम। वस्सलामु अलैकुम व रह - मतुल्लाह। (एजज़ुल कुरआन)

नि:संशय कृतज्ञता व प्रशंसा केवळ अल्लाहकरिता आहे. मी त्याची स्तुती प्रशंसा करतो, त्याच्याकडे मदत मागतो आणि आम्ही त्याच्या क्षमाछत्राचा आश्रय इच्छितो. आत्म्याच्या उपद्रवापासून आणि वाईट आचरणाच्या मोबदल्या पासून ज्याला अल्लाह मार्गदर्शन देईल (आणि तो त्यालाच मार्ग दाखवितो, जो खरोखर मार्गदर्शनाची इच्छा राखतो) तर त्याला कोणीही पथभ्रष्ट करू शकत नाही आणि ज्याला अल्लाह सरळ मार्गापासून दूर भटकवून देईल (आणि तो त्यालाच मार्गापासून भटकवितो जो सरळ मार्गाची इच्छा राखत नाही) तर त्याला कोणीही मार्गदर्शन करू शकत नाही.

मी साक्ष देतो की अल्लाह खेरीज कोणीही उपास्य नाही. तो एकटा आहे. त्याचा कोणीही सहभागी नाही. खरे तर सर्वात उत्कृष्ट वाणी अल्लाहचा ग्रंथ आहे. तो मनुष्य सफल झाला ज्याच्या मनात अल्लाहच्या ग्रंथाचे दिव्य तेज आहे आणि ज्याला इन्कारा नंतर अल्लाहने इस्लामची दौलत प्रदान केली. ज्याने समस्त मानवी वचनांना सोडून अल्लाहच्या ग्रंथाला आपल्यासाठी निवडून घेतले. नि:संशय अल्लाहची वाणी नखशिखान्त सत्य आहे. अतिशय प्रभावी आहे. जो याच्याशी

आत्मीयता राखील तुम्ही ही त्याच्याशी प्रेम राखा आणि आपल्या मनाच्या संपूर्ण एकाग्रतेसह अल्लाहशी खरे प्रेम राखा आणि त्याच्या ग्रंथाचे पठण आणि त्याच्या स्मरणापासून कधीही कंटाळून जाऊ नका आणि कधीही तुमची मने अल्लाहच्या ग्रंथाबाबत बेपर्वा आणि सक्त होऊ देऊ नका. यास्तव अल्लाहची मनापासून उपासना करा. दुसऱ्या कोणालाही त्याच्या सोबत तिळमात्र सहभागी ठरवू नका आणि त्याचे भय बाळगत रहा. जसा की भय बाळगण्याचा हक्क आहे आणि आपल्या सत्कर्मांचे सत्य समर्थन जीभेनही करीत रहा (म्हणजे जीभे द्वारे तेच सांगा, जे तुमच्या शान वैभवाला अनुसरून असेल) आणि अल्लाहची दया कृपा आणि धर्माच्या आधारावर आपसात स्नेह प्रेम राखा.'' अल्लाहची सलामती व दया कृपा असो तुमच्यावर.

## द्वितीय खुतबा :

अल-हम्दु लिल्लाही हम्दन कसीरवँ-वस्सलातु वस्सलामु अला रसूलिही अर-स-ल-हुल्लाहु शाहिदवँ-व दाईयन इलल्लाहि बिइज़्निहि व सिराजम-मुनीरा, व अला आलिही व अस्हाबिही व सल्ल-म तस्लीमन कसीरन कसीरा।

अस्माबअद-फ़-या- अय्युहन्नासु ! ऊसीकुम बितक़्वल्लाहि फ़-इन-न तक़्वल्लाहि मिलाकुल ह-स-नात । व अलैकुम बित्ताअति फ़-इन्नहू मँय्युतिइल्ला-ह व रसूलहू फ़-क़द फ़ा-ज़ फ़ौज़न अज़ीमा । व क़ालल्लाहु तआला फ़ी किताबिहिल मजीद । इन्नला -ह- व मलाइ-क-त-हू युसल्लू- न अलन्नबी -इ या अय्युहल्लज़ी-न आमनू सल्लू अलैहि व सल्लिमू तस्लीमा।

अल्लाहुम-म सल्लि अला सय्यिदिना व मौलाना मुहम्मदिवँ-व अला आलिही व अस्हाबिहिल्लज़ी-नत-त-ब ऊहु फ़ी साअतिल उसरह । अल्लाहुम-म अम्तिर श-आबी-ब रिज़्वानि-क अलस्साबिक़ी-नल अव्वली-न मिनल मुहाजिरी-न वल अनसारि ख़सूसन अला अफ़्जलिल ब-शरि बअदल अम्बियाई बित्तह्क़ीक़ि अमीरिल मुअ्मिनी-न सय्यिदिना अबी बक्रि-निस-सिद्दिक़ि रज़ियल्लाहु तआला अन्हु व अला अमीरिल मुअ्मिनी-न सय्यिदिना उ-म-र-निल फ़ारुक़ि रज़ियल्लाहु अनहु व अला अमीरिल मुअ्मिनी-न सय्यिदिना उसमानब्नि अफ़्फ़ा-न रज़ियल्लाहु तआला अन्हु व अला अमीरिल मुअ्मिनी-न सय्यिदिना अली-यिब्नि अबी तालिबन कर्रमल्लाहु वज्हहू व अला व-ल-दैहीस-सईदैनी सय्यिदा शबाबि अह्लिल जन्नति अल-ह-स-नि वल हुसैनि रज़ियल्लाहु तआला अन्हुमा व अला उम्मिहिमा सय्यिदति निसाइ अहिलल जन्नति फ़ाति-म-तज़-ज़हराइ रज़ियल्लाहु तआला अन्हा व अला साइरिस्सहाबति वत्ताबिई-न रिज़्वानुल्लाहि तआला अलैहिम अजमईन।

अल्लाहुम्मनसूर मन न-स-र दी-न मुहम्मदिन सल्लल्लाहु अलैहि व सल्ल-म वज-अलना मिन्हुम, वख़्जुल मन-ख़-ज़-ल दी-न मुहम्मदिन सल्लल्लाहु अलैहि व सल्ल-म व ला तजअलना मिन्हुम इबादल्लाहि ! रहि-म-कुमुल्लाहु इन्नल्ला-ह यामुरु बिल अदलि वल एहसानि व ईताइ ज़िल क़ुर्बा व यन्हा अनिल फ़ह्शाइ वल मुनकरि वल बग़्यि यइज़ुकुम ल-अल्लकुम त-ज़क्करु-न उज़्कुरुल्ला-ह यज़्कुरकुम वदऊहु यस-तजिब लकुम व ल-ज़िकरुल्लाहि तआला अअ-ला व औला व अ-अज़्ज़ु व अ-जल्लु व अ-तम्मु व अ-हम्मु व अअ-ज़मु व अकबर।

समस्त स्तुति प्रशंसा आणि कृतज्ञता अल्लाहकरिता आहे आणि फार फार दरूद व सलाम असो. त्याच्या पैगंबरांवर ज्यांना अल्लाह ने आपल्या आदेशाने साक्ष देणारा, भय दाखविणारा, आणि अल्लाहकडे बोलाविणारा व उज्वल दीप बनवून पाठविले आणि अधिकाधिक दरूद व सलाम असो त्यांच्या संततीवर आणि त्यांच्या सहकाऱ्यांवर.

लोक हो! मी तुम्हाला अल्लाहचे भय राखून सदाचार करण्याची आणि दुराचारापासून दूर राहण्याची वसीयत करतो. नि:संशय, अल्लाहचे भय सत्कर्मांचा खजीना आहे. तुमच्यासाठी आज्ञापालन व अनुसरण आवश्यक आहे. तेव्हा जो अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करील तो फार मोठी सफलता प्राप्त करील. सर्वश्रेष्ठ अल्लाहने आपल्या महामहीम ग्रंथात सांगितले आहे, नि:संशय! अल्लाह आणि त्याचे फरिश्ते पैगंबरांवर दरूद व सलाम पाठवितात. हे ईमानधारकांनो! तुम्ही ही त्यांच्यावर अगणित दरूद व खूप खूप सलाम पाठवा.

हे अल्लाह! तू आपल्या दया कृपेचा वर्षाव कर, आमचे सरदार आणि आमचे मित्र आदरणीय मुहम्मद यांच्यावर आणि त्यांच्या संतती व सहकाऱ्यांवर ज्यांनी तंगी आणि संकटांच्या प्रसंगात त्यांचे अनुसरण केले. हे अल्लाह! आपली मर्जी व आपल्या प्रसन्नतेचा वर्षाव कर त्या स्थलांतर केलेल्या ईमानधारकांवर आणि त्यांना सर्वतोपरि मदत करणाऱ्या अन्सारवर ज्यांनी सुरूवातीलाच ईमान राखले. विशेषत: पैगंबरांच्या नंतर सर्वात श्रेष्ठ मानव ईमानधारकांचे प्रमुख (अमीरूल मोमीनीन) आमचे सरदार माननीय अबू बकर सिद्दीक (रजि.) वर, अमीरूल मोमीनीन उमर बिन खत्ताब (रजि.) वर, अमीरूल मोमीनीन आमचे सरदार उस्मान बिन अफ्फान (रजि.) वर, अमीरूल मोमीनीन आमचे सरदार माननीय अली इब्न अबी तालिब (कर्रमल्लाहु वजुहु) वर, त्यांचे दोन्ही नेक तरूण सुपूत्र, जन्नती लोकांचे सरदार माननीय हसन आणि हुसेन (रजि.) वर, त्या दोघांची माता जन्नती स्त्रियांची सरदार माननीय फातिमा जोहरा (रजि.) वर, इतर सर्व सहाबा (पैगंबर मुहम्मद (स.) यांचे सहकारी) आणि ताबईन (रिजवानुल्लाहि तआला अलैहिम अजमईन) वर.

हे अल्लाह! तू मदत कर त्या लोकांची जे माननीय मुहम्मद (स.) यांनी आणलेल्या दीन (जीवनधर्मा) ची मदत करतील आणि आम्हाला अशा लोकांमध्ये सामील कर आणि असफल व अपमानित कर त्या लोकांना ज्यांनी माननीय मुहम्मद (स.) यांनी आणलेल्या धर्माला अवमानित व असफल बनविण्याचा प्रयत्न केला आणि आम्हाला अशा लोकांमध्ये सामील करू नकोस.

हे अल्लाहच्या दासांनो! अल्लाह तुमच्यावर दया करो. नि:संशय, अल्लाह आदेश देतो. न्याय करण्याचा, उपकार करण्याचा आणि नातेवाईकांना देण्याचा आणि तो मनाई करतो घाणेरड्या गोष्टीपासून, दुष्कृत्यांपासून आणि अत्याचार व अतिरेकापासून. तो तुम्हाला उपदेश करतो यासाठी की तुम्ही बोध ग्रहण करावा. अल्लाहचे स्मरण राखा तो तुमचे स्मरण राखेल. त्याला पुकारा तो तुमच्या पुकार चे उत्तर देईल आणि (लक्षात ठेवा की) सर्वश्रेष्ठ अल्लाहचे स्मरण उच्च प्रतिष्ठा आणि महानता राखणारी, परिपूर्ण, महत्वपूर्ण महान आणि फार मोठी गोष्ट आहे.

# ५३. निकाहचा खुतबा

निकाहचे शरीअतविषयक स्वरुप समजाविण्यासाठी, बुध्दीत बसविण्यासाठी आणि निकाहच्या संबंधाने येणाऱ्या मोठ्या जबाबदारीची आठवण करून देण्यासाठी निकाहच्या समारंभात खुतबा पढणे पैगंबर आचरणानुसार आहे. या प्रसंगी खुतब्याचा पूरेपूर लाभ घेण्याकरिता अधिक योग्य हे की निकाह पढविण्याऱ्या खुतब्या (प्रवचना) चा अनुवाद आणि संक्षिप्तस्पष्टीकरण ही आपल्या भाषेत सादर केले जावे. यासाठी की श्रोत्यांनी नीट समजून घ्यावे. हा उद्देश लक्षात घेता खाली निकाहच्या खुतब्याचा अनुवाद दिला जात आहे.

इन्नल हम-द लिल्लाहि न-स-तईनुहू व नस्तग़फ़िरुहू व नऊज़ू बिल्लाहि मिन शुरुरि अनफ़ुसिना मय्यँहदिहिल्लाहु फ़-ला मुज़िल - ल लहू व मय्युँज़लिल्हू फ़ला हादि-य लहू व अश्हदु अल्ला-इ-ला-ह इल्लल्लाहु व अश्हदु अन-न मुहम्मदन अब्दुहू व रसूलुह।

या अय्युहल्लज़ी-न आमनुत्तकुल्ला-ह हक़्-क तुक़ातिही व ला तमूतुन-न इल्ला व अन्तुम मुसलिमून।

या अय्युहन्नासुत्तक़ू रब्बकुमुल्लज़ी ख़-ल-क़्-कुम-मिन-नफ़सिवँ -वाहि-द तिवँ-व ख़-ल-क़ मिनहा ज़ौजहा व बस-स मिनहुमा रिजालन कसीरवँ-व निसा-अ, वत्तकुल्ला-हल्लज़ी तसाअलू-न बिही वल अरहा -म इन्नला-ह का-न अलैकुम रक़िबा। या अय्युहल्लज़ी- न आमनुत्तकुल्ला-ह व क़ूलू क़ौलन सदीदंय्युसलिह लकुम अअ-मालकुम व यग़फिर लकुम ज़ुनूबकुम व मय्युँति इल्ला-ह व रसूलहू फ़-क़द फ़ा-ज़ फ़ौजन अज़ीमा।

व क़ा-ल रसूलुल्लाहि सल्लल्लाहु अलैहि व सल्ल-म वल्लाहि इन्नी ल-अख़शाकुम लिल्लाहि व अतक़ाकुम लहू वलाकिन्नी असूमु व उफ़तिरु व उसल्ली व अरकुदु व अ-त-जव्वजुन्निसा-अ फ़-मर्रग़ि-ब अन सुन्नती फ़लै-स मिन्नी

"कृतज्ञता व प्रशंसा अल्लाहकरिताच आहे. आम्ही त्याच्याचकडे मदत मागतो आणि त्याच्याच जवळ आपल्या अपराधांची क्षमा मागतो आणि आम्ही आपल्या आत्म्याच्या उपद्रवांच्या व दुष्कृत्यांच्या तुलनेत स्वत:ला अल्लाहच्या आश्रयात देतो. (खरे तर असे की) ज्याला अल्लाह सरळ मार्गावर चालवील (आणि तो त्यालाच सरळ मार्गावर चालवितो. जो सरळ मार्गी चालण्याचा इरादा राखतो) तर त्याला कोणी पथभ्रष्ट करू शकत नाही. आणि ज्याला अल्लाह मार्गभ्रष्ट करतो (आणि तो त्यालाच मार्गभ्रष्ट करतो, जो स्वत: मार्गभ्रष्ट होऊ इच्छितो) तर त्याला कोणीही सरळ मार्गावर आणू शकत नाही आणि मी साक्ष देतो की अल्लाह खेरीज कोणीही उपास्य नाही आणि मी साक्ष देतो की मुहम्मद (स.) अल्लाहचे दास आणि त्याचे पैगंबर आहेत.

हे ईमानधारकांनो! अल्लाहचे भय यथा योग्यरित्या अंगिकारा आणि मरेपर्यंत अल्लाहशी निष्ठा राखण्यात व आज्ञापालन करण्यावर कायम रहा.

लोकांनो! आपल्या पालनकर्त्याच्या प्रकोपाचे भय बाळगा, ज्याने तुम्हाला एका जीवापासून निर्माण केले आणि त्याच जीवापासून त्याचा जोडा निर्माण केला. आणि त्या

दोघांच्या द्वारे अनेक पुरुष आणि स्त्रिया पसरविल्या. त्या पालनकर्त्या अल्लाहच्या नाराजी पासून आपला बचाव करीत रहा. ज्याचा वास्ता देऊन तुम्ही एकमेकांजवळ आपले हक्क मागतात आणि नातेवाईकांच्या हक्कांची काळजी घ्या. विश्वास ठेवा, अल्लाह तुमची देखरेख करीत आहे.

हे ईमानधारकांनो! अल्लाहचे भय बाळगत रहा आणि तोलामोलाचे मजबूत कथन जीभेने बोला. अल्लाह तुमच्या आचरणात सुधार घडवील आणि अपराधांवर माफीचे पांघरूण घालील आणि जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करतील ते फार मोठी सफलता प्राप्त करतील."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे सांगितले,

"अल्लाहची शपथ! मी तुम्हा सर्वात जास्त अल्लाहचे भय राखणारा आहे. तुम्हा सर्वांहून अधिक त्यांच्या नाराजी पासून आपला बचाव करणारा आहे. परंतु माझी अवस्था अशी आहे की मी कधी नफील रोजे राखतो, तर कधी रोजा राखता नाही. रात्री नमाज ही पढतो तर कधी झोप घेतो आणि मी स्त्रियांशी निकाह देखील करतो. यास्तव जो माझ्या आचरण पध्दतिचा अव्हेर करील, त्याचा माझ्याशी कसलाही संबंध नाही."

# ५४. इस्तिखारा

जीवनातल्या प्रवास, निकाह आणि व्यापार वगैरे महत्वपूर्ण मामल्यांमध्ये इसतिखारा करून घेत जा.

इस्तिखाराचा अर्थ आहे शुभ मांगल्य आणि भलाईची अभिलाषा करणे. ज्या महत्वपूर्ण आणि उचित कामांमध्ये तुम्हाला शुभ मांगल्याचा पैलू उघडपणे दिसून यावा. त्या संदर्भात इस्तिखाराचा इतमाम राखा आणि मग ज्या प्रमाणे मनाचा कल जाणवेल, त्यास अल्लाहचा फैसला समजून अंगिकारा.

इस्तिखाराची पध्दती अशी की जेव्हा जेव्हा फार मोठे महत्वपूर्ण काम समोर असेल तर अनुचित व हराम वेळा खेरीज वाटेल तेव्हा दोन रकअत नफ्ल नमाज अदा करा आणि मग इस्तिखाराच्या दुआचे पठण करा.

माननीय साद बिन अबी वक्कास (रजि.) यांचे कथन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाह कडून शुभ मांगल्याची इच्छा करणे आदमच्या संततीचे सद्‌भाग्य आहे आणि अल्लाहच्या फैसल्यावर राजी होणे हे ही आदमच्या संततीचे सदभाग्य आहे आणि आदमच्या संततीचे दुर्दैव हे की तिने अल्लाहकडे इसतिखारा न करावा आणि अल्लाहच्या फैसल्या वर नाखुश व्हावे." (हदीस : मुसनद अहमद)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हे ही सांगितले,

"इस्तिखारा करणारा कधीही निराश होत नाही आणि सल्ला मसलत करणारा कधी लज्जित होत नाही आणि कीफायतीने वापर करणारा कधीही कोणाचा गरजवान होत नाही." (तबरानी)

माननीय जाबिर (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) ज्या प्रमाणे आम्हाला कुरआन शिकवित त्याच प्रमाणे इस्तिखारा करण्याची ही शिकवण देत. ते सांगितले, जेव्हा तुमच्यापैकी कोणी एखाद्या महत्वपूर्ण मामल्यात काळजीग्रस्त असेल तर त्याने आधी दोन रकअत नफ्ल नमाज अदा करावी. त्यानंतर या दुआचे पठण करावे. (हदीस : बुखारी)

अल्लाहुम-म इन्नी अस्तख़ीरु-क बिइल्मि-क व अस्तक़्दिरु-क बिक़ुद-रति-क व अस् अलु-क मिन फ़ज़्लि-कल अज़ीमि फ़-इन्न-क तक़दिरु व ला अक़दिरु व तअलमु व ला अअलमु व अन-त अल्लामुल ग़ुयूब।

अल्लाहुम-म इन कुन-त तअ-लमु अन-न हाज़ल अम-र ख़ैरुल्ली फ़ी दीनी व मईशती व आक़िबति अम्री फ़क़दिरहू ली व यससिरहू ली सुम-म बारिक ली फ़ीहि व इन कुन-त तअ् -लमु अन-न हाज़ल अम-र शर्रुल्ली फ़ी-दीनी व मईशती व आक़िबति अमरी फ़सरिफ़्हु अन्नी वसरिफ़्नी अन्हु वक्दुर लियल ख़ै-र हैसु का-न सुम-म अर्ज़िनी बिही।

اَللّٰهُمَّ إِنِّيْ أَسْتَخِيْرُكَ بِعِلْمِكَ وَأَسْتَقْدِرُكَ بِقُدْرَتِكَ وَأَسْئَلُكَ

مِنْ فَضْلِكَ الْعَظِيْمِ فَإِنَّكَ تَقْدِرُ وَلَا أَقْدِرُ وَتَعْلَمُ وَلَا أَعْلَمُ وَأَنْتَ

عَلَّامُ الْغُيُوْبِ ۔

اَللّٰهُمَّ إِنْ كُنْتَ تَعْلَمُ أَنَّ هٰذَا الْأَمْرَ خَيْرٌ لِّيْ فِيْ دِيْنِيْ وَمَعِيْشَتِيْ

وَعَاقِبَةِ أَمْرِيْ فَاقْدِرْهُ لِيْ وَيَسِّرْهُ لِيْ ثُمَّ بَارِكْ لِيْ فِيْهِ وَإِنْ

كُنْتَ تَعْلَمُ أَنَّ هٰذَا الْأَمْرَ شَرٌّ لِّيْ فِيْ دِيْنِيْ وَمَعِيْشَتِيْ وَعَاقِبَةِ

أَمْرِيْ فَاصْرِفْهُ عَنِّيْ وَاصْرِفْنِيْ عَنْهُ وَاقْدُرْ لِيَ الْخَيْرَ حَيْثُ كَانَ

ثُمَّ أَرْضِنِيْ بِهٖ ۔

"हे अल्लाह! मी तुझ्या जवळ तुझ्या ज्ञानाचे वशिल्याने शुभ मांगल्याची याचना करतो आणि तुझ्या सामर्थ्याद्वारे, तुझ्याकडे तुझी मोठी मेहेरबानी मागतो. यासाठी की तू जबरदस्त सामर्थ्यशाली आहे आणि माझ्या अंगी तिळमात्र सामर्थ्य नाही. तू ज्ञानसम्पन्न आहेस आणि मला कसलेही ज्ञान नाही आणि तू अपरोक्षाच्या सर्व गोष्टी चांगल्या प्रकारे जाणतो.

हे अल्लाह! जर तुझ्या ज्ञानात हे काम माझ्यासाठी उत्तम आहे. माझा धर्म व ऐहिकतेच्या दृष्टीने आणि परिणतीच्या दृष्टीने तर माझ्यासाठी हे भाग्यात कर आणि माझ्या साठी याला सहज सुलभ कर आणि माझ्यासाठी याला मंगलदायी बनव आणि जर तुझ्या ज्ञानानुसार हे काम माझ्यासाठी वाईट आहे. माझा धर्म न ऐहिकतेच्या दृष्टीने आणि परिणतीच्या दृष्टीने तर या कामाला माझ्या पासून दूर ठेव आणि मला यापासून सुरक्षित राख आणि माझ्यासाठी शुभ मांगल्य आणि भलाई नशीबी कर जिथे कुठे ही असो, आणि मग मला त्यावर राजी आणि एकाग्रचित्त कर."

# ५५. अस्मा-ए-हुस्ना (अल्लाहची श्रेष्ठ नावे)

अल्लाहचा नामोल्लेख करणे, त्याच्या सद्‌गुणांची निरंतर आठवण करणे, त्या सद्‌गुणांचे विस्तृतीकरण समजून घेणे, श्रद्धा व सद्‌बुद्धीसह या सद्‌गुणांद्वारे मन-मस्तिष्क प्रभावित ठेवण्याची सवय लावून घेणे, हेच आत्मशुद्धी व मन:शांती लाभण्यासाठी पवित्र व सुरक्षित माध्यम आहे. कुरआनमध्ये म्हटले आहे,

" हे श्रद्धावंतांनो! अल्लाचे खूप स्मरण करा आणि सकाळ संध्याकाळ त्याचे पावित्र्यगान करीत राहा." *(दिव्य कुरआन, ३३:४१-४२)*

"अल्लाह चांगल्या नावानांच पात्र आहे, त्याचा चांगल्या नावांनीच धावा करा आणि त्या लोकांना त्यांच्या स्थितीत सोडा, जे त्याची नावे ठेवण्यात सत्यापासून पराङ्मुख होतात. जे काही ते करतात त्यांचा बदला त्यांना मिळाल्याशिवाय राहणार नाही."

*(दिव्य कुरआन, ७:१८०)*

या नामांचा विस्तार व त्यांचे विस्तृतीकरण कुरआनमध्येदेखील स्पष्टपणे वर्णित करण्यात आले आहे आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनीदेखील या सद्‌गुणांची संख्या, विस्तार व त्यांना सुरक्षित ठेवण्याचा मोबदला सांगितला असून त्यांचे वारंवार उच्चारण करण्यास सांगितले आहे. पैगंबरांनी म्हटले आहे,

"अल्लाहची नव्यान्नव नावे आहेत. ही नावे निरंतर स्मृतीत ठेवणारा मनुष्य स्वर्गात प्रवेश करील." (हदीस : बुखारी)

अल्लाहचे गुण तोंडपाठ करणे म्हणजे तुम्ही ती समजून घ्या, त्यानुसार वर्तणूक करण्याचा आणि आपल्या जीवनात त्यांची अंमलबजावणी करण्याचा प्रयत्न करा. याची योग्य पद्धत अशी आहे की तुम्ही अगदी मनापासून उत्कंठेने त्यांचे पठण करा, पवित्र कुरआन पठणाची सवय लावून घ्यावी आणि आणि नित्यनेमाने विचार-चिंतन करून त्यातील सद्‌गुणांवर अवश्य अंमलबजावणी करावी. मग या सद्‌गुणांचे विस्तृतीकरण असलेल्या सत्य व प्रामाणिक हदीसकथनांचे पठण करून ते आपल्या अंतर्मनात रुजवावेत. त्याचबरोबर सर्वसामान्यपणे अल्लाहच्या या गुणांवर आधारलेले व त्यांचा उल्लेख असलेले साहित्य व प्रार्थनां (दुआ)चे देखील मनपूर्वक आणि तन्मयतेने पठण करण्याची सवय लावून घ्या. कुरआनचे अध्ययन करणाऱ्या धर्मपंडितांनी कुरआनमधूनच अल्लाहच्या या नव्यान्नव श्रेष्ठ नामांचे संकलन केले आहे.

**१) अल्लाह–** हे सर्व सद्‌गुणांचा आणि कृपा व समृद्धीचा स्रोत असलेल्या विश्वनिर्मात्याचे नाव आहे. हे नाव त्याच्याव्यतिरिक्त कधीही व कुणासाठीही ठेवण्यात आलेले नाही आणि या नावाने कुणाचा उल्लेख करणेही अयोग्य आहे. अल्लाहच तुमच्या स्नेहाचे अधिकृत केंद्र आहे, तोच तुमची उपासना आणि बलिदानाचा एकमेव उपास्य आहे आणि तोच सर्व प्रकारच्या

संकटांपासून वाचविणारा स्वामी आहे. त्याचीच मनापासून उपासना करा आणि त्याच्यावरच विश्वास ठेवा.

"वास्तविक जे ईमान धारण करतात त्यांना अल्लाहच सर्वाधिक प्रिय आहे."

*(दिव्य कुरआन, २:१६५)*

"(हे पैगंबर (स.)) हा ग्रंथ आम्ही तुमच्याकडे सत्याधिष्ठित अवतरला आहे. म्हणून तुम्ही अल्लाहचीच भक्ती करा, धर्माला त्याच्यासाठी निर्भेळ करताना. सावधान, विशुद्ध धर्म हा अल्लाहचा अधिकार आहे." *(दिव्य कुरआन, ३९:२)*

"तुम्ही स्पष्टपणे सांगून टाका, मला तर केवळ अल्लाहच्या भक्तीची आज्ञा दिली गेली आहे आणि यापासून मनाई केली गेली आहे की एखाद्याला त्याच्याबरोबर मी भागीदार ठरवावे." *(दिव्य कुरआन, १३:३६)*

"आणि विश्वास ठेवणाऱ्यांचा विश्वास अल्लाहवरच असला पाहिजे."

*(दिव्य कुरआन, १४:१२)*

**२) अर्रहमान–** ज्याच्या कृपेमध्ये उत्साह व स्तब्धता आहे तो महाकृपाळू आणि अत्याधिक दया करणारा, ज्याच्या महाकृपेमुळे मानवास खूप मोठ्या प्रमाणात उत्तमोत्तम देणग्यांचा लाभ होतो.

"अत्यंत मेहरबान (ईश्वरा) ने कुरआनचे शिक्षण दिले आहे. त्यानेच मानवाला निर्माण केले, आणि त्याला बोलणे शिकविले." *(दिव्य कुरआन, ५५:१-४)*

अल्लाहने मानवाला कुरआनसारखी अतिमहान देणगी दिली आणि मग मानवाला बोलण्याची शक्ती प्रदान करून इतर सजीवांमध्ये श्रेष्ठत्व प्रदान केले यावरूनच अल्लाहची कृपा सर्वाधिक असल्याचे सिद्ध होते.

**३) अर्रहीम–** ज्याची दया निरंतर होत आहे, ज्याच्या कधीच न थांबणाऱ्या कृपांचा वर्षाव निरंतर होत आहे, या जगातदेखील त्याच्या एकसारख्या होणाऱ्या कृपावर्षावात मानवाचा उद्धार होत आहे, विकास होत आहे, पुण्यकर्मांच्या मार्गाकडे जात आहे, अंमलबजावणीची त्याला संधी मिळत आहे आणि पारलौकिक जीवनातदेखील ईमानधारक त्या दयावानाच्या याच गुणवैशिष्ट्याच्या समृद्धीमुळे स्वर्गासारख्या विश्रांतीगृहात सुखी व शांततामय जीवनाचा लाभ मिळेल.

"जर तुम्ही अल्लाहच्या देणग्यांची गणना करू इच्छिले तर गणना करू शकत नाही, वस्तुस्थिती अशी आहे की तो फारच क्षमाशील व दयाळू आहे."

*(दिव्य कुरआन, १६:१८)*

"तोच आहे जो तुम्हावर कृपा करतो आणि त्याचे दूत तुमच्यासाठी कृपेची प्रार्थना करीत असतात जेणेकरून त्याने तुम्हाला अंधकारातून प्रकाशात आणावे, तो श्रद्धावंतांवर

फार मेहेरबान आहे. ज्या दिवशी ते त्याला भेटतील त्यांचे स्वागत सलामने होईल आणि त्यांच्यासाठी अल्लाहने मोठा सन्माननीय मोबदला तयार ठेवला आहे.''

*(दिव्य कुरआन, ३३:४३-४४)*

**४) अल-मलिक–** सर्व जगाचा बादशाह आणि संपूर्ण विश्व व ब्रह्मांडाचा खरा सम्राट.

''तर उच्च व श्रेष्ठ आहे अल्लाह, खरा बादशाह.'' *(दिव्य कुरआन, २०:११४)*

**५) अल-कुद्दूस–** सर्व प्रकारच्या अवगुणांपासून व अपराधांपासून पूर्णत: पवित्र, म्हणूनच त्याने पाठविलेला कायदा प्रत्येक गुन्ह्यापासून सुरक्षित आहे.

**६) अस-सलाम–** सर्व प्रकारच्या दुर्बलता आणि त्रुटींपासून सुरक्षित आणि क्षतिमुक्त असा महाकल्याणकारी.

**७) अल-मुअ्मिन–** सर्व प्रकारच्या संकटांपासून व यातनांपासून अलिप्त सुखशांती व समृद्धीत ठेवणारा महाविश्वासू.

**८) अल-मुहैमिन–** जगाची देखरेख करणारा आणि दोषमुक्त ठेवणारा रक्षक.

**९) अल-अजीज–** प्रतिष्ठा व सामर्थ्याचा एकमेव स्रोत, ज्याचे सामर्थ्य सर्वांत प्रभावशाली आहे असा महाप्रिय.

''प्रतिष्ठा सर्वस्वी अल्लाहच्या अधिकारात आहे.'' *(दिव्य कुरआन, १०:६५)*

**१०) अल-जब्बार–** महाशक्तिमान, संपूर्ण विश्वाचा उद्धारकर्ता.

**११) अल-मुतकब्बिर–** प्रतिष्ठा व सन्मानाचा स्रोत, ज्याच्या महानत्वामध्ये कोणीही सहभागी नाही.

''तो अल्लाहच आहे ज्याच्या व्यतिरिक्त कोणी उपास्य नाही, तो बादशाह आहे अत्यंत पवित्र, सर्वस्वी शांती अभयदान करणारा, निगाहबान, सर्वांवर प्रभावी आपली आज्ञा बळाने लागू करणारा आणि मोठाच बनून राहणारा, पवित्र आहे अल्लाह त्या अनेकेश्वरवादापासून जे हे लोक करीत आहेत.'' *(दिव्य कुरआन, ५९:२३)*

**१२) अल-खालिक–** भरपूर शक्ती आणि गुणवैशिष्ट्यांचा मालक आणि उत्तमोत्तम सृष्टीरचयिता.

**१३) अल-बारी–** प्रत्येक वस्तूला अस्तित्व प्रदान करणारा, अतुल्य योजना आखणारा.

**१४) अल-मुसव्विर–** जीव व विश्वाला आकार प्रदान करणारा.

''तोच तर आहे, जो तुमच्या मातेच्या गर्भाशयात तुमचा आकार हवा तसा घडवितो.''

*(दिव्य कुरआन, ३:६)*

''तुमचे स्वरूप बनविले आणि फारच छान छान बनविले आहे.''

*(दिव्य कुरआन, ६४:३)*

"तो अल्लाहच आहे जो निर्मितीची योजना आखणारा आणि ती अमलात आणणारा व त्यानुसार रंगरूप देणारा आहे. त्याच्यासाठी सर्वोत्तम नावे आहेत."

*(दिव्य कुरआन, ५९:२४)*

**१५) अल-गफ्फार–** अत्यंत क्षमाशील आणि अपराध माफ करणारा.

"मी सांगितले, आपल्या पालनकर्त्याची क्षमा मागा, नि:संदेह तो मोठा क्षमाशील आहे." *(दिव्य कुरआन, ७१:१०)*

**१६) अल-कह्हार–** आपल्या निर्मितीवर प्रभुत्व राखणारा आणि अधिकारी.

**१७) अल-वाहिद–** एकमेव, ज्याच्या गुण, अस्तित्व आणि अधिकारांमध्ये कोणीही सहभागी नाही.

"आज कुणाचे साम्राज्य आहे, अल्लाह की जो एकमेव आहे आणि सर्वांवर प्रभुत्वसंपन्न!" *(दिव्य कुरआन)*

**१८) अत्तव्वाब–** भक्तांना उपजीविका देणारा आणि अपराध्यांना क्षमादान देणारा.

"तेव्हा अल्लाह आपल्या कृपेने त्यांच्याकडे वळला जेणेकरून त्यांनी त्याच्याकडे परत यावे. नि:संशय अल्लाह अत्यंत क्षमाशील व परम दयाळू आहे."

*(दिव्य कुरआन, ९:११८)*

**१९) अल-वह्हाब–** नि:स्वार्थ बक्षीस व दान देणारा.

"आम्हाला तुझ्या औदार्याच्या भांडारातून कृपा प्रदान कर, कारण तूच खऱ्या अर्थाने उदार आहेस." *(दिव्य कुरआन, ३:८)*

**२०) अल-खल्लाक–** कसेही, कधीही, प्रत्येक वस्तू निर्माण करणारा, निर्माण करण्यात सर्वगुणसंपन्न.

"काय तो, ज्याने आकाश आणि पृथ्वी निर्माण केले; यावर प्रभुत्व राखत नाही की यासारख्यांना निर्माण करू शकेल? का नाही, ज्याअर्थी तो निर्मितीत निष्णात आहे."

*(दिव्य कुरआन, ३६:८१)*

**२१) अल-रज्जाक–** आपल्या निर्मित सृष्टीतील सर्वांना उपजीविका प्रदान करणारा, गरज भागविणारा.

**२२) अल-मतीन–** अतिशय मजबूत व शक्तिशाली.

"अल्लाह तर स्वत:च उपजीविका देणारा आहे, मोठा शक्तिमान आणि जबरदस्त."

*(दिव्य कुरआन, ५१:५८)*

**२३) अल-फलाह–** आपला निर्मितीच्या दरम्यान योग्य निर्णय करणारा, संकटमोचक.

**२४) अल-अलीम–** भक्तांची प्रत्येक कथनी व करनी आणि विचार-भावना जाणणारा.

"सांगा, "आमचा पालनकर्ता आम्हाला एकत्र करील, मग आमच्या दरम्यान यथायोग्य निर्णय लावील. तो असा जबरदस्त शासक आहे जो सर्वकाही जाणतो."

*(दिव्य कुरआन, ३४:२६)*

**२५) अल-मुहीत–** सर्व जाती-समुदायांना वेढणारा, सर्व वस्तूंचे ज्ञान बाळगणारा.

"वस्तुत: अल्लाहने त्यांना वेढ्यात घेतलेले आहे. (त्यांच्या खोटे ठरविण्याने या कुरआनचे काही बिघडत नाही.)" *(दिव्य कुरआन, ८५:२०)*

**२६) अल-कदीर–** प्रत्येक वस्तूवर पूर्णपणे प्रभुत्व राखणारा आणि अधिकार बाळगणारा.

"अल्लाह तो आहे ज्याने सप्त आकाश बनविले आणि त्याच प्रमाणात पृथ्वी सुद्धा निर्माण केली. त्यांच्या दरम्यान आज्ञा उतरत असते (ही गोष्ट तुम्हाला अशासाठी सांगितली जात आहे) जेणेकरून तुम्ही जाणून घ्यावे की अल्लाह प्रत्येक वस्तूवर प्रभुत्व राखतो, आणि असे की अल्लाहचे ज्ञान प्रत्येक वस्तुला व्यापून आहे." *(दिव्य कुरआन, ६५:१२)*

**२७) अल-हलीम–** कोप पाठविण्यात घाई न करणारा. भक्तांना सुधारण्याची संधी देणारा, सहनशील.

**२८) अल-गफूर–** अतिशय क्षमादान प्रदान करणारा आणि आश्रय देणारा.

**२९) अल-अफूवु–** अत्याधिक माफ करणारा, क्षमाशील.

**३०) अश-शकूर–** आपल्या दासांच्या पुण्यकर्म व चांगल्या कामांची अतिशय प्रशंसा करणारा.

"वस्तुस्थिती अशी आहे की तो अल्लाहच आहे ज्याने आकाशांना व पृथ्वीला ढळण्यापासून सावरले आहे. आणि जर ते ढळले तर अल्लाहनंतर दुसरा कोणी त्यांना सावरू शकणार नाही. नि:संशय अल्लाह मोठा सहिष्णू आणि क्षमाशील आहे."

*(दिव्य कुरआन, ३५:४१)*

"हे दूर नव्हे की अल्लाह त्यांना माफ करील. अल्लाह मोठा माफ करणारा व क्षमा करणारा आहे." *(दिव्य कुरआन, ४:९९)*

"आणि ते म्हणतील, "अत्यंत आभारी आहोत त्या अल्लाहचे ज्याने आम्हापासून दु:ख दूर केले, नि:संशय आमचा पालनकर्ता क्षमाशील व कदर करणारा आहे."

*(दिव्य कुरआन, ३५:३४)*

**३१) अल-अजीम–** आपल्या गुणांमध्ये महान अस्तित्व असणारा आणि मोठेपणा बाळगणारा.

"म्हणून हे पैगंबर (स.), आपल्या महान पालनकर्त्याच्या नावाचे पावित्रगान करा."

*(दिव्य कुरआन, ५६:७४)*

**३२) अल-वासिअ्–** विशाल आणि व्यापक दृष्टी ठेवणारा, दासांवर मोठ्या संपन्नतेसह

उपकार करणारा.

"शैतान तुम्हाला दारिद्र्याचे भय दाखवितो व लज्जास्पद कार्यपद्धतीचे अवलंब करण्यास प्रोत्साहन देतो, परंतु अल्लाह तुम्हाला आपली क्षमा आणि कृपेची आशा देतो. अल्लाह फार उदार व विवेकशील आहे. तो ज्याला इच्छितो त्याला विवेक प्रदान करतो, आणि ज्याला विवेक लाभला त्याला खऱ्या अर्थी मोठी दौलत लाभली. या गोष्टीपासून केवळ तेच लोक बोध घेतात जे विवेकशील आहेत." *(दिव्य कुरआन, २६८-२६९)*

**३३) अल-हकीम–** जगातील राज्यसत्तेत आणि भक्तांच्या खटल्यांमध्ये मोठ्या शिताफीने निवाडा करणारा.

"आणि तुम्ही इच्छा केल्याने काही होणार नाही जोपर्यंत अल्लाह इच्छित नाही. अल्लाह निश्चितच मोठा ज्ञानी आणि बुद्धिमान आहे. आपल्या कृपाछत्रात ज्याला इच्छितो दाखल करतो आणि अत्याचाऱ्यांसाठी त्याने यातनामय प्रकोप तयार ठेवला आहे."

*(दिव्य कुरआन, ७६:३०-३१)*

**३४) अल हय्यु–** जीवनाचे स्रोत, मृत्यु, झोप आणि डुलकीपासून पवित्र.

"हे पैगंबर (स.), त्या परमेश्वरावर विश्वास ठेवा जो जिवंत आहे आणि कधीही मरणार नाही, त्याच्या स्तुतीसमवेत त्याचे पावित्रगान करा. आपल्या दासांच्या अपराधापासून केवळ त्याचेच माहितगार असणे पुरेसे आहे." *(दिव्य कुरआन, २५:५८)*

**३५) अल-कय्यूम–** जगाचे नियोजन आणि नियंत्रण राखणारा.

"अल्लाह तो चिरंतनजीवी आहे ज्याने तमाम सृष्टीचा भार सांभाळलेला आहे, त्याच्याशिवाय इतर कोणीही ईश्वर नाही, तो झोपतही नाही आणि त्याला झोपेची गुंगीही येत नाही." *(दिव्य कुरआन, २:२५५)*

**३६) अस्समीअ्–** दासांचे सर्वकाही ऐकणारा.

**३७) अल-बसीर–** दासांच्या कर्मांवर आणि कर्तृत्वावर लक्ष ठेवणारा, जेणेकरून त्यांच्यात नि:पक्षपणे निर्णय करता यावा.

"आणि अल्लाह ठीकठीक नि:पक्षपणे निर्णय देईल. उरले ते ज्यांचा (हे अनेकेश्वरवादी) अल्लाहला सोडून धावा करतात, ते कोणत्याही गोष्टीचा निर्णय लावणार नाहीत, नि:संशय अल्लाहच सर्वकाही ऐकणारा व पाहणारा आहे."

*(दिव्य कुरआन, ४०:२०)*

**३८) अल-लतीफ–** अत्यंत सूक्ष्मतेने पाहणारा, लहानात लहान उपायांचा अवलंब करणारा.

**३९) अल-खबीर–** दासांची प्रत्येक गोष्ट जाणणारा.

"(आणि लुकमानने सांगितले होते की) "बेटा, कोणतीही वस्तू ती मोहरीच्या

दाण्याबरोबर का असेना आणि कोणत्याही खडकात किंवा आकाशात अथवा पृथ्वीत कोठेही लपलेली का असेना, अल्लाह ती काढून आणील. तो सूक्ष्मदर्शी व खबर राखणारा आहे.''
*(दिव्य कुरआन, ३१:१६)*

**४०) अल-अलीयु–** अत्युच्च अधिकारी आणि प्रभुत्वशाली.

**४१) अल-कबीर–** अत्यंत श्रेष्ठत्व बाळगणारा, ज्याच्या प्रतिष्ठेत कोणीही सहभागी आणि तुल्यबळ नाही.

**४२) अल-हक्कु–** जो सत्य आहे आणि कोणाच्या नाकारणाऱ्याने त्याच्या सत्य अस्तित्वात काहीही फरक पडत नाही.

''हे सर्व काही यामुळे आहे की अल्लाहच सत्य आहे, आणि त्याला सोडून ज्या दुसऱ्यांचा हे लोक धावा करतात ते सर्व असत्ये आहेत, आणि (या कारणाने की) अल्लाहच महान व उच्चतर आहे.'' *(दिव्य कुरआन, ३१:३०)*

**४३) अल-मुबीन–** सत्य उलगडणारा आणि सत्यता सिद्ध करणारा.

''त्या दिवशी अल्लाह तो बदला त्यांना पुरेपूर देईल ज्याला ते पात्र आहेत आणि त्यांना माहीत होईल की अल्लाहच सत्य आहे, खऱ्याला खरे करून दाखविणारा.''
*(दिव्य कुरआन, २४:२५)*

**४४) अल-नसीर–** ईमानवाल्यांचे समर्थन करणारा आणि मदत करणारा, खरा स्वामी, बिघडलेले काम सावरून घेणारा.

**४५) अल-नसीर–** ईमानवाल्यांची मदत आणि समर्थन करणारा.

''अल्लाहच्या मार्गात प्रयत्नांची पराकाष्ठा करा जशी ती करायला हवी. त्याने तुम्हाला आपल्या कार्यासाठी निवडले आहे आणि धर्मामध्ये तुमच्यावर कोणतीही अडचण ठेवली नाही. दृढ व्हा आपल्या पिता इब्राहीम (अ.) च्या परंपरे (मिल्लत) वर. अल्लाहने पूर्वीसुद्धा तुमचे नाव मुस्लिम ठेवले होते आणि या (कुरआन) मध्येसुद्धा (तुमचे असेच नाव आहे) जेणेकरून पैगंबराने तुमच्यावर साक्षी राहावे आणि तुम्ही लोकांवर साक्षीदार. म्हणून नमाज कायम करा, जकात द्या आणि अल्लाहशी दृढनिष्ठ व्हा. तो आहे तुमचा वाली, फारच चांगला आहे तो वाली आणि फारच चांगला आहे तो सहायक.'' *(दिव्य कुरआन, २२:७८)*

''हे अशासाठी की श्रद्धावंतांचा वाली व सहायक अल्लाह आहे आणि अश्रद्धावंतांचा वाली व सहायक कोणीही नाही.'' *(दिव्य कुरआन, ४७:११)*

**४६) अल-करीम–** अतिप्रोत्साहनासह मोबदला देणारा आणि निवाडा करणारा.

''हे मानवा, कोणत्या गोष्टीने तुला आपल्या उदार पालनकर्त्याच्या बाबतीत संभ्रमात टाकले ज्याने तुला निर्माण केले, तुला नखशिखांत व्यवस्थित केले, तुला प्रमाणबद्ध बनविले, आणि ज्या रूपात इच्छिले तुला जोडून तयार केले?'' *(दिव्य कुरआन, ८२:६-८)*

**४७) अल-गनीयु–** मानवजातीबाबत निस्पृह असलेला.

**४८) अल-हमीद–** पवित्र गुणवैशिष्ट्ये असणारा, जो कोणाच्या प्रशंसेची वा कोणाच्या स्तुतीचा गरजवंत नाही.

"जो कोणी कृतज्ञता दर्शवील त्याची कृतज्ञता त्याच्यासाठीच लाभप्रद आहे जो सत्याचा इन्कार करील तर वास्तविकत: अल्लाह निरपेक्ष आहे आणि तो स्वयंस्तवनीय आहे."
*(दिव्य कुरआन, ३१:१२)*

**४९) अल-कवीयु–** महाशक्तिशाली.

**५०) अश-शदीद–** दृढ पकड करणारा, ज्याच्या पकडीतून कोणीही सुटू शकत नाही.

"फिरऔनवाले व त्यांच्या पूर्वीच्या लोकांच्या संबंधाने जे काही घडले ते याच नियमाप्रमाणे होते. त्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या वचनांना खोटे लेखले, तेव्हा आम्ही त्यांच्या अपराधामुळे त्यांना नष्ट करून टाकले आणि फिरऔनवाल्यांना बुडवून टाकले. हे सर्व अत्याचारी लोक होते." *(दिव्य कुरआन, ८:५४)*

**५१) अर-रकीब–** दासांच्या कर्मांवर आणि वागणुकीवर पाळत ठेवणारा.

"लोकहो, आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगा ज्याने तुम्हाला एका जीवापासून निर्माण केले आणि त्याच जीवापासून त्याचे जोडपे बनविले आणि या एकाच जोडप्यापासून समस्त पुरुष व स्त्रिया जगात पसरविल्या. त्या अल्लाहचे भय बाळगा ज्याचा वास्ता देऊन तुम्ही एक दुसऱ्याकडून आपल्या हक्काची मागणी करता आणि नातेसंबंध विच्छेद करण्यापासून दूर रहा. खात्री बाळगा की अल्लाह तुम्हावर लक्ष ठेवून आहे." *(दिव्य कुरआन, ४:१)*

**५२) अल-करीब–** भक्तांच्या अगदी जवळ राहणारा.

**५३) अल-मुजीब–** भक्तांची याचना-प्रार्थना स्वीकारणारा, उत्तरदायी आणि मान्य करणारा.

"आणि जेव्हा माझे भक्त तुम्हाला माझ्याबद्दल विचारतील तर (त्यांना सांगा की) मी तर सदैव निकट आहे. धांवा करणारा जेव्हा माझा धांवा करतो तेव्हा मी त्याच्या हांकेला प्रतिसाद देतो. तेव्हा त्याने माझ्या प्रतिसादाचा शोध घ्यावा माझ्यावर श्रद्धा ठेवावी जेणेकरून ते सन्मार्गावर येतील."
*(दिव्य कुरआन, २:१८६)*

"आणि समूदकडे आम्ही त्यांचा भाऊ सालेह (अ.) ला पाठविले. त्याने सांगितले, "हे माझ्या देशबंधुंनो, अल्लाहची भक्ती करा, त्याच्याशिवाय तुमचा कोणीही ईश्वर नाही. तोच आहे ज्याने तुम्हाला भूमीपासून निर्माण केले आणि येथे तुम्हाला वसविले, म्हणून तुम्ही त्याची क्षमायाचना करा आणि त्याच्याकडे परतून या. निश्चितच माझा पालनकर्ता जवळच आहे आणि तो प्रार्थनांना उत्तर देणारा आहे." *(दिव्य कुरआन, ११:६१)*

**५४) अल-वकील–** भक्तीचे सत्कर्म तडीस नेण्याची जबाबदारी घेणारा, प्रतिनिधित्व करणारा, कार्य सिद्धीस नेणारा.

"आणि ते उत्तरले की, अल्लाह आमच्यासाठी पुरेसा आहे आणि तोच सर्वोत्कृष्ट कार्यसिद्धीस नेणारा आहे." *(दिव्य कुरआन, ३:१७३)*

**५५) अल-हसीब–** भक्तांची विचारपूस करणारा आणि हिशोब घेणारा.

"आणि जेव्हा एखादा अदबीने तुम्हाला सलाम करील तर त्याला त्यापेक्षाही अधिक चांगल्या प्रकारे उत्तर द्या किंवा कमीतकमी त्याचप्रमाणे, अल्लाह प्रत्येक गोष्टीचा हिशेब घेणारा आहे." *(दिव्य कुरआन, ४:८६)*

**५६) अल-जामि'अ–** शरीराच्या कणांना एकत्र करणारा आणि अंतिम निवाड्याच्या दिवशी भक्तांना एकत्रित करणारा.

"हे पालनकर्त्या, नि:संशय तू एके दिवशी सर्व लोकांना एकत्रित करणार आहेस, ज्या दिवसाच्या आगमनाबद्दल कसलीही शंका नाही, तू आपल्या वचनापासून मुळीच ढळणारा नाहीस." *(दिव्य कुरआन, ३:९)*

**५७) अल-कादिर–** प्रत्येक कार्य करण्याची शक्ती बाळगणारा आणि सामर्थ्य राखणारा.

"काय माणूस असे समजतो की आम्ही त्याच्या हाडांना गोळा करू शकणार नाही? का नाही? आम्ही तर त्याच्या बोटांची पेरे पेरे सुद्धा नीट बनविण्यास समर्थ आहोत." *(दिव्य कुरआन, ७५:३-४)*

**५८) अल-हफीज–** भक्तांना प्रत्येक संकट व आपत्तीपासून वाचविणारा.

"जर तुम्ही तोंड फिरवीत असाल तर फिरवा. जो संदेश देऊन मी तुमच्याकडे पाठविला गेलो होतो तो मी तुम्हाप्रत पोहचविला आहे. आता माझा पालनकर्ता तुमच्या जागी दुसऱ्या लोकांना उठवील, आणि तुम्ही त्याचे काहीही बिघडवू शकणार नाही. खचितच माझा पालनकर्ता प्रत्येक गोष्टीचा निरीक्षक आहे." *(दिव्य कुरआन, ११:५७)*

**५९) अल-मुकीत–** मानवनिर्मितीस योग्यप्रकारे हिस्सा देण्याचे सामर्थ्य राखणारा, निरीक्षक.

"जो चांगुलपणाची शिफारस करील त्याला त्यात वाटा मिळेल आणि जो वाईट गोष्टीची शिफारस करील त्याला त्यातून वाटा मिळेल, आणि अल्लाह सर्व गोष्टींवर नजर ठेवणारा आहे." *(दिव्य कुरआन, ४:८५)*

**६०) अल-वदूद–** भक्तांवर अतिशय प्रेम करणारा, अतिप्रेमळ.

**६१) अल-मजीद–** श्रेष्ठ, महान, उत्तम, उत्तुंग, गौरवशाली.

"आणि तो क्षमा करणारा आहे. प्रेम करणारा आहे. राजसिंहासनाचा स्वामी आहे. गौरवशाली आहे." *(दिव्य कुरआन, ८५:१४-१५)*

**६२) अल-शहीद–** प्रत्येक ठिकाणी अस्तित्व असलेला, प्रत्येक गोष्टीची देखरेख करणारा.

"जो आकाशांच्या व पृथ्वीच्या राज्याचा स्वामी आहे, आणि तो अल्लाह सर्वकाही पहात आहे." *(दिव्य कुरआन, ८५:९)*

**६३) अल-वारिस–** प्रत्येक वस्तूचा अधिकृत मालक, खरा वारसदार.

**६४) अल-मुह्यी–** प्रत्येक सजीव निर्मितीस जीवन प्रदान करणारा.

"जीवन आणि मरण आम्ही देतो आणि आम्हीच सर्वांचे वारस होणार आहोत." *(दिव्य कुरआन, १५:२३)*

**६५) अल-वलीयु–** ईमानधारकांचा सहाय्यक आणि मदत करणारा.

**६६) अल-फातिर–** प्रत्येक वस्तूचा निर्माता.

"हे माझ्या पालनकर्त्या, तू मला राज्य प्रदान केले आणि मला गोष्टीच्या तळापर्यंत पोहचण्याचे शिकविले. आकाशांना आणि जमिनींना बनविणारा तूच इहलोकात व परलोकात माझा वाली आहेस, माझा शेवट इस्लामवर कर आणि परिणामांती मला सदाचारी लोकांबरोबर मिळव." *(दिव्य कुरआन, १२:१०१)*

**६७) अल-मालिक–** प्रत्येक वस्तूचा खरा स्वामी, ज्याच्यासमोर सर्व आश्रित व विवश आहेत.

"निर्णयाच्या दिवसाचा स्वामी आहे." *(दिव्य कुरआन, १:३)*

**६८) अल-मुक्तदिर–** प्रत्येक वस्तूवर अधिकार बाळगणारा आणि जो कोणत्याही कार्यात विवश होत नाही.

**६९) अल-मलीक–** सर्व अधिकार बाळगणारा सम्राट.

"अवज्ञेपासून अलिप्त राहणारे खचितच उद्यानात आणि कालव्यांत असतील, खऱ्या प्रतिष्ठेची जागा, महान सत्ताधिकारी बादशहाच्या समीप." *(दिव्य कुरआन, ५४:५४-५५)*

**७०) अल-अव्वल–** संपूर्ण सृष्टीच्या निर्मितीपूर्वी अस्तित्वात असणारा.

**७१) अल-आखिर–** संपूर्ण सृष्टीचा अंत झाल्यानंतरही मागे राहणारा.

**७२) अज-जाहिर–** ज्याचे ऐश्वर्य प्रत्येक कणात स्पष्ट आहे.

**७३) अल-बातिन–** दृष्टीपासून लपलेला.

"तोच आदीही आहे आणि अंतिमसुद्धा. आणि प्रकटही आहे व अप्रकटसुद्धा. आणि त्याला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे." *(दिव्य कुरआन, ५७:३)*

**७४) अल-काहिर–** भक्तांवर संपूर्ण प्रभुत्व राखणारा, सर्वाधिकारप्राप्त.

"त्याला आपल्या दासांवर सर्वाधिकार प्राप्त आहे आणि तो बुद्धिमान व जाणकार आहे." *(दिव्य कुरआन, ६:१८)*

**७५) अल-काफी–** भक्तांची प्रत्येक गरज पूर्ण करण्यास समर्थ असणारा.

"(हे पैगंबर (स.)) काय अल्लाह आपल्या दासांसाठी पुरेसा नाही? हे लोक त्याच्याशिवाय तुम्हाला दुसऱ्यांचे भय दाखवितात. वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाहने ज्याला पथभ्रष्ट केले त्याला कोणीही मार्ग दाखविणार नाही." *(दिव्य कुरआन, ३९:३६)*

**७६) अश-शाकिर–** भक्तांचा प्रयत्न आणि अंमलबजावणीची प्रशंसा करणारा.

"शेवटी अल्लाहला काय पडले आहे की तुम्हाला विनाकारण त्याने शिक्षा द्यावी. जर तुम्ही कृतज्ञ दास बनून राहिलात आणि श्रद्धेच्या मार्गावर चालत राहिलात तर अल्लाह मोठा गुणग्राहक आहे. आणि सर्वांची परिस्थिती जाणणारा आहे." *(दिव्य कुरआन, ४:१४७)*

**७७) अल-मुस्तआन–** ज्याच्याकडे मदतीची याचना केली जाऊ शकते असा.

"आणि त्यांनी यूसुफ (अ.) च्या सदऱ्यावर खोटेनाटे रक्त लावून आणले होते. हे ऐकून त्यांच्या वडिलांनी सांगितले, "किंबहुना तुमच्या वासनेने तुमच्याकरिता एक मोठे काम सोपे बनविले. बरे, संयम राखीन आणि चांगल्याच प्रकारे संयम बाळगीन, जी गोष्ट तुम्ही रचत आहात त्यावर अल्लाहकडूनच मदत मागितली जाऊ शकते." *(दिव्य कुरआन, १२:१८)*

**७८) अल-बदीअ–** कोणत्याही दृष्टांताशिवाय निर्माण करणारा, अनुपम प्रवर्तक.

"तोच आकाश आणि पृथ्वीचा प्रवर्तक आहे, जेव्हा एखादी घटना घटित करण्याचे इच्छितो तेव्हा फक्त म्हणतो, "तथास्तु" आणि क्षणार्धात तसे घडते."

*(दिव्य कुरआन, २:११७)*

**७९) अल-गाफिर–** गुन्हा माफ करणारा, पश्चात्ताप स्वीकारणारा.

"गुन्हा माफ करणारा आणि पश्चात्ताप स्वीकारणारा आहे, कठोर शिक्षा देणारा आणि मोठा उदारहस्त आहे, कोणी उपास्य त्याच्याव्यतिरिक्त नाही. त्याच्याकडेच सर्वांना रुजू व्हायचे आहे." *(दिव्य कुरआन, ४०:३)*

**८०) अल-हाकिम–** आपल्या निर्मितीवर राज्य करणारा एकमेव स्वामी, निर्णयाचा सर्वस्वी अधिकार बाळगणारा.

"सांगा, मी आपल्या पालनकर्त्यातर्फे एका उज्ज्वल प्रमाणावर कायम आहे आणि तुम्ही त्याला खोटे ठरविले आहे, आता माझ्या अखत्यारीत ती गोष्ट मुळीच नाही जिच्याबद्दल तुम्ही घाई करीत आहात, निर्णयाचा सर्वस्वी अधिकार अल्लाहला आहे. तोच सत्य बाबी सांगतो आणि तोच सर्वोत्कृष्ट निवाडा करणारा आहे." *(दिव्य कुरआन, ६:५७)*

**८१) अल-गालिब–** संपूर्ण अधिकार आणि नियंत्रण ठेवणारा.

"अशा प्रकारे आम्ही यूसुफ (अ.) साठी त्या भूभागात पाय स्थिरावण्याचा मार्ग काढला, आणि त्याला व्यवहार आकलनाचे शिक्षण देण्याची व्यवस्था केली. अल्लाह आपले काम केल्याशिवाय राहात नाही, परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत."

*(दिव्य कुरआन, १२:२१)*

**८२) अल-ह-कम–** नि:पक्ष निवाडा करणारा.

"मग ज्याअर्थी वस्तुस्थिती अशी आहे तर काय मी अल्लाहखेरीज इतर कोणी निर्णय करणारा शोधावा? खरे पाहता त्याने तर सर्व तपशीलासहित तुमच्याकडे ग्रंथ अवतरला आहे?" *(दिव्य कुरआन, ६:११४)*

**८३) अल-आलिम–** उघड व गुपितांना पूर्णत: जाणणारा.

**८४) अल-मु-त-आल–** प्रत्येक स्थितीत वर्चस्वशाली व प्रभुत्वशाली असणारा.

"तो गुप्त आणि प्रकट प्रत्येक गोष्टीचा विज्ञाता आहे, तो महान आहे आणि प्रत्येक स्थितीत उच्चतर राहणारा आहे." *(दिव्य कुरआन, १३:९)*

**८५) अल-रफीअ–** अत्युच्च व श्रेष्ठतर दर्जा असलेला.

"तो उच्च दर्जे राखणारा, सिंहासना (अर्श) चा स्वामी आहे. आपल्या दासांपैकी ज्यावर इच्छितो त्यावर आपल्या आज्ञेने आत्मा अवतरतो जेणेकरून भेटीच्या दिवसापासून त्याने सावध करावे." *(दिव्य कुरआन, ४०:१५)*

**८६) अल-हाफिज–** आपत्ती आणि दुर्घटनांपासून संरक्षण देणारा.

"अल्लाह उत्तम रक्षक आहे व तो सर्वांपेक्षा जास्त दया करणारा आहे." *(दिव्य कुरआन, १२:६४)*

**८७) अल-मुंतकिम–** आपल्या व आपल्या सच्चा भक्तांच्या शत्रूंचा प्रतिशोध घेणारा.

"आणि आम्ही तुमच्यापूर्वी पैगंबरांना त्यांच्या जनसमूहांकडे पाङ्गविले आणि ते त्यांच्यापाशी उज्ज्वल संकेत घेऊन आले. मग ज्यांनी अपराध केला, त्यांचा आम्ही सूड घेतला. आणि आम्हावर हा हक्क होता की आम्ही श्रद्धावंतांची मदत करावी." *(दिव्य कुरआन, ३०:४७)*

**८८) अल-काइमु बिल-किस्त–** प्रामाणिकपणे न्यायानिशी तरतूद व नियोजन करणारा.

**८९) अल-इलाह–** उपास्य, अल्लाह, ज्याच्याव्यतिरिक्त कोणीही उपासना करण्यायोग्य नाही.

"अल्लाहने स्वत: या गोष्टीची ग्वाही दिली आहे की त्याच्याशिवाय कोणीही परमेश्वर नाही, आणि फरिश्ते व सर्व ज्ञान राखणारेसुद्धा रास्त व न्यायनीतीने यांची ग्वाही देतात की, त्या प्रभावशाली बुद्धीमंताशिवाय खरे पाहता कोणीही ईश्वर नाही." *(दिव्य कुरआन, ३:१८)*

**९०) अल-हादी–** सरळमार्ग दाखविणारा, पैगंबर आणि पवित्र ग्रंथ पाठविणारा.

"आणि ज्ञानाने विभूषित लोकांनी जाणून घ्यावे की हे सत्य आहे तुझ्या पालनकर्त्याकडून आणि त्यांनी यावर श्रद्धा ठेवावी व त्यांची हृदये याच्यासमोर नमावीत, निश्चितच अल्लाह श्रद्धावंतांना नेहमी सरळमार्ग दाखवितो." *(दिव्य कुरआन, २२:५४)*

**९१) अर-रऊफ–** भक्तांवर अतिशय उपकार करणारा, हितचिंतक.

"तो दिवस उगवणार आहे, जेव्हा प्रत्येक सजीवाला आपल्या कृतीचे फळ उपलब्ध असल्याचे आढळेल मग त्याने पुण्य केले असो अथवा पाप, त्या दिवशी मनुष्य अशी कामना करील की, किती छान झाले असते, जर हा दिवस अद्याप त्याच्यापासून फार दूर असता! अल्लाह तुम्हाला आपल्या स्वतःचे भय दाखवतो आणि तो आपल्या दासांचा अत्यंत हितचिंतक आहे." *(दिव्य कुरआन, ३:३०)*

**९२) अन-नूर–** दोन्ही जगांना प्रकाशित करणारा, प्रकाशाचा स्रोत.

"अल्लाह आकाशांचा व पृथ्वीचा प्रकाश आहे. (सृष्टीमध्ये) त्याच्या प्रकाशाची उपमा अशी आहे जणू एका कोणाड्यामध्ये दिव्याची ज्योत तेवत असेल. तो एक पारदर्शी पडदा ठेवलेला. जणूकाही मोत्याप्रमाणे चमकणारा तारा. आणि तो एका अशा जैतुन कल्पवृक्षाच्या तेलाने तेवत आहे. जो पौर्वात्यही नाही की पाश्चिमात्यही नाही. अग्नीचा स्पर्श देखील झाला नसला तरी तो तेजस्वी होतो. प्रकाशावर प्रकाश (वाढण्याची सर्व साधने एकवटली असतील), अल्लाह आपल्या प्रकाशाकडे ज्याला इच्छितो त्याला मार्गदर्शन करतो, तो लोकांना दृष्टांत देऊन गोष्ट समजावून देतो. प्रत्येक गोष्ट त्याला चांगल्या प्रकारे माहीत आहे."

*(दिव्य कुरआन, २४:३५)*

**९३) अल-अकरम–** प्रतिष्ठा व सन्माननीय, भक्तांबरोबर उत्तम सन्मानजनक व्यवहार करणारा.

"वाचा, आणि तुमचा पालनकर्ता मोठा उदार आहे." *(दिव्य कुरआन, ९६:३)*

**९४) अल-अअला–** सर्वांत श्रेष्ठतर.

"(हे पैगंबर (स.)) आपल्या उच्चतर पालनकर्त्याच्या नावाचे पवित्र्यगान करा."

*(दिव्य कुरआन, ८७:१)*

**९५) अल-बर्र–** आपल्या निर्मितीशी उपकारक व्यवहार करणारा, दयावान.

"आम्ही पूर्वीच्या जीवनात त्याचाच धावा करीत होतो. तो खरोखरच मोठा उपकारी व दयावान आहे." *(दिव्य कुरआन, ५२:२८)*

**९६) अर-रब्ब–** उदरनिर्वाह करणारा, प्रत्येक प्रकारच्या संकटांपासून वाचविणारा आणि विकासाच्या सर्व साधनांची पूर्तता करून अद्‌भूत लक्ष्यापर्यंत पोहोचविणारा, स्वामी, शासक.

"स्तवन फक्त अल्लाहसाठीच आहे जो सर्व सृष्टीचा रब (पालनकर्ता) आहे."

*(दिव्य कुरआन, १:१)*

**९७) अल-हफीयु–** आपल्या निर्मित सृष्टीची उत्तमप्रकारे देखभाल करणारा, अत्यंत कृपावंत.

"बस्स, तू माझ्यापासून कायमचा वेगळा हो." इब्राहीम (अ.) ने सांगितले, "सलाम

आहे तुम्हाला, मी आपल्या पालनकर्त्याजवळ प्रार्थना करीन की त्याने आपल्याला क्षमा करावी. माझा पालनकर्ता माझ्यावर फारच कृपावंत आहे.'' *(दिव्य कुरआन, १९:४७)*

''सांगा, तो अल्लाह आहे एकमेव. अल्लाह सर्वांपासून निरपेक्ष आहे आणि सर्व त्याचे गरजवंत आहेत.'' *(दिव्य कुरआन, ११२:१-२)*

**९८) अल-अहद–** एकमेव, अतुल्य, ज्याची बरोबरी कोणीही करू शकत नाही.

**९९) अल-समद–** निस्पृह, कोणावरही विसंबून नसलेला.

''सांगा, तो अल्लाह आहे एकमेव. अल्लाह सर्वांपासून निरपेक्ष आहे आणि सर्व त्याचे गरजवंत आहेत.'' *(दिव्य कुरआन, ११२:१-२)*

# ५६. पैगंबरकृत प्रार्थना : एका दृष्टिक्षेपात

रात्रंदिवस वेगवेगळ्या समयी आणि क्षणी पठण करण्याकरिता कुरआन व हदीसमध्ये ज्या प्रार्थना (दुआ) आलेल्या आहेत त्या तोंडपाठ करा, त्यांचे निरंतर पठण करा आणि त्यांचे अगदी मनापासून, विचारपूर्वक व मनमोकळेपणाने योग्य पद्धतीने पठण करीत राहा, इथपर्यंत की या प्रार्थना व याचना नि:संशय तुमच्या मनाची कामना बनाव्यात. आपल्या अल्लाहकडे मागा व निरंतर मागत राहा आणि त्याने सांगितलेल्या शब्दांतच मागा. तसेच त्याचे भक्त नेहमी ज्या गोष्टींची मागणी करतात यांचीच मागणी करा - हीच आज्ञाधारकाची प्रतिष्ठा आहे आणि हीच आहे दोन्ही जगतांची सचोटी आहे.

याचाच विचार करून कुरआन व हदीसमधील वेचक प्रार्थना या पुस्तकात एकत्रित करण्यात आल्या आहेत, परंतु या प्रार्थना वेगवेगळ्या अध्यायांमध्ये वेगवेगळ्या विषयांवर संपूर्ण पुस्तकात विखुरल्या आहेत आणि वाचकाला आवश्यकता भासल्यास त्यांचा शोध घेता घेता खूपच त्रास होतो, याकरिता येथे त्या प्रार्थनांची एक सूची अशा प्रकारे देण्यात येत आहे की अक्षरांच्या क्रमानुसार प्रार्थनेचे नाव देऊन त्यासमोर ती जिथे उद्धृत करण्यात आली आहे त्या पृष्ठाचा क्रमांक देण्यात आला आहे. अशा प्रकारे या सर्व प्रार्थना व कोणत्या क्षणी त्यांचे पठण आवश्यक आहे हे एकाच दृष्टिक्षेपात सापडतात आणि त्यांच्यापासून लाभ घेण्यात मोठी सहजता निर्माण होते.

**अ, आ, इ, ई**

उ, ऊ, ए, ऐ, ओ, औ, अं, अ:



क, ख, ग, घ, ङ



च, छ,ज, झ

ट, ठ, ड, ढ, ण



त, थ,द, ध, न



प, फ, ब, भ, म

## य, र, ल, व, श, ष, स

ह, ळ, क्ष, ज्ञ